# अनुक्रमणिका



॥ श्रीसीतारामचंद्र प्रसन्न ॥

# प्रकाशकाचें निवेदन

भक्तवत्सल श्रीसीतारामचंद्रकृपें मराठवाड्यांतील सुप्रसिद्ध कवि व रसाळ कीर्तनकार श्री. दे. ल. महाजन यांनीं गोस्वामी तुलसीदासजींच्या 'रामचरितमानसा'च्या केलेल्या ओवीबद्ध अनुवादापैकीं प्रस्तुतचा प्रथम खंड रामप्रेमी वाचकांच्या हातीं देतांना आम्हांस अतिशय आनंद होत आहे.

पंचवीस वर्षांपूर्वी श्री. महाजनांनीं त्रोटक स्वरूपांत 'मानसा'च अनुवाद केला होता. पण रसिक भक्तांच्या सुदैवानें प्रस्तुतचा विस्तृत अनुवाद नुकताच तयार झाला आहे.

कोणताहि टीकाग्रंथ मूळ संहितेसह प्रकाशित व्हावा अशी उचित परंपरा असली तरी, प्रस्तुत ग्रंथ तसा प्रकाशित व्हावयाचा म्हणजे तो कमींत कमी पांच खंडांत तरी करावा लागला असता. तसा पूर्वसंकल्पहि होता; परंतु त्यांच्या प्रकाशनास लागणारी अर्थव्यवस्था महाराष्ट्रांतील मध्यमवर्गीय बहुजनसमाजाला झेंपणें कठिण व तें कामहि दीर्घ कालावधीचें; ही अडचण ध्यानांत घेऊन दोन भागांतच ही टीका प्रसिद्ध करण्याचा निर्णय मंडळास घ्यावा लागला. या पूर्वींच्या प्रकाशित झालेल्या टीकाहि मूळ संहितेवांचून प्रसिद्ध झाल्या आहेत.

मराठवाड्यांतील काव्यक्षेत्रांत श्री. महाजनांनीं तर स्वतंत्र, परंपरा निर्माण केली आहे. नांदेडचे कवि त्रिकूट म्हणजें श्री. पार्थिव श्री. कृष्णाकुमार व श्री. वा. रा. कान्त यांनीं काव्यसंपदेची स्फूर्ति महाजनांकडूनच घेतली आहे. श्री. देव (उस्मानाबाद) आणि श्री. रामराव पिंगळीकर हेहि यांपैकींच म्हणावयास हरकत नाहीं.

श्री. महाजनांनीं मराठी भाषेची निःस्वार्थ बुद्धीनें व स्वयंप्रेरणेनें केलेली सेवा सर्वविश्रुत आहे. आपल्या काव्यानें अशी परंपरा निर्माण करणाऱ्या श्री. महाजनांच्या समग्र साहित्यप्रकाशनाच्या दृष्टीनें 'महाजन साहित्य प्रकाशन मंडळा'ची स्थापना झाली आहे. त्यांच्या साहित्यापैकीं प्रस्तुतचा तुलसीरामायणाचा अनुवाद आधीं प्रकाशित करणें आवश्यक वाटलें; आणि याच कार्यासाठीं किमान पक्षीं दहा हजार रु. खर्च येणार आहे. व्यवहारांत 'माल नगद व पैसे उधार' अशी परंपरा रूढ असतां 'पैसे आधीं व माल उधार' असा उलटा प्रकार स्वीकारून ग्रंथ हातीं येण्यापूर्वी ज्या सन्मित्रांनी विश्वासानें व प्रेमादरानें उदारपणें ग्रंथास आश्रय दिला व तो आश्रय मिळविण्यास ज्या सुहृदांनी आपुलकीनें परिश्रम घेतले, त्या सर्वांचें मंडळ आभारी आहे. निम्म्या खर्चाचा भार आतांपर्यंत जनता जनार्दनानें घेतलाच आहे व त्या साह्यापेक्षेवरच हें कार्य अवलंबून असल्यामुळें यापुढें असेंच हार्दिक सक्रिय सहकार्य जनता करील असा आम्हास विश्वास आहे.

श्री. महाजनांच्या अप्रकाशित ग्रंथसंभारापैकीं, कीर्तनोपयोगी चाळीस आख्यानें, सप्तशतीचा श्लोकबद्ध अनुवाद, श्री. शंकराचार्यांच्या अपरोक्षानुभूतीचा पद्यानुवाद, नांदेड येथील ब्रह्मीभूत श्रीरामकृष्णबापू विरचित गुरुपरंपरास्तोत्राचा श्लोकबद्ध अनुवाद (पूर्वार्ध), वंगीय श्रीकृष्णचैतन्यामृत (ओवीबद्ध), स्फुटकविता (भा. २ रा) इत्यादि ग्रंथांचें प्रकाशन प्रस्तुत मंडळाच्या वतीनें करावें असा आमचा मानस आहे; आणि हें कार्य अतिशय मोठें असल्यामुळें जनतेच्या साह्यावरच त्याची यशस्विता अवलंबून आहे.

प्रस्तुत ग्रंथाची मुद्रण प्रत तयार करण्याच्या व दृकशुद्धीच्या कामीं श्री. गोळेगांवकर यांनीं श्रम घेतल्याबद्दल त्यांचें, व मराठवाड्याच्या अभिजात अभिमानानें मुद्रणाचें कार्य शक्य तितक्या लौकर होण्यासाठीं जी आपुलकी व्यक्त केली त्याबद्दल श्री. आ. कृ. वाघमारे व जयहिंद प्रेसचे व्यवस्थापक श्री. जगन्नाथराव बर्दापूरकर या उभयतांचें मंडळ अत्यंत आभारी आहे.

या कार्याचें महत्त्व ओळखून महाराष्ट्रांतील रसिक जनतेनें सहृदयतेनें ही सेवा गोड करून उत्तरोत्तर या कार्यास साह्य करावें अशी विनंती करून हें निवेदन पुरें करतों.

मु. नांदेड
गणेशचतुर्थी
श. १८७७

आपलें नम्र,
**म. सा. प्र. मंडळ**

# माझें मनोगत!

दोन अडीच तपांनंतर का होईना, स्वप्नसृष्टींतील 'मानसविहार' सत्यसृष्टींत उतरून सर्व महाराष्ट्रीय जनतेच्या दृष्टिपथांत येत आहे, हें मी माझें महद्‌भाग्य समजतों. खरें पाहतां 'मानस–विहार' स्वतः श्रीतुलसीदासांनीं म्हटल्याप्रमाणें मुख्यतः स्वांतःसुखाय लिहिला असला तरी त्याचा लाभ इतरांनाहि होण्याचा योग येणें, केवळ त्यास लागणाऱ्या सोयींचीं साधनें अनुकूल असण्यावरच अवलंबून आहे; असें निदान मी तरी म्हणणार नाहीं. हें कांहीं मी निराधार सांगत नाहीं. तुम्हीच पहा ना! श्रीएकनाथ महाराज व श्रीदासोपंत हे उभयतां समकालीन; पारमार्थिक महान् वाङ्मयाचे निर्माते संतकवि; उभयतांची भक्तिज्ञानवैराग्ययुक्त तपश्चर्या परमकोटीची; भगवत्कृपेचा लाभ उभयतांनाहि झालेला; दोघेहि 'स्वानुभूतवासाचें दान' करण्यास समर्थ; पण दोघांनाहि आपलें वाङ्मय घरोघरीं पोंचवण्याला आतांप्रमाणें त्या काळीं सोयीचीं साधनें अनुकूल नव्हतीं; तरीहि श्रीनाथांचें वाङ्मय महाराष्ट्रांत प्रायः सर्वत्र प्रसार पावावें व चार शतकें लोटूनहि श्री दासोपंतांच्या पासोडीचा जीर्णोद्धार करण्याचा आतां कुठे प्रसंग यावा, ही ऐतिहासिक घटना नेहमीं माझ्या दृष्टीपुढें उभी असते. मग सांगा. पारतंत्र्याच्या अंधारांत लिहिलेल्या माझ्यासारख्या सामान्य सेवकाचें लिखाण स्वातंत्र्याच्या प्रकाशांत मूर्तरूपाला येण्याची जी स्वप्नांतहि कल्पना नव्हती ती साकार झालेली मी प्रत्यक्ष पाहात आहे; तेव्हां हें मीं माझें महद्‌भाग्य असें कां बरें म्हणूं नये?

## थोडा पूर्व वृत्तान्त

मी विद्यार्थी असतांना आईच्या आग्रहानें 'हरिविजय', 'पांडव-प्रताप' हे श्रीधरांचे लोकप्रिय ग्रंथ घरीं प्रतिवर्षीं तिला वाचून दाखवीत

असे. एका वर्षी श्रीधरांचाच 'रामविजय' वाचण्याची इच्छा मीं बोलून दाखवली. त्यावेळीं ती म्हणाली, "नको नको. रामविजय आपल्या घरीं धार्जिण नाहीं, म्हणून वाचूं नये." त्या वेळीं या तिच्या म्हणण्यांतील गर्भित हेतु माझ्या मुळींच ध्यानांत आला नाहीं. पण रामविजय वाचण्याचा आग्रह मात्र मीं धरला नाहीं. पुढें बऱ्याच वर्षांनंतर मला समजलें कीं, माझे वडील हरिविजयाप्रमाणें रामविजयहि वाचीत असत. त्या वेळीं घरांत लक्ष्मी आपल्या ऐश्वर्यानें नांदत होती. नित्याच्या गोदावरीच्या स्नानाला जावयाचें तर आई म्यान्यांत किंवा पालखींत बसून जात असे. परंतु 'तेहि नो दिवसा गताः' असें जेव्हां तिला दिसून आलें, सत्ता. वैभव सर्व कांहीं अदृश्य होऊन वैधव्यांत व निपुत्रिक अवस्थेंत, माझ्यासारख्या जन्मतांच जन्मदात्रीचा बळी घेणाऱ्या अभागी व अनाथ अर्भकाला पोटशीं धरून जीवन कंठावें लागलें, एवंच साऱ्या सुखाच्या संसाराचा वनवास झाला; तेव्हां आयुष्यांतील या परिवर्तनानें तिच्या मनावर परिणाम होऊनच वनवासाच्या दुःखांनीं भरलेला रामविजय नको असें तिला वाटणें स्त्रीस्वभावाला धरून स्वाभाविकच होतें. आणि म्हणूनच तो वाचूं नये असें तिनें मला सांगितलें. या तिच्या इच्छेला अनुसरून मी अद्यापिहि रामविजय कांहीं हातीं धरला नाही !

## आश्चर्यजनक घटना !

वेडी आई, त्या वेळीं तिला काय कल्पना कीं, ज्याला आपण रामविजयाला हातहि लावूं नको असें सांगितलें, मर्यादापुरुषोत्तम भगवान् सीतारामाच्या आदर्श चरित्रापासून वंचित केलें, त्याच्याच हातून संपूर्ण रामचरित्र नुसतें वाचलेंच नव्हें तर लिहिलें जाणार आहे. इतकें कशाला, तिला वेडी म्हणून म्हणणारा स्वतः मी–मला तरी त्या वेळीं श्रीरामयशोगायनाचें भाग्य आपणाला लाभणार आहे याची कुठें कल्पना होती ? परंतु,

चौः राम कीन्ह चाहहि सो होई
करै अन्यथा अस नहि कोई

## मानस-मार्ग-दर्शक

बऱ्याच वर्षांपूर्वी येथें तामिरात खात्यामध्यें

### श्री. लाला रघुबीर दयाल

या नांवाचे एक ओव्हरसीयर होते. ते फारसी भाषेंतहि निष्णात असल्यामुळें बरेच विद्यार्थी त्यांच्याकडे शिकावयास येत असत. त्यांत मीहि एक होतों. शिकून बाकीचे विद्यार्थी गेल्यानंतर त्यांनीं मला बसवून घ्यावें; व तुलसीरामायण मोठ्या प्रेमानें ऐकवावें. पण त्या वेळीं मला तें मुळींच समजूं नये तरीहि पण त्यांनीं तें समजावून सांगावें. ते स्वतः निस्सीम रामोपासक होते. त्यांना माझ्याविषयीं काय वाटत होतें तें त्यांचें त्यांनाच माहीत, मात्र मजवर त्यांचें पुत्रवत् प्रेम होतें. रामचरित्राची गोडी तुलसीरामायणाच्या वाचनानें त्यांनींच मला लावून दिली.

प्रत्येक भाषेंतील साहित्यांत कांहीं उच्च कोटीचे ग्रंथ असतात, व ते अत्यंत लोकप्रिय होतात. आपल्या भारतांत उत्तरेस हिंदी भाषेंतील 'तुलसीरामायण' व महाराष्ट्रांत 'ज्ञानेश्वरी' हे दोन ग्रंथ असेच लोकप्रिय आहेत. या दोन्ही ग्रंथांच्या लोकप्रियतेचें एक आश्चर्यकारक गमक म्हणजे त्यांचीं नांवें ग्रंथकर्त्यांनीं दिलेलीं अनुक्रमें 'श्रीरामचरित मानस' व 'भावार्थदीपिका' अशीं असून तीं अल्प परिचितच राहिलीं व दोन्हीहि ग्रंथकर्त्यांच्या नांवांनीं प्रसिद्धीला पावलीं. दोन्हीहि ग्रंथांचीं भाषांतरें अन्यान्य भाषांत झालीं व होत आहेत. तुलसीरामायणाचें भाषांतर रशियन भाषेंत झाल्याचें मागेंच प्रसिद्ध झालें. ज्ञानेश्वरीचें इंग्रेजींत भाषांतर झालें आहे. यू. नोच्या ग्रंथसंग्रहाकरितां हिंदी भाषेंतील तुलसीरामायणाची व मराठी भाषेंतील ज्ञानेश्वरीची निवड झाली आहे. असो.

त्यांपैकीं तुलसीरामायण हा ग्रंथ जुन्या व कठिण हिंदी भाषेंत असल्यामुळें महाराष्ट्रीय जनता बहुधा त्याच्या रसास्वादापासून वंचितच राहिली. तथापि बऱ्याच वर्षांनीं नागपूरच्या कै. श्री. जामदारांचें

मराठी तुलसीरामायण माझ्या पाहण्यांत आलें. तें मी आवडीनें कितीदां तरी वाचीत असतांच त्याचा मराठी पद्य अनुवाद करावा अशी इच्छा झाली. तोंच त्या भाषांतराच्या आधारानें पूर्ण ग्रंथाचा ओवीबद्ध अनुवाद रचूनहि घेतला. पण वाचनानें मूळ ग्रंथांतील भाषेचा उत्तरोत्तर परिचय जसजसा होऊं लागला तसतशी अनुवादांतील रचना चौपाईच्या अनुक्रमानें मागें पुढें झालेली आढळून आली. तेव्हां कल्पना सुचली कीं, चौपाईच्या अनुक्रमानें ओंव्या रचल्या गेल्या तर फारच बरें. आणि मग काय ? पुन्हां आरंभापासून प्रस्तुत ग्रंथाच्या पद्धतीनें नवीनच रचना करण्यास सुरुवात केली. सवडी सवडीनें तोहि संकल्प श्रीरामानें तडीस नेला. मात्र श्री. जामदारांचें मजवरच नव्हे तर अखिल मराठी भाषिकांवर चिरकालिक ऋण झालें आहे, असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं.

श्रीतुलसीरामायणावर वरील गद्य टीकेनंतर नुकतेच डॉ. श्रीखंडे व श्रीप्रज्ञानानंद सरस्वती यांचे अनुक्रमें श्लोकबद्ध व समवृत्ताचें टीका ग्रंथ[1] प्रसिद्ध झालेले पाहून दोन तपांपूर्वी लिहिलेल्या या ग्रंथाच्या प्रकाशनांत स्वारस्य तरी काय अशी प्रसिद्धिपराङ्मुखतेची अंगीं जडलेली वृत्ति मधून मधून मनाला डांचूं लागली. परंतु प्रभूच्याच मनांत आलें आणि– काय झालें ? ग्रंथच तुमच्या हातीं आला.

काव्यकीर्तनाच्या प्रेमळ छंदानें जनताजनार्दनाची सहानुभूति मिळविण्याची पात्रता श्रीरामकृपेनें प्राप्त झाल्याचा आत्मविश्वास वाटूं लागला. तोंच माझ्या प्रेमळ मित्रांनीं माझ्या साहित्याच्या प्रकाशनाचा संकल्प करून मंडळहि स्थापन केलें व प्रस्तुत ग्रंथहि प्रकाशांत आणला.

छपाईच्या व्यवस्थेच्या निमित्तानें पुण्यास गेलों होतों. मोंगलाईतील मराठवाड्याच्या कवि, लेखक, संशोधक अशा साहित्यप्रेमी माणसां-

---

१. संगमनेरचे कै. केशव लक्ष्मण टेंभुर्णीकर हेहि मानसावर ओवीबद्ध टीका लिहीत होते. एक–दोन अध्यायहि त्यांनीं मजकडे पाठवून दिले होते. मीं माझे २।३ विश्राम त्यांना सादर केले होते. केसरींतून उतारे देऊन त्यांच्या टीकेचा पुरस्कारहि करण्यांत आला होता. पण अकाली मृत्यूनें तो त्यांचा संकल्प पुरा झाला किंवा नाहीं, हें मात्र कळलें नाहीं.

विषयीं ज्यांना अत्यंत आपुलकी वाटते, अशी उदार व प्रेमळ अंतःकरणाची व्यक्ति म्हणजे, विद्वत्तेच्या माहेरघरीं-पुण्यांतच नव्हे तर आतां अखिल भारतांत प्रसिद्धि पावलेले महामहोपाध्याय श्री. दत्तो वामन पोतदार यांना भेटून पुस्तकाच्या पुरस्काराविषयीं विनंति मोठ्या धाडसानें केली. आश्चर्य हें कीं, कांहींहि संकोच न करतां व विलंब न लावतां ती त्यांनीं आनंदानें मान्य केली. इतकेंच नव्हें तर 'अंगीकृतं सुकृतिनः परिपालयन्ति' या ब्रीदाप्रमाणें चार शद्ब लिहून प्रेमानें व कौतुकानें ग्रंथाचें स्वागत केलें. अनेक व्यापांनीं गुंतून गेलेल्या त्यांच्या उपकृतीचा मी आजन्म ऋणी आहे. थोरांचा आशीर्वाद घ्यावा या इच्छेनें पूज्य विनोबाजी भावे यांना विनंति केली व त्यांनींहि-निरंतर भूदान यज्ञाच्या अभिनव साम्ययोगांत मग्न असतांहि आपला आशीर्वाद त्वरित पाठविला. या उपकृतीच्या आनंदांत माझी विनंति त्यांच्या चरणाजवळ पोंचविणारे त्यांचे सहकारी श्री. अच्युतभाईजीहि सहभागी आहेत. तसेच श्री. धर्मभास्कर पांचलेगांवकर महाराजांनीं बालपणाच्या निरागस स्नेहाची आठवण ठेवून माझ्या कृतीचें कोडकौतुक केलें. या उभयतांच्या ऋणांतून मुक्त होण्याचें सामर्थ्य माझ्या अंगीं नाहीं.

श्री. संतकवि दासगणू महाराजांच्या आशीर्वादाची या प्रसंगींची माझी अपेक्षा आयत्या वेळीं पूर्ण होऊं शकली खरें सांगावयाचें तर, माझें सारें साहित्य त्यांच्याच आशीर्वादाचें प्रतीक आहे.

मंडळाकडून ज्यांचे आभार मानले गेले त्यांत मीहि व्यक्तिशः समाविष्ट आहे, हें निराळें सांगणें नको.

शेवटीं ज्या दयाघन सीतारामचंद्रानें आपलें गुणगान करविलें व प्रस्तुत पहिला भाग प्रकाशनांतहि आणला तोच 'बोलविता धनी' दुसरा भाग व इतर साहित्य प्रकाशांत आणण्याविषयीं जनतेच्या हृदयांत प्रेरणा करो, अशी नम्रपणें प्रार्थना करून हें माझें मनोगत येथेंच संपवितों.

बीड
आषाढी एकादशी
शके. १८७१

संतांचा दासानुदास
देवीदास लक्ष्मण महाजन.

# थोरांचे आशीर्वाद, पुरस्कार व अभिप्राय

स्थायी पत्ता–उत्कल भूदान समिति
बारियापाही (ओडीसा)
८–६–५५

श्री. महाजन,

आपल्या 'मानस–विहाराला' प्रस्तावनेदाखल मी चार शब्द लिहावे अशी आपण इच्छा दर्शविली ती मी आनंदानें मान्य करीत आहे!

रामायण हा आमच्या देशाचा कौटुंबिक ग्रंथ आहे! कुटुंबांत वाचावयाचें म्हणजे रामायणच!

'वाल्मीकिच्या जन जसा तृप्तिस पावे कुळांसकट कवनीं'–असें मोरोपंतानें उगीच नाहीं म्हटलें! इतकी अवीट कथा सर्व जगांत दुसरी झाली नाहीं. आपल्या देशांत अशी कोणतीच भाषा नाहीं, जिच्यांत एकाधिक कवींनीं रामकथा गायिली नाहीं.

आपल्या मराठींत एकनाथांचें 'भावार्थ रामायण,' जें अर्धवट राहिलेलें गावबानें बेमालूम पूर्ण केलें आहे, मराठी भाषेचा एक अलंकार आहे. तो केवळ त्याच्या वजनामुळें लोकांना झेंपत नाहीं. त्याचा संक्षेप कुणी तयार केला, तर गावबाचा त्याला आशीर्वाद लाभेल. पण गांवोगांवच्या गावबांचा आशीर्वाद पटकावून चुकला श्रीधर. श्रीधराचा रामविजय लहानपणीं आम्हीं किती हौशीने वाचला पण आतां ती परंपरा तुटत चालली.

आधुनिक काळांत चिंतामणराव वैद्यांचें 'रामचरित्र' गद्य असलें तरी पद्याहून कमी गोड नाहीं; आणि तें घरोघर एवढ्याचसाठीं वाचलें

जात नाहीं, कारण आपण घरगुती कामें अलीकडें शाळेवर ढकलून दिलीं आहेत.

मोरोपंतानें रामायणाचा जो ध्यास धरला त्याला तुलनाच नाहीं. त्याच्या विशिष्ट भाषाशैलीमुळें त्यानें लिहिलेलीं एकशेंआठ रामायणें लोकांत पसरायचीं नाहींत, पण त्याला त्याची पर्वाच नाहीं. 'परंतु रामायणांत' पहिलाच परंतु त्यानें असा घातला आहे.

श्रीरामचरित करितें मुक्त सकृत्
किमपि सेवितां भावें।
पार न लागे दशशत वदनांहि
परंतु वाटतें गावें।

रामायण तसें रामदासांनींहि लिहिलें आहे. नसतें लिहिलें तरच आश्चर्य. पण तें त्यानीं 'रामायण' लिहिलें म्हणण्यापेक्षां 'हनुमंतायन' लिहिलें म्हटलें पाहिजे. कारण सीताहरणापासून सीता-मोचनापर्यंतच मजकूर त्या रामायणांत त्यांनीं घातला आहे. पंचवटींतील पुरश्चरणाचा हा परिणाम समजला पाहिजे. रामायण गाऊनच तृप्त होऊं नये. तें आचरणाचाहि यत्न करावा, अशी रामदासांची अपेक्षा आहे.

भजावा जनीं पाहतां राम एकू
करीं बाण एकू, मुखीं शद्ब एकू
क्रिया पाहतां उद्धरे सर्व लोकू
धरा जानकी-नायकाचा विवेकू

रामायणप्रेमाचा आढावा इतर भाषांचाहि असाच विस्तृत होईल पण रामायणी-लेखकांत तुलसीदासांची करामत अद्वितीयच समजली पाहिजे. तुलसीदासांचें 'रामचरित-मानस' हा हिंदी भाषिकांचा धर्मग्रंथ झाला आहे. अरबींत कुराण, तमीळ भाषेंत कुरळ किंवा मराठींत ज्ञानेश्वरी यांना जी पदवी लाभली, ती तुलसीरामायणाला हिंदींत लाभली. आणि आज हिंदीभाषा राष्ट्रभाषा झाल्यानंतर त्याची व्याप्ति हिंदी भाषिकांपुरती मर्यादित न राहतां अखिल भारताचा तो ठेवा झाला आहे.

तुलसीरामायणाची कदर करण्यांत मराठी भाषा इतर भाषांच्या मागें राहिली नाहीं.

श्री वाल्मीकिच झाला
श्री तुलसीदास राम-यश गाया।

असा प्रांजळ अभिप्राय मोरोपंतानें केव्हांच प्रकट केला आहे. जामदारांनीं मूळ रामचरित-मानस सुंदर मराठींत भाषांतरासह चाळीस बेचाळीस वर्षांपूर्वी मराठींत प्रकाशित केलें. त्याहून अधिक चांगली आवृत्ति हिंदी भाषेंतहि माझ्या पाहण्यांत आली नाहीं. जामदारांनीं 'मानस हंस' म्हणून रामायणाचें रसिकावलोकनकरणला सुंदर ग्रंथहि लिहिला आहे. नुकतेंच रामायणाचें पद्यमय भाषांतरहि मराठींत केलें गेलें आहे. माझ्या तें वाचण्यांत आलें नाहीं. पण त्याचा थोडासा उतारा जो पाहण्यांत आला त्यावरून मनोयोग-पूर्वक तें रचलें गेलें असलें पाहिजे अशी माझ्यावर छाप पडली आहे. आतां तुम्ही ओवी छंदामध्यें हा नवीन 'विहार' ग्रंथ मराठी वाचकांना देत आहांत. लोकांना आवडण्यासारखेंच तुमचें हें काम झालें आहे. इतर छंदापेक्षां ओवी छंदांतलें लिहिणें साहजिकच समजायला सोपें जातें.

प्रस्तुत दोन कांडें तुम्हीं प्रकाशित करीत आहांत. दम धरून पुरें काम रेटून न्याल, आणि 'कधीं प्रपंचाचा सोस,' कधीं 'किंकर्तव्यमूढ,' कधीं 'देशोद्धार-चिंता' ( पृष्ठ १०१ ) असें होऊं देणार नाहीं, अशी आशा करतों.

ग्रंथाची भाषा साधी आणि ओघवती आहे. अनुवाद करण्यांत कुचराई झालेली नाहीं ही आनंदाची गोष्ट आहे. पदरचा घातलेला मजकूर मध्यें कंसांत दाखविला आहे त्याऐवजीं तो पृष्ठाखालीं अलग दर्शविला असतां तर अधिक बरें झालें असतें. छपाईच्या चुका मात्र दिसतात. त्यांचें शुद्धिपत्र न देतां गीता प्रेसवाले करतात त्याप्रमाणें तितक्या दुरुस्त्या हातानें करून शुद्ध प्रतच वाचकांच्या हातात देणें चांगलें होईल-

शांतिरस्तु, मनस्तुष्टिरस्तु, चित्तशुद्धिश्चास्तु

**विनोबाचे प्रणाम.**

॥ श्रीशंकर ॥

# संत कवि श्री. दासगणु महाराजाचा आशीर्वाद

श्री. विठ्ठल मंदिर
उमरी जि. नांदेड
रविवार अधिक भाद्रपद वद्य दशमी
शके १८७७

श्री. वे. ल. महाजन यांस :-

आपलें रामायणावरील ओंविबद्ध काव्य पाहिलें. अनुवाद रसाळ उतरला आहे. तुलसी रामायणावर जीं कांहीं चांगलीं पुस्तकें मराठींत उपलब्ध आहेत त्यांत आपल्या ग्रंथास मानाचें स्थान द्यावें लागेल. तुलसी रामायणांतील भावही मराठी ओंव्यांतून उत्तम तऱ्हेनें प्रकट केला आहे. विषयाशीं तादात्म्य झालेलें असल्यावांचून अशी गोडी अनुवादांत येणें शक्य नाहीं. आपल्या प्रेमळ आणि भाविक हृदयाची साक्ष ग्रंथ वाचीत असतांना पदोपदीं पटते. भाषांतर मधुर आहेच. महाजनांचीच भाषा ती ! नांवाप्रमाणेंच गंभीर पण ललित असली पाहिजे. आपल्या आजवरच्या सरस्वतीच्या सेवेचें हें श्रेष्ठ दर्जाचें फळ आहे असेंच म्हणावेसें वाटतें. आपल्या हांतून ही ईशसेवा पूर्ण होवो.

सकल संताचा चरणरज,

— दासगणु

'सुश्लोक मानस' कर्ते

# डॉ. श्रीखंडे यांचा अभिप्राय

श्री तुलसीमंजरी
बेलबाग
मंगळवार-कोल्हापूर
दि. ६-९-५५

कविवर्य श्री. देवीदास यांना सादर-

सा. न. वि. वि.

म. म. पोतदार यांचेकडे आपल्या प्रकाशित होणाऱ्या तुलसी-रामायणाच्या ओवीबद्ध अनुवादाचीं पृष्ठें पाहिलेलीं होतीं. आपला समग्र ग्रंथ केव्हां प्रकाशित होणार तें समजावें. आपल्या ग्रंथांतील मी थोडावेळ जो भाग चाळला त्यावरून आपला ओवीबद्ध ग्रंथ मोठ्या भक्तिभावानें आपण रचला आहे, अशी माझी भावना झाली व आनंद झाला.

आपला

**रामचंद्र चिंतामण श्रीखंडे**

## धर्म भास्कर श्री. संत पांचलेगांवकर महाराज

दि. १२–६–५५

भगवत्सेवा बुद्धीनें– व्यवसायबुद्धीनें नव्हें–कीर्तन करणारे व 'आख्यानरत्नमाले'चे संपादक असे आमचे परममित्र श्रीमान् कविवर्य महाजन यांनी अत्यंत परिश्रमपूर्वक अनेकविध साहित्य तयार केलें आहे; व त्याद्वारां जनतेंत सामष्टिक भगवदभाव व दंभनिरपेक्ष सांस्कृतिक प्रेम निर्माण केलें आहे. यांच्या अनेक ग्रंथांपैकीं 'मानसविहारा'चा पहिला भाग 'महाजन साहित्य प्रकाशन मंडळाच्या द्वारां छापला जात आहे..... तरी जनतेनें भगवद्भक्तियुक्त साहित्य संपत्तीची उपेक्षा न करितां सढळ हातांनी, व्यावहारिक अडचणी सहन करून उपर्युक्त सत्कार्यास साह्य करावें व जगच्चालक परमेश्वरानें त्यांच्या तपश्चर्येस व मंडळास यश द्यावें, अशी प्रार्थना करून हा संदेश संपवितों.

आपला

नृसिंह संचारेश्वर पांचलेगांवकर.

## गवर्नमेंट सिटी हायस्कूल

औरंगाबाद दि. २–२–५५

श्री. दे. ल. महाजनने श्री.तुलसीदास की मौलिक रचना का जो अनुवाद किया है वह इस क्षेत्र में एक अप्रतिम प्रयत्न है...... मैंने श्री. महाजन के अनुवाद के कुछ प्रसंग पढे, जिनमे प्रतीत होता कि आप हिंदी और मराठी पर अच्छा प्रभुत्व रखते हैं और आपमें एक अच्छे कवि की क्षमता भी है..... अत: आपका यह काव्य अधिक रुचिकर और लोकप्रिय होगा ऐसी आशा है। जनता इसका समुचित आदर करेगी.

जगमोहनलाल चतुर्वेदी

प्रिन्सिपाल हैदराबाद एज्युकेशनल सर्विस

**गौळीगुडा, भागानगर**

मि. मार्गशीर्ष व. १२ शके १८७२

श्री. महाजन हे मराठवाड्यांतील एक ख्यातनाम कवि आहेत... हिंदी आणि मराठी या दोन्ही सोदर भाषा आहेत म्हणून एका भाषेंतील भाव दुसऱ्या भाषेंत प्रकट करण्यांत कांहीं काठिण्य नाही, असें म्हणणें पूर्णपणें उचित नाहीं. बाह्यस्वरूप व सामान्य अर्थ व्यक्त करण्यापुरतें हें खरें आहे; परंतु प्रत्येक भाषेचे आंतरिक भाव भिन्न असतात आणि ते आपल्या स्वतंत्र प्रणालीनें व्यक्त होतात... श्रीमान् महाजनांची ही रचना लक्ष्यपूर्वक वाचल्यास आढळून येतें कीं, ते हिंदी भाषेचें रहस्य सहजपणें समजूं शकतात व तें मराठींत सरळपणें व्यक्त करूं शकतात... श्री तुलसीदासजींच्या भक्तिपर भूमिकेचें आकलन केल्यशिवाय त्यांच्या शद्वाभोंवतीं जें भावनावलय आहे, त्याचें उत्कृष्ट अवगाहन होऊं शकत नाहीं. श्री. महाजन स्वतः श्रद्धाळू व आचारसंपन्न असल्यामुळें त्यांनीं केलेला 'मानसांतील' प्रवेश एका विशिष्ट मर्यादेपर्यंत सफल झालेला दिसून येतो... महाजनांची ही रचना निःसंशय उच्च श्रेणीची आहे. हिच्या प्रकाशनानें मराठी ग्रंथभांडारांत एका उत्कृष्ट ग्रंथाचा समावेश होणार आहे; आणि मराठी भाषिकांचें लक्ष्यहि हिंदी भाषेकडे आकृष्ट होणार आहे. इत्यलम् (अनुवाद)

**डॉ. नारायणराव नांदापूरकर**
एम्. ए. पीएच्. डी.
लेक्चरर उस्मानिया युनिर्वासिटी
हैद्राबाद.

**गोरखपूर**

वै. व. १३।२०२१

प्रिय महोदय,

सप्रेम हरिस्मरण, आपका 'श्रीरामचरितमानस' का मराठी पद्यानुवाद का नमूना मिला। धन्यवाद! आपका अनुवाद बहुत सुंदर है और आपका श्रीरामचरितमानस के प्रति प्रेम तो सर्वथा प्रशंसनीय है.... आपके कार्यसे हमारी पूरी सहानुभूति है। आप धन्य हैं।

शेष प्रेम

भवदीय
हनुमानप्रसाद पोद्दार
(संपादक कल्याण)

एक तर कासार आहे व दुसरा मराठा असावा. पण महाराष्ट्रीयेतर नाहींत. यावरून तुलसीभक्ति आणि तुलसीकाव्यांचा अभ्यास महाराष्ट्रांत अगदीं जनतेमध्यें जाऊन स्थिर झाल्याचें प्रमाण मिळतें.

म. रा. भा. सभेच्या संग्रहीं तुलसीरामायणाची उर्दू लिपींत लिहिलेली ९६ सुंदर रंगीत चित्रें असलेली अशीहि एक अपूर्व व दर्शनीय वस्तु आहे!

जुन्या पठडीच्या महाराष्ट्रीय कीर्तनकारांचे तोंडीं कबीर-तुलसीदास-मीराबाई प्रभृति संतांचीं वचनें हटकून आढळत असत. श्री. दे. ल. महाजन हेहि कीर्तनकला चांगल्या प्रकारें जाणतात.

जुना काळ सोडून आपण आधुनिक काळांत आलों तरी तेथेंहि आपणांस महाराष्ट्रांतील प्रकाशकांनी तुलसीकबिरांचे लहानमोठे ग्रंथ छापलेले आढळतात. कबीरांचीं पदें व दोहे अनेक जणांनी छापलेले आहेत. मुंबईच्या कित्येक मराठी प्रकाशकांनी शिळाछापावर हिंदी संतांची कविता छापलेली आढळते.

अलीकडील तीस-पसतीस वर्षांच्या काळांत नागपुरचे कै. श्री. जामदार आणि पुण्याचे श्री. शंकर गजानन पुरोहित यांनीं इ.स. १९१९ मध्यें श्री तुलसीरामायण मूळ मराठींत सरळ अर्थ देऊन छापून प्रसिद्ध केलें. नंतर श्री. जामदारांनी तुलसीरामायणाच्या परामर्षाचा एक लहानसा ग्रंथहि प्रसिद्ध केला. नंतर थोड्याच दिवसांनी ग्वालेराचे श्री. गणेश सदाशिव भोपटकर यांनीं तुलसीरामायणाचा दोहा, सोरठा वगैरे वृत्तांत पण मराठींत पद्यात्मक अनुवाद करून पसिद्ध केला. श्री. भोपटकर यांचा रोखच पारमार्थिक आहे. परवा परवां तुलसीरामायणा-संबंधाचा तिसरा प्रसंग कोल्हापुरचे रसिक कवि डॉ. श्रीखंडे यांच्या ईर्ष्येमुळें सांगतेला गेला. डॉ. श्रीखंडे यांनी समग्र रामचरितमानस मराठींत सुश्लिष्ट श्लोकांत ग्रथित करून शेवटास नेलें. हें भाषांतर मोठें सरस उतरलें आहे. त्याच्या शेवटच्या भागाचें प्रकाशन नुकतेंच गेल्या गेल्या पाडव्याच्या सुमुहूर्तावर झालें.

आणि लगोलग श्री. देवीदास महाजन यांचा **मानसविहार** आज प्रसिद्ध होत आहे. मानसविहार ओवीबद्ध आहे. भोपटकराप्रमाणें समवृत्ताचें किंवा श्रीखंडयांप्रमाणें श्लोकबद्धतेचे बंधन श्री. महाजन यांनीं स्वीकारलें नाहीं. त्यांनी प्राचीन धांवत्या ओवीवृत्ताचा अवलंब केला आहे. त्यामुळें एक तर काव्यौघाला वेग लाभला आहे. श्री. देवीदास सराईत कवी आहेत. भाषेवर त्यांचें चांगलें प्रभुत्व आहे. त्यांचे ठिकाणीं ठाईंचाच भक्तीचा रंग आहे. त्यांचा हेतु तुलसीदासांच्या विख्यात काव्याचें मर्म उकलून दाखविण्याचा असल्यानें त्यांनी त्या कामास उचित अशा ओवी वृत्ताचा आश्रय केला आहे आणि म्हणून विस्तारानें कवीच्या मनोगताचें स्पष्टीकरण करणें त्यांस सहजच सुलभ झालें आहे.

श्री. देवीदासांची ओवी प्रासादिक आहे. कोठेंहि ती अडखळत नाहीं. यामुळें वाचतांना वाचकाचें मन प्रसन्न राहतें.

आधींच रामकथा गोड. कितीहि वेळां वाचली तरी कंटाळा येत नाहीं. म्हणून पंतांचें म्हणणें कीं–

"श्रीरामायण गायिलें तरि पुनः गावेंचि ऐसें करी।"

तसेंच वाचकहि ते पुनः पुनः वाचावें असें इच्छितो आणि पंतांप्रमाणेंच म्हणतो–

"वाचा वाचाया बहु झड घाली ग्रंथ सत्य नांवाचा।"

अशी गोड रामकथा तुलसीदासांच्या लेखणीमुळें अतिमधुर झाली आहे. या तुलसीकृत माधुरीचें सत्त्व मराठी वाचकाला सहजासहजी हस्तगत व्हावें या हेतूनें श्री. देवीदासांनी मानस–विहाररचना योजिली आणि अत्यंत यशस्वी रीत्या तडीस नेली.

श्री. देवीदासांनी नुसतें जुनें ओवीवृत्त अवलंबिलें आहे असें नव्हे तर श्रीधरमहिपतीची पठडी आधुनिक काळीं पुढें चालविणारे त्यांचेच देशबंधु ह. भ. प. संत दासगणू यांची आठवण होईल असें यश मिळविलें आहे.

हा ग्रंथ अनुवाद आहे; अर्थात् येथें कवीच्या प्रतिभेला स्वैरसंचार करतां येत नाहीं. पण निराळेंच कौशल्य प्रगट करावें लागतें. श्री. देवी-

दास यांनी तुलसीदासांच्या भावगर्भ स्पष्टीकरणास्तव जागोजागीं विवरणात्मक विस्तार पुरवणीदाखल समाविष्ट केलेला आहे. त्यामुळें ग्रंथाचें मर्म समजून घेण्यास सोय झाली आहे. असें बंधन असलें तरी एखाद्या वेळीं जेव्हां भावना उचंबळून जाते त्या वेळीं माणूस पत्करलेलीं बंधनेंहि क्षणभर विसरतो. श्री. देवीदास यांना मातृभाषेच्या अभिमानाचें जें सात्विक स्फुरण चढलें आहे त्याचा सात्विक आविष्कार अनावर होऊन प्रगट झाला आहे. पहिल्या सोपानांतील तिसऱ्या विश्रामाच्या प्रारंभीं हें गोड मातृभाषास्तवन आलेलें आहे. आणि त्यांत 'माता मर्त्य भाषा अमर' या शद्बांत जन्मदात्या मातेपेक्षांहि पिढ्यानपिढ्या जीवन देणारी मातृभाषा अधिक थोर असल्याचें स्थापित केलें आहे. मराठवाड्यानें मातृभाषेचा अभिमान किती जागरूक ठेविला आहे याची प्रतीति या उद्गारांनी आल्यामुळें धन्यता वाटते.

तुलसीवाङ्मयावर अनेक जुन्यानव्या टीकाकारांनी, भाष्य-कारांनी परिश्रम केलेले आहेत. अलीकडे चिकित्सा पद्धतीनें तुलसी-साहित्य, तुलसीचरित्र आणि तुलसीकाव्यसंपत्ति यांची चिकित्सा करणारे अनेक प्रबंध हिंदींत आणि इंग्रजी भाषेंत प्रसिद्ध झालेले आहेत. या चिकित्सकांत विधर्मी विद्वान देखील आढळतात. परंतु तुलसी-काव्याची महत्ता सर्वांनी एकमुखानें स्वीकारली आहे.

श्री. देवीदासांनी अथात् 'मानस–विहाराची' रचना भक्ति-भावाच्या परिपोषासाठींच केली आहे. यामुळें येथें तार्किक चिकित्सेला वावच त्यांनी ठेविला नाहीं. किंबहुना अशा सोंवळ्यांत तसलें ओंवळ खपलेंच नसतें. तसें करणें विसंगत झालें असतें.

मूळ तुलसी–वाणी आणि समोर मराठी छाया अशी एकत्र घ्यावी हा विचार भोपटकर–श्रीखंडे–महाजन तिघांनीहि मनांत इच्छा असूनहि ग्रंथविस्तारभयास्तव सोडून दिला आहे. तुलसीसंहिता सुलभ्य आहे. ती वाचकांनी घ्यावी आणि मग छायेचा रसास्वाद घ्यावा.

'कांड' ही परिचित भाषा जरा बाजूला ठेवून श्री. महाजन यांनीं कांडाला सोपान आणि अध्यायाला 'विश्राम' अशा संज्ञा दिल्या आहेत.

या पहिल्या भागांत बाल व अयोध्या हीं दोन प्रथमकांडें समाविष्ट झालेलीं आहेत. पुढील भागांत उर्वरित कांडाचा समावेश होणार आहे.

प्रस्तुत 'स्वराज्य' आहे. 'रामराज्य' ही संज्ञाहि याला पर्याय म्हणून लोकरूढ आहे. अशा वेळीं रामचरित–मानसांत विहार करण्याची संधि मराठी वाचकांना मानस–विहारकर्त्यांनी आणून दिलेली आहे. हें समयोचितच कार्य त्यांनी साधिलें असें म्हणावयास चिंता नाहीं. एका भाषेंतील उत्तमोत्तम ग्रंथरत्नें अन्य भाषाभाषियांना त्यांच्या भाषांत उपलब्ध करून द्यावी आणि अशा योगें पारस्परिक जवळीक वाढीस लावावी असा विचारप्रवाह सर्वत्र बळावत आहे; या हेतूच्या सिध्यर्थ कांहीं योजनाहि निश्चित होत आहेत. अशा समयीं श्री. देवीदासजींचा हा 'मानस–विहार' प्रसंगोचित वाटल्याशिवाय राहणार नाहीं. त्याचें तसें चीज होवो असें आम्ही इच्छितों आणि अशी ही महनीय सेवा केल्याबद्दल श्री. देवीदासजींचें अभिनंदन करतों.

ज्येष्ठ शु. १५<br>१८७७– पुणें.

**द. वा. पोतदार**

# अभंग

आयत्या पिठाची काढिली रांगोळी
ओव्यांच्या या ओळी ओंविघल्या

कोण कोठुनीया सृष्टीच्या बाहेरी
काय नाहीं तरी आणणार ?

आयतें गगन नक्षत्रें संपन्न
होय दृश्यमान दृष्टिक्षेपें

आयती धरणी पसरली दाट
होय पायवाट चालूं जातां

आयताच राम आयतीच कथा
अभिमान वृथा कासयाचा

आयतींच फुलें वेंचुनी आणिलीं
पूजा ही बांधिली राघवाची

आयता संकल्प रामें पुरवीला
दास म्हणे झाला तदर्पण.



# महाजन साहित्य प्रकाशन मंडळ
## नांदेड.

### —: कार्यकारी समिति :—

---

महाजन साहित्य प्रकाशन मंडळ पुस्तक १ ले

मूल्य ) —: शुद्धिपत्र :— ( दहा रुपये

| पृ. | ओवी | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ६ | ६४ | सर्प हा सर्वांगात | सर्प मुखींचा दांत |
| १३ | १८२ | खरा | रवा |
| १४ | १९७ | रामा नामाचें | नाम रामाचें |
| १६ | २३८ | पुराणिक | पुराणादिक |
| २५ | १२१ | पार्वती | पार्वती ती |
| ४० | ७२ | तुलसी मातेच्या | हुलसी मातेच्या |
| ९९ | ३११ | अत्यंत | अव्यंग |
| १०१ | ९ | ............ | कधीं नडते निराशा |
| १०८ | १४३ | गिरजा कुमारी | गिरिराज कुमारी |
| १२१ | १०६ | ............ | कठिण तेंचि सुघड |
| १२३ | १५१ | ............ | म्हणे होऊन सकंप |
| १४० | ५८ | दिन | हि न |
| १४३ | ११२ | हीन | ही न |
| १५२ | २६२ | ............ | अति निरभिमानपणें |
| १९३ | ३६ | मसर्थ | समर्थ |
| २१५ | १०६ | कठिणपण | कठिण पण |
| २४३ | ७० | करिती | कंथितो |
| २७७ | १८६ | देवध्वनि | वेदध्वनि |
| ३०० | १२९ | वर्णून | वर्णू न |
| ३०६ | श्लोक | गताभिषेकतस्था | गताभिषेकतस्तथा |
| ३२४ | ५८ | तैशीत | तदा |
| ३६२ | ७७ | रामगंगेचे | राम गंगेचे |
| ४१८ | ६९ | शिकवण | शिकवण द्यावी |

# मानस-विहार

## प्रथम सोपान

### (बालकाण्ड)

---

### विश्राम १ ला

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्यो नमः
श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः

श्लोक

वर्णानामर्थसंघानां रसानां छंदसामपि
मंगलानां च कर्तारौ वंदे वाणी-विनायकौ १
भवानीशंकरौ वंदे श्रद्धाविश्वासरूपिणौ
याभ्यां विना न पश्यंति सिद्धाः स्वांतस्थमीश्वरम् २

वर्णांच्या समुदायांचे । विविध अर्थविभागांचे । श्रृंगारादि नवरसांचे । छंदांचेहि ॥१॥ मंगलांचेहि तद्वत् । कर्ते जे का मूर्तिमंत । त्या शारदा-गणेशांप्रत । वंदितों मी ॥२॥ श्रीभवानी-शंकरांस । करितों मी वंदनास । श्रद्धा आणखी विश्वास । रूपें ज्यांचीं ॥३॥ ज्यांच्यावांचून निश्चितीं । कदापि पाहूं न शकती । हृदयस्थ ईशाप्रति । सिद्ध पुरुष ॥४॥

श्लोक –

वंदे बोधमयं नित्यं गुरूं शंकररूपिण्ाम्
यमाश्रितोहि वक्रोपि चंद्रः सर्वत्र वंद्यते ३

सीताराम–गुणग्राम–पुण्यारण्यविहारिणौ
वंदे विशुद्धविज्ञानौ कवीश्वरकपीश्वरौ ४

मी करितों प्रणिपात । बोधमय जो शाश्वत । त्या माझ्या सद्‌गुरुप्रत । शिवरूप जो ।।५।। ज्याच्या आश्रयेंकरून । चंद्रमा वक्र असून । सर्वत्र सर्वांलागून । वंद्य झाला ।।६।। सीताराम-गुण अगण्य । हेंचि पवित्र अरण्य । त्यांत विहरती पुण्य– । पुरुष जे ।।७।। जे पवित्रचि अत्यंत । स्वानुभवी ज्ञानवंत । ते वाल्मीकि हनुमंत । वंदितों मी ।।८।।

श्लोक –

उद्‌भवस्थितिसंहारकारिणीं क्लेशहारिणीम्
सर्वश्रेयस्करीं सीतां नतोऽहं रामवल्लभाम् ५

उत्पत्ति–स्थिति–प्रलय । कर्त्री जी का स्वयें होय । जी संसारतापत्रय । हरण करी ।।९।। कल्याणकर्त्री जी स्वतां । श्रीरामाची प्रिया कांता । ती जगन्माता श्रीसीता । वन्दितों मी ।।१०।।

श्लोक –

यन्मायावशवर्ति विश्वमखिलं ब्रह्मादिदेवासुराः ।
यत्सत्त्वादमृषैव भाति सकलं रज्जौ यथाहेर्भ्रमः ।।
यत्पादप्लवमेकमेव हि भवाम्बोधेस्तितीर्षावताम् ।
वंदेऽहं तमशेषकारणपरं रामाख्यमीशं हरिम् ६

ज्याच्या मायेस वश होऊन । वागते विश्व संपूर्ण । ब्रह्मादि देवतागण । असुरादिक ।।११।। ज्याच्या प्रादुर्भावेंकरून । रज्जूंत

सर्पासमान । मिथ्या जग भासमान । सत्य ऐसें ॥१२॥ ज्याचे चरण एकमेव । तारक तयांसी नाव । तरूं इच्छिती जे जीव । भवसागरीं ॥१३॥ जो सर्व कारणातीत । रामनामें जो विख्यात । त्या भगवान् विष्णुप्रत । वंदितों मी ॥१४॥

श्लोक –

नानापुराणनिगमागमसम्मतं यद् ।
रामायणे निगदितं क्वचिदन्यतोऽपि ॥
स्वान्तःसुखाय तुलसी रघुनाथगाथा– ।
भाषानिबन्धमतिमञ्जुलमातनोति ॥ ७

नानापुराणांतर्गत । वेदशास्त्रांसी सम्मत । रामायणीं जी वर्णित । अन्यत्रहि ॥१५॥ ती रघुनाथाची कथा । तुलसी स्वांतःसुखार्था । देशभाषेंत रची स्वतां । अति मधुर ॥१६॥

ज्याच्या स्मरणें निश्चितीं । कार्य पावें सिद्धिप्रति । जो का गणांचा पति । गजानन ॥१७॥ तो देवदेवेश्वर । अनुग्रह करो मजवर । जो बुद्धिराशि, आगर । शुभगुणांचें ॥१८॥ मूक होतसे पंडित । पांगळाहि पादरहित । उत्तुंग गिरिप्रत । लंघूं शके ॥१९॥ ऐसी ज्याची कृपा थोर । सकलकलिमल–वैश्वानर । तो भगवान् माझ्यावर । कृपा करो॥२०॥ जणुं नीलवर्ण पद्म । तैसी ज्याची तनु श्याम । नवआरक्तपद्मासम । नेत्र ज्याचे ॥२१॥ क्षीर-सागराभीतरीं । जो श्रीहरि शयन करी । तो माझ्या हृदयांतरीं । वास करो ॥२२॥ कुंदपुष्प-इंदुसम । ज्याचा देह शुभ्र परम । जो करुणेचा धाम । उमापति ॥२३॥ ज्याची दीनजनांवरी । स्वभा-वेंचि प्रीति भारी । तो शंकर मदनारि । कृपा करो ॥२४॥ श्रीगुरुपदाब्जाप्रत । माझा असो प्रणिपात । जो नरहरि मूर्तिमंत । कृपासिंधु ॥२५॥ महामोह अज्ञानज । हा निबिड-

तमःपुंज । त्यासी रविकर सतेज । बोध ज्याचा ॥२६॥ गुरुपदाब्जरजांस । करितों मी वंदनास । मधुर सुगंधित सुरस । प्रेमपूर्ण जें ॥२७॥ सुधावल्लींनीं परिपूर्ण । पदरज—सुंदर चूर्ण । भवरोग—प्रकार संपूर्ण । नाशितें जें ॥२८॥ पुण्यप्रद मूर्तिमती । शिवांगींची शुद्ध विभूति । स्पृहणीयमुदमंगलाप्रति । प्रसवित्ये जी ॥२९॥ भक्ताचें अंतःकरण । हाचि सुंदर दर्पण । तदीय मलाचें हरण । करित्ये जी ॥३०॥ तिचा करूनिया टिळा । लाविला जरी भाळा । तरी वश सद्गुणकुळा । करित्ये जी ॥३१॥ गुरुपदनखाची दीप्ति । रत्नराशीसमान ती । स्मरतां उद्भवे चित्तीं । दिव्य दृष्टि ॥३२॥ दिव्य दृष्टीचा प्रकाश । नाशी अज्ञान—तमास । प्राप्त हृदयीं जयास । महाभाग तो ॥३३॥ दिव्य चक्षु हृदयांतिल । त्या तेजें विकासतील । भवरात्रीचे मिटतील । दुःख-दोष ॥३४॥ जीं जीं ज्या ज्या खाणींत । प्रकट वा असती गुप्त । तीं तीं दिसतीं रामचरित— । हिरेमाणिकें ॥३५॥ जेविं मंत्रसिद्ध अंजन । निज दृष्टीसी लावून । जाणते साधक जन । सिद्ध होती ॥३६॥ आणि अप्रयासेंकरून । पर्वत—भूतल—कानन । पाहूं शकती निधान । त्या स्थलींचें ॥३७॥ तेविं गुरु-पदरजःकण । मृदु सुंदर अंजन । नेत्रामृत, करी हरण । दृग्दोषांचें ॥३८॥ त्या अंजनेंचि पवित्र । करूनिया निजनेत्र । वर्णीन रामचरित्र । भवमोचक ॥३९॥ प्रथम करितों प्रणिपात । भूदेवांच्या पदांप्रत । हरिती जे अज्ञानजनित । संशयांतें ॥४०॥ सकल सद्गुणांची खाण । ऐसे जे का संतजन । प्रेमें मृदुवचें करून । वंदितों त्यां ॥४१॥ शुभप्रद साधुचरित । जणुं कार्पा-सचि मूर्त । निरस—उज्ज्वल—गुणयुक्त । फलें जयां ॥४२॥ (विषयरसानें रहित । स्वभावतां साधु चरित । निरसपदाचा

भावार्थ । हाचि येथ ॥४३॥ ) स्वयें साहूनि दुःखास । झांकिती परछिद्रास । म्हणूनि जगीं पावती यश । वंदनीय ॥४४॥ आनंद–मंगलाचें बीज । हा साधूंचा समाज । चालता बोलता तीर्थराज । जगांत जो ॥४५॥ रामभक्ति जेथें मधुर । हीच भागीरथीची धार । ब्रह्मविद्येचा प्रचार । सरस्वती ॥ ४६ ॥ विधिनिषेधयुक्त जाणा । कलिदोष-विध्वंसना । कर्मकथा हीच यमुना । वर्णिलीसे ॥४७॥ हरिहर-कथाश्रेणी । हीच विराजे त्रिवेणी । मोदमंगलदायिनी । श्रवणें सर्वां ॥४८॥ स्वधर्मनिष्ठा चोखट । हाचि येथ अक्षयवट । सत्कर्मसमाज घनदाट । या प्रयागीं ॥४९॥ सर्वांसहि सदोदित । सुलभ हा सर्व देशांत । सादर सेवितां क्लेशांप्रत । शमन करी ॥५०॥ अवर्णनीय अलौकिक । हा तीर्थराज एक । प्रकट सद्यः फलदायक । प्रभाव याचा ॥५१॥ ऐकती आणि जाणती । प्रसन्न होऊनि चित्तीं । प्रेमातिशयें करिती । स्नान यांत ॥५२॥ ते जन याच जन्मांत । पावती चारी पुरुषार्थ । ऐसा संतसमाज मूर्त । प्रयागराज ॥५३॥ येथील स्नानाचें फल । प्राप्त होतसे तत्काल । कावळे होती कोकिल । बक ते हंस ॥५४॥ हो ऐकून फलश्रुति । चोज न मानावें चित्तीं । संतसंगतीची महति । अवर्णनीय ॥५५॥ वाल्मीकि आणि ब्रह्मसुत । तैसा अगस्ति विख्यात । ह्यांनीं कथिला स्ववृत्तांत । स्वमुखांनीं ॥५६॥ जलचर आणि भूचर । नानापरीचे खेचर । जीव जे का चराचर । जगामाजीं– ॥५७॥ बुद्धि, कीर्ति आणि गति । ऐश्वर्य आणि महति । जें ज्या यत्नें जयांप्रति । प्राप्त जेथें– ॥५८॥ सत्संग-तीची महति । तेचि केवल जाणती । लोकीं, वेदीं न निश्चितीं । उपाय अन्य ॥५९॥ संतसंगतीवांचून । प्राप्त न होतसे ज्ञान ।

तीहि रामकृपेंविण । सुलभ नव्हे ॥६०॥ मोदमंगलाचें मूळ । सत्संगतीच केवळ । सिद्धि-फल, साधनें सकळ । फुलें त्याचीं ॥६१॥ शठहि सज्जन होती । प्राप्त होतां सत्संगति । परिसस्पर्शें लोहाप्रति । सुवर्णत्व ये ॥६२॥ कुसंगतींत दैवेंकरून । सांपडती जरी सज्जन । सर्पमण्यापरि स्वगुण । त्यागिती

मुरलींच्या दंत ना ॥६३॥ (सर्प ~~हा सर्वांगांत~~ । असे जरी विषयुक्त । परि मणि विषाप्रत । हरण करी ॥६४॥ ब्रह्मा, विष्णु, उमापति । कवि, पंडित, सरस्वती । महिमा वर्णितां संकोचती । सत्पुरुषाचा ॥६५॥ तें संतांचें महिमान । कैसें वर्णवें मजकडून । जैसी भाजीविक्या-लागून । रत्नपरीक्षा ॥६६॥ मी वंदितों ते संत । समान जयांचें चित्त । हित आणि अनहित । नाहींच ज्यां ॥६७॥ जैसी का अंजलिगत । पुष्पें अति सुगंधित । करिती दोन्ही करांप्रत । सारखेंचि ॥६८॥ संत हो ! तुम्ही सरलचित्त । जाणतां जगाचें हित । युष्मत्स्वभाव-स्नेहाप्रत । जाणूनिया- ॥६९॥ ऐकूनि बालविनति । कृपा करा मजवरती । ज्यायोगें जडेल प्रीति रामचरणीं ॥७०॥ संतांचें समान चित्त । ऐसें जें का उपरोक्त । त्याचा आदर्श मूर्त । तुलसीदास ॥७१॥ याचें प्रत्यक्ष प्रमाण । प्रस्तुत मंगलाचरण । सज्जन-दुर्जनां वंदन । समान जिथें ॥७२॥ प्रथमतां मंगलाचरणीं । वंदिती सज्जनश्रेणी । परि दुर्जनांसि कुणी । वंदिती ना ॥७३॥ तेंचि वैशिष्ट्य येथील । अभूतपूर्व केवल । मंगलाचरणीं खल । वंदिले कीं ॥७४॥ सर्वत्र भगवद्-भावना । ऐसी जेथें उपासना । तेथेंचि हा उदारपणा । प्रत्यया ये ॥७५॥ असो आतां येथून । होईल खलांचें वंदन । तेंहि चित्त देऊन । श्रवण करा ॥७६॥) आतां वंदीन खलजन । मी सद्भावें करून । जे कुटिल निष्कारण । सरलांसहि ॥७७॥ परहिताची

होतां हानि । लाभ वाटे ज्यांलागुनी । अपकर्षें हर्ष मनीं । उत्कर्षें खेद ॥७८॥ हरिहरांचें सद्यश । पौर्णिमेचा रोहिणीश । त्यास जे राहूपरिस । विघ्नस्वरूप ॥७९॥ (आधीं कथेस न जाती । गेल्या स्वयें नायकती । त्यापरी ऐकूं न देती । इतरांसहि ॥८०॥ सांगूनिया मिथ्या वार्ता । बोलविती बोलती स्वतां । एवंच हरिहरकथा । होऊं नं देती ॥८१॥ ) दुसऱ्याचें कार्य गहन । त्यासी करावया विघ्न । जे सहस्रार्जुनासमान । पराक्रमी ॥८२॥ (सहस्र बाहू त्याप्रत । यांसी तो दोनचि हात । यापरी घेईल येथ । शंका कुणी ॥८३॥ तरी सहस्र बाहूंनीं । कार्य जें का होय जनीं । तें विघ्न करिती दोन्ही । हात यांचे ॥८४॥) परकीय दोषांलागून । करावया विलोकन । जे केवळ सहस्रनयन । इंद्रापरी ॥८५॥ दुसऱ्याचें हित देखा । मधुर घृतकणिका । त्यावरी मूर्त मक्षिका । ज्यांचें मन ॥८६॥ प्रखर जैसा हुताशन । तैसें ज्यांचें उग्रपण । महिषासुरासमान । क्रोध ज्यांचा ॥८७॥ पातकें आणि दुर्गुण । हेंचि ज्यांचें मुख्य धन । त्यावरी कुबेरा-समान । धनाढ्य जे ॥८८॥ ज्या दुष्टांचा अभ्युदय । केतूपरी सनिश्चय । सर्वांच्याहि हिता होय । हानिप्रद ॥८९॥ कुंभकर्णा-च्या समान । निद्रा घेती रात्रंदिन । ती निद्रा मात्र गहन । उत्तमचि ॥९०॥ (यावत्कालपर्यन्त । पडून राहती घोरत । तोंवरी सज्जनांप्रत । सौख्य मिळे ॥९१॥) व्हावा परकार्य-घात । हाचि ज्यांचा असे हेत । करिती स्वतनूचा पात । तदर्थ जे ॥९२॥ जैशा का गारा वर्षून । पिकाचा नाश करून । स्वयें जाती विरघळून । शेवटास ॥९३॥ जे क्रुद्ध शेषासमान । सहस्रमुखें करून । वाखाणिती रात्रंदिन । परदोषांतें ॥९४॥ असो एवं-गुणविशिष्ट । असती जे जन दुष्ट । त्या सर्वांसहि स्पष्ट ।

वंदितों मी ॥९५॥ पुनरावृत्ति करून । माझें खलांस वंदन । जे पृथुराजासमान । मूर्तिमंत ॥९६॥ उत्सुक अंतःकरणीं । दशसहस्र श्रवणीं । परकीय पापश्रेणी । ऐकती जे ॥९७॥ तसेंचि शक्रासमान । तया खलांस मानून । मी करितसे वंदन । पुनःपुन्हां ॥९८॥ (¹ 'सुरानीक' पदाचा अर्थ । देवांची सेना समस्त । जी आवडे इंद्राप्रत । निरंतर ॥९९॥ वज्र आवडे इंद्रास । वाग्वज्र तें दुष्टांस । दोन्हीहि सदा दोघांस । आवडती ॥१००॥ शक्रासम दुष्ट जन । सहस्रनेत्रेंकरून । करितात विलोकन । परदोषांतें ॥१०१॥) शत्रु, मित्र, उदासीन । यांचें ऐकतां कल्याण । मनीं जावें जळफळून । स्वभाव ज्यांचा ॥१०२॥ ऐसा स्वभाव जाणून । दोन्ही करांसी जोडून । करितों प्रेमेंकरून । प्रार्थना मी ॥१०३॥ आपल्याकडून त्यांना । केली सविनय प्रार्थना । परि ते नाणितील मना । चुकूनहि ॥१०४॥ प्रेमें पाजून पायस । पाळिला जरी वायस । कधीं तरी निरामिष होईल का ? ॥१०५॥ एकसमयावच्छेदेंकरून । संत आणि दुष्ट जन । दोघांच्या चरणांलागून । वंदितों मी ॥१०६॥ दोघेहि दुःखदायक । त्यांचीं लक्षणें अनेक । त्यांतूनिया कांहीं एक । वर्णितों मी ॥१०७॥ वियोग होतांचि क्षण । एक हरण करिती प्राण । एक देती दुःख दारुण । भेटतांचि ॥१०८॥ कमल आणि जळू जाण । साहचर्यें जलोत्पन्न । परि गुण ते भिन्न भिन्न । उभयतांचे ॥१०९॥ सज्जन-दुर्जन त्या रीतीं । जगीं एकदांचि जन्मती । भिन्न परस्पर असती । स्वभाव-गुणें ॥११०॥ अमृतमद्यासमान । असती सज्जन-दुर्जन । अथांग

---

१ बहुरि सक्रसम बिनवउँ तेहि । संतत सुरानीक हित जेही
बचन बज्र जेहिं सदा पिआरा । सहस नयन परदोष निहारा

सिंधु जन्मस्थान । दोघांसहि ॥१११॥ भले वा वाईट जन्म ।
आपुल्या कर्तृत्वेंकरून । यशापयशाचें धन । जोडितात ॥११२॥
जैसें सुधा, सुधाकर । भागीरथी, साधु नर । विषाग्निकर्मनाशा
क्रूर । व्याध, खल ॥११३॥ सद्‌गुण तैसे दुर्गुण । हें तों जाणती
सर्वजण । परि त्यांचें चांगुलपण । आवडीपरी ॥११४॥ म्हणून
भले जे असती । ते भलेंपण मिळविती । नीच शेवटीं पावती ।
नीचत्वातें ॥११५॥ अमरत्वानें सद्यश । प्राप्त होय अमृतास ।
मारकपणें अपयश । विषाप्रति ॥११६॥ दुर्जन घेती दुर्गुणांस ।
गुण सेविती साधु पुरुष । अगाध सागरापरिस । उभयतांहि ॥११७॥
यास्तव कांहीं दोष-गुण । येथें केले मीं वर्णन । न घडे परीक्षे-
वांचून । संग्रह-त्याग ॥११८॥ बरे–वाईट, सर्वजण । धात्यानें
केले निर्माण । वेदें कथिले दोष-गुण । पृथक्‌पणें ॥११९॥
विधात्याची सृष्टि जाण । गुणावगुणें परिपूर्ण । वेदेतिहासपुराण ।
निवेदिती ॥१२०॥ सुख, दुःख, पाप, सुकृत् । दिवस आणखी
रात । साधु, दांभिक, कुजात, । सुजातहि; ॥१२१॥ दानव, देव
समस्त । उच्च आणि अधोगत । जीवनदातें अमृत । मारक
विष; ॥१२२॥ माया आणि महेश्वर । जीव आणि जगदीश्वर ।
लक्ष्मी आणि दारिद्र्य । राव-रंक; ॥१२३॥ काशी आणि मगध
दोन्ही । भागीरथी कर्म-नाशिनी । मारवाड, मालव आणि ।
द्विज, खाटिक; ॥१२४॥ नरक आणखी स्वर्ग । वैराग्य आणि
अनुराग । ऐसा गुणदोष विभाग । वेदशास्त्रीं ॥१२५॥ जड, चेतन
समस्त । गुणदोष-परिप्लुत । विधात्यानें चि निर्मित । विश्व
जरी ॥१२६॥ परि संत हंस थोर । त्यागूनि वारिविकार ।
गुण-दुग्ध तेंचि सार । स्वीकारिती ॥१२७॥ ऐसा सदसद्विचार ।
देई जेव्हां परमेश्वर । ते दोष त्यागूनि अंतर । गुणीं रमे ॥१२८॥

काल, कर्म, स्वभाव तीन्ही । यांच्या प्राबल्यें करूनी । भलेहि चुकती, होउनी । मायेस वश ॥१२९॥ तो प्रसाद सुधारिती । त्यापरी संत सन्मति । दोषदुःख हरुनी देती । निर्मल यश ॥१३०॥ त्यापरीच दुष्टाप्रति । प्राप्त होतां सत्संगति । सत्क्रियाहि आचरिती । कदाचित् ॥१३१॥ तथापि सुटतां सत्संग । त्यांचें दुष्ट अंतरंग । न पालटतां अभंग । जैसेंच्या तैसें ॥१३२॥ करून संतांचा वेष । फसविती जे जगास । वेषप्रभावें पूज्यतेस । पावती जरी ॥१३३॥ शेखीं निभाव न लागून । प्रकटे तद्-दांभिकपण । ज्यापरी राहू, रावण । कालनेमी ॥१३४॥ अमंगलहि वेष धरून । साधू पावती सम्मान । जांबवंत हनुमान । जैसे जगीं ॥१३५॥ हानि दुःसंगतींत । लाभ तो सत्संगतींत । वेदीं, लोकीं हा सिद्धांत । ज्ञात सर्वां ॥१३६॥ वायूची ती ऊर्ध्व गति । त्याची घडतां सगति । धूळ ती उडे वरती । गगनां-तरीं ॥१३७॥ परि अधोगति जलांत । संसर्गें पावे क्षणांत । भूमीवरी कर्दमांत । मिळुनी जाय ॥१३८॥ साधूच्या सदनीं । देखा । असती ज्या शुक-सारिका । रामनामचि त्यांच्या मुखा । येत राही ॥१३९॥ त्यांसी दुष्टांच्या सदनीं । वास घडतां रात्रंदिनीं । उठतां बैसतां मोजुनी । शिव्याच येती ॥१४०॥ अग्निपासुनी धूम्र निघे । वाईट संगतीच्या योगें । निरुपयोगी रूप घे । काजळाचें ॥१४१॥ त्याच काजळाची होई । चमकदार सुंदर शाई । पुराण–लेखना येई । उपयोगास ॥१४२॥ पहा जलहि त्याच रीतीं । अग्नि वायूच्या संगतीं । मेघ बनून विश्वा-प्रति । जीवन दे ॥१४३॥ ग्रह, औषधि आणि जळ । त्यापरी वस्त्र, अनिळ । कुसंग, सुसंग केवळ । पावूनिया–॥१४४॥ सद-सद्वस्तूचें रूप । जगीं पावती साक्षेप । हें कळून ये आपोआप ।

सुज्ञ जनां ॥१४५॥ (सूर्यचन्द्रादि ग्रह सारे । पडतां उच्च स्थानीं साजिरे । पावती ज्योतिष्याधारें । शुभदायकत्व ॥१४६॥ तेचि पडतां नीच स्थानीं । देती अशुभफलालागुनी । हें अनुभवास ये जनीं । प्रत्यक्षपणें ॥१४७॥ त्यापरीच वनस्पति । जरी रोग दूर करिती । तरीच निश्चयें पावती । चांगुलपण॥१४८॥ न तरी त्यांतें सेवितां । रोग्यास नेती मृत्युपथा । तरी निंदेस सर्वथा । पात्र होती ॥१४९॥ तसेंच मेघाचें जळ । गंगेस मिळतां निर्मळ । सेविती प्राणी सकळ । आवडीनें ॥१५०॥ तेंचि पडतां गटरांत । मुकतें निर्मलत्वाप्रत । सर्वांकडून निश्चित । त्याज्य होय ॥१५१॥ वारा वाहतां वाहतां । सुगंध पसरी सभोंवता । तरीच पावे मान्यता । निश्चयानें ॥१५२॥ तोच दुर्गंध घेऊन । जरी वाहे नभांतून । जाय निश्चयें करून । उपेक्षिला ॥१५३॥ देवतामूर्ति मनोहर । किंवा सुंदर नारीनर । परिधान करितां वस्त्र । शोभा पावे ॥१५४॥ तेंचि मोलें जरी भारी । पांघरिलें प्रेतावरी । अशुद्ध आणि त्याज्य परि । मानिलें जाय ॥१५५॥ एवंच संसर्गेंकरून । चांगलेंवाईटपण । वस्तूस निश्चयें जाण । प्राप्त होय ॥१५६॥) प्रकाश आणखी तम । दोन्ही पक्ष असती सम । विधात्यानें केला नाम- । भेद मात्र ॥१५७॥ चन्द्राचा पोषक एक । दुजा त्यापरी शोषक । म्हणून देती लोक । यशापयश ॥१५८॥ जड-चेतन विश्वांतरीं । जीव जे जे नानापरी । सर्वांस जाणून अंतरीं । राममय ॥१५९॥ सर्वांच्याहि पदांप्रत । माझा असो प्रणिपात । जोडोनिया दोन्ही हात । निरंतर ॥१६०॥ सुर आणखी असुर । नाग, पक्षी आणि नर । त्यापरी प्रेत, पितर । गंधर्व ते- ॥१६१॥ किन्नरराक्षसां- सहित । माझा असो प्रणिपात । कृपा करोत सांप्रत ।

सर्वहि ते ॥१६२॥ उद्भिजादि खाणी चार । लक्ष चौऱ्यांशी शरीर । जलचर, भूचर, खेचर । जीवजाति-॥१६३॥ सीताराम मूर्तिमंत । जाणून सर्व जगाप्रत । जोडूनिया दोन्ही हात । वंदितों मी ॥१६४॥ मज सेवक मानून । कृपा करा पूर्ण । प्रेम करा सर्वहिजण । निष्कपट ॥१६५॥ स्वबुद्धिबलाचा कांहीं । विश्वास मजला नाहीं । मी प्रार्थितों सर्वांसहि । याकारणें ॥१६६॥ श्रीरामाची गुणकथा । वर्णू इच्छितों मी स्वतां । मन्मति अल्प, अगाधता । चरित्राची ॥१६७॥ ( कवित्वरचना–प्रसंगें । प्रकटावीं नाना अंगें । उपायहि तयाजोगे । अनेकविध ॥१६८॥ ) एकाहि अंगें सुकर । उपाय न सुचे तिळभर । मन्मति दरिद्री, थोर– । मनोरथ ॥१६९॥ बुद्धि पाहतां अति क्षुद्र । अभिरुचि उत्कृष्ट मात्र । अमृत इच्छी परि तक्र । न मिळे जगीं ॥१७०॥ माझ्या धाडसाची पूर्ण । क्षमा करितील सज्जन । बालबोल मन लावून । ऐकतील ॥१७१॥ जरी बोबडें बालक । बोले, तरी सकौतुक । ऐकती जननी–जनक । प्रसन्न मनें ॥१७२॥ परि जे का क्रूर, कुटिल । कुत्सित तेचि हांसतील । परदोष पाहणें केवल । भूषण जयां ॥१७३॥ अहो ! कवित्व आपुलें । कुणा न वाटें चांगलें । सरस अथवा असलें । नीरस अति ॥१७४॥ दुसऱ्याच्या कवित्वास । ऐकून वाटे जयां हर्ष । ऐसे जगीं श्रेष्ठ पुरुष । फार थोडे ॥१७५॥ बहु लोक जगाभीतरीं । बांधव हो ! सरितेपरी । जी वाढते स्वबळावरी । मिळतां जल ॥१७६॥ ( परोपजीवी कवित्व । करून पावती महत्व । एसेचि कविपुंगव । जगतीं बहु ॥१७७॥ ) परि सज्जन, पुण्यश्लोक । सिंधुसम कुणी एक । पाहून पूर्णशशांक । वाढे जो का ॥१७८॥ ( तैसेचि विरळा सज्जन । महात्मा सिंधुसमान । अन्याचें कवित्व

पाहून। संतोष ज्यां ॥१७९॥) गुण पाहतां अल्पमात्र। परि अभिलाष थोर। वाटे एक दृढतर। विश्वास हा ॥१८०॥ कवित्व ऐकतां सज्जन। घेतील सुख मानून। परि करितील दुर्जन। उपहासचि ॥१८१॥ तो खलांचा उपहास। हितप्रद मज स्वतांस। कावळे मानिती कर्कश। कोकिल-स्वर ॥१८२॥ जैसें पाहून हंसास। हंसें येई बगळ्यास। आणि हंसती चातकांस। दर्दुर ते ॥१८३॥ तैसें जे का दुष्ट जन। मलिन ज्यांचें अंतः-करण। ऐकून निर्मळ गुण। हंसतील ते ॥१८४॥ काव्यरसिक जे असती। रामपदीं नसे प्रीति। हा हास्यरस त्यांप्रति। सुखद होय ॥१८५॥ आधींच पाहतां ग्रंथ। रचणें प्राकृत भाषेंत। असे भोळीच त्यांत। बुद्धि माझी ॥१८६॥ हास्यास्पद हें मानून। हंसतील जरी दुर्जन। तरी त्यांत कांहींच न। दोष त्यांचा ॥१८७॥ प्रभुपदीं प्रेम न ज्यांस। समजहि नसे विशेष। ऐकून वाटेल नीरस। कथा तयां ॥१८८॥ हरिहर-पदीं ज्यां प्रीति। कुतर्कें न दूषित मति। कथा मधुर त्यांप्रति। राघवाची ॥१८९॥ राम-भक्तीनें भूषित। जाणूनिया कथेप्रत। संत ऐकतील वर्णित। प्रेमळ शब्दें ॥१९०॥ कवि नसेचि मी भला। वक्ताहि नसे चांगला। सर्वविद्या-सर्वकला-। विहीन मी ॥१९१॥ अर्था-सहित अक्षर। तैसे नाना अलंकार। छंदोरचना थोर थोर। अनेकविध ॥१९२॥ अपारचि भाव-भेद। रस-भेदहि अगाध। दोषगुण नानाविध। कवित्वाचे ॥१९३॥ कवित्वाचा तो विवेक। एकहि ना मज निःशंक। लिहून प्रतिज्ञालेख। कथितों खरें ॥१९४॥ माझें कवित्वलेखन। सर्वहि गुणांनीं हीन। यांत विश्वख्यात गुण। एकचि असे ॥१९५॥ हें विचारून चित्तीं। सुज्ञ ते श्रवण करिती। सवसद्विवेकमति। विमल ज्यांची ॥ १९६ ॥

यांत हाचि गुण थोर । रामा नामचें उदार । श्रुति-पुराणांचें सार । पवित्र अति ॥१९७॥ जें मंगलांचें निधान । करी अमंगल-हरण । उमेसह त्रिपुरदहन । जपे जया ॥१९८॥ काव्यहि वैचित्र्युक्त । आणि जें सत्कविकृत । रामनामविरहित । शोभे न तें ॥१९९॥ चन्द्रवदना आगळी । सर्वतोपरी श्रृंगारिली । शोभे न वस्त्राविण भली । सुन्दर स्त्री ॥२००॥ सर्व गुणांनीं सहित । काव्यहीन कविकृत । रामनामयशें मंडित । जाणूनिया– ॥२०१॥ आदरें श्रवण-पठण । त्याचें करिती सुज्ञ जन । संत हे भृंगासमान । गुणग्राही ॥२०२॥ यद्यपि माझ्या काव्यांत । एकहि रस नसे व्यक्त । रामप्रताप मात्र येथ । प्रकट असे ॥२०३॥ हाचि एक भरंवसा । वाटतसे मन्मानसा । सत्संगें कुणास सहसा । महत्त्व न ये ? ॥२०४॥ धूम्रहि कटु असतां । टाकून अंगींची कटुता । मलयसान्निध्यें तत्त्वतां । सुगंधित बने ॥२०५॥ हीन कवित्व असुनी । सद्वस्तु वर्णिली त्यांतुनी । विश्वमंगल-कारिणी । रामकथा ॥२०६॥ करून मंगलपूर्ति । हरिते कलि-मलाप्रति । ऐसी रामकथा म्हणती । तुलसीदास ॥२०७॥ या कविता-सरितेची । गति वाकडीच साची । परम पवित्र गंगेची । जैसी असे ॥२०८॥ परि सुंदर प्रभु-यश । तत्संगें सौंदर्य हीस । तेणें सज्जन-मनास । रुचेल ही ॥२०९॥ रक्षा स्मशान-प्रेताची । होतां विभूति शिवांगींची । पवित्र सुंदरता तिची । संस्मरणीय ॥२१०॥ रामयशानें मंडित । माझें काव्य सर्वांप्रत । प्रिय होईल अत्यंत । निश्चयानें ॥२११॥ तरुकाष्ठाचा विचार । कुणी करी का तिळभर । मलयसंगतीचा आदर । मात्र होय ॥२१२॥ काळी कपिला जरी गाय । परि शुभ्र अतिशय । गुणकारक तिचें पय । सर्वहि पीती ॥२१३॥ ऐसे माझे ग्राम्य बोल ।

सीतारामयशें केवल । गातीलहि, ऐकतील । सुज्ञ जन ॥२१४॥ मणि, माणिक, मोत्यें जरी । अमोलिक असतीं सारीं । सर्प-पर्वत-गज-शिरीं । न शोभतीं जशीं ॥२१५॥ राजाच्या मुकुटावरी । वा तरुणीच्या शरीरावरी । पावतात शोभा सारीं । विशेषेंचि ॥२१६॥ तेविं सत्कवीचें कवित्व । बुध सांगती हें तत्त्व । निपजतें न तेथें महत्त्व । अन्यत्र पावें ॥२१७॥ भक्तीचा हेतु धरून । सोडूनिया ब्रह्मभुवन । स्मरतांचि ये धांवून । सरस्वती ॥२१८॥ रामचरित-मानससर । त्यांत न घडे स्नान जर । श्रमाचा नच परिहार । कोटि उपायें ॥२१९॥ म्हणून कवि, पंडित । हें जाणूनिया चित्तांत । गाती हरियशाप्रत । कलिमलांतक ॥२२०॥ सामान्य जनांची कीर्ति । वर्णितां ती सरस्वती । करें पिटी भालाप्रति । पश्चात्तापें ॥२२१॥ हृदय हाचि सागर । बुद्धिशुक्तिका परिकर । स्वाती-शारदा, सुज्ञनर । संगती कीं– ॥२२२॥ जरी वर्षेल तीवर । श्रेष्ठ विचारांचें नीर । काव्यमौक्तिक सुंदर । निर्माण होय ॥ २२३ ॥ तया युक्तीनें वेधून । मग ओंवावें त्यांतून । रामचरित्राचें जाण । श्रेष्ठ सूत्र ॥ २२४ ॥ परिधानती सुज्ञ नर । शुचि स्वहृदयावर । प्रेम तयांचे अपार । तीच शोभा ॥ २२५ ॥ कलिकाळ कठिण विशेष । यांत जे आले जन्मास । कृति कावळ्याची, वेष । हंसाचा तो ॥ २२६ ॥ वेदमार्गातें त्यागून । कुमार्गे ज्यांचें वर्तन ।कपटाचे पुतळे, भाजन । कलिमलाचें ॥ २२७ ॥ वंचक असून साक्षात् । म्हणविती रामभक्त । कामक्रोधधनांकित । सेवक ते ॥२२८॥ या सर्वांच्या अग्रभागीं । माझी गणना प्रथम जगीं । धर्मदांभिकाग्रणीलागीं । धिःकार मज ॥ २२९ ॥ जरी आपुले दुर्गुण । सर्वहि करूं कथन । कथा वाढेल, पार न । लागेल मज ॥२३०॥

म्हणून त्या दुर्गुणांप्रति। वर्णिलें मीं अल्प अति। थोडक्यांतचि उमजती। सुज्ञ जन ॥२३१॥ माझी उदंड प्रार्थना। आणूनिया निज ध्याना। कथा ऐकून दूषणा। कुणी न दे ॥२३२॥ इतुक्याहि-वरी जे का। काढितील शंका, कुशंका। मजहून त्या बुद्धिरंकां। मूर्खत्व अति ॥२३३॥ मी मुळींच कवि नसे। चतुरहि ना म्हणवीतसे। श्रीरामगुण गातसे। यथामति ॥२३४॥ कोठें अनंत अपार। श्री रघुपतीचें चरित्र। कोठें मन्मति संसार-। निमग्न ही ॥२३५॥ जो का प्रचंड मारुत। उडवी मेरुगिरि-प्रत। सांगा कापसाची तेथ। काय कथा? ॥२३६॥ राममहिमा अपार। जाणून उत्तरोत्तर। कथा वर्णितां मदंतर। कचरे बहु ॥२३७॥ सरस्वती आणि शेष। विधाता आणि महेश। वेदशास्त्रेंहि अशेष। पुराणिक ॥२३८॥ 'नेति नेति' ऐसें म्हणून। ज्या श्रीराघवाचे गुण। करीत असती वर्णन। निरंतर ॥२३९॥ जरी जाणती सर्वजण। ऐसें प्रभूचें महिनान। तरी कुणीहि वर्णिल्याविण। राहिला नसे ॥२४०॥ तेथें वेदेंचि आपण। ऐसें कथिलें कारण। भजनप्रभाव वर्णून। बहु प्रकारें ॥२४१॥ जो अद्वितीय, निष्काम। जो निराकार, अनाम। जो अजन्मा, परंधाम। सच्चिदानंद ॥२४२॥ जो व्यापला विश्वांतून। जो विश्वरूप भगवान्। तोचि करी देह धरून। नाना लीला ॥२४३॥ इतुकाचि हेतु त्यांत। स्वभक्ताचें व्हावें हित। परम दयालु भगवंत। भक्तवत्सल ॥२४४॥ ज्या ज्या निज भक्तांवर। ममता आणि प्रेम फार। त्यांवरी तो करुणाकर। कोपला ना ॥२४५॥ गतवस्तुदाता केवळ। दीन जनांचा दयाळ। सरल बलिष्ठ नृपाळ। रघुनाथ तो ॥२४६॥ (राज्य दिलें सुग्रीवास। दयालुत्व म्हणून त्यास। आलिंगिलें निषादास।

सरलत्व हें ॥२४७॥ ऐसा दयालु सरळ। असूनिया अति प्रबळ। ध्यानीं न येचि केवळ। शिवाच्याहि ॥२४८॥ हें जाणून सुज्ञ जन। वर्णिती हरीचे गुण। करिती धन्य, पावन। निज वाणीतें ॥२४९॥ त्याचि बळें मीहि जाण। श्रीरामाचें गुणवर्णन। करितों मस्तक ठेवून। रामपदीं ॥२५०॥ मुनिजनांनीं प्रथमतां। गायिली हरिगुणकथा। त्याचि मार्गें सुगमता। बापहो! मज ॥२५१॥ जी अतिशय अपार। ऐसी सरिता सुंदर। सेतु बांधी नृपवर। तिच्यावरी ॥२५२॥ पिपीलिका अति सान। त्या पुलावरी चढून। जातसे श्रमावांचून। नदीपार ॥२५३॥ ऐशा बळेंचि करून। मनास धीर देऊन। मी रामकथा वर्णीन। मनोहर ॥२५४॥ ( श्रीरामचरितमानस। विहंगराज राजहंस। गोस्वामी तुलसीदास। ग्रंथकर्ते ॥२५५॥ स्वस्ति श्रीमानसविहार। तुलसीरामायणाचें सार। प्रथम सोपान सुखकर। भाविकांतें ॥२५६॥ मानस उत्तुंग परम। सोपान केले सुगम। वाटती तेहि दुर्गम। भाविकांतें ॥२५७॥ माझी टीका ही मराठी। हीच टेकावया काठी। ऐशा अशक्तांसाठीं। योजिली मी ॥२५८॥ सोपानींचा मार्ग भला। जरी दीर्घतम वाटला। तदर्थ योजिला पहिला। विश्राम हा ॥२५९॥ रसिक भाविक श्रोत्यांस। विनवीतसे देवीदास। माझ्या बोबड्या बोलांस। मान्य करा ॥२६०॥ )

—:०:—

# विश्राम २ रा

श्रीगणेशाय नमः। श्रीसरस्वत्यै नमः। श्रीगुरुभ्योनमः।
श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः

व्यासादिक ऋषीश्वर। झाले कविपुंगव थोर। ज्यांनीं वर्णिलें सादर। हरिचरित्र ॥१॥ त्यांच्या पदकमलांप्रत। माझा असो प्रणिपात। माझे सर्व मनोरथ। पुरवोत ते ॥२॥ कलियुगींचे कविजन। तदुपरी मी वंदीन। ज्यांनीं वर्णिले गुणगुण। राघवाचे ॥३॥ काव्यकुशल अत्यंत। ऐसे जे कवि प्राकृत। ज्यांनीं वर्णिले स्वभाषेंत। हरिचरित्र ॥४॥ झाले जे, जे विद्यमान। पुढे होतील उत्पन्न। निष्कपटपणें वंदीन। सर्वांस मी ॥५॥ कवीहो ! होऊन प्रसन्न। द्या एवढें वरदान। सत्समाजीं मिळो मान। मत्काव्यास ॥६॥ जो विलोकून प्रबंध। अनादर करिती बुध। त्याचा कर्ता अप्रबुद्ध। श्रमहि वृथा ॥७॥ कीर्ति, काव्य, ऐश्वर्य। तेंचि खरें श्लाघनीय। जेणें सर्वांचें हित होय। गंगेपरी ॥८॥ श्रीरामाचें यश श्रेष्ठ। माझी कविता निकृष्ट। या शंकेनें मन स्पष्ट। द्विधा होय ॥९॥ तुमच्या कृपेनेंचि मम। कार्य होणार सुगम। शोभे रेशमाचें काम। तरटावरी ॥१०॥ हें आणूनिया अंतरीं। कृपा करा माझ्यावरी। जेणें वर्णील वैखरी। विमल यश ॥११॥ जी कविता असे सरळ। कीर्तिहि तैसी निर्मळ। तिचाच विद्वन्मंडळ। आदर करी ॥१२॥ शत्रूहि असले जर। विसरून सहज वैर। ऐकून करितील वर। प्रशंसाहि ॥१३॥ बुद्धि नसतां निर्मळ। कवित्व न होय सरळ।

त्यांत माझें बुद्धिबळ । फार थोडें ॥१४॥ म्हणून वर्णितां हरि-गुणा । ऐसी करा हो! करुणा । हीच करितों प्रार्थना । वारंवार ॥१५॥ श्रीरघुनाथाचें चरित । मानस सरोवर ख्यात । तेथींचे कवि–पंडित । सुंदर हंस ॥१६॥ ऐकून बालविनति । ध्यानीं आणून मत्प्रीति । कृपाळूच मजवरती । होवोत ते ॥१७॥ श्रीवाल्मीकि मुनिराज । त्यांचें वंदितों पदाब्ज । ज्यांनीं निर्मिलें सहज । रामायण ॥१८॥ खरराक्षसकथेसहित । परि रम्य, मृदु अत्यंत । असून दूषणाचें वृत्त । निर्दोष परि ॥१९॥ ऋग्यजुःसामाथर्वाभिद । मी वंदितों चारी वेद । जे भवाब्धींत प्रसिद्ध । नौकेसम ॥२०॥ स्वप्नींहि ज्यांलागून । वाटला ना कधीं शीण । वर्णितां निर्मळ गुण । राघवाचे ॥२१॥ (महाभाग श्रोतृवर्य! । एथेंहि एक आश्चर्य । ग्रंथकर्त्यांचें सत्कार्य । मंगलाचरणीं ॥२२॥ विविध ग्रंथांमाजीं भली । नाना दैवतें वंदिलीं । एकचि रीत स्वीकारिली । सर्वांनींहि ॥२३॥ ब्रह्मा तो अपूज्य झाला । म्हणून त्यांनीं न वंदिला । परंपरेनें चालला । मार्ग ऐसा ॥२४॥ परि श्रीतुलसीदास । आचरिती हा विशेष । मंगलाचरणीं धात्यास । वंदूनिया ॥२५॥ संतांचें समान चित्त । हें तों आलें प्रत्ययाप्रत । वंदिले मंगलाचरणांत । सुष्ट दुष्ट ॥२६॥ विश्वचि जया राममय । कोण पूज्य, कोण अपूज्य । या विचारें हें आश्चर्य । प्रत्यया ये ॥२७॥ कीं सर्वसृष्टि-निर्माता । जया हरिहरांची समता । तोहि वंदिती विधाता । तुलसीदास ॥२८॥) विधात्याची पदधूलि । वंदितों मी निज भालीं । जेणें ही रचना केली । भवाब्धीची ॥२९॥ चन्द्रमा, धेनु, अमृत । यांच्या रूपें ते संत । विष–वारुणीच्या रूपांत । प्रकटले खल ॥३०॥ देवता, ब्राह्मण, पंडित । तेविं गुरुपदांप्रत । वंदून प्रार्थितों, हात ।

जोडूनिया ।।३१।। होऊनिया सुप्रसन्न । सर्वहि करा हो ! पूर्ण । मनोरथ शोभायमान । मन्मनींचे ।।३२।। पुन्हां वंदितों सरस्वती। देवगंगा भागीरथी। चरितें रम्य पवित्र अति । उभयतांचीं ।।३३।। स्नान-पान करितां एक । हरी पापें सकलिक । सांगतां, ऐकतां अविवेक । एक हरी ।।३४।। गुरु आणि माता–पिता । शिव-पार्वती तत्त्वतां । वंदितों त्या दीननाथां । आद्यदात्या ।।३५।। जे अनन्य भावें सेवक । जे स्वामीहि अलौकिक । सीतापतीचे निःशंक । सखेहि तसे ।।३६।। हेतूची नसतां उपाधि । तुलसी-दासासंबंधीं । ज्यांची हिताची बुद्धि । सर्वतोपरी ।।३७।। पाहून कलिकालाप्रत । जगाचें व्हावया हित । श्रीपार्वतीच्या सहित । श्रीशंकरें– ।।३८।। साबर ज्याचें अभिधान । तें मंत्रजाल संपूर्ण । केले असें जें निर्माण । सुप्रसिद्ध ।।३९।। अक्षरांचा नसे मेळ । निरर्थक जपमाळ । कळे प्रभाव केवळ । शिवप्रतापें ।।४०।। तोचि महेश्वर स्वतां। मजवरी प्रसन्न असतां। मुदमंगलमूलकथा। वर्णीन मी ।।४१।। शिव-पार्वतींतें स्मरून । तत्प्रसादहि मिळवून । रामचरित्र वर्णीन । प्रसन्न मनें ।।४२।। माझी कविता गोड लागे । श्रीशिवकृपानुषंगें । चंद्रमंडलसंसर्गें । रात्र जशी ।।४३।। जे या रामकथेप्रति । धरूनिया अति प्रीतीं । गाती, ऐकती, समजती । लक्ष्यपूर्वक– ।।४४।। रामपदीं अनुरक्त । होतील ते सुनिश्चित । विभागी कलिदोषरहित । मांगल्याचें ।।४५।। स्वप्नीं असतांहि जरी । करितील माझ्यावरी । खराच शिवशांकरी । अनुग्रह–।।४६।। तरी सत्यचि होतील । मीं बोलिले सर्व बोल । प्राकृत कवितेच्या केवल । प्रभावानें ।।४७।। वंदितों अयोध्या पुरी । जी असे पवित्र भारी । कलिपाप नष्ट करी । शरयूहि ती ।।४८।। मी वंदितों या उपरी । अयोध्येच्या नरनारी।

रामप्रीति जयांवरी । अपार असे ॥४९॥ त्या ममतेचें द्योतक । जानकीचा जो निंदक । त्या रजकाचीं अनेक । नाशिलीं पापें ॥५०॥ सर्व प्रजाजनांप्रत । करूनिया शोकरहित । केले सर्वथा सुस्थित । राघवानें ॥५१॥ कौसल्येस माझें वंदन । जी प्राचीदिशेसमान । जिची कीर्ति-क्रोली भरून । सर्व जगीं ॥५२॥ ज्या कौसल्येच्या उदरीं । सुंदर चंद्राच्या परी । अवतरलासे भूवरी । रामचंद्र ॥५३॥ जो सकल विश्वाप्रत । सुखदाता सुनिश्चित । दुष्ट-कमला तुषारवत् । असे जो का ॥५४॥ श्रीदशरथ भूपाप्रत । सर्व राज्ञीसमवेत । पुण्यमंगल मूर्तिमंत । मानूनिया– ॥५५॥ करीतसे मी वंदन । काया-वाङ्मनेंकरून । सुत-सेवक जाणून । करोत कृपा ॥५६॥ होऊन ज्यांचा निर्माता । महत्त्व पावला धाता । महाभाग माता–पिता । राघवाचे ॥५७॥ वंदितों त्या दशरथास । जो का अयोध्याधीश । निर्वाणीचें प्रेम ज्यास । राम-पदीं ॥५८॥ दीनदयाल रामाची । ताटातूट होतां साची । त्यागी तनु आवडीची । तृणसम जो ॥५९॥ परिवारासमवेत । वंदितों विदेहाप्रत । ज्याचें प्रेम असें गुप्त । रामपदीं ॥ ६० ॥ जें योग–भोगाभीतरीं । झांकलें होतें तोंवरी । रामास बघतां सत्वरीं । प्रकट झालें ॥ ६१ ॥ प्रथमतां मी वंदीन । त्या भरताचे चरण । ज्याचें नेमव्रत पूर्ण । अवर्णनीय ॥६२॥ रामाच्या पद-पंकजीं । ज्याचें मन घाली रुंजी । लुब्ध भृंगापरी ना त्यजी । सान्निध्य जें ॥ ६३ ॥ वंदीन आतां प्रांजल । लक्ष्मणाचें पदकमल । भक्त-सुखद शीतल । सुंदर जें ॥ ६४ ॥ श्रीरघुपतीची कीर्ति । पताका निर्मळ अति । यश झालें तिजप्रति । दंडासम ॥६५॥ जो का सहस्रशीर्ष । कारण जो जगतास । भूभय निवारणास । अवतरे जो ॥६६॥

तो राहो सदोदित । अनुकूल मजप्रत । कृपासिंधु सुमित्रा-सुत । गुणनिधान ॥ ६७ ॥ शत्रुघ्नपदाब्ज थोर । त्यास माझा नमस्कार । भरतानुगामी शूर । सुशील जो ॥६८॥ महावीर हनुमाना । माझी असो ही वंदना । वर्णिलें जयाच्या गुणा । रामें स्वयें ॥६८॥ माझा असो प्रणिपात । त्या वायु-कुमाराप्रत । जो दुष्ट-वना अग्निवत् । ज्ञानघन ॥७०॥ ज्याच्या हृदयमंदिरांत । वास करी रघुनाथ । करीं धनुष्य-बाणाप्रत । धरूनिया ॥७१॥ सुग्रीव वानरभूषण । अस्वलाधिप जांबवान । तैसाचि तो बिभीषण । राक्षसराज ॥७२॥ अंगद वालीचा नंदन । त्या अंगदादिकरून । जो कांहीं असे गण । वानरांचा ॥७३॥ सर्वांच्या सुंदर चरणा । माझी असो ही वंदना । ज्यांनीं मिळ-विलें रघुनंदना । हीन देहीं ॥७४॥ रामपदाचे उपासक । जे जे असती अनेक । पशु, पक्षी, देवलोक । असुरासह ॥७५॥ त्या सर्वांच्या पदाब्जांस । मी करितों वंदनास । जे केवळ रामदास । निर्हेतुक ॥७६॥ शुक, सनक, सनंदन । सनत्कुमार सनातन । नारद ज्याचें अभिधान । आदि मुनि ॥७७॥ जे जे थोर थोर मुनि । ज्ञान्यांचेहि शिरोमणि । पांडित्यांत अग्रगणी । जाहले जे ॥७८॥ वंदितों सर्वांलागून । धरेवरी शिर ठेवून । मुनींनो ! दास जाणून । कृपा करा ॥७९॥ जो विदेहाची सुता । जानकी जगताची माता । करुणाधाम रघुनाथा । अतीव प्रिय ॥८०॥ तत्पदद्वयाब्जांप्रत । मी करितों प्रणिपात । ज्यायोगें करीन प्राप्त । निर्मल मति ॥८१॥ पुन्हां सवाङ्मनःकर्म । रघुनायक श्रीराम । सर्वसमर्थ तत्पदपद्म । वंदितों मी ॥८२॥ ज्याचे नेत्र पद्मापरी । धनुर्बाण धारण करी । भक्त-संकटातें हरी । सौख्यदाता ॥८३॥ शद्ब आणि अर्थ दोन । जलतरंगासमान ।

बोलावयासीच भिन्न। अभिन्न ते ॥८४॥ तेविं सीतारामपदां-प्रति। ऐक्यभावें माझी प्रणति। जयां फारचि आवडती। दीनजन ॥८५॥ वंदितों आतां सप्रेम। राघवाचें 'राम' नाम। रविचंद्राग्नींचें परम। तत्त्वचि जें ॥८६॥ (या 'राम' नामा-मधून। 'र' 'अ' 'म' जे तीन वर्ण। त्यांचें करूं विवरण। सविस्तर ॥८७॥ अग्निबीज तो 'र' कार। वडव, दाव आणि जठर। इत्यादि जे वैश्वानर। मूळ त्यांचें ॥८८॥ जें जें शुभा-शुभ कर्म। मनाचा मलिन धर्म। त्या सर्वांसहि जें भस्म। करीतसे ॥८९॥ भानुबीज तो 'अ' कार। सहा शास्त्रें, वेद चार। यांच्या ज्ञानाचे निर्भर। प्रकाशक ॥९०॥ त्या ज्ञान-प्रकाशें परम। हृदयींचें अज्ञानतम। याचा जो का उपशम। करीतसे ॥९१॥ हिमकर बीज 'म' कार। जलें परिपूर्ण अपार। त्रिताप हरून निरंतर। शीतल करी ॥९२॥ 'र' कार बीज पूर्ण। वैराग्याचेंच कारण। मुख्यत्वें आहे म्हणून। सांगती बुध ॥९३॥ तैसें ज्ञानाचें कारण। 'अ' कार बीज पूर्ण। आणि भक्तीचें निदान। 'म' कारचि ॥९४॥ 'र' कार वैराग्यकारण। कर्म-वासनेचें इंधन। दहन करी म्हणून। अग्निरूप ॥९५॥ 'अ' कार ज्ञानकारण। मोहांधकारालागून। नष्ट करितें म्हणून। सूर्यरूप ॥९६॥ 'म' कार भक्तीचें कारण। त्रिविध तापालागून। शांत करितें म्हणून। चन्द्ररूप ॥९७॥ कृशानु, भानु, हिमकर[1]। शब्द योजिले सचातुर। 'र' कार, 'अ' कार, 'म' कार। व्याप्त ज्यांत ॥९८॥ श्रीमत्तुलसीदासांचें। हें बुद्धिकौशल्य साचें। महत्त्व 'राम' नामाचें। ऐका पुढें ॥९९॥ ) 'र' कार, 'अ' कार, 'म' कार। शिव–विष्णु–चतुर्वक्त्र। वेदाचा प्राण अपार।

---

१ बंदउँ नाम राम रघुबरको। हेतु कृसानु भानु हिमकरको

'राम' नाम ॥१००॥ ( शिव तो ज्ञानवाचक। विष्णु उपासनावाचक। विधाता कर्मवाचक। अनुक्रमें ॥१०१॥ ज्ञानोपासनाकर्म। तद्वाचक शद्ब राम। ऐसें त्रिकांडात्मक नाम। राघवाचें ॥१०२॥ या रामनामापासून। झाला असे जो उत्पन्न। मोक्षदायक म्हणून। 'ॐ' कार तो ॥१०३॥ वेदतत्त्वाचा अधिकार। ज्यास असे, त्यास तर। 'तत्त्वमसि' अपर। रामनाम ॥१०४॥ ) सत्त्वरजस्तमोरहित। उपमा नसे ज्याप्रत। गुणास अधिष्ठानभूत। रामनाम ॥१०५॥ हाचि असे महामंत्र। ज्याचा जप निरंतर। स्वमुखानें महेश्वर। करीतसे ॥१०६॥ काशीक्षेत्रांत महेश। मुक्ति मिळाया जीवांस। याच मंत्राचा उपदेश। करीतसे ॥१०७॥ या मंत्राचें महिमान। जाणतसे गजानन। पूजेमाजीं अग्रस्थान। रामनामें ॥१०८॥ ( पूर्वीं देवांच्या अंतरीं। इच्छा उद्भवे यापरी। आपुलीच व्हावी खरी। अग्रपूजा ॥१०९॥ हें पाहून विधात्यानें। सांगितलें प्रयुक्तीनें। प्राप्त होय ज्या साधनें। अग्रपूजा ॥११०॥ म्हणे "पृथ्वीप्रदक्षिणा। करील जो आधीं जाणा। अग्रपूजेच्या संमाना। तोचि पावे" ॥१११॥ वाहनें घेऊन आपुलीं। निघालीं देवमंडळी। पृथ्वीसभोंवतीं घाली। प्रदक्षिणा ॥११२॥ परि निराश गजानन। त्याचें मूषक वाहन। म्हणून येई परतून। माघारीं तो ॥११३॥ मार्गीं भेटले नारद। त्यांनीं केला तया बोध। दिला लिहूनिया शद्ब। 'राम' ऐसा ॥११४॥ 'या नामाच्या सभोंवतीं। प्रदक्षिणा घाल,' म्हणती। हें ऐकून गणपति। तैसेंचि करी ॥११५॥ रामनामा प्रदक्षिणा। घालून सत्वरीं जाणा। भेटलसे चतुरानना। येऊनिया ॥११६॥ त्या मागूनिया सर्व। परत पातले देव। चोज पाहती अभिनव। अकल्पित ॥११७॥

रामनामाचें महिमान । जाणून चतुरानन । गणेशातें अर्पी मान । अग्रपूजेचा ॥११८॥ ) वाल्मीकीच आपोआप । जाणे नामाचा प्रताप । जो करून उलटा जप । सिद्ध होय ॥११९॥ 'सहस्र-नामाच्या सम । हेंचि एक रामनाम' । ऐसी शिवगिरा उत्तम । ऐकूनिया ॥१२०॥ जपूनिया नामा-प्रत । आपल्या पतिसमवेत । जेविती झाली निश्चिंत । पार्वती ॥१२१॥ ( एकदां भगवान् शिव । बैसतां भोजनास्तव । बाहती सप्रेमभाव । पार्वतीतें ॥१२२॥ तें ती बोले नम्रवाचा । 'विष्णुसहस्रनामाचा । पाठ अजून व्हावयाचा । असे माझा' ॥१२३॥ पाहूनिया तिचा भाव । तैं सांगती सदाशिव । रामनामाचा प्रभाव । अलौकिक ॥१२४॥ 'घे एकदां रामनाम । मनोरमे ! रामीं रम । हें सहस्रनामा-समान । वरानने !' ॥१२५॥ तें ऐकून पतिवचन । रामनामातें घेऊन । पार्वती करी भोजन । शिवासवें ॥१२६॥) तिच्या हृदयींची भक्ति । पाहून शिव हृष्ट होती । सतींची अग्रणी करिती । अर्धांगीहि ॥१२७॥ रामनामाचा प्रभाव । स्वानुभवें जाणे शिव । फळे काळकूट अशिव । अमृतापरी ॥१२८॥ ( जैमिनी पुराणांतरीं । नामाच्याच विषयावरी । महर्षि व्यासांची वैखरी । महत्त्वाची ॥१२९॥ "रामनाम परब्रह्म । सर्व देवां पूज्यतम । न जाणे शंकरासम । कुणीहि मुने ! ॥१३०॥ कच्छावतार धरून । देवें केलें सिंधुमंथन । रत्नें निघालीं त्यांतून । चतुर्दश ॥१३१॥ प्रत्येकाच्या इच्छेनुसार । वांटी तयां शारङ्गधर । परि निघालें त्यांत घोर । हालाहल ॥१३२॥ त्या विषाचा प्रभाव अति । जाळी जैं ब्रह्मांडाप्रति । देव सैरावैरा पळती । त्याच्या भयें ॥१३३॥ शंकरास गेले शरण । म्हणती 'हे पंचानन ! । आम्ही जातसों जळून । वांचवा हो' ! ॥१३४॥

तें शिव दीनदयाल । प्राशीतसे हालाहल । तेंचि रामनामें तत्काल अमृत होय" ॥१३५॥) वर्षर्तूच्या समान ती । श्रीरघुनाथाची भक्ति । तुलसी सद्भक्त असती । धान्यासम ॥१३६॥ रामनामाचें सोज्ज्वल । जें श्रेष्ठ वर्णयुगुल । श्रावण-भाद्रपद केवल । मास दोन ॥१३७॥ (वर्षर्तु आल्यावांचून । साळी न होती उत्पन्न । भक्तपदातें योजून । दर्शविलें ॥१३८॥ भातास जैसा वर्षर्तु । मासद्वय असे हेतु । भक्तांचा जीवनतंतु । 'राम' नाम ॥१३९॥ अक्षरें 'र' कार 'म' कार । मधुर आणि मनोहर । जनहृदयींचे नेत्र । वर्ण दोन ॥१४०॥ (हे नेत्र नसती ज्यांस । अंधत्व येतसे त्यांस । पाहूं न शकती देवास । कदापि ते ॥१४१॥) जपावया सुलभ अति । सुखप्रद सर्वांप्रति । देती ऐहिक लाभ, मुक्ति । परलोकीं ॥१४२॥ सांगतां, ऐकतां, जपतां । विशेष यांची मधुरता । प्रिय तुलसीच्या चित्ता । रामलक्ष्मणासम ॥१४३॥ दोन्ही वर्णांचें वर्णन । करूं गेल्या पृथक् जाण । प्रीति जाय दुभंगून परस्पर ॥१४४॥ जीव-ब्रह्माच्या समान । 'राम' नामें दोन वर्ण । साहचर्यें असती पूर्ण । स्वाभाविक ॥१४५॥ नरनारायणापरिस । बंधुत्व या द्विवर्णांस । विश्वपालक विशेष । भक्तत्राते ॥१४६॥ भक्तिसुंदरीचे जाण । वर्ण ते कर्णभूषण । शुद्ध चन्द्रार्कासमान । जगद्हितार्थ ॥१४७॥ स्वाद एक तृप्ति एक । कैवल्यामृताचे निःशंक । कूर्मशेषापरी धारक भूगोलाचे ॥१४८॥ छत्र आणि मुकुटमणि । सर्व वर्णां उच्चस्थानीं । 'राम' ऐसे वर्ण दोन्ही । विराजती ॥१४९॥ (रेफरूप तो 'र' कार । अनुस्वार तो 'म'कार । मुकुटमणि छत्र । याच अर्थें ॥१५०॥) विचार करितां नामी-नाम । दोघेहि असती सम । प्रभुसेवकांचें प्रेम । परस्पर ॥१५१॥ अहो ! नाम

आणि रूप । मूळ मायेचें स्वरूप । ईश्वराच्याच साक्षेप । उपाधि ह्या ॥१५२॥ जरी या दोन्ही उपाधि । अवर्णनीय, अनादि । निरूपण करिती सुधी । ब्रह्मवेत्त ॥१५३॥ कोण अधिक, कोण न्यून । अन्यायचि करितां कथन । साधु जाणती ऐकून । तद्‍गुणभेद ॥१५४॥ पाहतां विचार करून । रूप हेंचि नामाधीन । न होय रूपाचें ज्ञान । नामाविणें ॥१५५॥ नाम-ज्ञानाव्यतिरिक्त । जाणतां नये रूपाप्रत । पदार्थ करतलगत । नेणवे तो ॥१५६॥ रूप दृष्टीं न देखतां । नामाचें स्मरण होतां । प्रगटून प्रेम चित्ता । विशेष गमे ॥१५७॥ नाम–रूपाची गति–कथा । अनिर्वाच्यचि सर्वथा । न वर्णवे, परि जाणतां । सुख देतसें ॥१५८॥ निर्गुण सगुण सम्यक् । नाम साक्षीभूत एक । सुज्ञ दुभाषी बोधक । उभयतांचा ॥१५९॥ ( जो होतसे रममाण । रमवी जो त्यालागून । दोघांचेंहि होय ज्ञान । रामशद्बें ॥१६०॥ जो होतसे रममाण । त्याचें स्वरूप निर्गुण । रमवी जो का, सगुण । रूप त्याचें ॥१६१॥) अहो ! या रामाचें नाम । असें रत्नदीपासम । जिव्हा–देहलींत ठाम । धारण करीं, ॥१६२॥ अगा हे तुलसीदासा ! । आंत बाहेर सरिसा । जरी उज्ज्वल प्रकाशा । इच्छिसी तूं ॥१६३॥ (आंत बाहेर प्रकाश । असावयाचा उद्देश । तोहि यथावकाश । विशद करूं ॥१६४॥ मनोबुद्धिचित्ताहंकार । हीं अंतरिंद्रियें चार । ज्ञानकर्मेंद्रियें साचार । बाहेरचीं ॥१६५॥ या इंद्रियांचा निःशेष, जाया अंधकार-दोष । मणि-दीपाचा प्रकाश । आवश्यक ॥१६६॥) नाम जिव्हेनें जपती । योगी स्वरूपीं जागती । बाह्य सृष्टी-पासून होती । अलिप्त ते ॥१६७॥ ब्रह्मसुखाचा अभिनव । निरूपम घेती अनुभव । निरामय, रूप न नांव । अनिर्वाच्य

जें ॥१६८॥ अति गूढ ज्याची गति । ऐशा स्वरूपानंदाप्रति । ज जीव जाणूं इच्छिती । निज मनांत– ॥१६९॥ आपुल्या जिव्हेनें त्यांनीं । नामाचा जप करोनी । त्या गूढ गतिलागूनी । ओळखावें ॥१७०॥ लय लावून निःशंक । नाम जपती साधक । पावून अणिमादिक । सिद्ध होती ॥१७१॥ ( प्रह्लादादि भक्त-गण । निष्काम जिज्ञासु जाण । त्यांचे मनोरथ पूर्ण । नामजपें ॥१७२॥ सुग्रीव आणि बिभीषण । अर्थार्थी भक्त जाण । त्यांचे मनोरथ पूर्ण । नामजपें ॥१७३॥ महद्दुःखें त्रस्त जन । ते नामातेंच जपून । घोर संकट निरसून । सुखी होती ॥१७४॥ ( गजेन्द्र आणि द्रौपदी । आर्त भक्तांची मांदी । तरली संकटां-बुधीं । नामजपें ॥१७५॥ ) श्रीरामभक्तांचे प्रकार । जगांत असती चार । पुण्यात्मे, निष्पाप, उदार । चौघेहि ते ॥१७६॥ ( आर्त, जिज्ञासु, अर्थार्थी । ज्ञानी चवथा पुरुषार्थी । भगवद्-गीतेंत तत्कीर्ति । वर्णिलीसे ॥१७७॥) चौघांहि चतुरां कारण। आधार नामचि जाण । प्रभूस ज्ञानी त्यांतून । विशेष प्रिय ॥१७८॥ युगांत, वेदांत चार । नाम–प्रभाव सर्वत्र । अन्यथा कलींत मात्र । उपाय नसे ॥१७९॥ सर्वहि वासनांप्रत । टाकूनिया जे अत्यंत । श्रीरामभक्तिरसांत । लीन झाले ॥१८०॥ नामाचें सुप्रेमामृत । त्याच्या निरामय डोहांत । ज्यांनीं केलें मज्जनाप्रत । मीनापरी ॥१८१॥ ( धर्मार्थकाममोक्ष । चारी पुरुषार्थ प्रत्यक्ष । विचारें पाहतां सापेक्ष । सकामचि ॥१८२॥ याहि वासनांनीं शून्य । असती प्रभूशीं अनन्य । तेचि निष्काम धन्य । भक्त खरे ॥१८३॥ ) निर्गुण आणि सगुण । ब्रह्माचीं स्वरूपें दोन । अनिर्वाच्य, उपमाहीन । अगाध, अनादि ॥१८४॥ ( येथें तुलसीदासांनीं । केली स्वतांची मांडणी । कीं नामचि

दोहोंहुनी । श्रेष्ठ असे ॥१८५॥ ) ज्या श्रेष्ठतम नामानें । केवळ निज बळानें । सगुण–निर्गुणाकारणें । वश केलें ॥१८६॥ प्रौढ ज्ञानें जे असती । ते परहृद्‌गत जाणती । तत्प्रेमानुभवेंप्रीति । कथितों मी ॥१८७॥ अग्नि काष्टगत एक । दुसरा व्यावहारिक । दोन्ही अग्नीसी सम्यक् । ब्रह्मविचार ॥१८८॥ ( काष्ठींचा तो हुताशन । त्यापरी ब्रह्म निर्गुण । व्यावहारिकापरी जाण । सगुण ब्रह्म ॥१८९॥ जैसे दोन्हीहि पावक । नामें भिन्न, स्वरूपें एक । सगुण-निर्गुण-विवेक । त्याचपरी ॥१९०॥) दोघेहि असती दुर्गम । नामेंचि होती सुगम । ब्रह्म-रामांहून नाम । मन्मतें श्रेष्ठ ॥१९१॥ (कळाया सगुण-निर्गुण । नामचि एक साधन । सगुण-निर्गुणांहून । नाम थोर ॥१९२॥) ब्रह्म अविनाशी एक । असें सर्वत्र व्यापक । आणि सच्चिदघनात्मक । आनंदपुंज ॥१९३॥ ऐसा प्रभु हृदंतरीं । जो संपूर्ण निर्विकारी । दीन दुःखीच संसारीं । जीव सारे ॥१९४॥ (ब्रह्म असून स्वयमेव । धरूनिया देहभाव । मुकूनिया सुखानुभव । दुःखी होती ॥१९५॥) नामाचें यथार्थं रूप । प्रकटे करितां तज्जप । रत्नांतून आपोआप । मोल जैसें ॥१९६॥ याचप्रकारें-करून । श्रेष्ठ निर्गुणाहून । असे नाम-महिमान । अपरंपार ॥१९७॥ रामाहूनिया साचार । मी म्हणेन नाम थोर । माझा स्वतांचा विचार । तदनुसार ॥१९८॥ (नाम श्रेष्ठ रामाहून । यासी काय हो ! प्रमाण । तें सांगती सोदाहरण । तुलसीदास ॥१९९॥) रामें भक्तहितास्तव । स्वयें होऊन मानव । कष्ट साहून साधु सर्व । सुखी केले ॥२००॥ सप्रेम जपतां नाम । कांहीं न करितां श्रम । मोदमंगलाचें धाम । भक्त होती ॥२०१॥ तपस्विनी अहल्या नारी । राम तिजचि एक तारी । नाम दुष्ट बुद्धीतें सुधरी । कोटयवधि ॥२०२॥ रामें केवळ ऋषिहिता । करून

ताटिकेच्या घाता । पुत्रांसह सैन्यां समस्तां । नष्ट केलें ॥२०३॥ दोष-दुःखांच्यासहित । भक्त-दुराशा समस्त । नाम नाशी, निशेप्रत । सूर्य जैसा ॥२०४॥ रामें आपण होऊन । केलें शिव-चाप भंजन । नामप्रतापेंकरून । भव-भय नुरें ॥२०५॥ एका दंडकाकारणें । रम्य केलें राघवानें । नामें असंख्य जनमनें । पवित्र केलीं ॥२०६॥ राक्षसांचा समुदाय । निर्दाळी श्रीराम-राय । सर्व कलिपापक्षय । नाम करी ॥२०७॥ शबरी जटायु सन्मति । वेंचक सद्‌भक्तांप्रति । मात्र दिधली सद्‌गति । रामचंद्रें ॥२०८॥ परि नामें उद्धरिला । असंख्य दुष्टांचा मेळा । ठावी नाम-गुण-कला । वेदांप्रति ॥२०९॥ रामें सुग्रीव बिभी-षण । हे दोनचि भक्त जाण । रक्षिले येतां शरण । जाणती सर्व ॥२१०॥ (सुग्रीव साह्य कराया । बिभीषण भेद घ्याया । केला आपुला, सांगाया । नलगे मुळीं ॥२११॥) नामें असंख्य दीनांप्रत । राखिलें असे सुरक्षित । गाजते लोक-वेदांत । ब्रीद थोर ॥२१२॥ (अजामिळ आणि गणिका । ऐशा अनेक पापी लोकां । सद्‌गति लाभली एका- । नाममात्रें ॥२१३॥) ऋक्ष-कपिसेना निरुपम । एकत्र करूनिया राम । सेतूस्तव करी श्रम । अतोनात ॥२१४॥ नामाचा करितां उच्चार । शुष्क होतो भवसागर । याचा करा मनीं विचार । सज्जनहो ! ॥२१५॥ करूनिया घोर रण । कुळासह मारिला रावण । आला अयोध्ये-लागून । सीतेसह ॥२१६॥ अयोध्या राजधानीचे । राम राजे असती साचे । देव, मुनीश्वर सुवाचें । गाती गुण ॥२१७॥ भक्त नामातें स्मरती । मनीं धरूनिया प्रीति । महामोहसेना जिंकिती । अनायासें ॥२१८॥ निजानंदसाम्राज्यांत । स्वच्छंदें फिरती नित । नामें शोक न त्यांप्रत । स्वप्नांतहि ॥२१९॥

निर्गुण ब्रह्म, सगुण राम । त्यांहून श्रेष्ठ हें नाम । वरदायकासि निस्सीम । वरदायक ॥२२०॥ (शिव-ब्रह्मादि देवता । वरदायिनी जरी स्वतां । त्यांतेंहि नाम पाहतां । वरदायक ॥२२१॥) शतकोटि रामचरित । त्यांतून रामनामाप्रत । घेई महेश मनांत । जाणूनिया ॥२२२॥ नामप्रसादें करून । शाश्वत शिवपंचानन । वेषें अमंगल असून । मंगलनिधि ॥२२३॥ शुक-सनक सकलिक । मुनि-योगी-सिद्धादिक । नामप्रसादें ब्रह्मसुख । उपभोगिती ॥२२४॥ नामप्रतापालागुनी । जाणती नारद मुनि । प्रिय हरिहरालागुनी । जगप्रिय जे ॥२२५॥ जपतां नामालागूनी । कृपा करितां चक्रपाणि । झाला भक्त शिरोमणि । प्रह्लाद तो ॥२२६॥ उद्विग्नतेनेंचि ध्रुव । जपतां हरीचें नांव । पावे निरुपम ठाव । अढळ ऐसा ॥२२७॥ स्मरतांचि हनुमंत । या पवित्र नामाप्रत । करून घे निजांकित । राघवातें ॥२२८॥ इतरहि पापी जे का । अजामिळ, गजेन्द्र, गणिका । हरिनामप्रभावें देखा । मुक्त झाले ॥२२९॥ ऐसी नामाची थोरवी । मीं कोठवरी वर्णावी । रामहि नामाची थोरवी । वर्णू न शके ॥२३०॥ (वर्णितां नाममहिमा । येथें झाली पूर्ण सीमा । लघुत्व दिधलें रामा । नामाहुनी ॥२३१॥ गोस्वामींनीं या रीतीं । वर्णून नाम—महति । केली अप्रत्यक्ष स्तुति । राघवाची ॥२३२॥ कुणी एकदां श्रीमंत । कृपणहि दिसे अत्यंत । तत्कृपणत्व त्याप्रत । दाखवितां—॥२३३॥ "अहो कृपणशिरोमणि ! । तुम्ही व्यापारी अग्रणी । तुमच्या नांवें कुणीहि आणी । लक्ष धन" ॥२३४॥ 'कृपण' ऐसें संबोधिलें । त्याचें न त्या दुःख झालें । परि प्रसन्नता पावलें । चित्त त्याचें ॥२३५॥ आणि खरें पाहूं जातां । नांवेंचि धन ये हातां । परि स्वयें मागूं जातां । मिळे न त्या ॥२३६॥ ही जाणीव

देतां तया । दुःख होईल कासया । व्यक्तीहुनी नामास या । महत्त्व ऐसें ॥२३७॥ वर्णितां नाममहति । करितां ही व्यंग्य स्तुति । तुलसीदासावरी होती । प्रसन्न प्रभु ॥२३८॥) श्रीरामचन्द्राचें नाम । असे केवल कल्पद्रुम । प्रतिकल्याणाचें धाम । कलियुगीं ॥२३९॥ ज्याचें करितांचि स्मरण । पूर्वीचा भांगेसमान । तुलसी हा झाला पूर्ण । तुलसीदास ॥२४०॥ (तुलसीदासें सगौरव । वर्णितां नामप्रभाव । कथिलासे स्वानुभव । यापरीनें ॥२४१॥ तुलसींत उपजे भांग । दोघां एकत्र संयोग । भांग गौण, तुळस चांग । मान्य जगीं ॥२४२॥ या नामाश्रयावांचून । जो होतों भांगेसमान । तो नामें गेलों होऊन । तुलसीपरी ॥२४३॥) चतुर्युगीं तीन्ही काळीं । स्वर्मृत्यु आणि पाताळीं । जीवा विशोकता आली । नामजपें ॥२४४॥ श्रुति, पुराणें आणि संत । या सर्वांचें हेंचि मत । सर्व पुण्यफल निश्चित । रामप्रीतीं ॥२४५॥ कृतयुगीं मुख्य ध्यान । त्रेतांत यज्ञविज्ञान । द्वापरीं तुष्टे भगवान् पूजनानें ॥२४६॥ परि कलि हा मलिन । पापतरूचें मूळ जाण । पापाब्धीं जनमनें मग्न । मीनापरी ॥२४७॥ कराल कलिकाळांत । नाम कल्पतरु मूर्त । स्मरणें नासे समस्त । मायाजाल ॥२४८॥ हें रामनाम कलींत । दे इच्छित वस्तूप्रत । करी इहपरहित । पितरांपरी ॥२४९॥ या कलियुगांत कांहीं । कर्म, भक्ति, ज्ञान नाहीं । रामनामाचाच पाहीं । आधार एक ॥२५०॥ कलि कालनेमीसम । केवल कपटाचें धाम । त्या सुबुद्ध समर्थ नाम । हनुमंतचि ॥२५१॥ राघवाचें 'राम' नाम । प्रत्यक्ष नरसिंहासम । हिरण्यकशिपु अधम । कलिकाल हा ॥२५२॥ जपकर्ता भक्तवृन्द । तो मूर्तिमंत प्रह्लाद । करूनि असुराचा वध । रक्षीतसे ॥२५३॥ भावें कीं दुष्ट मानसें ।

उल्हासें किंवा आळसें। नामजपें मंगल असे। दाही दिशां ॥२५४॥ तें नाम स्मरून आतां। श्रीरामाची गुणगाथा। करितों मी श्रीरघुनाथा। वंदूनिया ॥२५५॥ सुधारील न्यूनाधिक। सर्वतोपरी तो एक। ज्याच्या कृपेस निःशंक। सीमाच नसे ॥२५६॥ श्रेष्ठ स्वामी रामासम। मत्सम सेवक अधम। ब्रीद जाणून दयाधाम। रक्षी मज ॥ २५७॥ (तो सुस्वामी, मी कुसेवक। हा योग नव्हेंचि सम्यक्। म्हणून वाटतें दुःख। तुलसीदासा ॥२५८॥ परि केलें मद्रक्षण। यासी एकचि कारण। निज ब्रीदास आपण। राम पाही ॥२५९॥) लोकांत आणि वेदांत। श्रेष्ठ स्वामींची ही रीत। विनति ऐकतां हृद्गत। ओळखिती ॥२६०॥ श्रीमंत, निर्धन लोक। ग्राम्य तैसे नागरिक। प्रसिद्ध पातकी, मूर्ख। पंडितहि ॥२६१॥ सत्कवि, असत्कवि परि। आपापल्या बुद्धीपरी। नृपा सर्व नरनारी। गौरविती ॥२६२॥ साधु, धूर्त, सदाचारी। ऐसा भूप असे जरी। परम कृपाळू तो तरी ईश्वरांश ॥२६३॥ ('ना विष्णुः पृथिवीपति'। ऐसें सर्वत्र बोलती। परि तें कोणत्या अर्थी। हें नकळे ॥२६४॥ सत्ताधीश कसाहि जरी। बैसे सिंहासनावरी। तो ईश्वरांशावतारी। म्हटलें जर ॥२६५॥ नेणे प्रजेचें कल्याण। स्वार्थी ज्याचें लक्ष्य पूर्ण। न्यायनीति-राजकारण। नेणेचि जो ॥२६६॥ सौख्य मिळेल कशांत। वागणें कोणतें युक्त। याची मातहि स्वप्नांत। नेणेचि जो ॥२६७॥ प्रजेचें दुर्दैन्य, क्लेश। नुरवावे मुळीं लेश। हें कर्तव्य नरेश। नेणेचि जो ॥२६८॥ सर्व दुर्गुणांचा निधि। अनैतिक ज्याची बुद्धि। ज्याची प्रजा तुष्ट कधीं। न राहेचि ॥२६९॥ ऐशाहि काय भूपास। म्हणावें हो! ईश्वरांश। कळालें राजनिष्ठास। पाहिजे हें २७०॥ सांगती तुलसीदास।

साधु-सुज्ञ-सुशीलास । म्हणावें कृपाळु नृपास । ईश्वरांश ॥२७१ ॥ आतां ईश्वरांश ऐसें । उदार तच्चित्त कैसें । तेंहि सांगती सारांशें । तुलासीदास ॥२७२॥ ) ऐकून सर्वांची विनंति । ते आदरें सन्मानिती । जाणून तदुक्ति भक्ति । स्वभावगति ॥२७३॥ जो प्राकृत महिधर । तत्स्वभाव हा उदार । सुज्ञ-शिरोमणि थोर । रामराजा ॥२७४॥ नुसत्या प्रेमेंकरून । श्रीराम होय प्रसन्न । मंद पापी मजहून । कोण जगीं? ॥२७५॥ शठ सेवकाचें प्रेम । अभिरुचि महत्तम । स्वीकारील तो श्रीराम । कृपामय ॥२७६॥ जेणें नौकेच्या समान । जलीं तारिले पाषाण । केले ऋक्ष—कपि प्रधान । बुद्धिमंत ॥२७७॥ मी स्वयें म्हणतों ऐसें । लोकहि बोलती तैसें । राम सहन करीतसे । उपहासातें ॥२७८॥ कीं सीतानाथासमान । स्वामी श्रीरघुनंदन । आणि हा सेवक जन । तुलसीदास ॥२७९॥ (उपहासातें साहून । राम मत्स्वामी होऊन । आणी योग जुळवून । भावार्थ हा २८०॥) माझा खोडसाळपणा । धाष्ट्र्य भारी असे जाणा । नरक ऐकून पापांना । मुरडील नाक ॥२८१॥ माझें मज होतां ज्ञात । भीति वाटते मनांत । परि नाठवी रघुनाथ । स्वप्नींहि ते ॥२८२॥ ऐकून निर्मल चित्तीं । न पाहतां दोषांप्रति । स्वामीनें मद्‌भक्ति, मति । वाखाणिली ॥२८३॥ बोले उचित, अनुचित । परि पाहून शुद्ध चित्त । राम जाणून हृद्‌गत । तुष्ट होय ॥२८४॥ भक्त—प्रमाद किंचित् । न राहे प्रभुचित्तांत । आठवी हृत्प्रेमाप्रत । शतवार ॥२८५॥ वाली ज्या अपराधानें । मारिला व्याधाप्रमाणें । तोचि केला सुग्रीवानें । प्रमाद पुन्हां ॥२८६॥ तोचि प्रमाद फिरून । करीतसे बिभीषण । परि आणी स्वप्नींहि न । श्रीराम तो ॥२८७॥ (सर्व संगातें त्यागून । सुग्रीव

आणि बिभीषण । आले राघवा शरण । प्रथमतां ॥२८८॥ परि राज्य प्राप्त होतां । सहजचि ते उभयतां । झाले निमग्न सर्वथा। विषयांतरीं ॥२८९॥) परि भेटतां भरतास । संमानुनी त्या दोघांस । रामें राजसभेस । प्रशंसिलें ॥२९०॥ वृक्षातळीं रघुवीर । शाखेवरी तें वानर । परि आपुल्या बरोबर । करी तया ॥२९१॥ म्हणून तुलसीदास । म्हणे श्रीरामापरिस । अन्य सुस्वभावी सालस । स्वामी नसे ॥२९२॥ श्री रामाचें भलेंपण । तैसें प्रभुत्वहि जाण । असे सर्वांहिलागून । लाभप्रद ॥२९३॥ हें असेल सत्य जर । तरी मग निरंतर । तुझें फावलें खरोखर । तुलसीदासा! ॥२९४॥ ऐशा प्रकारें करून । सांगून स्वदोषगुण । पुन्हां मस्तक नमवून । सर्वांसहि २९५॥ वर्णितों मी सावकाश । रामाचें निर्मल यश । ऐकतां कलिकिल्मिष । नष्ट होती ॥२९६॥ (सोपानींचा मार्ग भला । जरी अति दीर्घ वाटला । तदर्थ दुसरा योजिला । विश्राम हा ॥२९७॥ रसिक भाविक श्रोत्यांस । विनवीतसे देवीदास । माझ्या बोबड्या बोलांस । मान्य करा ॥२९८॥)

---o---

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्यो नमः ।
श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः

श्रीयाज्ञवल्क्य मुनींनीं । कथा जी का सुलक्षणी । मुनींद्र भरद्वाजालागुनी । निवेदिली ॥१॥ संवादरूपेंकरून । तीच आतां मी वर्णीन । सुखें सर्वहि सज्जन । ऐकोत ती ॥२॥ ऐसें हें चरित्र भलें । श्रीशंकरांनीं निर्मिलें । पुन्हां कृपेनें ऐकविलें । पार्वतीसी ॥३॥ तेंचि शिवें केलें जाण । काक भुशुंडीस अर्पण । रामभक्तीचा जाणून । अधिकारी ॥४॥ पुन्हां भुशुंडीपासून । मिळे याज्ञवल्क्यालागून । त्यांनीं पुन्हां केलें कथन । भरद्वाजा॥५॥ तें ते श्रोते आणि वक्ते । समान शीलाचें होते । हरिलीलेतें जाणते । समदर्शी ॥६॥ निजात्मबोधेंकरून । त्रिकालींचें जयां ज्ञान । केवळ आवळ्यासमान । करतलस्थ ॥७॥ जे हरिभक्त सन्मति । अवांतरहि असती । सांगती, ऐकती, जाणती । नानापरी ॥८॥ प्रथमतां मीहि जरी । वराहक्षेत्राभीतरीं । ऐकिली ही कथा सारी । गुरुपासुनी ॥९॥ तेव्हां त्या बालपणांत । कळली न यथास्थित । कारण तें होतों बहुत । अज्ञान मी ॥११॥ वक्ता जैसा ज्ञानवेत्ता । तैसाच पाहिजे श्रोता । कारण कीं श्रीरामकथा । गूढ अति ॥१२॥ तेथें मी हा जीव जड । जाणूं कसा कथा गूढ । कलिमलें अति मूढ । ग्रासिल्यानें ॥१३॥ तथापि गुरूनें त्या कालीं । वारंवार निवेदिली । तेव्हां कांहीं समजली । बुध्द्यनुसार ॥१४॥ म्हणूनिया तीच कथा ।

[1]भाषाबद्ध करी आतां । जेणेंकरून मच्चित्ता ज्ञान होय ॥१५॥ (नाना ग्रंथ आलोडून । श्रीरामचरित पावन । केलें श्रवण–पठन । कितीहि जरी ॥१६॥ तरी नोहे समाधान । मन त्यांत होतें लीन । करूं इच्छितें वर्णन । पुनःपुन्हां ॥१७॥ वर्णावया रामगुण । मातृभाषा हें साधन । मातृभाषेचा अभिमान । स्वाभाविक ॥१८॥ चौदा विद्या, चौसष्ट कला । या जाणावया सकला । उपाय एकचि भला । मातृभाषा ॥१९॥ अज्ञान रोगालागुनी । नाशावया पूर्णपणीं । एक अमृत संजीवनी । मातृभाषा ॥२०॥ ज्ञान मंदिराची भली । सर्वांसहि सर्वकालीं । सहज सिद्धशी देहली । मातृभाषा ॥२१॥ अज्ञानाचा अंधकार । पसरतां सभोंवार । तैं ज्ञानदीपिका थोर । मातृभाषा ॥२२॥ श्रेष्ठ-कनिष्ठ भाषांत । प्राविण्य जाहलें प्राप्त । तरी आवडे अत्यंत । मातृभाषा ॥२३॥ जीवींचें गुह्य आपुलें । उघड कराया इच्छिलें । तरी साधन एक भलें । मातृभाषा ॥२४॥ मातृभाषा हें जीवन । मातृभाषा महाप्राण । मातृभाषा हेंचि स्थान । विश्रांतीचें ॥२५॥ मातृभाषा हाचि जीवा । क्षणो-क्षणींचा विसांवा । मातृभाषेचा प्रेमा सर्वां । सारखाचि ॥२६॥ मातृभाषेची महति । वाटे सर्व जीवांप्रति । ती मी वर्णन करूं किती । एक मुखें ॥२७॥ गीर्वाण भाषा ऋषींची । मातृभाषा होती साची । ग्रंथरचना तयांची । तींत झाली ॥२८॥ तदितर प्राकृत भाषा । ज्यांची होती मातृभाषा । त्यांतचि त्यांची मनीषा । पूर्ण झाली ॥२९॥ पांडित्य विसरून पार । ग्रंथकर्ते थोर थोर । मातृभाषेंत विचार । प्रकटविती ॥३०॥ प्राकृत कवींचीं प्रमाणें । किती तरी उदाहरणें । शक्य नोहे येथें देणें । विस्तार

[1] हिन्दी भाषेचें जुनें नांव भाषा असें आहे.

भयें ॥३१॥ मातृभाषेचा अभिमान । सर्वांस सारखा म्हणून । आवडती मातेहून । मातृभाषा ॥३२॥ मातृभाषा आणि माता । यांची तुलना करूं जातां । ठरे कोणाची योग्यता । श्रेष्ठतर ? ॥३३॥ माता आपुल्या स्तनांत । दुग्ध असे तोंपर्यंत । पाजवी अर्भकाप्रत । प्रेमभावें ॥३४॥ दुग्धजातांचि आटून । दूर देतसे लोटून । विदित सर्वांलागून । स्वानुभवें ॥३५॥ मातृभाषा तैसी नसे । अंकीं अर्भका घेतसे । वात्सल्यानें पाळीतसे । सर्वकाळ ॥३६॥ देहांत प्राण जोंवरी । माता पोषिते तोंवरी । ती माता मुकल्यावरी । पोरकें पोर ॥३७॥ तैसी नव्हे मातृभाषा । पुरे पुत्राच्या आयुष्या । गुंतवून प्रेमपाशा । रक्षीतसे ॥३८॥ माता मर्त्य, भाषा अमर । कोण कनिष्ठ, कोण थोर । हें तत्त्व मी वारंवार । सांगूं किती ॥३९॥ मातृभाषेची वंचना । दृष्टीपुढें होतां जाणा । सत्पुत्राच्या करी प्राणां । कासावीस ॥४०॥ मातृभाषेचा होतां ऱ्हास । जीवास होती बहुक्लेश । मातेहून प्रेमा विशेष । मातृभाषेचा ॥४१॥ सज्जनहो! सांगूं किती । मातृभाषेची महति । तुम्हांसहि कांहीं प्रचीति । असेल कीं ॥४२॥ मातृभाषेचा उत्कर्ष । देतसे परम हर्ष । नित्य घेती परामर्श । भाषाप्रेमी ॥४३॥ प्रेमा नावरे म्हणून । धरून सात्त्विक अभिमान । बोललों विस्तारें करून । क्षमा करा ॥४४॥ असो, मातृभाषाप्रेम । तुलसीदासांसि निःसीम । करिती भाषाबद्ध राम-। चरित्र हें ॥४५॥) मद्‌बुद्धि, विवेकबल । जेवढें कांहीं असेल । हृदयीं प्रभु प्रेरील । वर्णीन तसें ॥४६॥ निजमोह, भ्रम, शंका । स्वसामर्थ्यें हरी जी का । रचितों कथा जी नौका । भवसागरीं ॥४७॥ सुज्ञां विश्रांति-दायिनी । सर्व जनांची रंजिनी । कलिमल-विध्वंसिनी ।

रामकथा ॥४८॥ कलिस्वरूप सर्पास । रामकथा भरणीपरिस । याची स्पष्टता विशेष । संक्षेपें करूं ॥४९॥ ( 'भरणी' पक्ष्याचें अभिधान । त्याचा ऐसा स्वभावगुण । पडे निजांग चोरून । दिसतां अहि ॥५०॥ भक्ष्य आपुलें जाणून । सर्प गिळी त्या लागून । पक्षी पोटांत जाऊन । वैर साधी ॥५१॥ आपुले फुगवून पंख । फोडी सर्पाचें मस्तक । त्यातें मारून निःशंक । बाहेर पडे ॥५२॥ भरणीचा अर्थ अन्यत्र । बोलिलासे गरुडमंत्र । सर्पशत्रुत्व मात्र । दिग्दर्शित ॥५३॥ असो, सेवितां रामकथा । होय कलीची ही अवस्था । त्यास लावी मृत्युपथा । निश्चयानें ॥५४॥ ) कीं विवेक हुताशन । घर्षणें कराया उत्पन्न । असे अरणीसमान । रामकथा ॥५५॥ रामकथा ही कलींत । कामधेनु मूर्तिमंत । संत संजीवनी साक्षात् । गुणकर्त्री ॥५६॥ तीच श्रीरामाची कथा । पृथ्वीतलीं सुधासरिता । हरी मर्त्य भूची मर्त्यता । निःसंशय ॥५७॥ मायेचा होतां संभ्रम । जीव ओरडे भेकासम । त्या नागिणीच विषम । रामकथा ॥५८॥ असुरसैन्यासारखा । नरक तो असे देखा । त्या नरकाची विनाशिका । रामकथा ॥५९॥ (असुरसेन हा राक्षस । गया क्षेत्रीं त्याचा वास । परि पावे महत्त्वास । या कारणें-॥६०॥ कीं तयाच्या पाठीवर । व्हावया पितरोद्धार । होत असे निरंतर । पिंडदान ॥६१॥) देव आणि साधुसंत । सर्वांचे करी हित । ऐसी कथा ही साक्षात् । चंडिकाच ॥६२॥ साधुसंतांचा समुदाय । हाचि क्षीरसिंधु होय । रामकथा जणुं काय । लक्ष्मीच तो ॥६३॥ विश्वाचा भार सकल । वहावया सर्वकाल । रामकथा ही निश्चल । पृथ्वीपरी ॥६४॥ यमदूतांच्या मुखास । मसिलेप करावयास । जी का यमुनेपरिस ।

जगामाजीं ॥६५॥ (यम, यमुना हे दोन्ही । जन्मले सूर्यापासुनी । एक बंधु, एक भगिनी । परस्पर ॥६६॥ मागें एका समयासी । यमुनेनें त्या यमासी । मागितला निश्चयेंसी । एक वर ॥६७॥ कीं जे माझ्या जलांत । स्नान करिती त्यांप्रत । न देवोत त्वद्दूत । कदापि दंड ॥६८॥ या कारणें लेपावयासी । यमदूतांच्या मुखासी । श्यामवर्ण होय मसि । यमुनाजल ॥६९॥) अखिल जीवमात्रासी । जीवन्मुक्त करावयासी । रामकथा हीच काशी । जणुं काय ॥७०॥ श्रीरामचंद्रातें जैसी । प्रिय, पवित्र ती तुलसी । तंतोतंत असे तैसी । रामकथा ॥७१॥ तुलसीदासाचें कल्याण । कराया मनापासून । [1]हुलसीमातेच्या समान । रामकथा ॥७२॥ नर्मदा सरिता जैसी । तैसी आवडे शंकरासी । सर्वसिद्धिदात्री, राशि-। संपत्तीची ॥७३॥ सद्गुण देवांलागून । अदिति माते समान । राम भक्ति-प्रेमाची पूर्ण । पराकाष्ठा ॥७४॥ रामकथा मूर्तिमती । देवगंगा भागीरथी । चित्त हा रम्य अति । चित्रकूट ॥७५॥ तुलसीदासा ! प्रेम जाण । हेंचि सुंदर उपवन । सीता-राघवाचें स्थान । विहाराचें ॥७६॥ श्रीरामाची गुणश्रेणी । हाच रम्य चिंतामणि । इच्छिल्या फळालागुनी । देतसे जो ॥७७॥ साधुसंतांची सन्मति । ही कामिनी रूपवती । तिचा जणुं रम्य अति । शृंगार हा ॥७८॥ विश्वा मंगल करी साचा । गुण-समूह रामाचा । धर्मार्थकाममोक्षाचा । दाताच जो ॥७९॥ विवेक-वैराग्य-योगा । सद्गुरूच असे जो गा ! । भयंकर भवरोगा । अश्विनीसुत ॥८०॥ सीताराम-प्रेमा पावतां । जन्म-दाता माता-पिता । सर्व नेम-धर्म-व्रता । बीजचि जो ॥८१॥ पाप-ताप-शोक । यांचा जो का निवारक । इहपरलोक-पालक ।

---

१ श्रीतुलसीदासांच्या आईचें नांव.

प्रेमभरें ॥८२॥ जो विवेक-भूपतीचा । पराक्रमी प्रधान साचा । अगाध लोभ–सिंधूचा । अगस्ति जो ॥८३॥ कामक्रोध, कलि–पाप । हाच हत्तींचा कळप । तया बाल सिंहरूप । भक्त-मनोवनीं ॥८४॥ पूज्य आणि प्रिय अति । जो शंकराचा अतिथि । दारिद्र्य–दावाग्निप्रति । मेघचि जो ॥८५॥ विषयसर्पालागुनी । मंत्रसिद्ध महामणि । कठिण दैवरेषा खणी । कपाळींची ॥८६॥ हराया मोहांधकार । जो प्रत्यक्ष दिनकर । भक्त–धान्यां जलधर । पालक जो ॥८७॥ जो कल्पवृक्षासमान । इच्छिलें तें करी दान । सुलभ, सुखद भक्तालागून । हरिहरापरी ॥८८॥ श्रेष्ठ कवीचें मानस । हेंच जणुं शरदाकाश । तेथें नक्षत्रां परिस । असे जो का ॥८९॥ सेविती रामचरण । ऐशा त्या भक्तां लागून । जीवनधनासमान । गुणसंघ जो ॥९०॥ सुकृतांचा स श्रुमुदाय । त्यांचा फलसमुच्चय । त्या श्रेष्ठ भोगापरी प्रेय । गुणसंघ जो ॥९१॥ जगाचें व्हावया हित । विविध उपाधि-विरहित । साधुसमुदाय मूर्त । गुणसंघ जो ॥९२॥ सेवनीं जे समरस । तन्मनोरूप मानस । त्या सरोवरींचे हंस । गुणसंघ जो ॥९३॥ भागीरथीचे तरंग । पावन करिती अव्यंग । श्रीरामाचा गुणसंघ । त्याचपरी ॥९४॥ कुमार्ग, दुःशील उदंड । कुतर्क, कलह वितंड । कापट्य आणि पाखंड । दांभिकता- ॥९५॥ श्रीरामगुण संभार । या इंधना जाळणार । मूर्तिमंत वैश्वानर । प्रज्वलित ॥९६॥ श्रीरामाचा गुणग्राम । चंद्रकिरणांच्या समान । सौख्यदायक निस्सीम । सर्वांसहि ॥९७॥ कुमुद–चकोरांसरिस । त्यांत सज्जनचित्तास । कल्याणप्रद विशेष । लाभप्रद ॥९८॥ पार्वतीनें ज्या ज्या रीतीं । प्रश्न केले शिवाप्रति । जैसे निवेदी पशुपति । सविस्तर– ॥९९॥ ते ते सर्वहि प्रसंग । चित्र-विचित्र

कथाभाग । निवेदीन यथासांग । पद्यमय ॥१००॥ ऐसी ही कथा जयांनीं । ऐकिली नसेल श्रवणीं । आश्चर्य करूं नये त्यांनीं । ऐकूनिया ॥१०१॥ ही कथाच अलौकिक । ऐकूनिया ज्ञाते लोक । तिज आश्चर्यकारक । मानिती ना ॥१०२॥ जगीं रामकथेप्रति । पाहूं जातां नाहीं मिती । ऐसी येतसे प्रतीति । त्यांचे मनीं ॥१०३॥ श्रीरामाचे अवतार । विविध त्यांचे प्रकार । शतकोटि अपरंपार । रामायणें ॥१०४॥ कल्पभेदेंचि अपार । हरिचरित्रें सुंदर । मुनीश्वरांनीं समग्र । गायिलीं तीं ॥१०५॥ ऐसें जाणून निःशंक । ऐकिली पाहिजे सम्यक् । सादर प्रेमपूर्वक । रामकथा ॥१०६॥ श्रीराम स्वयें अनंत । त्याचें गुणहि अनंत । कथाविस्तारहि अनंत । म्हणूनिया ॥१०७॥ विचार जयांचे शुद्ध । ते हे रामकथा-भेद ऐकून आश्चर्यविद्ध । होतीच ना ॥१०८॥ ऐशा प्रकारेंकरून । सर्व संशय निरसून । गुरुपदाब्जधूलिकण । धरून शिरीं ॥१०९॥ मी पुनरपि समस्तां । प्रार्थितों जोडून हातां । जेणें कथेस वर्णितां । दोष न घडे ॥११०॥ आदरें शिवास आतां । नमवूनिया निज माथा । निर्मल रामगुणकथा । वर्णितों मी ॥१११॥ संवत् सोळाशे एकतीस । शिरीं धरून हरिपदास । श्रीरामगुणकथेस । आरंभितों ॥११२॥ चैत्रशुद्ध नवमीप्रत । मंगळवारीं धादांत । प्रकटले अयोध्येंत । चरित्र हें ॥११३॥ श्रीरामाची जन्मतिथि । ज्या दिनीं सांगती श्रुति । तेव्हां सर्व तीर्थें येतीं । अयोध्येंत ॥११४॥ असुर, नाग, खग, नर । देवादिक मुनीश्वर । होऊन सेविती सादर । रघुनाथातें ॥११५॥ (असुर–नाग–खग कोण । नर–देव–मुनि कोण । यांचें करूं स्पष्टीकरण । संक्षेपेंचि ॥११६॥ प्रह्लाद–बिभीषण असुर । नाग सहस्रफणिधर । काक भुशुंडी खेचर ।

गरुडादिक ॥११७॥ अर्जुनादिकरून नर । व्यास-वाल्मीक मुनीश्वर । ब्रह्मदेवादि शंकर । देवताह्या ॥११८॥) जन्ममहोत्सवदिन । साजरा करी भक्तजन । रामयशातें गाऊन । मधुरपणें ॥११९॥ साधु--सज्जन--महंत । होऊनिया एकत्रित । शुचि शरयूतीर्थांत । स्नान करिती ॥१२०॥ श्याम सुंदर शरीर । चित्तीं ध्याती रघुवीर । जपती नाममहामंत्र । श्रीरामाचा ॥१२१॥ जिच्या दर्शनें, स्पर्शनें, । स्नानें आणि आचमनें । सांगती वेद--पुराणें । पाप हरे ॥१२२॥ ऐसी पवित्र सरिता । त्या शरयूची महत्तता । शुद्ध बुद्धीची ब्रह्मसुता । वर्णू न शके ॥१२३॥ रामपरंधामदात्री । सरल लोकख्याता पुरी । विश्वातें पावनकर्त्री । रम्य जी का ॥१२४॥ अंडजादि खाणी चार । जगीं जीव अपरंपार । जेथें त्यजितां शरीर । मुक्त होती ॥१२५॥ मनोहर सर्वतोपरी । जाणून अयोध्यापुरी । सकल सिद्धींची दात्री । मंगल-खनि ॥१२६॥ विमल रामकथारंभ । येथें केला मी स्वयंभ । ऐकतां काममददंभ । नष्ट होती ॥१२७॥ रामचरितमानस । ऐसें अभिधान यास । तृप्ति होतसे कर्णास । श्रवणमात्रें ॥१२८॥ विषयवणवा भयाण । पेटल्या काननीं कठिण । होरपळे जो दारुण । मनोगज--॥१२९॥ या मानससरोवरीं । स्वयें घेई बुडी जरी । सुखीच होय तो तरी । निश्चयानें ॥१३०॥ जें रमवी मुनिमानस । पवित्र स्पृहणीय विशेष । ऐसें रामचरित-मानस । निर्मिलें शिवें ॥१३१॥ कायिक आणि वाचिक । तिजा दोष मानसिक । हें त्रिविध दारिद्र्यदुःख । नष्ट करी ॥१३२॥ कलह आणि दुराचार । कलीचीं पापें अपार । यांसी मानस सरोवर । नष्ट करी ॥१३३॥ चरित-मानस रचोनी । शिवें सांठविलें मनीं । कथिलें पार्वती-

लागुनी । समयोचित ॥१३४॥ श्रीरामचरितमानस । म्हणून श्रेष्ठ नांव ह्यास । विचारें ठेवी महेश । आनंदानें ॥१३५॥ तोच सुखद सुंदर । कथा वर्णितों सविस्तर । ऐका सुजनहो ! सादर । लक्ष्यपूर्वक ॥१३६॥ हें रामचरितमानस । जैसें आलें उदयास । ज्या ज्या उद्देशें प्रकाश । पावलें जगीं– ॥१३७॥ त्या त्या प्रसंगांची कथा । सर्वहि वर्णितों आतां । उमामहेश्वरां उभयतां । स्मरूनिया ॥१३८॥ शिवाच्या प्रसादें चित्तीं । प्रकाशे निर्मल मति । म्हणूनिया ग्रंथाप्रति । तुलसी कवि– ॥१३९॥ आपुल्या बुध्द्यनुसार । कथा वर्णिती मनोहर । ऐकून सज्जन चतुर । सुधारोत ॥१४०॥ सद्‌बुद्धि हें भूमितल। हृदय अगाधत्व केवल । वेदपुराण-सिंधुजल । संतमेघ ॥१४१॥ (समुद्रींचें जलसार । घेऊन जैसे जलधर । वर्षून भरिती सर । भूतलींचें ॥१४२॥ तैसे साधुसंत थोर । घेती पुराणश्रुति-सार । भक्तजनांचें हृदंतर । पूर्ण भरिती ॥१४३॥) श्रीरामाचें यश थोर । हेंच पाणी श्रेष्ठतर । मधुर आणि मनोहर। मंगल-प्रद ॥१४४॥ प्रभूच्या लीला सगुण । वर्णती ज्या संतजन । जलाचें तें स्वच्छपण । हरितें मल ॥१४५॥ वर्णितां अवर्णनीय । ऐसें प्रेमभक्तिद्वय । तेंचि जलाचें माधुर्य । शीतलत्व ॥१४६॥ पुण्यरूप धान्याप्रत । हेंचि जल उपयुक्त । रामभक्तजनां मूर्त । जीवन तें ॥१४७॥ मेघरूप पृथ्वीवर । सांचतें तें पवित्र नीर । वाहूं लागतें सुंदर । श्रवणमार्गें ॥१४८॥ सुंदर मानस सरोवरीं । स्थिरावून तेंचि वारि । संथ, शीतल, सुखकारी । सुरस होय ॥१४९॥ बुद्धिविचारपूर्वक । हृदयाल्हादकारक । माजीं रचिले अलौकिक । संवाद जे ॥१५०॥ पवित्र आणि सुंदर । जें मानस सरोवर । त्याचेचि हे मनोहर । घाट चार ॥१५१॥

यासी सप्तकांडात्मक । सोपान शोभादायक । होतां ज्ञाननेत्रा-
वलोक । प्रसन्न मन ॥१५२॥ अबाधित आणि निर्गुण । श्रीरामाचें
महिमान । थोर अगाध जीवन । वर्णितों मी ॥१५३॥ सीता-
रामाचें सद्यश । जल हें अमृतासरिस । उपमा-तरंगविलास ।
मनोरम ॥१५४॥ सुंदर चौपाया वरती । दाट पद्मपत्रें असती ।
काव्यकला रम्य शुक्ति । मौक्तिकांची ॥१५५॥ सुंदर सोरठे-
दोहे । छंद जे जे विविध हे । नानारंगीं शोभताहे । कमल
संघ ॥१५६॥ निरुपम अर्थप्रबंध । सुंदर रहस्यभेद । तेंवि
भाषाहि सुबोध । मनोहर ॥१५७॥ हेचि त्या कमलांत शुद्ध ।
पराग आणि मकरंद । तैसा उत्कृष्ट सुगंध । अनुक्रमें ॥१५८॥
श्रवणें लाभें सुकृतसार । गुंजारव करिती भ्रमर । ज्ञानवैराग्य-
विचार । हेचि हंस ॥१५९॥ ध्वनि, वक्रोक्ति, रस, जाति ।
काव्यगुण चार असती । ते मनोहर नाना रीतीं । मीन येथ ॥१६०॥
धर्मार्थकामादिक । चारी पुरुषार्थसंज्ञक । ज्ञान-विराग-विचा-
रात्मक । कथिले जे– ॥१६१॥ जप-तप रस नव । योग
वैराग्यादि भाव । सुंदर जलचर सर्व । तडागीं या ॥१६२॥
पुण्यश्लोक साधुजन । त्यांचें नाम-गुण-वर्णन । तें जलपक्ष्यांसमान ।
नानावर्णी ॥१६३॥ संतसभा भोंवतालीं । आंबराई लागलेली ।
वसंतासम वर्णिली । श्रद्धा त्यांची ॥१६४॥ नाना प्रकारेंकरून ।
भक्ति-क्षमा-दया-वर्णन । वृक्ष आणि लतावितान । येथील
हे ॥१६५॥ यमनियम आणि शम । यांचीं वर्णनें पुष्पांसम– ।
ज्ञानवर्णनें मनोरम । फळें येथ ॥१६६॥ हरीच्या चरणीं प्रीति ।
हा ज्ञानफलांतर्वर्ती । श्रेष्ठ रस म्हणून वर्णिती । वेद स्वयें ॥१६७॥
इतर कथाप्रसंग । वर्णिले अनेक सांग । ते शुकपिक विहंग ।
नाना वर्णी ॥१६८॥ कथा करितां श्रवण । होतसें जें रोमहर्षण ।

तेंच उद्यान, उपवन । पुष्पवाटिका ॥१६९॥ परिसतां कथा-सार । सुख होय जें निर्भर । सत्पक्ष्यांचा सुविहार तोचि येथ ॥१७०॥ मन हाच माळी कुशल । नेत्रमात्रेंचि केवल । सिंचितसे प्रेमजल । तयांवरी ॥१७१॥ हें रामचरित्र थोर । गाती जे का सादर । या सरोवराचे चतुर । रक्षक ते ॥१७२॥ ('चतुर' शब्दें चार रक्षक । स्वयें शिव उमानायक । याज्ञवल्क्य, भुशुंडीकाक । तुलसीदास ॥१७३॥ जे जे कोणी नरनारी । सदा ऐकती अत्यादरीं । या मानसाचे अधिकारी । तेचि देव ॥१७४॥ विषयी, अत्यंत दुष्ट । काक, बक, खटनट । ते अभागी सरानिकट । जातीच ना ॥१७५॥ कीं ते जंबुक बेडूक । वा इतर सान कीटक । येथें विषयरसात्मक । कथा न बहु ॥१७६॥ म्हणून कामी जनरूप । काक, बक, विषय-लोलुप । येथें यावया समीप । धजतीच ना ॥१७७॥ या सरोवरीं येणें । घडे अति कठिणपणें । रघुनाथकृपेंविणें । न येववे ॥१७८॥ कठिण दुष्टांचा संग । हाच भयंकर कुमार्ग । दुर्जनवचनें हीं उरग । व्याघ्रसिंह ॥१७९॥ (येथें यावयाची वासना । आधीं उपजेचि ना मना । मध्यें विघ्नें येतीं नाना । उपजतांचि ॥१८०॥ दुष्ट जे ते रोधिती । "कासया जातां" म्हणती । "तेथें पावाल फजीती । जाऊनिया ॥१८१॥ पुण्य-पापाची जाणीव । हीच घातुक स्वयमेव । इहलोक-भोग सर्व । मुकतील ना ॥१८२॥ पाप–पुण्याच्या अज्ञानीं । पाप जरी ये घडुनी । तरी तें अज्ञात म्हणुनी । क्षम्य होय" ॥१८३॥ ऐसें शिकवून दुर्जन । करूं न देतील गमन । हेंचि कुसंगतीचें विघ्न । भयंकर ॥१८४॥) पदोपदीं होय अमित । गृहकृत्यांची गुंतागुत । तेचि प्रचंड पर्वत । अति दुर्गम ॥१८५॥ मोह, मद, विषम मान । हेंचि निबिड

कानन । भीषण नदीसमान । कुतर्क बहु ॥१८६॥ (संपत्तीचा अति मद । उद्‌भवूंच न दे बोध । मानापमानें करी रोध । जावयातें ॥१८७॥ श्रेष्ठ वर्णाभिमान । आड येऊन करी विघ्न । तेणें अशक्य होय गमन । मानसातें ॥१८८॥ सोडून मोह, मद, मान । करावें वाटल्या गमन । कुतर्काचें मध्यें विघ्न । उभेंचि सदा ॥१८९॥ उठती नाना तरंग । होय समाधान-भंग । त्या योगें श्रद्धेचें अंग । नष्ट होय ॥१९०॥ खरें खोटें कुणा ठावें । कुणीं निश्चयें जाणावें । परलोकींचें मानावें । काय खरें ॥१९१॥ कोण दृष्टीसमोर गेला । स्वर्गी जाऊन परतला । सांगतां कोणीं पाहिला । ऐकिला का ? ॥१९२॥ कल्पनेचे खेळ सारे । कोणें मानावे ते खरे । कुतर्क येती या प्रकारें । निजमनांत ॥१९३॥ तेणें संशय व्यापून । श्रद्धाहीन होय मन । म्हणून न घडें गमन । मानसातें ॥१९४॥) मार्गीं वेंचाया कारण । गांठीं नसे श्रद्धाधन । सत्संगति ज्यांलागून । घडलीच ना ॥१९५॥ हें मानस सरोवर । त्यां दुष्प्राप्य अतितर । ज्यां श्रीराम रघुवीर । प्रिय नाहीं ॥१९६॥ सोसून इतुक्या कष्टांस । जाई जरी मानसास । तरी होय निद्रावश । जातां क्षणीं ॥१९८॥ जडतेची थंडी कठिण । अंगीं भरे थडथडून । जाऊनहि न घडें स्नान । अभाग्यातें ॥१९८॥ सरोवरीं स्नान-पान । न करवें त्यालागून । परत फिरे साभिमान । तेथूनिया । ॥१९९॥ पुन्हां कोणी येऊन त्यास । करूं जातां विचारपूस । सरोवराचा उपहास । ऐकवी त्या ॥२०१॥ (स्वयें जाऊन मानसीं । लाभ न झाला तयासी । म्हणून त्याचे निंदेसी । प्रवृत्त होय ॥२०१॥ म्हणे कशाचें मानस । काय महत्त्व तयास । काय फळ ये हातास । स्नान-पानें ॥२०२॥ उडवावया लोकभ्रम । घेतले

आम्ही हे श्रम । बुडवावया पुढील क्रम । मूर्खत्त्वाचा ॥२०३॥ ह्या आणून आविर्भाव । मिरविती बडेजाव । ऐसा तयांचा स्वभाव । बनून जाय ॥२०४॥ आधीं होतां विघ्न-बाधा । दुर्गम होय मार्ग साधा । ज्याचे मनीं नसे श्रद्धा । त्यासीच हें ॥२०५॥) परि कसलेंहि विघ्न । बाधा न करी त्यालागून । कृपादृष्टीं रघुनंदन । पाही जया ॥२०६॥ तोच सरोवरीं सादर । मज्जन करी भरपूर । दग्ध न होई महाघोर । त्रिविध-तापें ॥२०७॥ सोडून हें सरोवर । ते कदापि न जाती दूर । रामचरणीं निर्भर । प्रेम ज्यांचें ॥२०८॥ बापहो! या सरीं सांग । स्नापूं इच्छी महाभाग । तेणें करावा सत्संग । मनो-भावें ॥२०९॥ ऐशा मानसीं विचित्र । लागतो हृदयींचे नेत्र । ऐशा स्नानेंचि पवित्र । कविबुद्धि ॥२१०॥ तेणेंचि हृदयीं केवळ । उठले आनंदकल्लोळ । प्रेमानंद-प्रवाह सोज्ज्वळ । उचंबळले ॥२११॥ तेणेंचि सुंदर कविता । वाहे मूर्तिमती सरिता । विमल यशोजलभरिता । राघवाची ॥२१२॥ शरयु हेंचि तिचें नाम । जी सुमंगलाचा उगम । लोक-वेद-मत उत्तम । जिचें तट ॥२१३॥ ऐसी मानसकन्यका । सरिता अति निष्कलंका । कलिमल तरुतृणादिकां । समूळ छेदी ॥२१४॥ मुक्त, मुमुक्षु, सकाम । त्रिविध श्रोत्यांचा संगम । दोन्ही तटां-वरील ग्राम, । नगर, पुरें ॥२१५॥ संतसभा जी येथींची । निरुपम अयोध्या साची । सकल सुमंगलांची । मूळ जी का ॥२१६॥ रामभक्तीची स्वर्धुनी । मिळे तिच्यांत जाउनी । सुंदर शरयु तटिनी । सत्कीर्तीची ॥२१७॥ राम-लक्ष्मण करितां युद्ध । समरीं पावलें यश शुद्ध । सुंदर शोण महानद । येऊन मिळे ॥२१८॥ शरयु-शोणाभीतरीं । गंगा शोभे कैशा-

परी । विरक्तिना ज्ञान-माझारीं । भक्ति जैसी ॥२१९॥ त्रिविध तापाचा नाशक । प्रवाह होऊन त्रिमुख । सिंधूंत प्रवेशे निःशंक । रामरूपाच्या ॥२२०॥ मानसीं उगम पावून । गंगेला मिळाली जाऊन । श्रवणें करी पावन । सज्जनमनें ॥२२१॥ मधून मधून ओघानें । विचित्र कथांचीं वर्णनें । तिच्या तटाकींचीं वनें, । उपवनें तीं ॥२२२॥ (मुनींद्रयांचें भाषण । पार्वतीचें जन्मकथन । तिचें तप, तिचें लग्न । शंकराशीं ॥२२३॥ संवाद झाला उभयतां । मनु–शतरूपेची कथा । उपवनापरी सर्वथा । चरित्रें हीं ॥२२४॥ सतीचा दुष्ट संदेह । यज्ञकुंडीं त्यजिला देह । त्यापरी दुःसह मोह । नारदाचा ॥२२५॥ प्रतापभानूचा परिचय, । रावणजन्म, दिग्विजय । ऐशा कथा निःसंशय । वनरूप ॥२२६॥) शिवपार्वतीविवाहाचें । वर्णन त्या वरातीचें । असंख्य नानापरीचे । जलजीव ते ।२२७॥ रामजन्माचा आनंद । समारंभ जो प्रसिद्ध । भोंवरे तरंगाचे शुद्ध । रम्यत्व तें ॥२२८॥ चौघांहि त्या भावंडांचीं । जीं बालचरित्रें साचीं । कमलें बहु रंगांचीं । असंख्य तीं ॥२२९॥ भूपराज्ञी सपरिवार । यांचें सुकृत जें थोर । जलपक्षी आणि भ्रमर । प्रवाहींचे ॥२३०॥ जानकीचें स्वयंवर । ती कथा अति सुंदर । या सरितेची मनोहर । विलसे शोभा ॥२३१॥ अनेक प्रश्न, आशंका । या नदीमधल्या नौका । कुशल नावडी देखा । मार्मिकोत्तरें ॥२३२॥ ऐकून कथाप्रबंध । परस्पर होय संवाद । तोचि येथ पथिकवृन्द । तत्तटींचा ॥२३३॥ भार्गवरामाचा क्रोध । हीच धार भयप्रद । रामवचनें सुसंबद्ध । घाट तिचे ॥२३४॥ लक्ष्मणादि सबांधव । रामविवाहमहोत्सव । शुभ तरंग सुखानुभव । देती सर्वां ॥२३४॥ सांगतां, ऐकतां निश्चित । होती हृष्ट, रोमांचित । पुण्यात्मे ते सर्व शांत ।

मुदित मनें ॥२३६॥ रामराज्यतिलकास्तव । झाला मंगल महोत्सव । तो यात्रेकरूंचा जमाव । पर्वीं जणुं ॥२३७॥ कैके-यीची दुष्ट मति । हेंच शेवाळें त्यावरती । जिच्यायोगें नाना विपत्ति । फळा आल्या ॥२३८॥ (श्रीरामाचा वनवास । मृत्यु घडे दशरथास । कारण ती या सर्वांस । दुष्टमति ॥२३९॥) असंख्य उत्पात-शामक । भरतचरित्रें सकलिक । शरयुतटींचे निःशंक । जप-याग ते ॥२४०॥ कलिपापें, खल, दुर्गुण । यांचें जें का विवरण । हेंच जलाचें मलिनपण । काकबक ॥२४१॥ कीर्तीची रसवाहिनी । सर्व षड्ऋतूंतुनी । पवित्र सौभाग्य-शालिनी । सुंदर अति ॥२४२॥ (षड्ऋतूंच कथात्मक । कैसे असती व्यापक । तेहि सांगती मार्मिक । तुलसीदास ॥२४३॥) शिवपार्वती-परिणय । हा हेमंत ऋतु होय । रामजन्मोत्सव सुख-मय । शिशिर ऋतु ॥२४४॥ (येतां ऋतुहि हेमंत । शीत वाढे अतोनात । तेणें लोक भयभीत । निजांतरीं ॥२४५॥ शिवविवाहीं वरात । तींत पाहून भूतप्रेत । स्त्रीबालकें भयग्रस्त । तदवसरीं ॥२४६॥ शिशिर ऋतूचा प्रसंग । चोहींकडे नाचरंग । सकलांचें अंतरंग । सुप्रसन्न ॥२४७॥ तैसा होतां रामजन्म । अयोध्या ती आनंदधाम । लोकां झालें सुख परम । दशरथा-सह ॥२४८॥) रामविवाह-कौतुक । आनंदमंगलात्मक । सकल ऋतूंचा नायक । वसंत तो ॥२४९॥ (होतां वसंताचा आगम । पल्लव, फलें आणि सुम । यांचा अभिनव उद्गम । वृक्षांवरी ॥२५०॥ रामविवाहीं त्यापरी । नूतन वस्त्रें नानापरी । परिधानी जनता सारी । पल्लव ते ॥२५१॥ विवाहमंडपीं जन । आनंदें हास्यवदन । तेंचि पुष्पांचें विकसन । प्रफुल्लित ॥२५२॥ सीतारामाचा विवाह । निर्विघ्न झाला सोत्साह । फलोद्गम

निःसंदेह । मधुर रसें ॥२५३॥) वनाभिगमन नंतर । ह्राच ग्रीष्म असह्यतर । सूर्यताप, वायु प्रखर । मार्गकथा ॥२५४॥ (ग्रीष्मीं व्याकुल होती जन । कडक ऊन्ह, आह्या ऊन्ह । कित्येक ऊन्ह लागून । मरून जाती ॥२५५॥ वनीं जातां रघुनंदन । दशरथाचें देहावसान । आणि व्याकुल परिजन । अयोध्येचे ॥२५६॥) घोर निशाचर-संग्राम । ह्रा वर्षर्तूचा आगम । देव-धान्यांस परम । मंगलप्रद ॥२५७॥ (वर्षाऋतूमाजीं उघड । लागे पावसाची झड । बाणवर्षाव अवघड । युद्धींचा तो ॥२५८॥ मेघवृष्टीनें सुपीक । क्षेत्रें होतीं सकलिक । तैसे मुदित देवलोक । राक्षसवधें ॥२५९॥ रामराज्यीं अतिशय । सौख्य, माहात्म्य, विनय । तोचि विशद शरत्समय । सुखकारक ॥२६०॥ (शरद्ऋतूमाझारीं । आकाशीं आणि सरोवरीं । जैशी होय सर्वतोपरी । निर्मलता ॥२६१॥ तैसी श्रीरामाच्या राज्यीं । निर्मलता जनसमाजीं । दुःख गेलें, जगामाजीं । अपार सुख ॥२६२॥ सती-शिरोमणि सीता । तिची जी सद्गुणकथा । तीच होय निर्मलता । निरूपम जलीं ॥२६३॥ भरताचा सुस्वभाव । हें जलाचें शीतलत्व । जें एकरूप सदैव । अवर्णनीय ॥२६४॥ अवलोकन, संभाषण । एकमेकांचें मीलन । प्रेम आणि प्रसन्नपण । परस्पर ॥२६५॥ चौघां भावांचें एकत्व । अलौकिकचि बंधुत्व । तेंचि जलाचें सुगंधत्व । माधुर्यहि ॥२६६॥ माझा विनय, आर्तता । तैशीच माझी दीनता । हीच जलाची निर्दोषता । हळुवारपणा ॥२६७॥ (अपूर्व अनुपमेय । तुलसीदासांचा विनय । म्हणून सर्वमान्य होय । ग्रंथराज ॥२६८॥ जलाचें हलकेंपण । दोष नव्हे, तो सद्गुण । चरितमानसाचें लक्षण । तैसेंचि हें ॥२६९॥) ऐसें अद्भुत सलिल । प्राशितां सुखद

केवल । आशा, तृष्णा, मनोमल । निवारक ॥२७०॥ रामप्रेमातें पोषक । ऐसें जल हें अलौकिक । सकलकलिपाप–हारक । शैथिल्यासह ॥२७१॥ भवतापाचें शोषक । संतोषातेंहि पोषक । अध-दारिद्र्य-दोष–दुःख । शमन करी ॥२७२॥ कामकोप–मद–मोहातें । जल हें समूळ नाशितें । निर्मल ज्ञान वाढवितें । विवेका-सह ॥२७३॥ या जलाचें अत्यादरीं । स्नान-पान घडें जरी । हृदयींचें समूळ हरी । संतापपाप ॥२७४॥ ज्यांनीं ज्यांनीं या जलानें । धुतलीं न आपुलीं मनें । भ्रष्टले कलिकालानें । अधमाधम ॥२७५॥ तृषित होऊन हरिण । मृगजल विलोकून । आशाबद्ध भटकून । दुःखी होय ॥२७६॥ तेंवि तृष्णेनें व्यापिला । पाहून भवमृगजला । जीव दुःखीं सांपडला । भवचक्रीं ॥२७७॥ (ऐसे जीव भाग्यहीन । त्यांचें सोडून कथन । साधिती कथा-नुसंधान । तुलसीदास ॥२७८॥) त्या जलाचे गुणगण । यथामति मी वर्णून । त्यांत करविलें मज्जन । स्वमनाचें ॥२७९॥ स्मरून भवानीशंकरां । तुलसीदास म्हणे चतुरां । रामकथा मनोहरा । वर्णितों मी ॥२८०॥ (सोपानींचा मार्ग भला । जरी अति दीर्घ वाटला । तदर्थ तिसरा योजिला । विश्राम हा ॥२८१॥ रसिक भाविक श्रोत्यांस । विनवीतसे देवीदास । माझ्या बोबड्या बोलास । मान्य करा ॥२८२॥)

—: ० :—

## विश्राम ४ था

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्यो नमः
श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः

आतां रामपदपद्म । हृदयीं धरून सप्रेम । तेविं प्रसादहि परम । पावूनिया ॥ १ ॥ मुनिवर्य दोघेजण । त्यांचें परस्पर मीलन । मनोहर संभाषण । वर्णितों मी ॥ २ ॥ भरद्वाज मुनि ख्यात । वास करिती प्रयागांत । जयांची प्रीति अत्यंत । रामपदीं ॥३॥ जे तपस्वी परिपूर्ण । शमदमदया—निधान । परमार्थमार्गीं निपुण । अतोनात ॥४॥ जेधवां माघ मासांत । रवि ये मकरेप्रत । दर्शना येती समस्त । तीर्थराजाच्या ॥५॥ देव, दनुज, किन्नर । मेळे करून नारीनर । स्नानें करिती सादर । त्रिवेणींत ॥६॥ माधवपदाब्जांप्रति । सर्वहि भावें पूजिती । अक्षयवट-स्पर्शें होती । हृष्टगात्र ॥७॥ भरद्वाजांचा आश्रम । अतिशयें पवित्रतम । परम सुंदर मनोरम । मुनिवरांतें ॥८॥ त्या स्थलीं येतें घडून । ऋषिमुनींचें सम्मेलन । प्रयागीं करिती गमन । स्नानार्थ जे ॥९॥ उरकून प्रातःस्नान । अति उल्हासें करून । करिती हरिगुणगान । परस्पर ॥१०॥ ब्रह्मनिरूपण, वेदान्त । पूर्वमीमांसा शास्त्रार्थ । वर्णिती तत्वसिद्धान्त । सांख्यादिक ॥११॥ ज्ञान आणखी विरक्ति । भगवंताची सद्भक्ति । करिती सप्रेमयुक्ति । प्रतिपादन ॥१२॥ मकर-संक्रमणाभीतरीं । स्नानें करून यापरी । सर्वहि जाती माघारीं । निजाश्रमा ॥१३॥ प्रतिवर्षीं नियमबद्ध । होतसे महदानन्द ।

स्नानें करून मुनिवृंद । परत जाई ॥१४। एकदां माघमासभर । स्नानें करून निर्भर । गेले सर्व मुनीश्वर । स्वाश्रमातें ॥१५॥ याज्ञवल्क्य मुनीश्वर । ज्ञानी जे का श्रेष्ठतर । जाणती राम-चरित्र । पूर्णपणें ॥१६॥ म्हणून भरद्वाजांनीं । त्यांच्या पदांतें वंदुनी । आश्रमीं घेतलें ठेवुनी । अत्यादरें ॥१७॥ अतिशयें सत्कारिलें । पादपद्म प्रक्षाळिले । देऊनिया बैसविलें पवित्रा-सनीं ॥१८॥ करून पूजोपचार । सद्यश वानिती मुनिवर । बोलती अति पवित्र । कोमल गिरा ॥१९॥ "हे याज्ञवल्क्य मुनिनाथ ! । मी पहा संशयें ग्रस्त । तुम्हां करतलीं समस्त । वेदतत्त्व ॥२०॥ सांगूं जातां तो संशय । मज वाटे लज्जाभय । परि न सांगतां, होय । महाहानि ॥२१॥ प्रभो ! संतजन, नीति । यापरि प्रतिपादिती । श्रुतिपुराणें वर्णिती । त्याच-परी ॥२२॥ कीं शुद्ध ज्ञान हृदयांत । कदापिहि नव्हें प्राप्त । गुरूंशीं घडतां किंचित् । प्रतारणा ॥२३॥ (वयें वृद्ध झालों आज । असून नसे ज्ञान मज । म्हणून वाटते लाज । पुसावया ॥२४॥ पुढें करून संशय । परीक्षाच घेतो काय । वाटेल हें म्हणून भय । मदंतरीं ॥२५॥ ) ऐसा करून विचार । निज शंका निवेदणार । कृपा करून दासावर । निवारा तो ॥२६॥ राम-नामाचा महिमा । अपार, त्या नसे सीमा । संत–पुराण–डिंडिमा । उपनिषदांचा ॥२७॥ स्वयें शंभु अविनाशी । जपतसे अहर्निशीं । ज्ञानसद्गुणांचा राशि । भगवान् शिव ॥२८॥ जगीं अंडजादि प्रभृति । चतुर्विध जीव असती । काशींत मरतां पावती । मोक्षपद ॥२९॥ हा तरी मुनिसत्तमा ! । रामनामाचा महिमा । कृपा करून रामनामा । बोधी शिव ॥३०॥ मुने ! तो कोणता राम । तुम्हां पुसतों ससंभ्रम । सांगा मज करून सुगम ।

कृपानिधे ! ॥३१॥ अयोध्याधीश दशरथ । राम त्याचा एक सुत । त्याचें चरित्रहि विदित । सर्व जगा ॥३२॥ जेणें स्त्रीविरहें करून । दुःख भोगिलें दारुण । क्रुद्ध होऊन रावण । वधिला रणीं ॥३३॥ तोचि हा राम विलसे । किंवा अन्य कुणी असे । त्रिपुरारि जपतसे । जयाप्रति ॥३४॥ तुम्ही सत्याचें निधान । तुम्हां सर्व असे ज्ञान । विवेकें करा कथन । निश्चयानें ॥३५॥ जेणें माझा भ्रम थोर । लया जाईल निर्धार । ऐसी कथा सविस्तर । सांगा नाथा !" ॥३६॥ याज्ञवल्क्य मुनिनाथ । बोलती हांसून किंचित् । "रामप्रभाव विदित । असे तुम्हां ॥३७॥ वाङ्मनःकर्मयुक्त । तुम्ही आहां रामभक्त । तुमच्या चतुरतेप्रत । जाणिलें मीं ॥३८॥ गूढ जे का रामगुण । इच्छितां कराया श्रवण । वरून अति मूढपण । विचारितां ॥३९॥ तरी ऐका हो! सादर । चित्त करून एकाग्र । निवेदितों मी सुंदर । रामकथा ॥४०॥ महामोह घोरतर । हा प्रचंड महिषासुर । रामकथा भयंकर । कालिका ही ॥४१॥ रामकथा मूर्तिमती । चन्द्राचीं किरणें असती । संतचकोर करिती । पान तिचें ॥४२॥ शंका ही तुम्हांप्रमाणें । घेतली होती भवानीनें । तें कथिलें श्रीशिवानें । समजावुनी ॥४३॥ तोच आतां सुप्रसिद्ध । उमाशंभूंचा संवाद । करीतसे मी विशद । यथामति ॥४४॥ ज्या हेतूनें घडला । ऐका झाला ज्या समयाला । तुमचा संशय लयाला । जाईल मुने ! ॥४५॥ मागें एकदां काय झालें । त्रेतायुगीं जें वर्तलें । अगस्त्य ऋषीकडें गेले । भगवान् शिव ॥४६॥ तेव्हां तयाचे संगतीं । जगन्माता होती सती । ऋषि जाणून पूजिती । अखिलेश्वरा ॥४७॥ मुनिवर्यें त्या समयास । वर्णिलें रामकथेस । ऐकून मानी महेश । परम सुख ॥४८॥ ऋषीनें केला पावन ।

हरिभक्तिचाच प्रश्न। शिवें अधिकारी जाणून। निवेदिलें ।।४९।। श्रीरामाचे गुणगण । करीत कथन--श्रवण । तेथेंच राही कांहीं दिन । कैलासनाथ ।।५०।। मुनीचा निरोप घेऊन। शंकर त्रिपुर-दहन। सतीसहवर्तमान । स्वस्थला निघे।।५१।। त्याच समयीं साचार । हरावया भूमिभार । हरीनें घेतला अवतार । रघु-वंशीं ।।५२।। पित्राज्ञा प्रमाण मानून । राज्यत्यागें उदासीन । अविनाशी करी भ्रमण । दंडकवनीं ।।५३।। हृदयीं विचार करीत । जात होते कैलासनाथ । कैसें होईल मजप्रत । प्रभुदर्शन ।।५४।। कारण, प्रभु भूतलां । गुप्तरूपें अवतरला। आपण जातांचि सकलां । कळेल हें ।।५५।। शंकराचे हृदंतरीं । कल्लोळ उठती यापरी । मर्म हें नेणिलें परि । सतीनें तें ।।५६।। दर्शनलोभ एकीकडें । मनीं भय दुसरी कडें। नेत्रांस लालसा जडे । दर्शनाची ।।५७।। (उघड जाऊन भेटावें । तरी गुप्त प्रकटवावें । न जावें तेंहि न भावें । मना-प्रति ।।५८।। ही द्विविध मनःस्थिति । होऊनिया कैलासपति । किंकर्तव्य प्रवाह-गर्तीं। सांपडे तें ।।५९।।) मनुष्याच्याच हातानें। मृत्यु याचिला रावणानें । करूं इच्छिलें प्रभूनें । विधिवच खरें ।।६०।। दर्शना न गेलों जरी । पश्चात्ताप होय तरी। विचार चाले, न ये परि । कृतीमाजीं ।।६१।। ऐशा विचारें महेश । झाला होता चिंतावश । त्याच समयीं लंकेश । जात होता ।।६२।। अधम मारीचाप्रत । घेतले तेणें समवेत । तोहि बनला त्वरित । कपट-मृग ।।६३।। कापटयें मूढ रावण । करी सीतेचें हरण । मनीं प्रभूचें श्रेष्ठपण । न कळेंचि त्या ।।६४।। बंधुसहवर्तमान । प्रभु आला मृग वधून । आश्रम पाहून नयन । साश्रु झाले ।।६५।। (साश्रु व्हायाचें कारण । संसारीं गृहस्थ-

पण । टिकूं न शके स्त्रीविण । कदापिहि ॥६६॥ किंवा निज परिवारांत । कुल पात्र निंदेप्रत । व्हावें लागेल लज्जित । त्या योगानें ॥६७॥ स्त्रीविण जीवित जरी । गृहस्थाश्रमाभीतरीं । लतेविण वृक्ष भारी । भयानक ॥६८॥ संसार जो का स्त्रीविणें । दिवसां चद्राचें चांदणें । नौकेवांचून वाहणें । प्रवाहांतरीं ॥६९॥ स्त्रीवांचून श्रेष्ठ कुल ।स्त्रीवांचून श्रेष्ठ शील । ग्रहण--कालींचें मंडल । रवि-शशीचें ॥७०॥ स्त्रीवांचून जो संसार । स्मशान-यात्रेचा परिवार । शृंगार नव्हे तो संस्कार । प्रेताचाच ॥७१॥ जीवन जें का स्त्रीविण । गृहस्थाश्रमा दूषण । स्त्री मुख्यत्वें विभूषण । प्रपंचाचें ॥७२॥ या कारणें रघुनंदन । मुकतां सीतेलागून । नेत्रांतून अश्रुसिंचन । करीतसे ॥७३॥ पुरवलें स्त्रीचें मरण । परि न बरवें स्त्रीहरण । सत्कुलास तें दूषण । चिरकालिक ॥७४॥ भोगाव्या लागती आपदा । वरी होते कुलनिंदा । एकदां नव्हे दहादां । जनामाजीं ॥७५॥ मुकून संसारसुख । जडें स्त्रीविरह-दुःख । लोकांस दावाया मुख । लाज वाटे ॥७६॥ स्त्रीमरणाहून थोर । स्त्रीहरण खरोखर । मुकावें लागे इहपर- । सुखा-लागीं ॥७७॥ श्रीराम नव्हता स्त्रैण । नव्हता दरिद्री, कृपण । दीन, दुर्बल, निस्त्राण । नव्हता मुळीं ॥७८॥ मुकला गृहस्थाश्रम । कुलनिंदा घडे विषम । अश्रु ढाळीतसे राम । म्हणूनिया ॥७९॥ घेतां मनुष्यावतार । नरापरीच व्यवहार । अश्रु ढाळी रघुवीर । या कारणें ॥८०॥) विरहें विकल होऊन । नरापरी रघुनंदन । शोधिती ते दोघेजण । वनांतरीं ॥८१॥ योग-वियोग ज्यांप्रति । शब्दहि न लागूं पडतीं । त्या विरहदुःखाची प्राप्ति । प्रकट दिसे ॥८२॥ (सीता-रामाचा योग । अनादिसिद्ध अभ्यंग । त्यांचा न घडेचि

वियोग । कल्पांतींहि ॥८३॥ ऐसा असून सिद्धान्त । श्रीराम प्रभु साक्षात् । वियोगदुःखें दुःखित । उघड दिसे ॥८४॥ श्रीरामाचें चरित्र । पाहतां अतिविचित्र । जाणती श्रेष्ठ पवित्र । ज्ञानवंत ॥८५॥ (विचित्र म्हणजे द्विविध । एका सुगम, एका दुर्बोध । विशुद्ध आणि अशुद्ध । बुद्धीपरी ॥८६॥ सद्‌बुद्धीचे जाणते । जाणती मूळ हेतूतें । तेणें त्यांच्या बुद्धीतें । मोह न पडे ॥८७॥ देवतांच्या संरक्षणा । आणि दुष्टांच्या निर्दाळणा । अवतरले ब्रह्म जाणा । रामरूपें ॥८८॥ यापरी हें गूढ ज्ञान । असतें ज्ञात्यालागून । म्हणून त्या मोहाज्ञान । न शिवें कदा ॥८९॥) परि ज्यांची मलिन मति । वश जे का मोहाप्रति । विपरीत भाव धरिती । हृदयांत ते ॥९०॥ (पापकर्माचे संस्कार । झाले ज्यांच्या बुद्धीवर । अशुद्ध बुद्धि निर्धार । त्यांचीच ती ॥ ९१॥ एक असतां एक मानणें । हें मोहाचेंच झडपणें । नव्हें, मोहासी वश होणें । अज्ञानेंचि ॥९२॥ ब्रह्म मूळ निर्विकार । तें कैसें होईल नर । करील शोक अपार । विरहदुःखें ॥९३॥ ऐसीच कल्पना करिती । रहस्य ते न जाणती । मंदमति वश होती । मोहास जे ॥९४॥) त्याच समयीं शंभूनीं । पाहिलें रामालागुनी । अत्यानंद उद्‌भवे मनीं । विशेषेंचि ॥९५॥ डोळे भरून आपुले । लावण्यसिंधूस पाहिलें । जाणून प्रकट न केलें । अप्रस्तुत ॥९६॥ 'जय सच्चिदानन्द हरि । जगत्पावन मुरारि' । ऐसें म्हणून मदनारि । चालते झाले ॥९७॥ सतीसह–वर्तमान । जातां शिव भगवान् । रोमांचित कृपानिधान । पुनः पुन्हां ॥९८॥ ती शंकराची अवस्था । सतीनें अवलोकितां । विकल्प उद्‌भवे चित्ता । विशेषेंचि ॥९९॥ "जगद्वंद्य महादेव । जगदीश स्वयमेव । शिर नमिती

देव । मुनिजन जया मुनि ॥ १०० ॥ तयांनीं ऐसें असून । नृपसुता केलें वंदन । 'सच्चिदानन्द' म्हणून । 'परंधाम' ॥१०१॥ त्याचें सौंदर्य पाहून । इतुके झाले तल्लीन । प्रेम नावरें अजून । हृदयांतरीं ॥१०२॥ ब्रह्म जें सर्वत्रव्यापक । माया-जन्मरहित । इच्छारहित भेदातीत । अनाकलनीय ॥१०३॥ तें काय देह धरून । येईल मानव होऊन । ज्याचें नाहीं पूर्ण ज्ञान । वेदांसहि ॥१०४॥ देवहितास्तव जरी । विष्णुहि नरतनु धरी । तोहि महादेवापरी । सर्वज्ञचि ॥१०५॥ तो काय अज्ञानापरी । शोधित फिरेलें नारी । जो लक्ष्मीपति असुरारि । ज्ञानधाम ॥१०६॥ श्रीशंकराची वैखरी । असत्य न होणार परि । शिव सर्वज्ञ यापरी । जाणती सर्व" ॥१०७॥ या संशयें तिचें चित्त । अतिशय झालें व्याप्त । परि ज्ञान हृदयांत । न शिरेचि ॥१०८॥ सतीनें प्रकट न केलें । जरी न बोलून दाविलें । शंभूंनीं सर्व जाणिलें । अंतर्यामीं ॥१०९॥ (अंतर्ज्ञानचि विचित्र । बिनतारी तारायंत्र । व्यापकपणें सर्वत्र । जाणतसे ॥११०॥ भूत, भविष्य, वर्तमान । घडलें, घडतें, ये घडून । त्याचें व्हावें पूर्ण ज्ञान । अंतर्ज्ञानानें ॥१११॥ स्वर्ग, मृत्यु पाताल । त्रिलोकींची हालचाल । येणें कळून तत्काल । अंतर्ज्ञान तें ॥११२॥ त्यापरी गत जन्मींचें । अथवा विद्यमानाचें । कळणें भावि जन्मींचें । अंतर्ज्ञान तें ॥११३॥ दोन मनें एक झालीं । द्वैतभावा विसरलीं । परस्पर वृत्ति कळली । अंतर्ज्ञान तें ॥११४॥) "हे सति!" म्हणती शिव । "ऐक, तुझा स्त्रीस्वभाव । न धरीं हा संशय वाव । हृदयांतरीं ॥११५॥ अगस्ति ऋषींनीं यत्कथा । वर्णन केली सर्वथा । ज्याची तयां भक्तिप्रथा । कथिली मी ॥११६॥ तोचि माझा इष्ट देव । असे उपास्य राघव । ज्यात सेविती

सदैव । धीर मुनि ॥११७॥ ज्यातें मुनि, योगी, सिद्ध । जे धीर मति प्रसिद्ध । चित्त करूनिया शुद्ध । ध्याती सदा ॥११८॥ 'नेति नेति' ऐसें म्हणून । वेद, शास्त्र आणि पुराण । ज्याच्या कीर्तीचें गायन । करितात ॥११९॥ तोचि राम हा निःशंक । परब्रह्म सर्वव्यापक । अनेक–ब्रह्मांडनायक । मायाधीश ॥१२०॥ तो निजभक्तहितार्थ । अवतरलासे सांप्रत । जो स्वतंत्र सदोदित । रघुवंशमणि" ॥१२१॥ जरी वारंवार महेश । करी ऐसा उपदेश । परि न ठसेचि लेश । सती-मनीं ॥१२२॥ हांसून म्हणे शंकर । हरिमाया बलवत्तर । ऐसा जाणून निर्धार । हृदयांतरीं ॥१२३॥ "जरी तुझ्या हृदयांतरीं । संशय असेल भारी । कां न घेसी जाऊन तरी । परीक्षा तूं ॥१२४॥ मी बसेन तोंपर्यंत । या वट-वृक्षाच्या छायेंत । जोंवरी येशील परत । मजपाशीं ॥१२५॥ जेणें पावेल उपशम । महामोह आणि भ्रम । तो यत्न करीं ठाम । योग्य-विचारें" ॥१२६॥ (सती विकल्पें नाडली । पति-मनोगता मुकली । अकल्याण प्रवर्तली । दुरभिमानें ॥१२७॥ दुरभिमान तेथें विकल्प । विकल्प तेथें घडें पाप । पाप तेथ आपोआप । अकल्याण ॥१२८॥) शिवाज्ञा तैं घेऊन । सती निघाली तेथून । 'काय करावें' म्हणून । विचार करी ॥१२९॥ इकडे चित्तीं पंचानन । करी ऐसें अनुमान । 'सतीचें मात्र कल्याण । न घडे दिसें ॥१३०॥ प्रत्यक्ष मोहि सांगून । नव्हे शंका-निरसन । दैव प्रतिकूल म्हणून । बरें नव्हे ॥१३१॥ जें जें नेमिले राघवे । तें तें होणार स्वभावें ॥ फांटे फोडीत बसावें । तर्कें कोणीं' ॥१३२॥ ऐसें म्हणून महादेव । जपूं लागे हरि-नांव । सती गेली जिथें राघव । सौख्यधाम ॥१३३॥ सती ती हृदयांतरीं । वारंवार विचार करी । जानकीचें रूप धरी । शेवटास ॥१३४॥

राजपुत्र दोघेजण । येत होते जिकडून । त्या वाटेच्या समोरून । चाले स्वयें ॥१३५॥ सतीकृत सीतावेष । पाहून लक्ष्मण शेष । चकित मनीं विशेष । भ्रमित होय ॥१३६॥ कांहीं न बोलतां अक्षर । ठाकला अति गंभीर । जाणे मनाचा खंबीर । प्रभु-प्रताप ॥१३७॥ सतीची कपटकृति । जाणे सुरांचा अधिपति । सर्वसाक्षी बसे चित्तीं । सर्वांच्याहि ॥१३८॥ ज्यांच्या स्मरणें करून । नष्ट होतसे अज्ञान । तोचि सर्वज्ञ भगवान् । रामचंद्र ॥१३९॥ ऐसें असून सत्तत्त्व । सती करी लपंडाव । स्त्रीस्वभावाचा प्रभाव । पहा कैसा ॥१४०॥ निज मायेची महति । जाणूनिया निज चित्तीं । हांसून बोले रघुपति । मृदुवचें ॥१४१॥ जोडूनिया करयुग्म । प्रभु करीतसे प्रणाम । घेऊनिया निजनाम । पित्यासह ॥१४२॥ म्हणे, "माते ! निवेदीं तूं । कोठें असे वृषकेतु । वनीं फिराया काय हेतु । एकटीच" ॥१४३॥ मृदु, रहस्यें भरली । श्रीरामाची उक्ति भली । ऐकतांच ओशाळली । अतिशयें ती ॥१४४॥ भीतीनें हृदय उडें । चालली महेशाकडें । पडलें महा सांकडे हृदयांतरीं ॥१४५॥ शंकर करितील क्रोध । म्हणून मन भयें विद्ध । कपट न व्हावें प्रसिद्ध । हेंचि कोडें ॥१४६॥ "शंकरांनीं सांगितलें । तें नाहींच मीं मानिलें । निज अज्ञान आरोपिलें । रामावरी ॥१४७॥ आतां जाऊन तेथवर । काय तरी देऊं उत्तर" । हृदयीं पेटला फार । दारुण दाह ॥१४८॥ प्रभूनें जाणिलें चित्तीं । कीं दुःख पावली सती । कांहीं स्वप्रभावाप्रति । दाखविलें ॥१४९॥ सतीनें पाहिलें कौतुक । मार्गीं चालतां एक । पुढें दिसे रघुनायक । स्त्री-बंधुसह ॥१५०॥ मागें परतून पाहतां । विलोकिलें रघुनाथा । सुंदर वेषें बंधु, सीता । समागमें ॥१५१॥ जिकडे जिकडे पाहतसे ।

तिकडें प्रभु बसला दिसे। सेविती चतुर ऐसे। सिद्ध मुनि॥१५२॥ ब्रह्मा–विष्णु–महेश्वर। पाहिले अनेक प्रकार। एकाहून एक थोर। प्रभाव ज्यांचा ॥१५३॥ भावें चरण वंदिती। प्रभूची सेवा करिती। पाहिले देव या रीतीं। सुंदर वेषें॥१५४॥ सावित्री आणि इंदिरा। सतीसह एकसरां। असंख्य परम सुंदरा। विलोकिल्या ॥१५५॥ ज्या ज्या वेषेंकरून। ब्रह्मादिक देवगण। त्या त्या रूपा अनुसरून। पाहिल्या त्या ॥१५६॥ ज्या ज्या रूपें जेथें तेथें। विलोकिलें राघवातें। शक्तिसह होते तेथें। सर्व देव ॥१५७॥ (ससावित्री ब्रह्मदेव। लक्ष्मीसहित माधव। शचीसह स्वयमेव। इंद्रराज ॥१५८॥ त्याहूनहि नवलाव। सतीसह महादेव। सेवितां तो राघव। दिसे तिज ॥१५९॥) संसारीं वावरणारे। चराचर जीव सारे। तेथेंचि नाना प्रकारें। विलोकिलें ॥१६०॥ देव नाना वेष धरून। पूजिती प्रभुलागून। जरि रामरूप आन। देखिलें ना ॥१६१॥ सीतेसह रघुवीर। देखिले अपरंपार। वेष त्यांचें नव्हते मात्र। भिन्न भिन्न ॥१६२॥ तोचि रघुनाथ स्वतां। तोचि लक्ष्मण, तीच सीता। पाहून सती भयभीता। अतिशयेंचि ॥१६३॥ हृदय कांपूं लागलें। देहभान कांहीं नुरलें। डोळे झांकून घेतले। बैसे पथीं ॥१६४॥ पुन्हां नेत्र उघडून। करितां अवलोकन। तेथें दक्षजेलागून। कांहीं न दिसे ॥१६५॥ रामपदा वारंवार। नमवूनिया निज शिर। जेथें होते श्रीशंकर। जाई तेथ ॥१६६॥ समीप जातांच क्षणीं। श्रीमहेश शूलपाणि। पुसती किंचित् हांसूनी। कुशल वृत्त ॥१६७॥ कोणत्या प्रकारें करून। आलीस परीक्षा घेऊन। सांग सर्वहि वर्तमान। खरें खरें ॥१६८॥ श्रीरामचंद्राचा प्रभाव। सती जाणून स्वयमेव।

करी शिवासी लपंडाव । भीतिवशें ॥१६९॥ (साहस, अनृत, लपंडाव । हा स्त्रीजातीचा स्वभाव । प्रसंग कठिण अतीव । वाटे तिज ॥१७०॥ अभिमानें घडें साहस । पुढें अनृत अनायास । शेवटीं घडती सायास । परिणामीं ॥१७१॥ त्याच कर्माच्या प्रवाहें । तिची वृत्ति–नौका वाहे । शिव पुसतां लवलाहें । काय म्हणे ॥१७२॥) "छे छे, परीक्षा कसली । पतिदेवा! न घेतली । तुम्हांपरीच मी केली । प्रणति तथा ॥१७३॥ तुम्ही जें जें केलें कथन । असत्य घडेल कोठून । प्रतीति चुकली येऊन । मन्मनास" ॥१७४॥ तेधवां ध्यान धरोनी । पाहिलें श्रीशंकरांनीं । सतीनें केलीकरणी । जाणिली ती ॥१७५॥ मग मस्तक आपुलें । राममायेस नमविलें । खोटें बोलाया प्रेरिलें । सतीस जिनें॥१७६॥ ईश्वरेच्छा बलवत्तर । जी का घडून येणार । हृदयीं विचारिती शंकर । सर्वज्ञ ते ॥१७७॥ "सीतेचा घेतला वेष । हा सतीनें केला दोष" । तेणें विषाद विशेष । शिवमनांत ॥१७८॥ "जरी आतां मी येथून । सतीवरी प्रेम करीन । अनीति वाढेल, बुडून । भक्तिमार्ग ॥१७९॥ सती पवित्र परम । त्याज्य नव्हे प्रिया मम । जरि करूं जातां प्रेम । पाप घडें"॥१८०॥ परि हें हृद्गत लेश । प्रकट न करी महेश । आणि वाढे दाह विशेष । हृदंतरीं ॥१८१॥ तेव्हां भगवान् शंकर । प्रभुपदीं नमवून शिर । हृदयीं स्मरतां रघुवीर । भाविती हें ॥१८२॥ "या शरीरें मज निश्चितीं । भेटतां नये सतीप्रति ।" हा संकल्प शिव करिती । हृदयांतरीं ॥१८३॥ ऐसा करून विचार । धैर्यशील श्रीशंकर । जाती स्मरत रघुवीर । कैलासातें ॥१८४॥ चालतांना वाट-चाली । सुंदर नभोवाणी झाली । "धन्य दृढ भक्ति आपुली । जय महेश! ॥१८५॥ ऐसी प्रतिज्ञा तुम्हांविण । करूं शके अन्य

कोण । भगवान् समर्थ आपण । श्रीरामभक्त" ॥१८६॥ ऐकून आकाशवाणी । चिंता जडे सती-मनीं । विचारी तें संकोचुनी । शंकरातें ॥१८७॥ "सांगा सांगा कृपावंता! । पण केला तरी कोणता । दीनदयाला समर्था! । सत्यधामा!" ॥१८८॥ अति आग्रहेंकरून । तिनें केला जरी प्रश्न । तरी न केलें कथन । त्रिपुरांतकें ॥१८९॥ तंव सती निज मनीं । विचारी तर्केंकरूनी । सर्वज्ञ श्रीशंकरांनीं । जाणिलें सर्व ॥१९०॥ प्रत्यक्ष शिवासी निश्चितीं । केली मी कपटकृति । अज्ञान मूर्ख स्त्रीजाति । स्वभावेंचि ॥१९१॥ दूध-पाणी एक होती । एका मोलें विकले जाती । तैशीच प्रीतीची रीति । दिसून ये ॥१९२॥ प्रीतिरस दुभंगून । जातो निश्चयें करून । कपटाचें विरजण । पडतां क्षणीं ॥१९३॥ दुःख वाटे सतीचित्तीं । जाणून आपुली कृति । चिंतेसहि नाहीं मिति । अवर्णनीय ॥१९४॥ (करणीचा पश्चात्ताप । तेणें तो शोक-संताप । कैसें टळेल मग पाप । हीच चिंता ॥१९५॥) कृपासागर शंकर । स्वभावें अति गंभीर । उघड न कथिती मात्र । मदपराध ॥१९६॥ शिवाची चर्या पाहुनी । जाणती झाली भवानी । मज त्यागिलें प्रभूंनीं । व्याकुल हृदीं ॥२९७॥ उमजतां निज पातक । न बोलवे कांहीं एक । हृदय भडकें अधिक । आव्यापरी ॥ १९८ ॥ सती दुःखित अतीव । जाणूनिया ऐसें शिव । कथिती तिच्या सुखास्तव । सुंदर कथा ॥१९९॥ चालतां चालतां पंथ । वर्णीत इतिहास बहुत । पोंचले कैलासाप्रत । विश्वनाथ ॥२००॥ तेथेंहि पुन्हां पंचानन । निज प्रतिज्ञा जाणून । बैसे घालून पद्मासन । वट-तरू-तलीं ॥२०१॥ स्वरूपीं सहज शंकर । निमग्न होतां निर्भर । लागे समाधि सुस्थिर । अखंडित ॥२०२॥ त्या समयीं हि ती

सती । कैलासींच करी वस्ती । परि वाढे उद्वेग अति। उत्तरोत्तर ॥२०३॥ या गोष्टीचें मुख्य वर्म । कुणा कांहीं नसे सुगम । एकेक दिन युगासम । वाटे तिज ॥२०४॥ नित्य नवा शोकभर । साही सतीचें अंतर । “ दुःखसिंधूच्या पार । जाईन कधीं ॥२०५॥ रघुपतीचा अपमान । घडला जो मजकडून । मानिलें पतीचें वचन । असत्य तसें ॥२०६॥ तत्फल मजकारणें। दिलें असें विधात्यानें । घडवून आणिलें घडणें । योग्य जें तें ॥२०७॥ आतां विधात्या ! तुजसी । गोष्ट ही न कळे कैसी । मजला जिवंत ठेविसी । शिवविन्मुख ” ॥२०८॥ हृदयींची उद्विग्नता । कांहीं न येचि वर्णितां । चित्तीं आठवी रघुनाथा । चतुरा ती ॥२०९॥ “ प्रभो ! जरी तुम्ही स्वतां । दीनदयाळ म्हणवितां । ‘ शोकहरण ’ ऐसी कथा । वेद गाई ॥२१०॥ तरी मी करित्यें विनंति । जोडूनिया करांप्रति । सुटावा हा शीघ्रगति । देह माझा ॥२११॥ जरी माझें शिवचरणीं । प्रेम असेल निर्वाणीं । मनोवाक्कर्मेंकरूनी । सत्यव्रत हें ॥२१२॥ तरी समदर्शी प्रभुवरा ! । ऐका माझी नम्र गिरा । यापरीचा उपाय करा । शीघ्रतेनें ॥२१३॥ जेणें अनायासें मज । मरण येईल सहज । कठिण विपत्तीचें बीज । दग्ध होय ” ॥२१४॥ यापरी ती दक्षसुता । दुःखी होय अपरिमिता । ती महद् दुःखकथा । अवर्णनीय ॥२१५॥ मग सत्त्यांशी सहस्त्र । लोटले जें संवत्सर । समाधि त्यजी शंकर । अविनाशी ॥२१६॥ रामनामाचें स्मरण। करी शिव भगवान् । जगत्पति जागले म्हणून । जाणे सती ॥२१७॥ तोंच सतीनें जाऊन । वंदिले शिवाचे चरण । संमुखचि दिलें आसन । शंकरानें ॥२१८॥ रसाळ हरीची कीर्ति। वर्णी तें कैलासपति । दक्ष झाला प्रजापति । त्याच कालीं ॥२१९॥

धात्यानें विचारपूर्वक । जाणून योग्य हा एक । प्रजापतींचा नायक । केलें तया ॥२२०॥ थोर अधिकार यापरी। दक्ष जेव्हां प्राप्त करी। तैं झाला हृदयांतरीं । गर्व महा ॥२२१॥ ऐसा कुणीहि निश्चयेंसी । जन्मला नाहीं अवनीसी । प्रभुत्व पावतां ज्यासी । गर्व नाहीं ॥२२२॥ सर्वहि मुनिलागुनी । दक्षें तेव्हां पाचारुनी । आरंभिलासे तत्क्षणीं । यज्ञ महा ॥२२३॥ तैसें सकल सुरवर । आमंत्रिले तैं सादर । यज्ञभागाचा अधिकार । होता जयां ॥२२४॥ किन्नर, नाग अपूर्व । सिद्ध आणखी गंधर्व । स्त्रियांसह देव सर्व । जात होते ॥२२५॥ ब्रह्मा, विष्णु महेश्वर । वगळून देव थोर। चालले सर्व सुरवर। सजवून यानें ॥२२६॥ सतीनें तैं आकाशांत । पाहिलें विमानांप्रत । नानापरी सुशोभित । जात होतीं ॥२२७॥ देवांगना त्या मिळून। करिती मधुर गायन । जें ऐकतां सुटे ध्यान । मुनिजनांचें ॥२२८॥ "देव विमानीं बैसून। कोठें हे करिती गमन।" सतीनें हळूंच प्रश्न । विचारिला ॥२२९॥ ऐकून सतीचा प्रश्न । तेव्हां शिव भगवान् । करी वृत्तान्त–कथन। यथार्थ जो ॥२३०॥ "पितृगृहीं होय यज्ञ।" ऐसें ऐकून वर्तमान । कांहींसें झालें प्रसन्न । चित्त तिचें ॥२३१॥ (तिच्या हृदयसागरीं । उठती कल्पनालहरी । विरहसंताप–हारी । सुखद ज्या ॥२३२॥) मनिं म्हणे, 'त्रिपुरारि। आज्ञा देतील जरी । राहीन कांहीं काळ तरी। या निमित्तें ॥२३३॥ पतीनें परित्यागिलें । हृदयीं भारी दुःख झालें। परि जाणून न बोले । निजापराध ॥२३४॥ ( आधीं वाटे न बोलावें। पुन्हां वाटे विचारावें । ऐसे खाई हेलखावे। तिचें मन ॥२३५॥ शेखीं बोलली भवानी । मनोहारिणी वाणी । भय–संकोच–प्रेमांनीं । परिपूर्ण जी ॥२३६॥ "माझ्या पित्याच्या

मंदिरीं। उत्सव होतसे भारी। आपुली अनुज्ञा जरी। असेल मज– ॥२३७॥ तरी कृपाधामा ! सत्वर। जाऊन मी तेथवर। अवलोकीन सादर। सोहळा तो" ॥२३८॥ (ऐकून सतीचा प्रश्न। बोले शिव भगवान् । जेणें तिचें समाधान। होय कांहीं ॥२३९॥) "बरें पुसलेंस तूं सति!। तें मानलें मजप्रति। परि अनाहूत तूं निश्चितीं। हें अनुचित ॥२४०॥ निज कन्यांचा। समुदाव। दक्षें पाचारिला सर्व। परि माझ्या शत्रुत्वास्तव। वगळिलें तुज ॥२४१॥ मद्वर्तनें ब्रह्मसभेंत। दुःखित झालें तच्चित्त। म्हणून आज आपणांप्रत। अवमानिलें" ॥२४२॥ (मागें एके अवसरीं। ब्रह्मसभेभीतरीं। ब्रह्मा-विष्णु–त्रिपुरारि। यांच्यासवें– ॥२४३ बसतां सर्वहि सुरगण। झालें दक्षाचें आगमन। देव देती अभ्युत्थान। तयाप्रति ॥२४४॥ ब्रह्मा, विष्णु, महेश्वर,। हे मात्र बसले स्थिर। तेणें दक्ष तिघांवर। रुष्ट झाला ॥२४५॥ म्हणे " तिघेहि उन्मत्त। करितां मज अवमानित। यज्ञभागविर्वाजित। व्हाल तरी" ॥२४६॥ या शापाच्या कारणें। तिघां नसतीं पाचारणें। म्हणून पडलें सांगणें। शंकरातें ॥२४७॥ ) " पाचारण नसतां मूळ। जरी भवानी! जाशील। तरी प्रेम, मर्यादा, शील। राहील ना ॥२४८॥ स्वामी, पित।, गुरु, स्नेही। जरी जाणें यांच्या गृहीं। जावें न पडतां संदेहीं। अनाहुत ॥२४९॥ परी चौघांतून जर। कुणी जरी करी वैर। तेथें गमन करितां मात्र। कल्याण नव्हें ॥२५०॥ नाना प्रकारें करून। शिव शंभू भगवान् देतसे समजावून।। सतीप्रती ॥२५१॥ तरी ती भवितव्यतेस। पूर्णपणें झाली वश। तेणें नपडेचि प्रकाश। तदंतरीं ॥२५२॥ पुन्हां सांगे श्रीशंकर। "अनाहुत जाशील जर। तरी मज मुळीं मात्र। न

रुचेल तें" ॥२५३॥ नाना प्रकारें करून । शिवें दिलें समजावून । तथापि तिजलागून । राहवेंचि ना ॥२५४॥ (प्रयत्न करितांहि निःशंक । सती जावया उत्सुक । म्हणून कैलासनायक । काय करी ॥२५५॥) निज मुख्य मुख्य गण । तिच्या समागमें देऊन । तिजला त्रिपुरदहन । पाठवीतसे ॥२५६॥ निज पित्याच्या सदनीं । जेव्हां पोंचली भवानी । कुणीहि ना तिज संमानी । दक्षभयें ॥ २५७॥ आदरानें स्वभावतां । भेटे एकली माता । भगिनी हांसत बाह्यतां । भेटल्या तिज ॥२५८॥ नुसतें कुशल वृत्तहि । दक्षानें पुसलें नाहीं । होय सर्वांगाची लाही । पाहतां हें ॥२५९॥ सतीनें जाऊन मग । अवलोकिला तो याग । कुठेंहि न दिसे भाग । शंकराचा ॥२६०॥ तेव्हां आठवे चित्तास । शिवें केला जो उपदेश । पाहून अनादरास । हृदय जळें ॥२६१॥ पहिलें दुःख हृदयांत । इतुकें नव्हतें व्याप्त । जितुका झाला सांप्रत । संताप महा ॥२६२॥ जरी का जगदंतरीं । घोर दुःखें नानापरी । तरी कठिण सर्वांतरीं । जात्यपमान ॥२३३॥ त्या अपमानें अंतरीं । सती संतापली भारी । माता सांगे नानापरीं । समजावुनी ॥२६४॥ झाला शिवापमान । कांहीं केल्या नव्हें सहन । प्रकट न झालें ज्ञान । हृदयांतरीं ॥२६५॥ तेव्हां हट्टास पेटून । सभेलागीं धिक्कारून । सती बोलली वचन । क्रोधभरें ॥२६६॥ "ऐका ऐका सभाजन ! । सर्व मुनींद्र मिळून । ऐकिली, घडली ज्यांकडून । शिवनिंदा– ॥२६७॥ त्या निंदेचें सद्यःफल । तुम्हां सर्वांस मिळेल । पश्चात्तापांत पडेल । पुरता पिता ॥२६८॥ संत, शिव, लक्ष्मीपति । यांच्या निंदा जेथें होती । तेथें मर्यादा निश्चितीं । ठरली अशी ॥२६९॥ घडेल आपणांकडून । करावें तज्जिव्हाछेदन । न तरी कान झांकून ।

निघून जावें ॥२७०॥ जगाचा आत्मा निःशंक। महेश त्रिपुरांतक। विश्वपिता हितकारक। सर्वांचाहि ॥२७१॥ पिता माझा मंदमति। निंदीतसे शिवाप्रति। दक्षवीर्याचा निश्चितीं। देह माझा ॥२७२॥ त्या कारणें मी त्वरित। विसर्जीन देहाप्रत। स्मरून शिव चित्तांत। चंद्रमौली" ॥२७३॥ ऐसें बोलून सत्तीनें। देह जाळिला योगाग्नीनें। हाहाःकार उडे तेणें। सर्व यज्ञीं ॥२७४॥ सतीचें ऐकून मरण। होते जे का शिवगण। करिती यज्ञविध्वंसन। तदनंतर ॥२७५॥ होतो यज्ञाचा विध्वंस। ऐसें विलोकून दृश्य। भृगुप्रभृति मुनीश। रक्षिती त्या ॥२७६॥ वृत्तान्त ऐशा प्रकारें। कळतांचि श्रीशंकरें। पाठविलें क्रोधभरें। वीरभद्रा ॥२७७॥ तेणें जाऊनिया तेथ। केलासे यज्ञ उध्वस्त। दिलें योग्य प्रायश्चित्त। सर्व देवां ॥२७८॥ विदित जी का विश्वाप्रति। दक्ष पावे तीच गति। जी शिवविन्मुखा अंतीं। प्राप्त होय ॥२७९॥ यापरीचा इतिहास। ठावा सर्व जगतास। म्हणून वर्णिलें त्यास। संक्षेपें मीं ॥२८०॥ (शिवासी करितां विरोध। अंतीं होय दुःखप्रद। हेंचि कराया विशद। मुख्य तत्त्व ॥२८१॥ दक्षयागाचा इतिहास। संक्षेपेंचि श्रोत्यांस। निवेदिती तुलसीदास। संतकवि ॥२८२॥ सोपानींचा मार्ग भला। जरी अतिदीर्घ वाटला। तदर्थ चवथा योजिला। विश्राम हा ॥२८३॥ रसिक भाविक श्रोत्यांस। विनवीतसे देवीदास। माझ्या बोबड्या बोलांस। मान्य करा ॥२८४॥)

—:०:—

# विश्राम ५ वा

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्यो नमः
श्रीसीतारामचन्द्राभ्यां नमः

देह विसर्जितां सती । वर मागे हरिप्रति । असो शिवपदीं प्रीति । जन्मोजन्मीं ॥१॥ त्याच कारणें भवानी । हिमाद्रि-गृहीं जाउनी । पार्वती-देह पावुनी । जन्म घेई ॥२॥ हिमालयाच्या सदनीं । जन्मली जेव्हां भवानी । सिद्धि संपत्ति त्या स्थानीं । प्राप्त झाल्या ॥३॥ ठायीं ठायीं मुनिजन । करिती आश्रम पावन । योग्य स्थानें त्यांलागून । हिमाद्रि दे ॥४॥ फलपुष्पांनीं मंडित । सर्वहि आणि सदोदित । वृक्ष तैसे वनप्रान्त । नानाविध ॥५॥ शैल सहज सुंदर । प्रकट झाल्या त्यावर । नानापरीं मनोहर । रत्नखनि ॥६॥ पवित्र जलपूरिता । वाहती सर्व सरिता । खगमृगभृंगां समस्तां । निवास सुखें ॥७॥ स्वाभाविक वैरभाव । त्यागूनिया सर्व जीव । हिमगिरीवरी सर्व । प्रेम करिती ॥८॥ पार्वती येतां सदनांत । शोभे कैसा हिमवंत । रामभक्ति होतां प्राप्त । जैसा नर ॥९॥ मंगल कृत्यें नितनूतन । तद्‌गृहीं येतीं घडून । करिती यशोगान । ब्रह्मादिक ॥१०॥ हें सर्वहि वर्तमान । कळे नारदांलागून । हिमगृहीं करिती गमन । कौतुकानें ॥११॥ हिमालयें त्यां पाहून । केला फारचि संमान । दिलें पद प्रक्षाळून । उच्चासना ॥१२॥ स्त्रीसह शिर आपुलें । मुनिपदीं नम्र केलें । साऱ्या घरांत सिंचिलें । चरणतीर्थ ॥१३॥ सभाग्यमहति भली । हिमालयानें वर्णिली । बाहून कन्या

घातली । मुनिपदांवरी ॥१४॥ "तुम्ही तो त्रिकालज्ञानी । जाणतां सर्वांलागुनी । असे तुमचा सर्व स्थानीं । संचारहि ॥१५॥ तरी कन्येचे दोष–गुण । करा हो ! मज कथन । मुनिश्रेष्ठा ! विचारून । हृदयांतरीं" ॥१६॥ हांसून मृदु गूढ वाणी । बोलती नारदमुनि । "सर्व गुणांची ही खनि । कन्या तुझी ॥१७॥ स्वाभाविक गुणेंकरूनी । संदर, सुशील शहाणी । उमा, अंबिका भवानी । नामें हिचीं ॥१८॥ सर्वलक्षण-संयुक्ता । असे तुझी ही दुहिता । आवडती पतिचित्ता । सदोदित ॥१९॥ हिचें अखंड अविनाश । सौभाग्य रात्रंदिवस । पितरांस मिळे यश । हिच्याच मुळें ॥२०॥ सर्वहि विश्वाभीतरीं । पूज्य होय ही कुमारी । हिच्यासवें कांहीं परि । दुर्लभ नसे ॥२१॥ हिचें करून नाम-स्मरण । पातिव्रत्यरूप तीक्ष्ण । खड्‌गधारेवरी स्त्रीगण । चढेल कीं ॥२२॥ ऐशापरी हिमवंता ! । सुलक्षणी तुझी सुता । दोनचार दोष आतां । तेहि ऐक ॥२३॥ निर्गुण, संमानरहित । मातृपितृ-विरहित । संशयहीन समस्त । उदासीन– ॥२४॥ योगी आणि जटाधारी । निष्काम जो का अंतरीं । नग्न, परिवेष करी । अमंगल ॥२५॥ ऐशा लक्षणांचा पति । मिळेल तुझ्या कन्येप्रति । रेषा हिच्या हातावरती । पडली अशी ॥२६॥ ऐकून मुनींची वाणी । सत्य होय हें जाणुनी । दांपत्य दुःखी स्वमनीं । उमा हर्षे ॥२७॥ परि नारदाहिलागून । भेद न आला कळून । दशा एक, परि भिन्न । भाव त्यांचा ॥२८॥ (लक्षणें जीं केलीं कथन । असतीं कुणा उद्देशून । याचें प्रथम न झालें ज्ञान । नार-दातें ॥२९॥) सर्व सखी आणि पार्वती । हिमालय मैना सती । रोमांचित तनु, येती । अश्रु नेत्रीं ॥३०॥ देवर्षीचें जें भाकित । तें कदापि नव्हें अनृत । उमा धरी स्वमनांत । वाक्य तेंचि ॥३१॥

शिवाच्या पदकमलीं । प्रीतिहि तैं उद्भवली । दुष्प्राप्य म्हणून वाटली । शंका मनीं ॥३२॥ अप्रासंगिक जाणून । प्रीति ठेविली झांकून । सखींच्या ओसंगीं जाऊन । बैसे पुन्हां ॥३३॥ नारदाचें भविष्य सत्य । कधीं न होय असत्य । म्हणून सचिंत दांपत्य । चतुर सख्या ॥३४॥ चित्तांत धरून धैर्य । बोले तेव्हां । हिमालय । कोणता करूं उपाय । सांगा मुने ! ॥३५॥ तैं म्हणती मुनीश्वर 'हिमवंता ! श्रवण कर । विधीनें लिहिलें अक्षर । ललाटीं जें- ॥३६॥ देव-दैत्य किंवा नर । नाग अथवा मुनीश्वर । पुसून टाकूं शकणार । कुणीहि ना" ॥३७॥ "तथापि तुजलागून । उपाय एक निवेदीन । जरी अनुकूल प्राक्तन । सिद्धि जाय ॥३८॥ वराचीं लक्षणें जैशीं । मीं कथिलीं तुजपाशीं । तैसाच मिळे उमेसी । निःसंशय ॥३९॥ वराचे जितुके दोष । सांगितलें मीं विशेष । ते शिवाठायीं अशेष । मानितों मी ॥४०॥ जरी का हिचा विवाह । होईल शंकरासह । गुणांसम दोषसमूह । कुणीहि म्हणे ॥४१॥ शेषमंचकीं शयन । जरी करी नारायण । दोष न दे त्यालागून । पंडितहि ॥४२॥ सूर्य आणि जातवेद । घेती सर्व रसास्वाद । परि तयां मतिमंद । कुणी न म्हणे ॥४३॥ पवित्र आणि अपवित्र । वाहून नेतसे नीर । परि गंगेस अपवित्र । कुणीहि न म्हणे ॥ म्हणूनिया समर्थास । शैलपते ! नाहीं दोष । सूर्याग्नि-गंगेपरिस । उपर्युक्त ॥४४॥ आपणहि करूं सर्व । ऐसी मनीं धरी हांव । कुणी जरी जडजीव । ज्ञानमदें ॥४५॥ तरी तो नर कल्पभरी । पचेल नरकाभीतरीं । जीव ईश्वराबरोबरी । होय कैसा?"॥४६॥ गंगेच्या जलानें सिद्ध । केलें असे जरी मद्य । कदापि तिजला बुध । प्राशिती ना ॥४७॥ (तेंवि जीव ईश्वरांश । देहाश्रयी मोहवश । म्हणून ईश्वरत्व त्यास । नसे मुळीं ॥ ४८ ॥) तेंचि मद्य गंगेप्रत । मिळतां होय पुनीत । जीव आणि ईश्वरांत ।

भेद ऐसा ॥४९॥ (नष्ट होऊन अज्ञान । सच्चिदानन्द झाल्या-विण । जीवास ईश्वरपण । नाहीं तसें ॥५०॥) भगवान् शिव प्रसिद्ध । समर्थचि स्वतःसिद्ध । सर्वथा कल्याणप्रद । विवाहीं हा ॥५१॥ परि बहु कष्टेंकरून । प्राप्त महेश भगवान् । तरी कष्टतां प्रसन्न । सत्वर होय ॥५२॥ जरी का ही तुझी सुता । तप करी हिमवंता ! । टाळील भवितव्यता । त्रिपुरांतक ॥५३॥ यद्यपि अनेक वर । असती या पृथ्वीवर । हिला मात्र नसे इतर । शिवाविण ॥५४॥ भक्तासी वरदायक । नतक्लेशनिवारक । सेवक-मनोरंजक । कृपासिंधु ॥५५॥ इच्छिलें फल जें मनीं । शिवाराधनेवांचुनी । कोटि योग-जपेंकरुनी । सिद्ध नव्हे" ॥५६॥ इतुकें बोलून नारद । मनीं स्मरून गोविंद । देते झाले आशी-र्वाद । पार्वतीस । ॥५७॥ हिचें कल्याणचि आतां । होणार ही निश्चितता । संशय करी गा ! परता । हिमालया" ॥५८॥ धीर देऊनि इतुका । नारद गेले ब्रह्मलोका ॥५९॥ पुढील चरित्र ऐका । घडलें जैसें ॥६०॥ पतीस भेटून एकांतीं । म्हणे तेव्हां मैना सति । "कळलें नाहीं मजप्रति । मुनि-भाषण ॥६१॥ वर घरंदाज कुलीन । सुंदर कन्द्रेसमान । त्याशींच करावें लग्न । अनुपमहि जो ॥६२॥ कन्या माझी नाहीं तरी । राहो, राहील कुमारी । नाथा ! प्रिय प्राणापरी । उमा माझी ॥६३॥ गिरिजेसी योग्य जोड । मिळणें होय अवघड । लोक म्हणतील जड । सहजचि तुम्ही ॥६४॥ याचा विचार करून । नाथा ! ठरवावें लग्न । जेणें मनास होय न । पश्चात्ताप" ॥६५॥ हृद्गत कथून आपुलें । पदीं मस्तक ठेविलें । तैं तिज सप्रेम बोले । हिमालय ॥६६॥ "कदाचित् चंद्रांतून । अग्निहि होय उत्पन्न । परि नारदाचें वचन । असत्य

नव्हें ॥६७॥ प्रिये! मैने! मनांतून । सर्वहि शोक टाकून । श्रीभगवंताचें चिंतन । करी आतां ॥६८॥ जेणें पार्वतीलागून । केलें भूवरी निर्माण । करील निश्चयें कल्याण । तोचि तिचें ॥६९॥ आतां तुझें खरोखरी । प्रेम आहे कन्येवरी । जाऊन प्रेरणा करी । या परीची ॥७०॥ तप करावें विशेष । जेणें प्राप्त होय महेश । अन्य उपायांनीं क्लेश । हरतील ना ॥७१॥ श्रीनारदाचें वचन । सरहस्य सकारण । सर्व गुणांचें निधान । सुंदर शिव ॥७२॥ ऐसा करी तूं विचार । शंका टाकूनिया दूर । सर्वतोपरी शंकर । निष्कलंक" ॥७३॥ ऐकून पतिवचन । मैना मनीं आनंदून । गेली सत्वर उठून । गिरिजे-कडे ॥७४॥ उमेसी दृष्टीं देखिलें । नेत्र अश्रूंनीं भरले । वात्सल्यें तिनें घेतलें । ओसंगीं ॥७५॥ वारंवार तिजलागून । हृदयीं घे कवटाळून । कंठ गद्‌गद, बोलवें न । कांहीं हि तिज ॥७६॥ सर्व विश्वाची जननी । जी का सर्वज्ञ भवानी । बोले सुखद, मृदु वाणी । मातेप्रति ॥७७॥ आई गे! मी सकौतुक । स्वप्न विलोकिलें एक । तें तुज सांगत्ये ऐक । इत्थंभूत ॥७८॥ एक ब्राह्मण सुंदर । वर्ण ज्याचा असे गौर । उपदेशी वरचेवर । ऐसें मज ॥७९॥ "गिरजे! आधीं जाऊन । करीं गे! तपालागून । नारदें कथिलें वचन । सत्य जाण ॥८०॥ तुझे मातापिताहि ते। संमत या विचारातें । तप सुखकारी, नाशितें । दुःखदोषा ॥८१॥ घेई तपाची साह्यता । सृष्टि रचितो विधाता । विष्णु सर्व जगत्त्राता । तपोबलें ॥८२॥ तपोबलें श्रीशंकर । करी सृष्टीचा संहार । शेष साही पृथ्वीभार । तपोबलें ॥८३॥ सर्वहि सृष्टी लागुनी । तपाचा आधार भवानी । तप करीं जा, स्वमनीं- । जाणून हें" ॥८४॥ ऐकून कन्येची उक्ति । चकित झाली मैना

सती । स्वप्न ऐकवी पतिप्रति । पाचारुनी ॥८५॥ बहु प्रकारें करून । मायबापां समजावून । निघाली तपाकारण । उमा हर्षें ॥८६॥ प्रिय परिवार, इष्ट जन । मातापिताहि मिळून । व्याकुळ झाले, मुखांतून । शद्ब न निघे ॥८७॥ वेदशीर्ष नामें मुनि । आले तेव्हां तया स्थानीं । सर्वांतें समजावुनी । सांगती ते ॥८८॥ पार्वतीचें महिमान । तन्मुखें श्रवण करून । ज्ञान होतां सर्वजण । शांत झाले ॥८९॥ प्राणपतीचे चरण । उमा हृदयीं धरून । तप करीतसे जाऊन । वनांतरीं ॥९०॥ ती अत्यंत कोमलांगी । तनु नसे तपाजोगी । पतिपद स्मरून त्यागी । सर्व भोग ॥९१॥ शिवपदीं नितनूतन । प्रेम होऊन उत्पन्न । देहविस्मृतीनें मन । मग्न तपीं ॥९२॥ सहस्त्र वर्षेंपर्यंत । भक्षिलें फलमूलांप्रत । वर्षें काढिलीं तीं शत । शाकाहारें ॥९३॥ तदुपरी कांहीं दिन । जलपान, वायुभक्षण । केले उपवास कठिण । कांहीं दिवस ॥९४॥ बिल्वपत्रें महितलीं । पडुनिया शुष्क झालीं । त्रिसहस्त्र वर्षें कंठिलीं । भक्षून तीं ॥९५॥ पुढें तिनें केला मग । शुष्क पर्णांचाहि त्याग । तैंपासून म्हणे जग । 'अपर्णा' तिज ॥९६॥ तपानें तनु रोडली । ऐशी उमा विलोकिली । गगनीं गंभीर झाली । देववाणी ॥९७॥ "जो निज मनीं चिंतिला । तो हेतु सफल झाला । श्रवण करीं या बोला । गिरिकन्यके! ॥९८॥ भोगिसी दुःसह क्लेश । ते सोडून दे निःशेष । आतां भेटतील महेश । त्रिपुरांतक ॥९९॥ तप खडतर या रीतीं । केले कुणींहि न पार्वती! । अनेक ज्ञाते धीरमति । झाले मुनि ॥१००॥ आतां ब्रह्म-प्रसादवाणी । सत्य, विशुद्ध जाणुनी । ठेव हृदयीं धरुनी । सदोदित ॥१०१॥ बोलवावयाकरितां । येईल जेव्हां तव पिता । तैं हट्ट सोडून परता । घरीं जा तूं ॥१०२॥ जेव्हां भेटतील

घेऊन । सप्तर्षि तुजलागून । तेव्हां जाण ही प्रमाण । देव-वाणी" ॥१०३॥ ब्रह्मवाणी नभोगता । यापरी श्रवण करितां । गिरिकन्या रोमांचिता । आनंदली ॥१०४॥ पार्वती-चरित्र सुंदर । मीं वर्णिलें येथवर । ऐका चरित्र मनोहर । शंकराचें ॥१०५॥ जेव्हां सतीनें जाऊन । देह केला विसर्जन । तें पासून शिव-मन । विरक्त झालें ॥१०६॥ श्रीरामाच्या नामाप्रति । जपे सदोदित चित्तीं । ऐके श्रीरामाची कीर्ति । जेथें तेथें ॥१०७॥ श्री भगवान् शंकर । चिदानंद सुखागार । मोह, मद, काम दूर । ज्यापासुनी ॥१०८॥ संचार करी भूवरी । हृदयीं धरून श्रीहरि । सर्वलोक-सुखकारी । रामचंद्र ॥१०९॥ कोठें जाऊन मुनीस । करीतसे ज्ञानोपदेश । राघवाच्या सत्कथेंस । वर्णी कोठें ॥११०॥ जरी स्वयें कामरहित । तरीहि शिव भगवंत । भक्त-विरहें दुःखित । सर्वज्ञ तो ॥१११॥ बहुकाल ऐशा रीतीं । उलटून गेल्यावरती । नित्य नवी उपजे प्रीति । श्रीराम-पदीं ॥११२॥ शंकराचे व्रतनेम । तैसे विलोकुन प्रेम । निश्चल भक्ति निस्सीम, । हृदयांतरीं– ॥११३॥ प्रगटला रघुनंदन । कृतज्ञ कृपायतन । रूपशीलाचें निधान । तेजस्वी महा ॥११४॥ बहु प्रकारें करून । प्रशंसी शिवालागून । "तुजविण करील कोण । ऐसें व्रत" ॥११५॥ नानापरीं रघुपति । समजावी शिवाप्रति । जन्मा आलीसे पार्वती । निवेदी हें ॥११६॥ गिरिजेचें तप घोर । वर्तन अति पवित्र । सविस्तर कृपासागर । वर्णीतसे ॥११७॥ प्रभु म्हणे, 'शिवा! संप्रति । माझी ऐकावी विनंति । जरी का असेल प्रीति । माझ्यावरी ॥११८॥ तरी येथूनिया जावें । पार्वतीलागीं वरावें । हें मागतों तें द्यावें । मजप्रति ॥११९॥ शिव म्हणे तैं, "यापरी । करणें योग्य नाहीं जरी । स्वामीची आज्ञाहि

परि । अनुल्लंघनीय ॥१२०॥ शिरीं तुझ्या आज्ञेप्रत । धरून वागावें तद्वत् । परमधर्म हे नाथ! । आमुचा हा ॥१२१॥ मातापिता, गुरुजन । तैसें स्वामीचें वचन । पाळावें विचारेंविण । जाणून शुभ ॥१२२॥ सर्वतोपरी तूं स्वतां । अससी अति हितकर्ता । म्हणून अनुज्ञा माथां । वंद्य आम्हां" ॥१२३॥ प्रभु जाहला प्रसन्न । ऐकून शिवाचें वचन । भक्तिज्ञानें परिपूर्ण । धर्मयुक्त ॥१२४॥ प्रभु म्हणे, "हे शंकरा! । पण आपुला करी पुरा । आजपासून मद्गिरा । हृदयीं धरीं" ॥१२५॥ ऐसें बोलून भगवान् । पावलासे अंतर्धान । शिवें धरिलें तेंचि ध्यान । हृदयांतरीं ॥१२६॥ त्याच समयीं सप्तर्षि । येते झाले शिवापाशीं । बोले शंकर तयासी । योग्य गिरा ॥१२७॥ "ऋषिवर्य! तुम्ही बरवे । पार्वतीसन्निध जावें । आणि परीक्षून घ्यावें । प्रेम तिचें ॥१२८॥ हिमालयासी सांगुनी । तिज पाठवावें सदनीं । संदेह जो का तन्मनीं । करावा दूर" ॥१२९॥ (ऐसे सांगतां ऋषिवर्यां । निघाले ते तेथूनिया । गौरीची परीक्षा घ्याया । प्राप्त झाले ॥१३०॥) ऋषींनीं त्या तपोवनीं । कैसीं देखिली भवानी । मूर्तिमती ये दिसुनी । तपस्याच ॥१३१॥ ऋषि तिजलागीं पुसती । "ऐक ऐक गे पार्वती! । किमर्थ घोर तपाप्रति । करित्येंस तूं ॥१३२॥ करिसी कुणाची आराधना । काय धरिलीस वासना । कां आम्हांस सांगसी ना सत्य मर्म" ॥१३३॥ ऋषींच्या प्रश्नालागुनी । श्रवण करून भवानी । गूढ मनोहर वाणी । बोललीसे ॥१३४॥ "मर्म कराया कथन । संकोच धरी मन्मन । माझी मूर्खता ऐकून । हंसाल तुम्हीं १३५॥ मन घेटलें हट्टास । नायके परोपदेश । इच्छी भित बांधायास । पाण्या-

वरी ।।१३६।। नारदें जें जें कथिलें । तें एक सत्य मानिलें । पंखाविण मीं इच्छिलें । उडावया ।।१३७।। मुनिहो! करा विलोकन । माझें केवढें अज्ञान । सदा इच्छितें मन्मन । भ्रतार शिवा" ।।१३८।। ऐकूनिया तिचें वचन । हांसले ते ऋषिजन । म्हणती "पर्वतापासून । जन्म तुझा ।।१३९।। नारदाच्या बोधाप्रत । ऐकून वागतां तद्वत् । कोण नांदेल गृहांत । सांग बरें ।।१४०।। जाऊन दक्षसुतांस । नारदें केला उपदेश । त्यांनीं परतून गृहास । पाहिलें ना ।।१४१।। (पुत्र उत्पन्न करून । दक्षें दिलें अनुशासन । सकल सृष्टीचें सृजन । करावया ।।१४२।। ते सर्वहि दक्षसुत । तपार्थ गेले वनांत । तों भेटले तयांप्रत । नारदमुनि ।।१४३।। तेणें त्यां उपदेशिलें । सर्वहि विरक्त झाले । पुन्हां परत न आले । स्वगृहासी ।।१४४।।) चित्रकेतूचें घर भलें । ऐसेंच पालथें घातलें । हिरण्यकश्यपूचें केलें । दैन्य तैसें ।।१४५।। (चित्रकेतु राजाप्रति । स्त्रिया होत्या कोटिगणती । परि त्या पुत्रसंतति । नव्हती मुळीं ।।१४६।। कांहीं काळा नंतर । धाकटच्या स्त्रीस सुकुमार । झाला असे एक पुत्र । एकुलता ।।१४७।। त्या एकुलत्या पुत्रावरी । भूपतीचें प्रेम भारी । जडलें त्या अवसरीं । नैसर्गिक ।।१४८।। राजस्त्रिया ज्या इतर । त्यांना वाटला मत्सर । त्यांनीं मारिला कुमार । देऊन विष ।।१४९।। मुलाचें घेऊन प्रेत । राजा झाला शोकग्रस्त । येते झाले तितुक्यांत । नारदमुनि ।।१५०।। त्यांनीं ज्ञानोपदेश केला । भूपति विरक्त झाला । तपोवनाप्रति गेला । आला न पुन्हां ।।१५१।। हिरण्यकश्यपूची कांता । गर्भवती ती असतां । उपदेशिली पतिव्रता । नारदांनीं ।।१५२।। तो बोध गर्भें ऐकिला । तोच पुढें प्रह्लाद झाला । तिचे पोटीं जन्मा आला ।

भक्तश्रेष्ठ ॥१५३॥ त्याच प्रह्लादाकारणें । छळितां त्याच्या पित्यानें । नृसिंहरूपें विष्णूनें । वधिलें तया ॥१५४॥) नारदाचा उपदेश । जे ऐकती स्त्री-पुरुष । घर सोडून भिकेस । लागती ते ॥१५५॥ नारदाचें कपटी मन । वेषें दिसाया सज्जन । करूं इच्छी स्वसमान । सर्वांसहि ॥१५६॥ ऐकून तद्वचनास । मानून मनीं विश्वास । इच्छिसी पति उदास । स्वभावें जो ॥१५७॥ जो निर्गुण लज्जाहीन । मलिन वेष करी धारण । फिरे हातांत घेऊन । नरकपाल ॥१२८॥ जो केवल कुलहीन । घर नसे त्या-लागून । जो करी सर्प धारण । दिगंबर ॥१५९॥ पावून ऐशा वरातें । सुख मिळें काय तूतें । ठकाच्या भुलथापांतें । ठकलीस बरी ॥१६०॥ लोकाग्रहास्तव भलें । शिवें सतीस परणिलें । पुन्हां तिजला मारविलें । त्यागून तिज ॥१६१॥ आतां शिव दुःखी नसे । सुखानें निद्रा घेतसे । भीक मागुनी खातसे । जीवनार्थ ॥१६२॥ मुळीं एकाकी यापरी । ऐशा फटिंगाच्या घरीं । स्त्री असणें कधीं तरी । खपेल का? ॥१६३॥ अजुनी सांगतों स्पष्ट । ऐक आमुचीच गोष्ट । त्वदर्थ योजिला उत्कृष्ट । वर आम्हीं ॥१६४॥ तो अतिशय सुंदर । शुद्ध, सुशील, सुख-कर । ज्याची गाती वेद चार । यशोलीला ॥१६५॥ दोष नसेचि जयासी । सर्व गुणांचा जो राशि । जो वैकुंठनिवासी । लक्ष्मीपति ॥१७६॥ ऐशा वरातें आणुनी । भेटवूं तुजलागुनी"। ऐकतां हांसुनी भवानी । काय म्हणें ॥१६७॥ "गिरिपासून देह झाला । हें सत्य तुम्ही बोललां । देह सुटे तरीहि भला । हट्ट न सुटे ॥१६८॥ जैसें पाषाणापासून । उत्पन्न होय सुवर्ण । जाळि-तांहि स्वभावगुण । न सोडी तें ॥१६९॥ नारदाचें अनुशासन । मी कदापि नुल्लंघीन । नांदो अथवा बुडो सदन । न भीच

मी ॥१७०॥ गुरूच्या वचनावरती । विश्वास नसे ज्याप्रति । सहज सुखाची प्राप्ति । स्वप्नीं न त्या ॥१७१॥ अवगुणांचें आगर । जरी असती शंकर । सर्व गुणांचें मंदिर । विष्णुहि जरी ॥१७२॥ परि ज्याचें अंतःकरण । ज्याशीं झालें रममाण । त्याशींच निश्चयेंकरून । काम त्याचें ॥१७३॥ जरी तुम्ही प्रथमतां । मुनींद्रहो ! मज भेटतां । युष्मद्‌बोध केला असतां । शिरसा मान्य ॥१७४॥ आतां मी निज जीवन । केलें असे शिवार्पण । विचारील दोष–गुण । कोण मग ॥१७५॥ तुमच्या हृदयांतरीं । आग्रहचि असेल भारी । सोयरिकीविण जरी । न राहवें ॥१७६॥ उठाठेव करणारांस । नसे मुळींच आळस । कन्या–वरहि बहुवस । जगामाजीं ॥१७७॥ कोटच्यवधि जन्मवरी । माझी प्रतिज्ञा यापरी । शिवास वरीन, न तरी । राहीन तशी ॥१७८॥ परि नारदोपदेश । त्यजणार नाहीं लेश । स्वयें शतदां महेश । सांगतील जरी" ॥१७९॥ जगदंबा म्हणे ऋषींतें । "मी तुमच्या पायां पडतें । विलंब झाला स्वाश्रमातें । जाया तुम्हां" ॥१८०॥ ऐसा तत्प्रेमा पाहुनी । बोलती तैं मुनि ज्ञानी । "असो जगदंबे भवानी । जयजयकार ॥१८१॥ मायाच तूं स्वयमेव । प्रत्यक्ष भगवान् शिव । आम्हां मायबाप सर्व । विश्वाचेहि" ॥१८२॥ पदीं नमवुनी शिर । निघाले ते मुनीश्वर । मोदें गात्रें वारंवार । रोमांचित ॥१८३॥ मुनीश्वरांनीं जाउनी । हिमालया दिलें धाडुनी । आणविलें कन्येलागुनी । विनवून गृहीं ॥१८४॥ तदनंतर सप्तर्षि । पातले शंकरापाशीं । पार्वतीची कथा सरशीं । निवेदिती ॥१८५॥ तिचा प्रेमा परिसून । शिव होतसे तल्लीन । सप्तर्षि ते आनंदून । गेले गृहा ॥१८६॥ मग ज्ञानी श्रीशंकर । चित्त करून सुस्थिर । ध्यानीं होतसे तत्पर ।

राघवाच्या ।।१८७।। (सोपानींचा मार्ग भला । जरी अति दीर्घ वाटला । तदर्थ पांचवा योजिला । विश्राम हा ।।१८८।। परम भाविक श्रोत्यांस । विनवीतसे देवीदास । माझ्या बोबड्या बोलांस । मान्य करा ।।१८९।।)

—०-०—

## विश्राम ६ वा

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्यो नमः
श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः

तारक नामें राक्षस । झाला त्याच समयास । भुजप्रतापें विशेष । तेजोबलें ।।१।। लोक आणि लोकपाल । त्यानें जिंकिले सकल । मुकलें तें सुरकुल । सौख्य-धना ।।२।। तो असुर अजरामर । न जिंकवें क्षणभर । नाना युद्धें करून सुर । त्रस्त झाले ।।३।। तेव्हां ब्रह्मापाशीं पातले । गाऱ्हाणें सांगूं लागले । विधीनें दुःखी देखिले । सर्व देव ।।४।। सर्वांसी समजावून । सांगे तें चतुरानन । तारकासुराचें मरण । होय जेणें ।।५।। "शिवाच्या वीर्यापासून । पुत्र होय जो उत्पन्न । तोचि जिंकी त्यालागून । रणांगणी" ।।६।। ऐका माझा मनोदय । तोचि करा हो उपाय । ईश्वरसाहाय्यें कार्य । सिद्ध होय ।।७।। सतीनें दक्ष-यागांत । विसर्जिलें देहाप्रत । जाऊन हिमाद्रि-गृहांत । जन्मली ती ।।८।। शिवचि प्राप्त व्हावा पति । ही इच्छा धरून चित्तीं । करिती झाली पार्वती । तपश्चर्या ।।९।। परि शिव भवबाम् । सर्व संगांतें

त्यागून । स्वस्थ बैसला लावून । समाधीतें ॥१०॥ जरी असेल अत्यंत । दिसावया अनुचित । तरी माझें एक मत । श्रवण करा ॥११॥ तुम्ही आधीं कामदेवा । शंकराकडे पाठवा । शिव-मनाचा करावा । क्षोभ तयें ॥१२॥ तदुपरी आम्ही जाऊं । शिवासी मस्तक नमवूं । विवाह कराया लावूं । आग्रहानें ॥१३॥ एणें प्रकारें निश्चित । होईल देवांचें हित" । 'हेंचि अति योग्य मत' । म्हणती सर्व ॥१४॥ हाच करून विचार । देवांनीं स्तवितां फार । काम पंचबाणधर । प्रकटलासे ॥१५॥ देव आपुली विपत्ति । यथासांग निवेदिती । ऐकूनिया रतिपति । विचार करी ॥१६॥ 'शिवासी राहून विषम । नव्हें माझें मुळीं क्षेम' । किंचित् हांसून काम । ऐसें म्हणे ॥१६॥ "तथापि तुमचें काम । करीन निश्चयें ठाम । 'उपकार-धर्म परम' । वेद म्हणे ॥१७॥ व्हावयासी परहित । त्यजी जो स्वदेहाप्रत । त्या प्रशंसिती संत । निरंतर ॥१९॥ ऐशा करून पणास । निघे वंदून सर्वांस । घेऊन सुमचापास । साहच सवें ॥२०॥ क्रमूं जातां मार्गाप्रत । काम विचारी मनांत । शिवविरोधें निश्चित । मरण माझें ॥२१॥ मग आपुला प्रभाव । पसरीतसे कामदेव । करी निजांकित सर्व । विश्वाप्रति ॥२२॥ जेधवां मीनकेतन । झालासे क्रोधायमान । वेदमर्यादा लोपून । क्षणांत जाय ॥२३॥ मुख्य ब्रह्मचर्यव्रत । संयम तैसे बहुत । धैर्य, ज्ञान, धर्ममत । विज्ञानहि- ॥२४॥ (मैथुन जें अष्टविध । त्या सर्वांचा प्रतिबंध । तेंचि म्हणावें विशुद्ध । ब्रह्मचर्य ॥२५॥ दृष्टीं सौंदर्य पहावें । पुनः पुन्हां न्याहाळावें । नेत्रकटाक्ष भिडवावें । दर्शन तें ॥२६॥ देतां घेतां वस्तूलागून । अंग अंगा संयोजन, । हस्तांदोलन, आलिंगन, । स्पर्शन तें ॥२७॥ एकत्र बसावें, उठावें । एकत्र फिराया जावें ।

एकत्र हंसावें, खेळावें । क्रीडन तें ॥२८॥ एकमेकांसी बोलावें स्वहृद्गत सुचवावें । पर्यायेंचि जाणावें । रहस्य तें ॥२९॥ त्यांत मिळतां एकांत । व्यक्त व्हावें मनोगत। गुप्त भाषण साक्षात् । निःसंकोच ॥३०॥ उपभोगाची वासना । दृढतर जडावी मना । संचरे कामकल्पना । संकल्प तो ॥३१॥ सौंदर्य नसतां सामोरीं । चिंतन घडे अभ्यंतरीं । अध्यवसाय दिनरात्रीं । तोचि जाणा ॥३२॥ मनोगतांचा संयोग । होऊन घडे संभोग । क्रियानिवृत्तीचें अंग । आठवें हें ॥३३॥) सदाचार आणि जप । योग-वैराग्य-प्रताप । विवेक-सेना सकंप । सर्वहि पळे ॥३४॥ सैन्यासहवर्तमान । विवेक करी पलायन । येतां काम-वीरगण । रणांगणीं ॥३५॥ ज्ञानदाते ते सद्ग्रंथ । जाऊन गिरिकंदरांत । त्या समयीं झाले गुप्त । लुप्त तसे ॥३६॥ यापुढें काय होईल । आम्हांस कोण रक्षील । ऐसी उडाली धांदल । बिश्वांतरीं ॥३७॥ दोन मस्तकांचा वीर । कोण ऐसा पृथ्वीवर । ज्यास्तव कोपें धनुःशर । काम धरी ॥३८॥ जे सजीव चराचर । जगीं असती सानथोर । कोणी नारी किंवा नर । ऐशा नामें— ॥३९॥ ते ते सर्व स्त्रीपुरुष । आपापल्या मर्यादेस । सोडूनिया झाले वश । कामाप्रत ॥४०॥ सर्वांच्याहि हृदयांत । कामेच्छा जाहली व्याप्त । वृक्ष लवविती शाखांप्रत । पाहून लता ॥४१॥ सरिता त्या उचंबळती । सिंधूकडें धांव घेती । परस्पर मिळून जाती । तलावतळीं ॥४२॥ जेथें या जड जीवांची । ऐशी दशा झाली साची । तेथें स्थिति सजीवांची । कोण वर्णी ? ॥४३॥ पशु-पक्षी सान थोर । खेचर, भूचर, जलचर । काल विसरून कामातुर । सर्व झाले ॥४४॥ (मानवेतर जे प्राणी । असती नैसर्गिक बंधनीं । सेविती विषयालागुनी । कालानुसार ॥४५॥ नियमें षड्ऋतूंतून । त्यांचें होय

प्रजासृजन । तेंहि न राहिले बंधन । क्षणमात्रहि ॥४६॥ ) मदांध आणि व्याकुल । कामें केलें विश्व सकल । चक्रवाकां नुरे तिल । दिनरात्र-भेद ॥४७॥ (दिवसां चक्रवाक-युग्म । परस्पर पावे संगम । परि तो मोडला नियम । नैसर्गिक ॥४८॥ ) देव, दैत्य, नारीनर । त्यापरी सर्प किन्नर । प्रेत, पिशाच, भूतमात्र । वेताळहि ॥४९॥ यांची जी अवस्था झाली । ती मी नसेचि वर्णिली । कामवश सर्वकालीं । जाणून त्यां ॥५०॥ सिद्ध, विरक्त म्हणितले । महामुनि योगी भले । तेहि कामवशें झाले । योगभ्रष्ट ॥५१॥ योगींद्र तपस्वी स्वतां । कामवश बघतां बघतां । तेथें मग कोण कथा । पामरांची ॥५२॥ चराचर विश्वाप्रति । नारीमय विलोकिती । जे का सर्वदा पाहती । ब्रह्ममय ॥५३॥ अबलांचा समुदाय । जगा पाही पुरुषमय । पुरुषहि अबलामय । विलोकिती ॥५४॥ ऐसा दोन घटकाभर । कामकृत चमत्कार । व्यापलासे चराचर । ब्रह्मांडांत ॥५५॥। तेव्हां कोणासहि धीर । नुरलासे क्षणभर । मदनें हरिलें अंतर । सर्वांचेंहि ॥५६॥ केवळ जे उपासक । ज्यांसी रक्षी रघुनायक । त्या समयीं तेचि एक । राहिले शांत ॥५७॥ ( ज्ञान, कर्म, औपासन । प्रभु-प्राप्तीचें साधन । तयांचें येथें वर्णन । विवंचिलें ॥५८॥ ज्ञान-सदसद्विवेक । सवें घेऊन साहाय्यक । पळाले म्हणून निःशंक । निवदिलें ॥५९॥ कर्मयोग जेणें घडे । सद्ग्रंथ तेहि बापुडे । लुप्त झाले एकीकडे । निवेदिलें ॥६०॥ उरलें तें औपासन । योगत्रयींचें साधन । त्यास श्रीरघुनंदन । रक्षीतसे ॥६१॥ ) दोन घटकांपर्यंत । ऐसी झाली वाताहात । जोंवरी काम पोंचत । शिवसन्निध ॥६२॥ बिलोकितां शंकराला । कामदेव चपापला । तैं पूर्ववत् शांत

झाला । विश्वगोल ॥६३॥ जगांतील जीव समस्त । सुखी जाहले त्वरित । मद उतरतां शांत । मदांध जणुं ॥६४॥ विलोकितां शिवाप्रत । काम झाला भयभीत । भगवान् दुर्गम दुरापास्त । दुराधर्ष ॥६५॥ आले तैसें परत जावें । लज्जा वाटे ती न सांगवें । स्वमृत्यु जाणून जीवें । उपाय योजी ॥६६॥ वसंतऋतु सुंदर । प्रकट केला शीघ्रतर । नवपुष्पान्वित मनोहर । वृक्षश्रेणी ॥६७॥ वनोपवनें, सरोवर । वापिकांनीं सभोंवार । शोभती अति सुंदर । दिक्प्रान्त ॥६८॥ त्या समयीं ज्या त्या स्थानीं । प्रेम आलें उचंबळुनी । पाहून मुमुर्षूचें मनीं । उपजे काम ॥६९॥ मरणोन्मुखाच्या अंतरीं । कामोद्भव तदवसरीं । वनश्रीची शोभा सारी । अवर्णनीय ॥७०॥ शीतल तैसा सुगंधित । वाहे अति मंद वात । कामाग्नीचा जो प्रख्यात । मित्र खरा ॥७१॥ विकसित झाल्या सरोवरीं । नाना कमलांच्या हारी । मधुर गुंजती ज्यांवरी । भृंगश्रेणी ॥७२॥ हंस–पिक–शुक–तति । मधुर आलाप काढिती । तेंवि नृत्य–गान करिती । अप्सराहि ॥७३॥ कलाकौशल्य समस्त । कोटयवधि करून तेथ । हरला सैन्यासमवेत । कामदेव ॥७४॥ शिवसमाधि निश्चल । जें ढळली नाहीं तिल । काम झाला कोपाकुल । हृदयांतरीं ॥७५॥ आम्रवृक्षाची सुंदर । शाखा पाहून समोर । काम चढला तीवर । क्रुद्ध मनें ॥७६॥ पुष्प–धनुष्य आपुलें । कामें आकर्ण ताणिलें । त्यावरी बाण योजिले । अतिकोपें ॥७७॥ (धनुष्य मूळ पुष्पांचें । त्यावरी जे योजायाचे । त्या पांचहि बाणांचें । स्वरूप हें ॥७८॥ कमल जें का आरक्त । अशोक, आम्रमंजिरीयुत । नवमल्लिका समवेत । नील पद्म ॥७९॥ ) विषम बाण सोडिले । जाऊन

हृदया भिडले । समाधि–भंगें केलें । जागृत शिवा ॥८०॥ तें महेशाच्या चित्तीं । क्षोभ जाहलासे अति । नेत्र उघडून भोंवतीं । अवलोकी ॥८१॥ आम्रपल्लवा आड लपला । शिवें काम विलोकिला । क्रोध येतां त्रैलोक्याला । कंप सुटे ॥८२॥ तेव्हां शिव भगवान् । उघडी तृतीय नयन । बघतां जळून मदन । भस्म झाला ॥८३॥ त्यायोगानें जगभर । झाला भारी हाहाःकार । भ्याले सुर, असुर । हृष्ट झाले ॥८४॥ (तारकासुराचा अंत । पूर्ण व्हाया मनोगत । योजीतसे सुरयूथ । कामदेवा– ॥८५॥ ऐसा साहाय्यक काम । जाऊन जाहला भस्म । दैत्य देतील निस्सीम । ताप आतां ॥८६॥ भस्म झाला मनोरथ । म्हणूम देव समस्त । झाले फार भयभीत । निजांतरीं ॥८७॥ देवांचें अयशस्वी काम । गेला काम, झाला भस्म । म्हणून आनंद परम । दैत्यांप्रति ॥८८॥) विषयी जन कामसुख । स्मरून करिती शोक । जाहले योगी, साधक । निष्कंटक ॥८९॥ निर्भय झाले योगीजन । ऐकून पतिनिधन । रति मूर्छित होऊन । पडे तदा ॥९०॥ रडे, करी आक्रंदना, । पति–प्रताप वर्णना । गेली भाकीत करुणा । शिवसन्निध ॥९१॥ अतिशयें प्रेमभरें । विनवी बहु प्रकारें । कर जोडून सामोरे । उभी राही ॥९२॥ कृपाळु, शीघ्रसंतोषी । शिवप्रभु व्योमकेशी । अबला जाणून तिशीं । उचित वदे ॥९३॥ "ऐक ऐक गे हे रति! । आजपासून तुझा पति । अनंग नामें जगतीं । राहील कीं ॥९४॥ अंग नाहीं तो अनंग । तथापि नसतां अंग । सर्वांचेंहि अंतरंग । व्यापील हा" ॥९५॥ (मग अनंगाचें मीलन । होय कैसें मजलागून । ऐसें वाटल्या समाधान । करी शिव ॥९६॥) "तुझें पतीशीं मीलन । येईल केव्हां

घडून। तोहि प्रसंग श्रवण। करी रति ॥९७॥ जैं यदुवंशीं साचार। कृष्ण घेऊन अवतार। पृथ्वीचा महान् भार। उतरील ॥९८॥ त्या समयीं होय रति। कृष्णपुत्र तुझा पति। अन्यथा ही अभयोक्ति। होणार नाहीं" ॥९९॥ ऐसें शिवाचें वचन। ऐकून रति करी गमन। आतां करितों वर्णन। दुसरी कथा ॥१००॥ हें सर्वहि वर्तमान। कळतां देवांलागून। ब्रह्मादि करिती गमन। वैकुंठातें ॥१०१॥ ब्रह्मा-विष्णुसमवेत। देव मिळून समस्त। जाते झाले, कृपावंत। जेथें शिव ॥१०२॥ पृथक् पृथक् तयांनीं। स्तविला श्रीशूलपाणि। प्रसन्न झाला तत्क्षणीं। चंद्रमौली ॥१०३॥ तेव्हां तो कृपासागर। बोले शिवशंकर। सांगा आलां सुरवर!। किं निमित्त? ॥१०४॥ तेव्हां धाता म्हणे, "तुम्ही। आहां प्रभो! अंतर्यामी। तथापि भक्तिवश स्वामी। विनति असे ॥१०५॥ सर्व देवांच्या मानसीं। श्रीशंकरा व्योमकेशी। उद्भवली असे ऐसी। लालसा ही ॥१०६॥ डोळे भरूनिया सर्व। पाहूं इच्छिती हे देव!। तुमचा विवाहोत्सव। विश्वनाथा! ॥१०७॥ हे मदन-मदमोचक!। उपाय तो करा एक। पाहूं उत्सव सकळिक। डोळे भरून ॥१०८॥ काम जाळून रतीतें। दिलें अभयवरातें। कृपासागरें केलें तें। बहु चांगलें ॥१०९॥ आधीं करून शासन। मग द्यावें कृपादान। सहज स्वभावगुण। समर्थांचा ॥११०॥ पार्वतीनें आजवर। तप केलेंसे अपार। आतां तिचा अंगिकार। करा नाथा!" ॥१११॥ धात्याचें वच ऐकुनी। हरि-वाणी आठवुनी। 'तथास्तु' म्हणे शूलपाणि। प्रसन्न मनें ॥११२॥ सुरवरांनीं त्या कालीं। मोदें दुंदुभी वाजविली। जयजयकारें केली। पुष्पवृष्टि ॥११३॥ जाणून उचितावसर। आले सप्त ऋषीश्वर। धाता पाठवी

सत्वर । हिमालय–गृहीं ।।११४।। ज्या स्थलीं होती पार्वती । आधी ऋषि तेथें जाती । मधुर वचन बोलती । कपटयुक्त ।।११५।। "तेव्हां आम्हीं सांगितलें । तें त्वां मुळीं न मानिलें । उपदेशा मान्य केलें । नारदाच्या ।।११६।। तुझा पण मात्र आतां । खोटा ठरणार तत्त्वतां । कां की जाळिलें मन्मथा । महेशानें ।।११७।। ऋषींचें वाक्य ऐकुनी । हांसून बोले भवानी । "योग्य बोलला विज्ञानी । मुनीश्वर हो ! ।।११८।। तुमच्या मतें शंकरांनीं । काम जाळिला या क्षणीं । सविकार का शूलपाणी । आजवरी ? ।।११९।। माझ्या मतानें श्रीशिव । योगीच असती सदैव । अज, अनवद्य, स्वयमेव । कामभोगशून्य ।।१२०।। ऐसें जाणून मी जर । सेविला असेल शंकर । कर्मप्रेमपुरस्सर । वाङ्मनेंहि– ।।१२१।। तरी ऐकाहो ! मुनीश । मी केलेल्या प्रतिज्ञेस । सत्य करितील महेश । कृपानिधि ।।१२२।। तुम्ही जें कांहीं सांगतां । शिवें जाळिलें मन्मथा । तुमचें अज्ञान तत्त्वतां । फार मोठें ।।१२३।। अहो अग्नीचा स्वयमेव । ठरलेला हा स्वभाव । शैत्य जाणेंचि असंभव । तत्समीप ।।१२४।। गेलें जरी निकटतर । अवश्य नष्ट होणार । काम–शंकराचा प्रकार । ऐसाचि हा" १२५।। ऐसें वचन ऐकुनी । चित्तीं हर्षले ते मुनि । प्रीति, विश्वास पाहुनी । पार्वतीचा ।।१२६ वंदूनिया तिजप्रति । सप्तर्षि तेथून निघती । हिमाद्रिनिकटवर्ती । जाते झाले ।।१२७।। जें कांहीं घडून आलें । हिमालया निवेदिलें । काममृत्यु ऐकून झालें । दुःख अति ।।१२८।। परि रतीचें वरदान । पुन्हां केलें निवेदन । आनंदला तें ऐकून । हिमवंत तो ।।१२९।। शंकराची महत्तता । विचारूनि निज चित्ता । सादर होय बोलावितां । मुनिवरांतें ।।१३०।। शुभदिन, शुभ नक्षत्र । पाहून घटिका

सुंदर । केला वेदविध्यनुसार । लग्न–निश्चित ॥१३१॥ मग लग्नपत्रिका ती । दिधली सप्तर्षींप्रति । पाय धरून विनंति । हिमाद्रि करी ॥१३२॥ ऋषींनीं दिली त्वरित । ती पत्रिका धात्याप्रत । वाचितां प्रेम हृदयांत । न समावें ॥१३३॥ पत्रिका वाचून धाता । झाला सर्वां ऐकविता । ऐकतां हर्ष समस्तां । सुरगणांसी ॥१३४॥ सुमनवृष्टि आकाशीं । वाद्येंहि वाजती तैसीं । शुभकलश दाहीदिशीं । सजविले तैं ॥१३५॥ तेव्हां सर्व सुरगणें । आपापलीं सुवाहनें । नानाविध तीं विमानें । सज्ज केलीं ॥१३६॥ मंगलकारक पूर्ण । होती तैं शुभशकुन । करूं लागल्या गायन । अप्सराहि ॥१३७॥ इकडे शिवगण-संभार । करी शिवाचा शृंगार । तो विचित्र प्रकार । श्रवण करा ॥१३८॥ मस्तकींचा जटाजूट । त्याचाचि केला मुकुट । मयुरपिच्छ चोखट । सर्पाचेंच ॥१३९॥ कुंडलें तींहि श्रवणीं । कंकणेंहि हातांतुनी । घातलीं शिवालागुनी । सर्पांचींच ॥१४०॥ सर्वहि अंगालागून । केलें भस्माचें लेपन । व्याघ्रचर्माचें वसन । पांघराया ॥१४१॥ भाळीं सुंदर आगळा । रेखिला चंद्राचा टिळा । मस्तकीं गंगा सोज्ज्वळा । शोभतसे ॥१४२॥ ललाटीं वन्हिसमान । धरूनि या नेत्र तीन । यज्ञोपवीत भूषण । भुजंगाचें ॥१४३॥ कंठिकें धरिलें गरला । हृदयीं नृमुंडमाला । वेष अशिव कृपाला । कल्याणधामा ॥१४४॥ त्रिशूल, डमरू मिळून । हातीं विराजती दोन । निघे नंदीवरी बसून । वाजतीं वाद्यें ॥१४५॥ पाहूनिया शिवाप्रति । देवललना हांसती । वरायोग्य नाहीं म्हणती । वधू जगीं ॥१४६॥ विष्णु आणि पद्मासन । इत्यादिक देवगण । स्ववाहनीं आरोढून । वरात चाले ॥१४७॥ देवगण सर्वतोपरी । अप्रतिम होता जरी ।

वरात नव्हती परि । वरानुरूप ॥१४८॥ तेव्हां विष्णु भगवान् । हांसून बोले वचन । सर्व दिक्पालांलागून । पाचारुनी ॥१४९॥ “पृथक् पृथक् होऊन । चालूं लागा सर्वजण । सवें समाज घेऊन । आपापला ॥१५०॥ वरास साजेल ऐसी । वरात कांहीं नसे तशी । जाऊन परगांवासी । होईल हंसें” ॥१५१॥ ऐकून विष्णूचें वचन । हंसते झाले सुरगण । सेनेसहवर्तमान । पृथक् झाले ॥१५२॥ तें मनांतल्या मनांत । हांसतसे भोलानाथ । हरीचा विनोद किंचित् । जाणार नाहीं ॥१५३॥ (व्यंग्य वाक्य निश्चयात्मक । मूळ चमत्कृतिजनक । बोले वैकुंठनायक । उलट जे का ॥१५४॥ भगवंताचा विचार । वरातीयोग्य नसे वर । परि बोले चमत्कृतिपर । उलट ऐसें ॥१५५॥ तें चातुर्य श्रीहरीचें । शिवें ओळखिलें साचें । म्हणून व्यंग्य वचनाचें कौतुक गमें ॥१५६॥) श्रीहरीचें तें वचन । अति प्रियकर ऐकून । बाहिला भृंगी पाठवून । गण सर्व ॥१५७॥ शिवाचें अनुशासन । ऐकून आले सर्व-गण । वंदिती शिर नमवून । शिव-पदाब्जीं ॥१५८॥ नानापरींचीं वाहनें । नटतीं विविध वेषानें । बघून स्वगणाकारणें । हांसे शिव ॥१५९॥ कुणास नाहींच मुख । कुणासी मुखें अनेक । कुणी करपादविन्मुख । बहुपद-बाहू ॥१६०॥ कुणासी अनेक डोळे । कोणी केवळ आंधळे । धष्टपुष्ट कुणी, दुबळे । अतिशय ॥१६१॥ कोणी ते अति दुर्बळ । कित्येक लठ्ठ प्रबळ । वेष कुणाचे मंगळ । अमंगळ तसे ॥१६२॥ कुणा भूषण मुंडमाळ । कुणा हातीं नरकपाळ । सर्वांग रक्तबंबाळ । कुणाचें तें ॥१६३॥ गर्दभमुखी, श्वानमुखी । सूकर-जंबूक मुखी । गण-वेष-संख्या नेमकी । कोण सांगे ॥१६४॥ नाना प्रकारचीं प्रेतें । योगी-पिशाच बहुतें । ज्यांच्या वर्णणें भेदांतें । शक्य नव्हे ॥१६५॥ कोणी

थयथया नाचती । कोणी ते गीतास गाती । फारचि लहरी असतीं । भूतें सर्व ॥१६६॥ पाहूं जातां भूतांप्रति । भयंकर ते दिसतीं । विचित्र प्रकारें बोलतीं । वचनें तशीं ॥१६७॥ वर सजलासे ज्यापरी । वरात शोभे त्यापरी । मार्गीं जातां नानापरी । कौतुक होय ॥१६८॥ इकडे हिमालय भला । मंडप रचिता झाला । अति विचित्र वर्णिला । न वचे मुळीं ॥१६९॥ जितुके म्हणून पर्वत । असती साऱ्या जगांत । सानथोर जयांप्रत । न वर्णवें ॥१७०॥ वनोपवनें, सागर । नद, सरिता, कासार । सर्वां धाडी हिमकर । आमंत्रणें ॥१७१॥ आपुल्या इच्छेनुसार । वेष धरून मनोहर । समाज-स्त्रिया सुंदर । समागमें ॥१७२॥ हिमाद्रीच्या गृहाप्रति । सर्व मिळूनिया येती । तें मंगल गीतें गातीं । प्रेमभरें ॥१७३॥ आधींच हिमालयानें । शृंगारिलीं नाना सदनें । सर्व राहिले ज्यां मानें । योग्य तसें ॥१७४॥ पाहून शोभा नगराची । तैसी सुंदरता त्याची । चतुरता विधात्याची । गौण वाटे ॥१७५॥ जेथें विधीची निपुणता । गौण वाटतसे चित्ता । पुरशोभा विलोकितां । खरोखर ॥१७६॥ वन आणि उद्यानाची । कूप–तडाग–नदीची । कोण वर्णूं शके साची । सुंदरता ॥१७७॥ ध्वज, पताका अगणित । तोरणें तीं मंगल युक्त । घरोघरीं जेथ तेथ । शोभा देतीं ॥१७८॥ स्त्रिया, पुरुष सुंदर । गुणांनीं अतिचतुर । पाहतां मुनींचें अंतर । मोह पावें ॥१७९॥ श्रीजगदंबा भवानी । जेथ अवतरे येउनी । शक्य न पुरे वर्णनीं । नगर तें ॥१८०॥ रिद्धि-सिद्धि आदि करून । सर्व संपत्ति मिळून । वाढती नित्यनूतन । अधिकाधिक ॥१८१॥ नगरासमीप वरात । येतां खळबळ लोकांत । तेणें पुर-सौंदर्यांत । वृद्धि होय ॥१८२॥ सज्ज करून समस्त ।

वाहनें अपरिमित । सादर कराया स्वागत । सर्व जाती ॥१८३॥ पाहून देव-समुदाय । हर्षें आनंदलें हृदय । हरीस देखतां अतिशय । मोद झाला ॥१८४॥ परि शिवसमाजाप्रति । जेव्हां ते अवलोकिती । सर्व वाहनें उधळतीं । पळतीं भयें ॥१८५॥ चतुर जे होते जन । राहिले धीर धरून । पळालीं जीव घेऊन । सर्व बाळें ॥१८६॥ पळूनिया घरीं जातां । त्या पुसती माता-पिता । थरथरां कांपत वार्ता । सांगतीं भयें ॥१८७॥ "आतां सांगों तरी काय । कथिलें मुळीं न जाय । वऱ्हाड कशाचें सैन्य । यमाचेंच ॥१८८॥ नव्हे नव्हे तो वर । दिसे बावळट फार । बसूनिया बैलावर । पातलासे ॥१८९॥ सर्प अंगासी वेष्टित । नर-कपाल हातांत । भस्म-लेपन त्याप्रत । अलंकार ॥१९०॥ देहास भस्मलेपन । सर्प, कपाल भूषण । शिरीं जटा, वेष नग्न । भयंकर ॥१९१॥ समागमें भूत-प्रेत । पिशाच, योगिनी अमित । विक्राळ मुखें ज्यांप्रत । राक्षसचि ॥१९२॥ ऐसी पाहून वरात । जे राहतील जिवंत । त्यांचें पुण्यचि निश्चित । अपरंपार ॥१९३॥ उमेच्या विवाहाप्रति । तेचि केवळ पाहती" । यापरीं मुलें सांगतीं । घरोघर ॥१९४॥ शिवाचाच समुदाव । हा जाणूनिया भाव । हांसती तेव्हां सर्व । मातापितरें ॥१९५॥ नानाप्रकारें-करून । समजाविती त्यांलागून । "नसें भिण्याचें कारण । निर्भय व्हा" ॥१९६॥ सामोरे जे जे जाती । वरातीस ते आणिती । देती योग्य सर्वांप्रति । जानवसे ॥१९७॥ घेऊन मंगलारति । आली तेव्हां मैना सती । समागमें स्त्रिया गातीं । मंगल गीतें ॥१९८॥ त्यांच्या गोंडस हातांत । हेमपात्रें सुशोभित । ओंवाळाया शिवाप्रत । जाती हर्षें ॥१९९॥ शिवाचा भीषण वेष । जेव्हां दिसला स्त्रियांस । उद्भवें भय विशेष । त्यांच्या

मनीं ॥२००॥ स्त्रिया पळती भिउनी । जाऊन बसती सदनीं । इकडें जाई शूलपाणि । जानवसीं ॥२०१॥ मैनेच्या हृदयांतरीं। विषाद वाटला भारी । घेई आपुली कुमारी । पाचारुनी ॥२०२॥ अतीव स्नेहेंकरून । ओसंगीं घे तिजलागून । आले डोळे डबडबून । नीलाब्जासम ॥२०३ म्हणे "दिलें ज्या धात्यानें । सौंदर्य तुजकारणें । मूढ, वेडा वर तेणें । योजिला कसा ? ॥२०५॥ बावळटचि जो दिसे । वरातें निर्मिलें कसें । जेणें दिलें तुज असें । सौंदर्य हें ॥२०६॥ जें फळ कल्पवृक्षास । लागलें पाहिजे सरस । तें लाविलें बाभळास । बलात्कारें ॥२१७॥ गिरिहून तुझ्यासकट । मी करीन कडेलोट । जळेन वा बुडेन थेट । सागरांत ॥२१८॥ गेलें जरी घरदार । अपकीर्ति जगभर । लग्न न होऊं देणार । जिवंतपणीं ॥२०९॥ भोंवतीं स्त्रिया सकल । झाल्या तें अति विकल । दुःखित पाहून केवल । मेनेप्रति ॥२१०॥ मेना करी आक्रंदन । रडे दीर्घस्वरेंकरून । कन्यास्नेहें कातावून । काय म्हणे ? ॥२११॥ "नारदाचें अहित तें । मी केलें होतें कोणतें । जेणें मद्‌गृह नांदतें । विध्वंसिलें ॥२१२॥ जेणें ऐसा उपदेश । केला माझ्या पार्वतीस । वेडचा वरार्थ तपास । करविलें जें ॥२१३॥ खरें पाहूं जातां तया । नाहीं मोह, नाहीं माया । नाहीं गृह, धन, जाया । उदासीन ॥२१४॥ नासाया परसदना । लाज, भीड नाहीं मना । वंध्या प्रसववेदना । जाणेल कशी"? ॥२१५॥ यापरी दुःखी जननी । विलोकूनिया भवानी । बोलली कोमल वाणी । विवेकयुक्त ॥२१६॥ "माते! हा विचार करीं । शोक टाकूनिया दुरी । विधिघटना कधीं तरी । टळेल काय ?॥२१७॥ वेडा वर नशीबांत । असेल जरी लिखित । दोष द्यावा कुणाप्रत । काय म्हणुनी ॥२१८॥ तुझ्यानें

ललाटरेखा । पुसून टाकवेल का? । न घे लावून कलंका । व्यर्थ माते! ॥२१९॥ माते! आतां करीं एक । लावून न घे कलंक शोक हा अप्रासंगिक । टाकून दे ॥२२०॥ सुख–दुःख ज्या ज्या काळीं । लिहिलें असेल भालीं । मी जाईन ज्या ज्या स्थळीं । पावेन तें" ॥२२१॥ विनम्र आणि कोमल । ऐकून उमेचे बोल । दुःखी झाल्या स्त्रिया सकल । निजांतरीं ॥२२२॥ नानाप्रकारें करून । दूषिती धात्यालागून । करिती अश्रुमोचन। नेत्रांतुनी ॥२२३॥ ऐकतां या वृत्तान्तासी । हिमाद्रि जाई गृहासी । सवें नारद, सप्तर्षींसी । घेऊनिया ॥२२४॥ नारदांनीं त्या कालीं । सर्वांची समजूत केली । पूर्वजन्मींची कथिली । कथा सारी ॥२२५॥ "ऐक मैनें! माझी वाणी । चित्तीं ती सत्य जाणुनी । कीं, जगदंबा भवानी । कन्या तुझी ॥२२६॥ अजा, शक्ति अनादिनी । नाश नाहीं जीलागुनी । शिवार्धांग-निवासिनी । सदोदित ॥२२७॥ उत्पत्ति–स्थिति–संहार । जगाचा हीच करणार । स्वेच्छेनें धरी शरीर । लीलेस्तव॥२२८॥ दक्षाचे गृहीं प्रथम । गेली ही घेऊन जन्म । पावूनिया 'सती' नाम । सुंदर तनु ॥२२९॥ तेथेहि शंकरासह । हिचा झालासे विवाह । प्रख्यात कथा-प्रवाह । सकल जगीं ॥२३०॥ एकदां शिवासहित । सती ती असतां जात । रघुकुलाब्जसूर्याप्रत । पाहिलें तिनें ॥२३१॥ तिच्या मना मोह झाला । शिवबोध ना ऐकिला । सीतेचा वेष धरिला । संशयानें ॥२३२॥ सीतेच्या वेषाकारणें। घेतलें जेंव्हां सतीनें । त्या अपराधें शिवानें । त्यजलें तिज ॥२३३॥ शिवविरहें जाई मग । पितृगृहीं होतां याग । योगानलीं तें सर्वांग । जाळून घे ॥२३४॥ आतां तुमच्या सदनीं । जन्मली तीच्च भवानी । करी पतिप्राप्तिलागुनी । दारुण

तप ॥२३५॥ ऐसें जाणून अंतरीं । संशय तो दुरी करीं । सदा गिरिजाकुमारी । शंकर–प्रिय" ॥२३६॥ ऐसें नारदाचें वचन । तेव्हां श्रवण करून । झालें दुःखनिरसन । सर्वांचेंहि ॥२३७॥ क्षण न लागतां सत्वरीं । पसरली सर्व नगरीं । ऐसी कथा घरोघरीं । पार्वतीची ॥२३८॥ मैना आणि हिमवंत । तेव्हां झाले प्रमुदित । वंदिती उमापदांप्रत । पुनः पुन्हां ॥२३९॥ नारी, पुरुष, बालक । तरुण, वृद्ध जे लोक । आनंदले नागरिक । सर्वहि अति ॥२४०॥ मग तया नगरांत । होतसे मंगल गीत । सर्व सजविती अमित । हेमकलश ॥२४१॥ पक्वान्नेंहि नानापरीं । होऊं लागतीं साजिरीं । जीं जीं कांहीं व्यवहारीं । सूपशास्त्रीं ॥२४२॥ तेथील भोजनाची परी । वर्णवेल कैशापरी । ज्या गृहांत वास करी । जगदंबा ॥२४३॥ सर्वहि वऱ्हाडयांप्रति । तें सादर पाचारिती । विष्णुविधिप्रभृति । सर्व देव ॥२४४॥ नानाप्रकारें पंगती । बैसल्या भोजनाप्रति । वाढपे वाढूं लागती । चतुर जे का ॥२४५॥ देव बसले जेवावया । ऐसें पाहूनिया स्त्रिया । लागल्या थट्टा कराया । मृदुवाणीनें ॥२४६॥ मृदुस्वरानें युवती । व्यंग्य वचनें बोलती । उखाळ्या पाखाळ्या काढिती । परस्पर ॥२४७॥ देवहि ते सावकाश । करिती तें भोजनास । आनंदती विनोदास । ऐकूनिया ॥२४८॥ करीत असतां भोजन । जो आनंद वर्धमान् । कोटिमुखें तद्वर्णन । शक्य नव्हें ॥२४९॥ भोजनोत्तर आंचवतां । तांबूल दिले समस्तां । निज जानवसीं देवतां । जात्या झाल्या ॥२५०॥ मुनीश्वर त्या समया । गिरिभूषण हिमालया । मुहूर्त तें निवेदाया । येते झाले ॥२५१॥ विवाहाच्या समयास । विलोकून हिमगिरीश । पाठवीतसे देवांस । बोलावणें ॥२५२॥

अत्यादरें देवांप्रत । पाचारिले तैं समस्त । आसनें दिलीं यथोचित । सर्वांसहि ॥२५३॥ वेदविधीनें वेदिका । तेथें सिद्ध केली देखा । मंगल मनोहारिका । गाती स्त्रिया ॥२५४॥ अति दिव्य सिंहासन । ठेविलें होतें मांडून । निर्मी जया चतुरानन । अवर्णनीय ॥२५५॥ विप्रांतें नमस्कारून । त्यावरी बैसे पंचानन । निजप्रभूतें स्मरून । राघवासी ॥२५६॥ तदनंतर मुनीश्वरीं । बाहिली गिरिजाकुमारी । आणिती सख्या सुंदरी । सजवून तिज ॥२५७॥ रूप पाहून समस्त । सुर झाले तैं मोहित । शोभा वर्णू शके जगांत । कोण कवि? ॥२५८॥ ती जगताची जननी । शिवार्धांगिनी जाणुनी । वंदिती मनोंचे मनीं । देव सारे ॥२५९॥ ऐसी भवानी ती उमा । होती सौंदर्याची सीमा । वर्णिली न जाय सुषमा । कोटिमुखें ॥२६२॥ कोटिवदनेंकरून । केलें न जाय वर्णन । जगज्जननीचें महान् । सौंदर्य तें ॥२६१॥ जेथें संकोच पावती । श्रुति, शेष, सरस्वती । तेथें कोठें मंदमति । तुलसी-दास? ॥२६२॥ ती सौंदर्याची खनि । जातसे माता भवानी । मध्यमंडपीं, ज्या ज्या स्थानीं, भगवान् शिव ॥२६३॥ लज्जा-मर्यादेकरून । करूं न शके विलोकन । पतिपदाब्जीं तन्मन । मधुप होय ॥२६४॥ मुनींच्या आज्ञेनुसार । देवाद्य श्रीगणेश्वर । पूजी तेव्हां महेश्वर । पार्वतीसह ॥२६५॥ ऐसें श्रवण करुनी । संशय न घ्यावा कुणीं । देव अनादि जाणुनी । सर्वदाहि ॥२६६॥ (शिव–पार्वतीपासून । जन्मलासे गजानन । जन्माआधींच पूजन । त्याचें घडें ॥२६७॥ ऐसें ऐकून वर्णन । शंकाकुल होय मन । म्हणूनिया समाधान । योजिलेंसे ॥२६८॥ उत्पत्ति–स्थिति–संहार । सृष्टीचा तो वारंवार । परि अनादि सुरवर । जसेच्या-तसे ॥२६९॥ सृष्टीचीं होतां उत्पत्ति । तेहि उदय पावती ।

पुनरपि प्रलयीं होती । अंतर्धान ॥२७०॥ या परी देवांचा क्रम । शास्त्रीं बोलिला असंभ्रम । म्हणून संशयाचें काम । नसे येथें ॥२७१॥) विवाहविधि ज्या रीतीं । वर्णन करित्ये श्रुति । मुनीश्वर सर्व करिती । तैशापरी ॥२७२॥ दोन्ही हातीं कन्या-कुश । घेऊन तेव्हां गिरीश । भवानी जाणून शिवास अर्पण करी ॥२७३॥ जैं महेशें जाश्वनीळें । हें पाणिग्रहण केलें । तैं हृदयीं आनंदले । सर्व देव ॥२७४॥ वेदमंत्रांचा उच्चार । करिती तैं मुनीश्वर । देव करिती जयजयकार । शंकराचा ॥२७५॥ नाना प्रकारेंकरून । होतसे वाद्यवादन । पुष्पवृष्टि नभांतून । नानापरी ॥२७६॥ शिवपार्वती–विवाह । होतां समारंभासह । साऱ्या ब्रह्मांडीं उत्साह । भरून राहे ॥२७७॥ दासदासी, अश्वयूथ । हत्तींसह नानारथ । गायी, वस्त्रें, मणि, पदार्थ । नानापरीं ॥२७८॥ अन्नें सुवर्णभाजनीं । भरून नाना वाहनीं । आंदण दिलें, तें वर्णनीं । शक्य नोहे ॥२७९॥ देणग्या बहु प्रकारीं । देऊनिया त्या उपरी । हिमालय तो बद्धकरीं । काय म्हणे ॥२८०॥ "तुम्हां पूर्णकामाप्रति । काय द्यावें मीं संप्रति" । शिवपदाब्ज धरी हातीं । स्वस्थ राहे ॥२८१॥ कृपासागर शिवानें । निज श्वशुराकारणें । तोषविलें पूर्णपणें । सर्वतोपरी ॥२८२॥ तदुपरी मैना सती । धरून पदाब्जांप्रति । प्रेमपरिपूर्ण चित्तीं । काय म्हणे ॥२८३॥ 'प्रभो ! उमा कन्या मम । आवडती प्राणासम । गृहकिंकरी निरुपम । करा हिज॥२८४॥ माझ्या अपराधां समस्तां । क्षमा करा तुम्ही आतां । वरूनिया प्रसन्नता । द्या हो वर ॥२८५॥ बहुपरीं सासूकारणें । समजाविलें शिवानें । तंव ती वंदून चरणें । जाई घरीं ॥२८६॥ तदुपरी मैना जननी । उमेप्रति पाचारुनी । योग्य बोधी

बसवुनी । निजांकावरी ॥२८७॥ "बाळे! शिवपदपूजा । सदोदित करीत जा । पतिविण देव न दुजा । स्त्रीधर्म हा" ॥२८८॥ ऐसें बोलतां वचन । अश्रूंनीं भरले नयन । कन्येस कवटाळून । हृदयीं धरी ॥२८९॥ म्हणे, "विधीनें स्त्रीजात । कशास निर्मिली जगांत । सुख न पराधीनाप्रत । स्वप्नांतहि" ॥२९०॥यापरीं ती माता चित्तीं । विकल झाली प्रेमें अति । शोक अनुचित जाणून ती । धैर्य धरी ॥२९१॥ पडूनिया चरणांवर । मिठी मारी वारंवार । अपरिमित प्रेमभर । अवर्णनीय ॥२९२॥ स्त्रियांसी कवटाळुनी । भेटती झाली भवानी । आलिंगी पुन्हां जाउनी । मातृहृदया ॥२९३॥ पुन्हां भेटून मातेप्रति । निघती झाली पार्वती । योग्य आशीर्वाद देती । सर्वहि तिज ॥२९४॥ पुन्हां वळून पार्वती । अवलोकी मातेप्रति । सख्या तिजला नेती । शिवाकडें ॥२९५॥ आले ते एकूण एक । तोषवूनिया याचक । निघे कैलासनायक । उमेसह ॥२९६॥ देवसमूह समस्त । हर्षें वर्षे पुष्पांप्रत । सुंदर दुंदुभी नभांत । दुमदुमूं लागे ॥२९७॥ त्या समयीं हिमवंत । स्वयें चालला सहित । पोंचवाया शिवाप्रत । अत्यादरें ॥२९८॥ नानाप्रकारेंकरून । श्वशुरासी तोषवून । निरोप देई त्यालागून । वृषकेतु ॥२९९॥ मग तेथून त्वरित । गृहीं येऊन हिमवंत । तेणें गिरि-सर समस्त । पाचारिले ॥३००॥ आदरें देऊन दानें । विनयें अति संमानें । पाठवी सर्वांकारणें । गिरिराज ॥३०१॥ जेव्हां भगवान् शंकर । आलासे कैलासावर । स्वलोकीं सर्व सुरवर । जाते झाले ॥३०२॥ जगाचे मातापितर । पार्वती आणि शंकर । म्हणून त्यांचा शृंगार । न वर्णीं मी ॥३०३॥ (श्रीतुलसीरामायण । असून साहित्याची खाण । शृंगारलीलावर्णन । वर्ज्य येथें ॥३०४॥ तेणें

शृंगाराचे भोक्ते । निराश होतील श्रोते । तरी तिहीं क्षमा येथें । केली पाहिजे ॥३०५॥ शृंगार हा रसराज । नवरसांमाजीं सहज । परि येथें केला वर्ज्य । कविवर्यें ॥३०६॥ स्त्रीपरीक्षा जाणती कुणी । कोण पद्मिनी, यक्षिणी । कोण शाकिनी, डाकिनी । कोण असे ॥३०७॥ यापरीं स्त्रियांची जाति । न्याहाळून परीक्षिती । तेथें काय मातेप्रति । परीक्षावें ? ॥३०८॥ स्त्रीपरीक्षेसी अपवाद । परम वंद्य मातृपद । तियेचा शृंगार विशद । वर्णूंच नये ॥३०९॥ सौंदर्याचें जें वर्णन । तें नव्हेंचि अप्रमाण । शृंगाराचा महाप्राण । तोचि असे ॥३१०॥ विप्रलंभ आणि संभोग । शृंगाराचे दोन भाग । रसोत्कर्षीं ते अव्यंग । उभयतांहि ॥३११॥ वर्णनीय आवश्यक । एकाहून ते एक । परि मर्यादेचा विवेक । मातृस्थानीं ॥३१२॥ शिवभवानी उभयतां । जगताचे मातापिता । संभोगशृंगार वर्णितां । संकोच हा ॥३१३॥ म्हणूनिया तुलसीदास । संक्षेप देऊन त्यास । वर्णिती त्यांचा विलास । अल्पमात्र ॥३१४॥ ) असो दोघे नानारीतीं । भोगविलास करिती । निज गणांसह राहती । कैलासावरी ॥३१५॥ शिवभवानीचा विहार । नित्यनूतनप्रकार । यापरी बहु अवसर । लोटलासे ॥३१६॥ ऐसा लोटतां अवसर । जन्मला षण्मुख कुमार । समरीं तारकासुर । मारिला जेणें ॥३१७॥ कथा वेदशास्त्रांभीतरीं । प्रसिद्ध पुराणांतरीं । 'कार्तिकेयजन्म' सारी । सृष्टि जाणे ॥३१८॥ कार्तिकेयाचा जन्म । त्याचा प्रताप, त्याचें कर्म । पुरुषार्थ महत्तम । विश्व जाणे ॥३१९॥ त्या हेतूनें सांप्रत । शिवकुमार-चरित । मी वर्णन केलें येथ । संक्षेपानें ॥३२०॥ श्रीशिव आणि पार्वती । यांच्या विवाहकथेप्रति । जे सांगती, जे गाती । नारी-नर- ॥३२१॥ कल्याण, विवाह, मंगल ।

इत्यादि कार्यों सकल । ते ते सुख पावतील । सदोदित ॥३२२॥ श्रीशंकराचें चरित्र । समुद्रासम अपार । न लागे ज्याचा पार । वेदांसहि ॥३२३॥ वर्णन करील त्यास । कैसा मग तुलसीदास । अति मंदबुद्धि ज्यास । गांवढळचि जो ॥३२४॥ (सोपानींचा मार्ग भला । जरी अतिदीर्घ वाटला । तदर्थं सहावा योजिला । विश्राम हा ॥३२५॥ रसिक भाविक श्रोत्यांस । विनवीतसे देवीदास । माझ्या बोबड्या बोलांस । मान्य करा ॥३२६॥)

—०-०—

## विश्राम ७ वा

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्योनमः
श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः

(जय जय रघुकुळ-टिळका । जय जय भक्तजन-पालका । जय जय चित्तचालका । रामराया ॥१॥ तुझें वर्णावें चरित । ऐसा संकल्प मनांत । वर्णू जातां आतोनात । उत्साह-भरें ॥२॥ पडे प्रपंचाचा विसर । बुद्धि नुरे भानावर । गोडी अति अनावर । वाढूं लागे ॥३॥ परि ग्रंथकर्तृत्वाची । भूमिका माझी नव्हे साची । बाधा बाधते विघ्नांची । मध्यंतरीं ॥४॥ नानाविध ते साक्षेप । अनेकापरीं विक्षेप । तेणें पावलें संक्षेप । ग्रंथकार्य ॥५॥ श्रीतुलसीरामायण । स्वयंसिद्ध परिपूर्ण । त्याचा अनुवाद संकीर्ण । संकल्पिला ॥६॥ परि तो संकल्प माझा । कें पुरविसी रघुराजा । तुजविण कोण दुजा । पूर्ण करी ॥७॥ कधीं अडते मनःस्थिति । कधीं नडते परिस्थिति ।

ग्रंथ कर्तृत्वाची पूर्ति । कैसी घडे? ॥८॥ कधीं अडते दुराशा । ग्रंथकर्तृत्व सहसा । चालूं न दे ॥९॥ कधीं प्रपंचाचा सोस । कधीं विपरीत सहवास । कधीं विषय-विलास । आड येई ॥१०॥ कधीं स्वार्थाचीच ओढ । कधीं परमार्थ सुदृढ । कधीं किंकर्तव्यमूढ । निजांतरीं ॥११॥ कधीं सन्मानाची धोंड । कधीं परोपदेशीं चाड । कधीं निद्रालस्य गोड । वाटे मनीं ॥१२॥ कधीं देशोद्धार-चिंता । कधीं मोक्षसाधन-वार्ता । आत्मोद्धारीं पांगुळता । अडे कधीं ॥१३॥ एवंच ही मनोव्यथा । पूर्ण न होऊं दे ग्रंथा । तरी आतां रघुनाथा! । कृपा करी ॥१४॥ ग्रंथ-कर्तृत्वाची हांव । हा तो सहजस्वभाव । परि सामर्थ्याची उणीव । पदोपदीं ॥१५॥ याचा करावा अनुवाद । त्याचा प्रकटावा बोध । ऐसे संकल्प नानाविध । येती मनीं ॥१६॥ त्या संकल्पानुसार । चाले लेखन वरचेवर । परि होईना निर्धार । पूर्णतेचा ॥१७॥ नूतन चालें लेखन । मागें पडे पुरातन । तेणें एकहि पावें न । पूर्णतेस ॥१८॥ ऐसी माझी ही अवस्था । ठावी तुजला सर्वथा । यास्तव प्रार्थितों समर्था । रामराया ! ॥१९॥ ऐसी कृपा झणीं करीं । निश्चय धरून अंतरीं । एक तरी शेवटवरी । ग्रंथ नेई ॥२०॥ आतां उपेक्षा न करीं । दया करीं दासावरी । लेखणी माझी हातीं धरीं । अविश्रांत ॥२१॥ माझ्या हातास धरून । प्रभो ! वर्णवी तुझे गुण । श्रीतुलसीरामायण । मराठी हें ॥२२॥

ऐकून शिवचरित । सुंदर रसभरित । भरद्वाज मुनि अत्यंत । सुखावले ॥२३॥ श्रवणासी कथेवर । प्रेम वाढे अधिकतर । नेत्रीं नीर, अंगावर- । रोमावलि ॥२४॥ प्रेमें विवश होउनी । शब्द न ये मुखांतुनी । दशा

देखूनि ज्ञानी मुनि । आनंदले ॥२५॥ ( तन्मय भेटतां श्रोता । परम संतोषे वक्ता । याज्ञवल्क्य मुनिनाथा । तैसें झालें ॥२६॥ ) "मुनीश्वरा भरद्वाजा! । महा धन्य जन्म तुझा। प्राणासम प्रिय गिरिजा- । नाथ तुज ॥२७॥ शिवपदाब्जीं ज्याप्रति । अल्पमात्र नाहीं रति । रामास ते नावडती । स्वप्नांतहि ॥२८॥ शिवपदीं निष्कपट । प्रेम असणें उत्कट । श्रीरामभक्ताचे स्पष्ट । लक्षण हें ॥२९॥ कोण शिवासम तरी । रघुपतीचा व्रतधारी? । निष्कलंक त्यजिली नारी । सती जेणें ॥३०॥ करून प्रतिज्ञापूर्ति । दृढ केली रामभक्ति । शिवा-सम रामाप्रति । कोण प्रिय? ॥३१॥ मी प्रथमचि तुजप्रत । सांगून शिवचरित । त्वदंतरींचें इंगित । ओळखिलें ॥३२॥ कीं तूंच एक पुनीत । असती श्रीरामभक्त । सर्वविकाररहित । तूंच एक ॥३३॥ तुझें शील आणि गुण । मी घेतले ओळखून । ऐक, करितों कथन । रामलीला ॥३४॥ ऐक मुने! आज भलें । तुझ्या समागमीं वहिलें । मन्मना जें सुख झालें । न वर्णवें ॥३५॥ मुनीश्वरा ! रामचरित । असे अपार अत्यंत । शत कोटि शेषांप्रत । न वर्णवें ॥३६॥ तथापि केलें जैसें श्रुत । वर्णून सांगेन तद्वत् । स्मरून धनुर्धारीप्रत । गिरापति जो ॥३७॥ (वाणीची स्वामिनी सदा । मान्य झाली श्रीशारदा । गिरापति ऐशा पदा ॥ योजिलें येथ ॥३८॥ त्यजून ती सरस्वती । कां स्मरला रघुपति । ऐशी शंका वाटे चित्तीं । कुणास जरी ॥३९॥ तरी तियेचा निरास । करिती श्रीतुलसीदास । तोहि सद्वाग्विलास । अवलोका हो ॥४०॥ ) शारदा ब्रह्म-कुमारी । काष्ठाच्या बाहुलीपरी । स्वामी राम सूत्रधारी । अंतर्यामीं ॥४१॥ ज्यावरी तो कृपादानी । आपुला दास

जाणुनी । नाचवी तद्हृदंगणीं । शारदेस ॥४२॥ प्रणाम करून आतां । त्या कृपाळू रघुनाथा । वर्णितों तद्गुणकथा । निर्मल जी ॥४३॥ जो रमणीय अत्यंत । कैलास म्हणती ज्याप्रत । शिव–पार्वती सतत । राहती जेथें ॥४४॥ सिद्ध आणि तपोधन । योगी आणि देवगण । मुनिसमुदाय मिळून । किन्नरासह ॥४५॥ तैसेच्चि पुण्यात्मे जन । तेथें राहती मिळून । सेविती सुखनिधान । शंकरातें ॥४६॥ जे हरिहरपराङमुख । धर्मीं प्रेम न नावेक । जाऊं न शकती लोक । स्वप्नींहि ते ॥४७॥ ऐशा त्या कैलासा-वर । विशाल वट तरुवर । नित्यनूतन सुंदर । सर्व कालीं ॥४८॥ ( कुणा ऋतूंत पानें फुटतीं । कुणा ऋतूमाजीं झडतीं । सर्व ऋतूंत याची स्थिति । सारखीच ॥४९॥ ) त्रिविध वाहे अनिल । छायाहि अति शीतल । शिवाचें विश्रांतिस्थल । वेद गाई ॥५०॥ शिवप्रभु एके कालीं । जाय तया वृक्षातलीं । तरु पाहून हृत्कमलीं । तुष्टे फार ॥५१॥ निज करेंच्चि व्याघ्रांबर । पसरून त्याचेवर । बैसे सहज शंकर । कृपाधन ॥५२॥ कुंद–चंद्र–शंखापरी । गौर तनु–कांति साजिरी । आजानुबाहु पांघरी । मुनिवल्कलें ॥५३॥ नवोदित पद्मश्रेणी । तैसी आरक्त पदें दोन्हीं । भक्तहृत्तमोहारिणी । नखकांति ॥५४॥ सर्प, भस्म अंगावरी । भूषणें त्याला त्रिपुरारि । शरच्चंद्रा लज्जित करी । तन्मुखश्री ॥५५॥ जटा–मुकुट सुरसरी । शोभतात ज्याच्या शिरीं । विशाल कमला-परी । नेत्र ज्याचे ॥५६॥ कंठ ज्याचा नीलवर्ण । जो का लावण्यनिधान । ललाटीं शोभायमान । बालशशि ॥५७॥ बसलासे मदनारि । शोभतसे कैशापरी । जणुं मूर्त देहधारी । शांतरस ॥५८॥ योग्यशा समयाप्रति । जाणूनिया

ती पार्वती । शिवासमीप झाली जाती । जगन्माता ॥५९॥ जाणून पत्नी प्रियकर । करून अति आदर । आसन देई शंकर । वामभागीं ॥६०॥ शिवासमीप बैसली । अति हर्षित जाहली । कथा चित्तीं आठवली । पूर्वजन्मींची ॥३१॥ पतीच्या अंतःकरणीं । प्रेमा अधिक जाणुनी । हांसुनी मधुर वाणी । बोले उमा ॥६२॥ सकल लोकांच्या हिता । करी ऐसी जी का कथा । तीच पुसाया गिरिसुता । इच्छीतसे ॥६३॥ "अहो विश्वाच्या नायका ! । प्राणनाथा ! त्रिपुरांतका ! । तुमचा महिमा त्रिलोका । विदित असे ॥६४॥ विश्व जे का चराचर । नाग, देव आणि नर । सर्वहि सेवनीं तत्पर । पदाब्जाच्या ॥६५॥ प्रभो ! तुम्ही समर्थ पूर्ण । सर्वज्ञ, मूर्त कल्याण । कलागुणांचें निधान । समस्त-हि ॥६६॥ योग, वैराग्य, ज्ञान । सर्वांचें निवासस्थान । नाम कल्पतरूसमान । शरणागता ॥६७॥ जरी मजवरी प्रसन्न । असाल सुखनिधान! । निज खरी दासी म्हणून । मानितां मज- ॥६८॥ तरी प्रभो ! कृपा करून । हरावें माझें अज्ञान । रामकथा निवेदून । नानापरीं ॥६९॥ कल्पतरुतळीं ज्यास । स्वसदनीं घडे वास । तो दारिद्र्यजन्य दुःखास । साहील कसा ? ॥७०॥ शशिभूषणा ! यापरीं । विचारूनिया अंतरीं । माझा मतिभ्रम भारी । हरा नाथा ! ॥७१॥ प्रभो, परमार्थ-वक्ते । जे जे मुनि सर्व, ते ते । म्हणती रामचन्द्रातें । अनादि ब्रह्म ॥७२॥ शेष आणि सरस्वती । श्रुतिपुराणें त्याच रीतीं । रामगुणगान करिती । सर्वहि ते ॥७३॥ स्वयें तुम्ही 'रामनाम' म्हणूनिया दिनयाम । सादर जपतां नाम । कामरिपो ! ॥७४॥ तो राम तेंचि हा साचार । अयोध्याधीशाचा कुमार । कीं अज, निर्गुण, अगोचर । अन्य कुणी? ॥७५॥ जरी असे राजतनय ।

तरी ब्रह्म कैसा होय । स्त्रीविरहें पावेल काय । बुद्धिभ्रम? ॥७६॥ चरित्र प्रत्यक्ष पाहून । ऐकूनिया महिमान । संशयें करी भ्रमण । बुद्धि माझी ॥७७॥ जरी व्यापक, इच्छारहित । अन्य कुणी ब्रह्म समर्थ । तरी समजावुनी नाथ ! । सांगा मज ॥७८॥ अज्ञ जाणून मजप्रति । राग न माना चित्तीं । मोह निरसे ज्या रीतीं । तेंचि करा ॥७९॥ (प्रत्यक्ष पाहिलें म्हणून । गेली पार्वती बोलून । गतजन्मींचें वर्तमान । सांगतसे ॥८०॥) रामचंद्राची महति । पाहिली मी वनप्रांतीं । अतिभयें तुम्हांप्रति । न निवेदिली ॥८१॥ चित्ताच्या मालिन्यामुळें । योग्य ज्ञान नाहीं झालें । त्याचें फळहि पावलें । योग्य रीतीं ॥८२॥ तोचि संशय अजुनी । उर्वरीत माझ्या मनीं । कृपा करा, कर जोडुनी । प्रार्थित्यें मी ॥८३॥ प्रभो ! तेव्हां बहु रीतीं । समजाविलें मजप्रति । तरी नाथा ! मजवरती । कोप न करा ॥८४॥ तेव्हां सारखा सांप्रत । मोह नाहीं मजप्रत । रामकथेची मनांत । गोडी वाटे ॥८५॥ तरी सांगा हो ! पावन । श्रीरामाचे गुण-गण । हे भुजंगराजभूषण । सुरनाथा! ॥८६॥ भूवरी ठेवून शिर । पदीं करित्यें नमस्कार । जोडूनिया दोन्ही कर । प्रार्थित्यें मी ॥०७॥ श्रीराम-विमल-गुण । आतां करा हो ! वर्णन । श्रुति सिद्धान्तांचें पूर्ण । सार जें का ॥८८॥ यद्यपि जाति स्त्रियांची । अधिकारिणी न साची । परि दासी आहे तुमची । तनुवाङ्मनें ॥८९॥ मुळीं गूढ तत्त्वाप्रत । संत न ठेविती गुप्त । अति अधिकारी प्राप्त । होय जेव्हां ॥९०॥ (होऊन संशयग्रस्त । स्वानुभवानें वंचित । सत्यार्थ तळमळे चित्त । आर्त तोचि ॥९१॥ पूर्वजन्मीं मोह ग्रस्त ॥ तेणें चित्त अस्ताव्यस्त । तेणें अधिकारा प्रशस्त । नसेन मी ॥९२॥ मोहग्रस्त जो संशय तो मूर्त विकल्प

होय । मोहनिरासें पावे लय । विकल्प तो ॥९३॥ आतां संशयचि केवळ । चित्तास करी तळमळ । यास्तव आर्तता निर्मळ । माझे मनीं ॥९४॥ ऐसी निर्मळ आर्तता । उपजविते आतुरता । समाधानार्थ गिरि-सुता । काय म्हणे ॥९५॥) अत्यंत आर्ततेनें मी । पुसतसे सुरस्वामी ! । रामकथा सांगा तुम्ही । करून दया ॥९६॥ प्रथमतां तें कारण । सांगा विचार करून । निर्गुण ब्रह्म सगुण । देहधारी ॥९७॥ सांगा प्रभो! नंतर । श्रीरामाचा अवतार । बालचरित उदार । सांगा पुढें ॥९८॥ सांगा कैसें सीतेप्रत । पणिलेंसे विवाहांत । राज्य त्यागी रघुनाथ । कोणत्या दोषें ॥९९॥ वनीं करूनिया वास । चरित केलें बहुवस । कैसें मारिलें रावणास । सांगा नाथा! ॥१००॥ राज्यीं बैसून अवलीळा । केल्या ज्या ज्या बहुलीला । श्रीशंकरा ! सौख्यशीला ! । सांगा सर्व ॥१०१॥ अहो करुणायतन ! । शेखीं करा निवेदन । करी श्रीरघुनंदन । चमत्कार जो ॥१०२॥ निज प्रजेस घेउनी । कैसा रघुवंशमणि । जाता झाला तो विमानीं । निज धामा ॥१०३॥ मग प्रभो ! करा कथन । तें तत्त्व समजावून । यदनुभवांत मग्न । ज्ञानी मुनि ॥१०४॥ तैसें भक्ति आणि ज्ञान । वैराग्य आणि विज्ञान । विभागांसह वर्णन । करा पुढें ॥१०५॥ तदितर महत्पूर्वक । रामरहस्यें अनेक । सांगा हो नाथा ! विवेक । निर्मल अति ॥१०६॥ (आर्त होऊन पार्वती । पुसे रामकथेप्रति । एकेक आणून चित्तीं । कथाभाग ॥१०७॥ कैसें वर्तलें चरित । काय गर्भित तत्त्व त्यांत । तेंहि कळाया विस्तृत । सांगा म्हणे ॥१०८॥ आर्त होऊन पुशिलें । तितुकें जरी निवेदिलें । तरी कळलेसें न झालें । इत्थम्भूत ॥१०९॥ म्हणूनिया अज्ञपणें । जें जें राहिलें पुसणें । तेंहि कळाया काय म्हणे । पार्वती

ती ॥११०॥) पुसतां पुसतां राहिलें । जें जें मी न विचारिलें । गुप्त न पाहिजे ठेविलें । दयाळा तें ॥१११॥ त्रिभुवनाची गुरुमूर्ति । वेद म्हणे तुम्हांप्रति । पामर काय जाणती । अन्य जीव" ॥११२॥ ऐसे पार्वतीचे प्रश्न । साहजिक शोभायमान । सरळ, रुचले ऐकून । शिवमनातें ॥११३॥ शिवहृदयीं समस्त । प्रकटे रामचरित । प्रेमें रोमांच, नेत्रांत– । प्रेमाश्रुहि ॥११४॥ श्रीरघुनाथाची मूर्ति । आविर्भूत झाली चित्तीं । सुख परमानंदा-प्रति । अमित होय ॥११५॥ दोन घटिकांपर्यंत । मग्न त्या ध्यानरसांत । पुन्हां केलें मनाप्रत । बहिर्मुख ॥११६॥ रघुपतीच्या चरित्रास । त्या समयीं श्रीमहेश । आनंदें वर्णावयास । प्रारंभ करी ॥११७॥ "असत्य तें सत्य म्हणून । भासे ज्याच्या ज्ञानाविण । रज्जूचें नसतां ज्ञान । सर्प जैसा ॥११८॥ ज्याच्या ज्ञानानें निर्धारें । लुप्त होय जग सारें । जागृतींत जैसा नुरे । स्वप्नभ्रम ॥११९॥ ऐसा बालरूप राम । त्या करितों मी प्रणाम । यन्नामजपें सुगम । सर्व सिद्धि ॥१२०॥ मंगलधाम जो हरि । अमंगला दूर करी । तो दशरथांगणविहारी । कृपा करो" ॥१२१॥ ऐसा करून प्रणाम । त्रिपुरारि वंदी राम । बोले वाणी सुधेसम । आनंदानें ॥१२२॥ (पुसल्यावांचून भाषण । हें तो असे अप्रमाण । वक्ता जरी का निपुण । ज्ञातेपणें ॥१२३॥ आधीं पाहिजे विचारिता । तेव्हांच शोभे तो वक्ता । जिज्ञासु नसतां श्रोता । वृथा भाष्य ॥१२४॥ आधीं भूमि नांगरावी । खणून मोकळी करावी । वरती मग वृष्टि व्हावी । तीच योग्य ॥१२५॥ भूमि जरी खडकाळ । वरी वर्षे मेघजळ । तरी वर्षणें निष्फळ । होय जैसें ॥१२६॥ तैसें नसतां पृच्छक । सांगूं जाणें जो विवेक । श्रम सारे निरर्थक । होतात

ते ॥१२७॥ चव्हाटीं उभे राहावें । यारे! यारे! हें म्हणावें । दिसेल त्या पाचारावें । ओरडुनी ॥१२८॥ त्याचें व्हावया कल्याण । करावें बहु भाषण । विवेचन, विवरण । काथ्याकूट ॥१२९॥ तें पाहून लोक येती । गोळा होती सभोंवतीं । कांहीं ऐकिलेंसें करिती । क्षणमात्र ॥१३०॥ आल्याचा करणें आदर । गेल्यास त्याचा धिःकार । ऐसें ज्ञानाचें तें सत्र । चालवावें ॥१३१॥ नाहीं कुणासी जिज्ञासा । ज्ञान सांगे पसा पसा । लोकां म्हणती 'बसा बसा' । उठून जाती ॥१३२॥ रोगी नसतां औषध । सांगता वैद्य अप्रबुद्ध । तैसा होय ज्ञानबोध । जिज्ञासूविण ॥१३३॥ तृषार्तासीच जीवन । क्षुधापीडितास अन्न । शीतग्रस्तास वसन । देणें योग्य ॥१३४॥ रोगग्रस्तासी औषधी । तैसी जिज्ञासूतेंचि बुद्धि । अन्यथा ती कार्यसिद्धि । नव्हेचि कदा ॥१३५॥ ही जिज्ञासाच केवळ । सर्व विवेकाचें मूळ । मात्र असावी प्रांजळ । कपटहीन ॥१३६॥ ऐसी प्रांजळ जिज्ञासा । उद्‌भवे पार्वती–मानसा । आनंद वाटे महेशा । अवर्णनीय ॥१४०॥ विसरले तिचे अपराध । विसरला तो असत्यवाद । तिज करावा प्रबोध । ऐसें गमे ॥१४१॥ तिच्या विषयीं धन्यता । वाटली शिवाच्या चित्ता । मौन सोडून तत्त्वता । काय म्हणे ॥१४२॥) "धन्य धन्य तूंच खरी । हे गिरिजराज्- कुमारी । तुजसमान उपकारी । नसे कुणी ॥१४३॥ श्रीरामकथाप्रसंग । त्वां पुसला यथासांग । जगत्पावन जैसें गांग । सर्व लोकां ॥१४४॥ रघुवीरपदांप्रति । तुझी जडलीसे प्रीति । प्रश्न झालीस करिती । जगद्‌हिता ॥१४५॥ श्रीरामकृपेंकरुनी । प्रिये पार्वती भवानी! । आतां त्वदंतःकरणीं । स्वप्नांतहि– ॥१४६॥ शोक आणि तसा मोह । भ्रम अथवा संदेह । मुळीं न हे दोष-

समूह । माझ्या मतें ॥१४७॥ पहिलीच शंका तथापि । घेतलीस पुनरपि । श्रवण-पठनें ओपी । हितचि सर्वां ॥१४८॥ ज्यांनीं श्रवणें करून । ऐकिले ना हरिगुण । सर्पबिलाच्या समान । रंध्र त्यांचे ॥१४९॥ ज्यांनीं नयनेंकरून । न घेतलें सद्दर्शन । मयूर-पिच्छासमान । नेत्र त्यांचे ॥१५०॥ जैसा का कडू भोंपळा । तैसा मस्तकाचा गोळा । हरिगुरुपदतळां । जो न लवे ॥१५१॥ हरीच्या भक्तिलागुनी । स्थान न यदंतःकरणीं । जिवंत परि ते प्राणी । प्रेतासमान ॥१५२॥ जी करित्ये कदापि न । श्रीरामाचें गुणगान । दर्दुर-जिव्हेसमान । जिव्हा तीच ॥१५३॥ वज्रासमान कठोर । अंतःकरण निष्ठुर । ऐकून हरिचरित्र । हर्षे न जें ॥१५४॥ यास्तव गिरिकुमारी ! । रामलीला श्रवण करीं । देवांची जी हितकारी । दैत्यां मुग्ध ॥१५५॥ कामधेनूच्या समान । श्रीरामाची कथा जाण । दे सर्व सुखालागून । सेवितांचि ॥१५६॥ संतसमुदाय, सज्जन । त्याचपरी देवगण । कोण न करी श्रवण । जाणून हें ॥१५७॥ रामकथा शोभायमान । करतालिकेसमान । संशयपक्ष्यालागून । उडविते जी ॥१५८॥ श्रीरामकथा ही भारी । कलिवृक्षासी कुठारी । सादर तूं श्रवण करीं । गिरिकन्यके ! ॥१५९॥ श्रीरामाचीं गुणनामें । चरित्रें हीं मनोरमें । अगणित जन्मकर्में । वेद गातीं ॥१६०॥ भगवान् श्रीरघुनाथ । स्वयें ज्यापरी अनंत । गुणकीर्तिकथा तद्वत् । असंख्यचि ॥१६१॥ श्रवण केलें ज्या रीतीं । आणि जैसी माझी मति । पाहून अति त्वत्प्रीति । सांगेन मी ॥१६२॥ सुंदर जे सहजगति । प्रश्न तुझे हे पार्वती! । सुखद संमत संतांप्रति । रुचले मज ॥१६३॥ परि तुझें हें म्हणणें । रुचलें न मजकारणें । जरी तूं मूढपणें । वदलीस ॥१६४॥ तूं जी बोललीस वाणी ।

राम आहे अन्य कुणी । श्रुति गाती, ध्याती मुनि । ज्या-प्रति ॥१६५॥ ऐसें बोलती, ऐकती । ते नर अधम निश्चितीं । मोहपिशाच्चें ज्यांप्रति । ग्रस्त केलें ॥१६६॥ जे पाखंडी, जे नास्तिक । हरिपदांसी विमुख । जे सत्यासत्य विवेक । जाणती ना ॥१६७॥ जे अज्ञानी मतिमंद । भाग्यहीन जे का अंध । ज्यांचा विषयमलें अशुद्ध । मनोदर्पण ॥१६८॥ जे व्यभिचारी, कपटी । अतीव कुटिल पोटीं । संतसभेची ज्यां भेटी । स्वप्नींहि ना ॥१६९॥ ऐसी वेदविरुद्ध वाणी । तेच बोलती वदनीं । निजलाभ आणि हानि । न कळे ज्यां ॥१७०॥ दर्पण मुळींच मलिन । जे असती नेत्रहीन । केविं पाहूं शकती दीन । रामरूप तें ॥१७१॥ सगुण–निर्गुण–विवेक । ज्यांसी नाहींच निःशंक । कल्पित वचनें अनेक । जल्पती जे ॥१७२॥ हरि–मायेच्या अंकित । होऊन भ्रमती जगांत । त्यांच्या जल्पनेचे किंचित् । आश्चर्य ना ॥१७३॥ ज्यासी झाला सन्निपात । पिशाच्चग्रस्त मदमत्त । वचन विचार-युक्त । न बोलती ते ॥१७४॥ महामोह–मद्यपान । घडलेंसें ज्यालागून । त्यांचें घ्यावें न वचन । कानांवरी ॥१७५ यापरीं हृदयीं निज । विचार करून सहज । संशय त्यजून भज । श्रीरामपदा ॥१७६॥ हे गिरिराजकुमारी ! । माझे बोल श्रवण करीं । भ्रमतमा रविकरांपरी । वाक्य माझें ॥१७७॥ सगुण-निर्गुणांत कांहीं । पाहूं जातां भेद नाहीं । वेद, पुराणें, पंडितहि । सांगती मुनि ॥१७८॥ जो निराकार निर्गुण । अव्यक्त अजन्मा जाण । भक्त–प्रेमवशें सगुण । तोच होई ॥१७९॥ सगुण म्हणावें निर्गुणासी । ही एकता तरी कैसी । जल, जल-गार जैसी । भिन्न नाहीं ॥१८०॥ ( ब्रह्म पाहतां निर्गुण । राम पाहतां सगुण । यांचें कैसें अभिन्नपण । प्रत्यया ये ॥१८१॥

ब्रह्म तें मोहरहित । राम झाला मोहग्रस्त । म्हणूनिया संशया-
प्रत । निवारिती ॥१८२॥) भ्रमरूपी तिमिरासी । ज्याचें नाम
तेजोराशि । मोहप्रसंग कैसा त्यासी । सांगवेल ॥२८३॥
सच्चिदानंद राम ईश । तो मूर्तिमान् दिनेश । मोहनिशेचा
लवलेश । नाहीं तेथें ॥१८४॥ प्रकाशरूप साक्षात् । सहजचि
असे भगवंत । विज्ञानाची प्रभात । पुन्हां न तिथें ॥१८५॥
(रात्रहोतांचि समाप्त । प्रारंभ होय दिनाप्रत । रात्र नसतां
सतत । दिवसचि तो ॥१८६॥ जेथें नाहीं निशागम । तेथें न
निशेचा निर्गम । प्रभाताचें नसें काम । नांवासहि ॥१८७॥
तैसे भगवंताचे ठायीं । ज्ञानप्रकाश सदाहि । विज्ञान--प्रभाताचें
नाहीं । काम तेथें ॥१८८॥) हर्ष, शोक, विकार, गुण । तैसेंचि
ज्ञान, अज्ञान । अहंममत्वाभिमान । जीवधर्म हे ॥१८९॥
ब्रह्म व्यापक म्हणून । जग जाणें रामालागून । परमानंद सना-
तन । परमेश्वर ॥१९०॥ जो का पुराण पुरुष । स्वयंभु
स्वप्रकाश । मायाब्रह्मांडाचा ईश । प्रत्यक्ष जो ॥१९१॥ ऐसा
रघुकुलमणि । तोचि मत्स्वामी" म्हणुनी । शिवें मस्तक नमवुनी ।
नमस्कारिला ॥१९२॥ आपुला भ्रम न जाणती । अज्ञानी जे
मंदमति । प्रभुवरी दोष ठेविती । जड जीव ते ॥१९३॥ जैसें
वरतीं गगनीं । मेघपटला पाहुनी । सूर्य झांकला म्हणुनी ।
म्हणती मूर्ख ॥१९४॥ नेत्रीं अंगुली धरून । करी जो अवलोकन ।
प्रत्यक्ष चंद्रमा दोन । भासती त्या ॥१९५॥ रामाविषयीं
पार्वती! । मोह होणें ऐशा रीतीं । तमोधूमधूलि दिसती । नभीं
जैसें ॥१९६॥ (आकाश निर्लेप निर्मल । त्या स्पर्शूं न शके
मल । तैसा राम सर्वकाल । मोहमुक्त ॥१९७॥) विषय आणि
इंद्रियें । तद्देवता, जीव स्वयें । एकमेकांच्या साह्यें । चैतन्य-

युक्त ॥१९८॥ या सर्वांचा प्रकाशक । जो कोणी असे प्रमुख । अनादि अयोध्यानायक । राम तोचि ॥१९९॥ ( विषयांस इंद्रिय प्रकाश । देवता प्रकाशिती इंद्रियांस । आणि प्रकाश देवतांस । जीवात्म्याचा ॥ २०० ॥ दीप आणि त्याचा विषय । तो विषय तेज होय । तत्प्रतीति चक्षुरिंद्रिय । करून देई ॥२०१॥ दीप दिसे प्रकाशमान् । तो प्रकाश नेत्रां- पासून । सूर्यदेवते कारण । तेज नेत्रां ॥२०२॥ सूर्याचें जें का चैतन्य । केवळ जीवात्मजन्य । ऐसे चैतन्य अन्योन्य । प्राप्त सर्वां ॥२०३॥ सर्वांचें प्रकाशकेन्द्र । एकचि श्रीरामचंद्र । मोह तमाचें अभद्र । अज्ञान तिथें ॥२२४॥) प्रकाश्य वस्तु जगत् । प्रकाशक श्रीरघुनाथ । ज्ञानगुणधाम साक्षात् । मायाधीश॥२२५॥ जयाच्या सत्तेकरून । माया ती जड असून । भासते सत्या- समान । मोहामुळें ॥२०६॥ शुक्तिकेच्या ठायीं जसें । रजत मूर्तिमंत भासें । किंवा मृगजल दिसें । सूर्यकिरणीं ॥२०७॥ तिन्ही कालांमाजीं जरी । ही प्रतीति भासे खरी । तो भ्रममात्र कुणी दुरी । करूं न शके ॥२०८॥ ऐशापरी सारें जगत् । राहे श्रीहरीच्या आश्रित । मिथ्या परि दुःखाप्रत । देत असे ॥२०९॥ जैसें का स्वप्नाभीतरीं । शिर कापिलें कुणी तरी । तें दुःख न होय दुरी जागृतीविण ॥२१०॥ जयाच्या कृपेनें ऐसें । अज्ञान नष्ट होतसें । गिरिजे ! रघुनाथ असे । कृपाळु तो ॥२११॥ ज्याचा आदि आणि अंत । कुणा न झाला विदित । वेदें गाइलें जयाप्रत । यथामति ॥२१२॥ तो पायांविण चालतो । कानां- वांचून ऐकतो । हातांविण कर्मं करितो । नानापरीं ॥२१४॥ तैसा रसनेरहित । सेवी सर्व रसांप्रत । वाणीवांचून उचित । महान् वक्ता ॥२१४॥ देहावांचून स्पर्शतो । नेत्रावांचून पाहतो ।

घ्राणेविण तो सेवितो । सर्व गंध ॥२१५॥ यापरी सर्वतोपरी । अलौकिक कृति सारी । महिमा ज्याचा विश्वांतरीं । अवर्णनीय ॥२१६॥ ज्याचें वेद, बुधजन । ऐसें करिती वर्णन । ज्याचें धरितात ध्यान । सर्व मुनि ॥२१७॥ तोच दशरथनंदन । करी भक्तांचें कल्याण । अयोध्याधीश भगवान् । रामचंद्र ॥२१८॥ मृत्यु पावतां काशींत । पाहून त्या जीवांप्रत । ज्याच्या नामबलें मुक्त । करितों मी– ॥२१९॥ तोच मत्प्रभु निश्चितीं । चराचरांचा अधिपति । सर्व–हृदयीं रघुपति । अंतःसाक्षी ॥२२०॥ इच्छा नसून मनांत । नर घेतां नामाप्रत । पापें बहुजन्मकृत । नष्ट होतीं ॥२२१॥ चित्तीं धरून आदर । स्मरण करिती जे नर । तरती भवसागर । गोष्पदासम ॥२२२॥ हे भवानी! सांगूं काय । परमात्मा तो राम होय । 'त्यासी मोह' हें अयोग्य । म्हणणें तुझें ॥२२३॥ ऐशा या संशयाप्रति । कुणीहि धरितां चित्तीं । ज्ञान, वैराग्य नष्ट होती । सर्वगुण" ॥२२४॥ करी भ्रमाच्या भंजना । त्या ऐकून शिववचना । सर्व कुतर्करचना । नष्ट झाली ॥२२५॥ रघुपतीच्या पदकमलीं । श्रद्धा, प्रीति उद्‌भवली । कठिणशी लया गेली । असंभावना ॥२२६॥ (शुद्ध श्रीरामरूप । तेथें मोहाचा आरोप । या कल्पनेचा लोप । पूर्ण झाला ॥२२७॥) वरचेवरी ती उभा । धरी शिवपदपद्मा । करकमलां असंभ्रमा । जोडीतसे ॥२२८॥ मधुर वचनाप्रति । बोलती झाली पार्वती । ओथंबली जणुं उक्ति । प्रेमरसें ॥२२९॥ "चंद्रकिरणांसमान । ऐकून युष्मद्‌वचन । मोह शरदातप महान् । नष्ट झाला ॥२३०॥ तुम्ही होतांचि सकृप । संशय पावेल लोप । यथार्थ रामस्वरूप । कळलें मज ॥२३१॥ तुमच्या कृपेनें नाथा! । विषाद विरला

आतां । पदप्रसादें समर्था ! । सुखी झाल्यें ॥२३२॥ प्रभो ! आतां मजलागून । आपुली दासी जाणून । स्वभावें जड अज्ञान । नारी–जरी ॥२३३॥ प्रथमतां मी जी गोष्ट । पुशिली ती करा स्पष्ट । जरी मजवरी संतुष्ट । आहां प्रभो ! ॥२३४॥ राम ब्रह्म निश्चयेंसी । ज्ञानस्वरूप अविनाशी । सर्वांतःपुरनिवासी । सर्वरहित ॥२३५॥ नाथा ! कोणत्या कारणें । नृदेह धरिला । तेणें । तें समजावून सांगणें । वृषकेतो! ॥२३६॥ ऐकून विनम्र अति । पार्वती-वचनाप्रति । रामकथेवरी प्रीति । विशेषशी ॥२३७॥ त्या समयीं मदनारि । आनंदला हृदंतरीं । स्वभावेंचि सुविचारी । श्रीशंकर ॥२३८॥ बहुप्रकारेंकरून । पार्वतीतें प्रशंसून । पुढतीं कृपानिधान । बोलतसे ॥२३९॥ (सोपानींचा मार्ग भला । जरी अतिदीर्घ वाटला । तदर्थ सातवा योजिला । विश्राम हा ॥२४०॥ रसिक भाविक श्रोत्यांस । विनवीतसे देवीदास । माझ्या बोबड्या बोलांस । मान्य करा ॥२४१॥)

—:०:—

# विश्राम ८ वा

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्यो नमः
श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः

"ऐक ऐक हे पार्वती ! । मंगलशा कथेप्रति । 'रामचरित-मानस' अति । निर्मल जें ॥१॥ काकभुशुंडीनें वर्णन । केलें या कथेलागून । पक्षिराज गरुडें श्रवण । केलें तिज ॥२॥ तो संवादहि उत्कृष्ट । कैसा झालासे प्रकट । तो यथासांग सुस्पष्ट । पुढें करूं ॥३॥ रामावतार-चरित । आधीं ऐक तूं सांप्रत । सुंदर आणि पुनीत । अतीव जें ॥४॥ श्रीहरीचे गुण, नाम । पार ज्याचा अति दुर्गम । कथारूपेंहि निस्सीम । अपरिमित ॥५॥ परि जैसी माझी मति । तदनुसार संप्रति । सांगतों ऐक पार्वती! । आदरें तूं ॥६॥ ऐक गिरिजे ! वहिलीं । हरिचरित्रें चांगलीं । वेदशास्त्रांनीं गाइलीं । निर्मल बहु ॥७॥ श्रीहरीचा अवतार । ज्यायोगें होय भूवर । एकचि कारण निर्धार । सांगतां न ये ॥८॥ मनोवाणीबुद्धिप्रत । अतर्क्य श्रीरघुनाथ । ऐसें माझें असें मत । ऐक सुज्ञे! ॥९॥ तरी संत मुनीश्वर । सुपुराण, वेद चार । त्यांनीं स्वबुध्द्यनुसार । कथिलें जसें ॥१०॥ हे सुमुखि ! त्याच रीतीं । सांगतों मीहि संप्रति । जैसें कळलें मजप्रति । कारण तें ॥११॥ अगे! ज्या ज्या समयास । धर्माचा होतसे ऱ्हास । वाढती नीच राक्षस । दुरभिमानी ॥१२॥ जे न मुखें वर्णवती । ऐसे अन्याय करिती । गो-विप्र-सुर त्रासिती । धरणीसह ॥१३॥ मारूनियां असुरांना । करी देवांची स्थापना । वेदमर्यादारक्षणा । स्वयें

करी ॥१४॥ निज निर्मल यशाचा । जगीं विस्तार करी साचा। हा श्रीरामावताराचा । हेतु मुख्य ॥१५॥ गाऊन त्या यशाप्रत। भवाब्धि तरती भक्त। कृपासिंधु भक्तहितार्थ। देह धरी ॥१६॥ श्रीराम-जन्म-मूलक । कारणें असतीं अनेक । विचित्र एकाहून एक। विशेष तीं ॥१७॥ एक दोन जन्म त्यांतून । विस्तारें करितों वर्णन । सुज्ञे! पार्वती! सावधान । श्रवण करीं ॥१८॥ द्वारपाळ श्रीहरीचे । आवडते दोन साचे । जय-विजय नांवाचे। जाणती सर्व ॥१९॥ ब्राह्मण-शापेंकरून । ते बांधव दोघेजण। पावले असुरजनन । तमोगुणी २०॥ हिरण्यकश्यपु एक। दुजा हिरण्याक्ष नामक । सुरेंद्रगर्वमोचक । विदित जगा ॥२१॥ ते विजयी रणांगणीं। विख्यात वीर दोन्ही । वराहरूप धरुनी। वधिलें एका ॥२२॥ होऊनिया नरहरी । पुन्हां दुजासहि मारी। भक्त प्रह्लादाचें पसरी। सुंदर यश ॥२३॥ तेच दोघे निशाचर। पातले पुन्हां भूवर । होऊनिया महावीर। बलवंत ॥२४॥ रावण आणि कुंभकर्ण। त्या दोघांचें अभिधान । सुरविजयी योद्धे पूर्ण। ख्यात जगीं ॥२५॥ जरी प्रभूनें मारिलें । परि ते न मुक्त झाले। ब्रह्मवाक्य प्रमाण केलें । त्रिजन्माचें ॥२६॥ (जय-विजयांकारणें । शापिलें सनकसनंदनें। राक्षसयोनीत घेणें। जन्म तुम्ही ॥२७॥ ऐसा देतांक्षणीं शाप । द्वारपाळां पश्चात्ताप। पुन्हां मागती उःशाप। प्रार्थूनिया ॥२८॥ दयाळु ऋषिवर्यांनीं। उःशाप दिला त्यालागुनी। पावाल तामस योनी। निश्चयेंच ॥२९॥ परि प्रत्येक जन्मांत । अवतरुनी भगवंत । तुमचा करील अंत। वधूनिया ॥३०॥ यापरी तीन जन्मांत । तुम्हां मारील भगवंत । तिसऱ्या जन्मांत मुक्त । व्हाल तुम्ही ॥३१॥ ऐशापरीं एक वेळ। सुखवाया द्वारपाळ। अवतार

भक्त-कृपाळ । घेता झाला ।।३२।।) कश्यप-अदिति तेथ । पिता माता प्रभुप्रत । जे कौसल्या-दशरथ । नामें ख्यात ।।३३।। एका कल्पाच्या भीतरीं । अवतरून यापरीं । पवित्र लीला संसारीं । करिता झाला ।।३४।। एका कल्पाच्या भीतरीं । देव देखिले दुःखी भारी । जिंकिले सर्व समरीं । जालंधरें ।।३५।। त्या समयीं श्रीशंकर । संग्राम करी अपार । मारितां न मरे असुर । महाबली ।।३६।। त्या दैत्यराजाची कांता । होती महा पतिव्रता । तिच्या प्रभावें शिव स्वतां । जिंकूं न शके ।।३७।। (अनादि कालापासून । पतिव्रतेचें महिमान । चालत आलें, अजून । आर्यावर्ती ।।३८।। देव, दैत्य नि मानव । यांचा भिन्नचि स्वभाव । पतिव्रताचा परि भाव । एकनिष्ठ ।।३९।। पति असतां सात्विक । पतिव्रता अनन्यगतिक । पति पापी, नीच, घातक । तरीहि शुचि ।।४०।। उदाहरणें देऊं जातां । विस्तार होईल ग्रंथा । म्हणून संक्षेपें आतां । निवेदितों ।।४१।। पति पाप करी अगण्य । अनीतींत त्या प्रावीण्य । परि पति-व्रतेचें पुण्य । त्यास तारी ।।४२।। श्रुतिपुराणांभीतरीं । दैत्य-कथा नानापरी । त्यांच्या पतिव्रता नारी । तारक त्यां ।।४३।। प्रभु-देवांचा पक्षपाती । तदर्थ धरी देहाप्रति । त्यांतें व्हाया सुखप्राप्ति । कपट करी ।।४४।।) स्वीकारून कपटमार्ग । तिच्या व्रताचा करी भंग । देवकार्य करी सांग । श्रीहरि तो ।।४५।। या तत्कपटा-कारणें । जाणिलें जें पतिव्रतेनें । क्रुद्ध होऊन तें तिनें । शाप दिला ।।४६।। (पातिव्रत्याचा भंग केला । लोक म्हणती घात झाला । काळिमा केवळ लागला । देवांप्रति ।।४७।। न्याय-नीति इत्यादिक । धर्माचा जो संस्थापक । त्याचें अनीति-मूलक । वर्तन कसें ? ।।४८।। मागें अहल्येविषयीं । इंद्र

कामुकहृदयीं । गौतमाचें रूप घेई । कपटेंचि तो ॥४९॥ घेऊन गौतमाचें रूप । केलें व्यभिजार-पाप । तें गौतमें दिला शाप । इंद्राप्रति ॥५०॥ तैसेंचि येथें वर्तलें । विष्णूनें कपट केलें । जालंधराचें धरिलें । रूप आधीं ॥५१॥ फसवून त्याची कांता । भ्रष्टविली पतिव्रता । ऐसीच प्रसिद्ध कथा । लोकांतरीं ॥५२॥ यापरी हा असंबद्ध । व्यभिचाराचा अपवाद । निरसाया कथा-संबंध । स्पष्ट करूं ॥५३॥ झुंजतां स्वयें शंकर । अजिक्य तो जालंधर । हें पाहून परमेश्वर । काय करी ॥५४॥ दैत्याचें सारेंच वर्म । जाणे एक पुरुषोत्तम । विष्णुभगवान् ज्ञानधाम । जगदाधार ॥५५॥ तो प्रभु तैं काय करी । ब्राह्मणाचा वेष धरी । वृंदा सतीच्या समोरीं । उभा राहे ॥५६॥ पाहूनिया भगवंता । ती विचारी युद्धवार्ता । त्याच क्षणीं काय कथा । घडे तेथें ॥५७॥ हस्तपाद इत्यादिक । अवयव कांहीं मायिक । पडले येऊन अचानक । तिच्यापुढें ॥५८॥ पतीचीं छिन्न विछिन्न । गात्रें तीं अवलोकून । करूं लागली रूदन । वृंदा सती ॥५९॥ ऐसें पाहून भगवंत । म्हणे तेव्हां वृंदेप्रत । पतिव्रते ! तूं सांप्रत । रडतेस कां? ॥६०॥ तूं असतां पतिव्रता । करिसी कां शोक वृथा । गात्रें जोडूनिया कांता । सजीव करीं ॥६१॥ पातिव्रत्य-पुण्यबळें । अवयव जोडून सगळे । आपुल्या पतीस केलें । सजीव तिनें ॥६२॥ धडचि तें शिरोहीन । आपुला पति मानून । सेवा करी तैं बसून । वृंदा तिथें ॥६३॥ निज पतीचींच गात्रें । मानून अति पवित्रें । सेवा करी सेवापात्रें । जाणूनिया ॥६४॥ परि होता तो परपुरुष । तेणें घडे तिला दोष । पातिव्रत्य भंगे लेश । त्या योगानें ॥६५॥ भंग होतांच व्रताचा । तिकडे जालंधराचा । वध होऊन देवांचा । जय झाला ॥६६॥ पाहून पतीच्या वधा ।

पतिव्रता सती वृंदा । प्रभुकपटें पावे क्रोधा । विशेषेंचि ॥६७॥ पतिमरणाचें दुःख । हें तों तिज स्वाभाविक । म्हणे, "कां जगन्नायक । कपट करी? ॥६८॥ देवा! त्वां कपट केलें । हें तों नाहीं झालें भलें । कां हें विपरीत आणिलें । निज मनांत? ॥६९॥ देव तुझे, दैत्य तुझे । यांत काय असे माझें । कां बा! एका देव-काजें । भुललास तूं? ॥७०॥ सकल सृष्टीचा चालक । तूंच एक जगन्नायक । धर्म—नीतीचा संस्थापक । तूंच कीं गा! ॥७१॥ देवां धर्म नियोजितां । दैत्यां अधर्मी वर्तवितां । सांग कुणाची तरी सत्ता । असे दुजी ॥७२॥ हें तुझें तूंच जाणसी । मत्संबंध नसे त्याशीं । परि पातिव्रत्यधर्मासी । योजिलें त्वां ॥७३॥ तूंच योजिसी न्याय-नीति । तूंच त्या प्रतिपाळिसी । मग कां या समयासी । विसरलास? ॥७४॥ नियोजिल्या धर्मापरी । वागत असतां नारी । कपट कां केलें तरी । सांग तुवां? ॥७५॥ नीति-धर्म त्वां स्थापावा । स्वयें काय लोपवावा । तुज शोभतें न देवा! । यत्किंचित् ॥७६॥ सिंहासनीं नृपराय । प्रजेसाठीं करी न्याय । स्वयेंचि करी अन्याय । अविचार ॥७७॥ कोण त्यास शिक्षा करी । सांग देवा! तूंच तरी । सेवाधर्मे परि नारी । सामर्थ्ययुक्त ॥७८॥ त्याच सामर्थ्यें सांप्रत । शापित्यें मी तुजप्रत । येई नरजन्मांत मृत्युलोकीं ॥७९॥ स्वीकारून कपटमार्ग । दिला त्वां पतिवियोग । तरी तुजहि दुःखभोग । आवश्यक ॥८०॥ जन्म घेऊन मत्पति । हरील त्वत् कांतेप्रति । स्त्रीविरहें दुःखप्राप्ति । होय तुज" ॥८१॥ असो, हें विषयांतर । स्वीकारिलें येथवर । कथानक सविस्तर । निवेदाया ॥८२॥ विष्णूनें केलें कपट । कोणतें तें केलें स्पष्ट । निरसाया मूळ दुष्ट । अपवाद तो ॥८३॥) वृंदेचा शाप

श्रीहरि । मान देऊन स्वीकारी । कृपाघन लीलाधारी । भगवान् तो ॥८४॥ एका जन्माचे अवसरीं । कारण घडलें यापरीं । ज्यास्तव नरदेह धरी । रामचंद्र ॥८५॥ प्रभूच्या प्रति अवतारीं । कथा जी घडली सारी । कवींनीं वर्णिली बहुपरीं । ऐक मुने ! ॥८६॥ (एकेका कल्पाभीतरीं । अवतार नानापरीं । त्याचीं कारणेंहि सारीं । भिन्न भिन्न ॥८७॥ निमित्त जयविजयाचें । किंवा सतीच्या शापाचें । ऐसें भिन्न भिन्न साचें । कारण घडे ॥८८॥ जन्मकथेचें कारण । एकाहून एक भिन्न । झाले कथाभाग म्हणून । वेगळाले ॥८९॥ एकाच अवताराची । भिन्न कथा कैंची । ऐसी शंकाहि कुणाची । असेल जरी ॥९०॥ तरी त्याचें समाधान । व्हायास हें विधान । कीं कल्पभेदेंकरून । भिन्न कथा ॥९१॥ शिव म्हणे "हे पार्वती ! । ऐक आणिक कथेप्रति । ज्या कारणें रघुपति । जन्मास ये ॥९२॥) एके वेळीं श्रीहरीला । नारदानें शाप दिला । एका कल्पांत अवतरला । त्याच साठीं" ॥९३॥ ऐकून वचनाप्रत । पार्वती झाली चकित । नारद तो विष्णु-भक्त । ज्ञानीहि तसा ॥९४॥ म्हणे, "कोणत्या कारणें । शाप दिला नारदानें । अपराध रमापतीनें । काय केला ? ॥९५॥ तो मज प्रसंग सारा । सुगम त्रिपुरारे ! कथन करा । मोह मुनीच्या अंतरा । आश्चर्य हें" ॥९६॥ ऐसा तो प्रश्न ऐकुनी । बोले महेश हांसुनी । "कोण मूर्ख, कोण ज्ञानी । न सांगवें ॥९७॥ रघुपति ज्यास जैसें । ज्या समयीं करीतसे । तो तैसाचि होत असे । त्याच क्षणीं" ॥९८॥ याज्ञवल्क्य म्हणती आतां । "सांगतों रामगुणकथा । ऐका हो ! धरून आस्था । भारद्वाजा !" ॥९९॥ करी भवाचें भंजन । ऐसा

भज रघुनंदन । त्यजूनिया मद, मान । तुलसीदासा! ॥१००॥ (सर्व जगाचा चालक । सूत्रधार रघुनायक । कोण ज्ञानी, कोण मूर्ख । म्हणावा तो ॥१०१॥ कर्ता एक रघुनाथ । जीव सारे तदंकित । म्हणून न व्हावें चकित । कशानेंहि ॥१०२॥ ज्ञानी जे, ते होती मुग्ध । विरक्त ते विषयांध । चतुर ते मतिमंद प्रसंगानें ॥१०३॥ असमर्थ ते समर्थ । परमार्थी करिती स्वार्थ । उपकारी होती व्यर्थ । प्रसंगानें ॥१०४॥ असतां सुंदर स्वरूप । क्षणांत होती कुरूप । पुण्यात्मे करिती पाप । प्रसंगानें ॥१०५॥ सुगम तेंहि अवघड । रामसत्तेपुढें पाड । कुणाचा ना ॥१०६॥ अवघड ते सुघड । जें जें येईल अंतरीं । तें तें श्रीरामचि करी । तोचि एक सत्ताधारी । स्वयंसिद्ध ॥१०७॥ त्यानें केलें तेंच होतें । त्यानें नेलें तेंच जातें । त्यानें दिलें तेंच येतें । अनायासें ॥१०८॥ ऐसें जाणूनिया वर्म । आचरावें प्रतिकर्म । इतुकाच्च जीवधर्म । नेमिलासे ॥१०९॥ त्यासी असावें अनन्य । तरीच त्या होय मान्य । तयाचाच जन्म धन्य । निश्चयानें ॥११०॥ ऐसा करून विचार । तुलसीदास कवीश्वर । विनयानें वारंवार । उपदेशिती ॥१११॥ ऐसी देउनी जागृति । पुढें कथा निवेदिती । तीच सांगतों यथामति । श्रवण करा ॥११२॥) असो, हिमालय पर्वतीं । गुहा एक पवित्र अति । सुंदर वाहे भागीरथी । निकटवर्ती ॥११३॥ सुंदर, शुचि परम । या परीचा तो आश्रम । वाटलासे अत्युत्तम । नारदातें ॥११४॥ गिरिसरितेनें युक्त । विलोकून वनप्रांत । प्रेम झालेंसे उचित । प्रभुचरणीं ॥११५॥ (हें स्थानाचें महिमान । येतें अनुभवा लागून । मनाचें परिवर्तन । कोठें कसें ॥११६॥ नाना तीर्थें, नाना क्षेत्रें । धर्मीं कथिलीं पवित्रें । पुण्यपावन स्वतंत्रें । सुप्रसिद्ध ॥११७॥ तपश्चर्येचे आश्रम । पुनीत ते चारी धाम । परमार्थाचे विश्राम ।

सुविख्यात ॥११८॥ देवस्थान तसें मोठें । पवित्र गायीचे गोठे । श्रीतुलसीचें गोमटें । वृंदावन ॥११९॥ पवित्रशा पंचवटीं । वट-वृक्ष-तळवटीं । कीं सागराराचे तटीं । रम्य स्थानीं– ॥१२०॥ विषण्णहि असतां मन । होत असें सुप्रसन्न । ऐसें स्थानमहिमान । अनुभवा ये ॥१२१॥ रणांगणीं चढे शौर्य । किंवा स्मशानीं गांभीर्य । सभेमाजीं भरें धैर्य । वक्तृत्वाचें ॥१२२॥ वारांगने-च्या आळींत । श्रृंगारचेष्टा अतोनात । पुराणकथा–कीर्तनांत । विरक्तता ॥१२३॥ असो स्थानाचा महिमा । वर्णूं जातां नसे सीमा । नारदऋषिसत्तमा । तैसेंचि होय ॥१२४॥ त्या पवित्र वातावरणीं । भाव जडे प्रभुचरणीं । परिसावी श्रोतृगणीं । पुढील कथा ॥१२५॥) स्मरतांचि हरिप्रति । रुद्ध झाली शाप-गति । सहजचि शुद्ध चित्तीं । समाधिस्त ॥१२६॥ (दक्ष प्रजा-पतीनें । शापिलें मुनिकारणें । नित्य भ्रमण तेणें । नार-दासी ॥१२७॥ एके ठायींच निवास । होत नसे नारदास । तो येथें नुरला दोष । शापगतीचा ॥१२८॥ पाहून मुनीची अवस्था भय वाटे सुरनाथा । तेणें बाहून मन्मथा । संमानिलें ॥१२९॥ (तपश्चर्येचा भंग । कराया समर्थ अनंग । बोलवायाचा प्रसंग । याकारणें ॥१३०॥) "सवें स्वसैन्य घेऊन । मदर्थ करी गमन" । निघता झाला मदन । प्रसन्न मनें ॥१३१॥ देवेंद्राच्या हीच चित्तीं । वाटूं लागलीसे भीति । मत्पुरीं कराया वस्ती । इच्छी मुनि ॥१३२॥ कामी आणि लोभी चित्तीं । जे कुणी जगीं असती । कुटिल काकासम भीती । सर्वांसहि ॥१३३॥ शुष्क अस्थीतें घेऊन । मूर्खपणें जाय पळून । अवलोकूनिया श्वान । मृगेंद्रातें ॥१३४॥ कीं घेईल हिरावून । ऐसें गमें त्यालागून । तैसी लाज वाटली न । इंद्राप्रति ॥१३५॥ जाऊन त्या आश्रमाला ।

जेव्हां मदन पोंचला । निज मायेनें निर्मिला । वसंत तयें ॥१३६॥
बहुवर्णी सुमयुक्त । नाना वृक्ष प्रफुल्लित । चाले कोकिलकूजित।
गुंजती भृंग ॥१३७॥ शीत, मंद, सुगंधित । वाहे त्रिविध मारुत ।
जो का करी वृद्धिगत । कामाग्नीतें ॥१३८॥ रंभादिक देवांगना ।
नवयौवनसंपन्ना । कामकलेंत निपुणा । सर्वहि ज्या ॥१३९॥
बहु तान–तरंगयुक्त । गातीत्या मधुर गीत । गुच्छ घेऊन करांत ।
खेळती खेळ ॥१४० (अप्सरांचा समुदाय । गातां करी अभिनय ।
ज्यायोगें कामविषय । वाढे बहु ॥१४१॥ हातवारे मनोहर ।
करूं लागती खालींवर । कटाक्ष फेंकिती चौफेर । विकार-
युक्त ॥१४२॥ ऐशा परिवारासहित । सज्ज होऊन मन्मथ ।
मोहूं पाहे मुनीप्रत । प्रयत्नानें ॥१४३॥) परिवार बघून मदन ।
होतसे हर्षायमान । मायाजाल दे पसरून । नानापरीं ॥१४४॥
परि त्याची कामकला । ढळवूं न शके मुनीला । तैं पापी मदन
भ्याला । निज भयेंचि ॥ १४५॥ (झाली प्रयत्नांची सीमा ।
भय वाटे ऐसें कामा । न जिंकितां मुनिसत्तमा । नाश
माझा ॥१४६॥) त्याच्या मर्यादेलागून । उल्लंघूं शकेल कोण ।
ज्याचें करी संरक्षण । लक्ष्मीपति ॥१४७॥ स्वपरिवारासहित ।
होऊन अति सभीत । स्वयें मनीं पराभूत । कंदर्प तो ॥१४८॥
तेव्हां जाऊन शरण । धरी मुनीचे चरण । अत्यंत नम्र भाषण ।
करीतसे ॥१४९॥ (मुनीचें तप भंगाया । श्रम केले, गेले वांया ।
म्हणून तयाच्या पायां । शरण जाय ॥१५०॥ केवढें तें घोर
तप । आतां निश्चयें सकोप । होईल मुनि ॥१५१॥ क्षणीं
शापील आपणां । ऐसें भय अंतःकरणा । म्हणून तयाची करुणा ।
भाकीतसे ॥१५२॥ व्हावें तया साह्यभूत । ही तो एकीकडे
मात । उलट करूं पाहे घात । मन्मथ तो ॥१५३॥ ऐसें पाहून

घोर पाप । मुनीस यावा संताप । द्यावया मदना शाप । प्रवर्तावें ।।१५४।। परि तप तें सात्त्विक । नव्हें कुणासी घातक । निष्काम आत्मोद्धारक । निष्कलंक ।।१५५।।) परि नारदाच्या चित्तीं । क्रोध न आला तिळ–रति । गोड बोलून त्या उक्ति । तुष्ट करी ।।१५६।। (ऐसी पाहूनिया शांति । अनुपमेय ती विरक्ति । वाटलें मदनाप्रति । महदाश्चर्य ।।१५७।।) मस्तक पदीं नमवून । मुनीची आज्ञा घेऊन । सपरिवार मदन । जातां झाला ।।१५८।। मुनीचें शील, शांतता । तैसी आपुली कुशलता । काम झाला वाखाणिता । सुरसभेंत ।।१५९।। तें ऐकून सर्वांप्रति । आश्चर्य वाटलें चित्तीं । मुनीस प्रशंसिती, वंदिती । हरीस ते ।।१६०।। (पराभूत तो कंदर्प । परतला आपोआप । स्व-तपाचा समारोप । करी मुनि ।।१६१।। झाला काम–पराभव । याची होतांच जाणीव । मनीं उपजे अहंभाव । नारदातें ।।१६२।। काम जातां यावा क्रोध । किंवा उद्भवावा मद । क्रोधाभावीं मुनिबद्ध । अहंभावें ।।१६३।। मी जिंकिला मनोभव । ऐसा होतां अहंभाव । मग तो सहजस्वभाव । बळावतो ।।१६४।। मदनातें म्यां जिंकावें । हें कुणाहि नसे ठावें । नारदासी न राहवें । स्वस्थ मग ।।१६५।। विजय हा जगाभीतरीं । सांगावा कुणास तरी । ऐसें विचारी अंतरीं । नारद मुनि ।।१६६।। कामाचे जे अंकित । सांगूं जातां तयांप्रत । त्यांत महत्त्व किंचित् । न गमे तया ।।१६७।। जिहीं कामास जिंकिलें । परि क्रोधें ते वश झाले । शांतीस पूर्ण मुकले । निष्कारण ।।१६८।। ऐसा मदनारि शंकर । त्यासीच कथितां सत्वर । विजयमहत्त्व फार । प्रशंसनीय ।।१६९।। त्या समयीं नारद ऋषि । जातां झाला शिवापाशीं । मी काम जिंकिला ऐसी । घमेंड मनीं ।।१७०।। कामदेवाचें चरित्र ।

निवेदी शंकराप्रत । प्रिय जाणून अत्यंत । सांगे शिव ॥१७१॥ (कामादि षड्रिपूंतून । विशेष रिपु अभिमान । याचें कर्तृत्व कळून । कांहीं न ये ॥१७२॥ पांचहि शत्रूंवरती । जरी झाली जयप्राप्ति । परि न होय समाप्ति । अभिमानाची ॥१७३॥ रिपुपंचकाचा जेता । मनीं वाहतो अहंता । 'अजिक्य' अभिमान स्वतां । येणेंपरी ॥१७४॥ तथापि धरून मौन । न दावितां अभिमान । जित होईन म्हणून । म्हणेल कुणी ॥१७५॥ जरी स्वीकारितां मौन । वाटतें जें निरभिमान । ह्यांतचि हा अभिमान । मात करी ॥१७६॥ अभिमान जिंकिला ऐसी । मात कळतां लोकांसी । प्रशंसा चाले अहर्निशीं । या विषयीं ॥१७७ स्वयें आहों निरभिमान । हाचि जडे अभिमान । अजिक्यचि सर्वांहून । अभिमान हा ॥१७८॥ नारदा जडला गर्व । जय मिळविला अपूर्व । परि व्यर्थ जाय सर्व । अजिक्यपण ॥१७९॥ तेणें होय अकल्याण । यास्तव द्रवलें मन । शिव देई शिकवण । नारदातें ॥१८०॥) वारंवार मुनीश्वरा ! । माझी विनति ध्यानीं धरा । ऐकविलें समाचारा । जैसें मज– ॥१८१॥ तैसें श्रीहरिलागून । ऐकवूं नका वर्तमान । चर्चा निघतांहि जाणून । गुप्त ठेवा ॥१८२॥ (होतां प्रभूची भेट । देवचि काढील गोष्ट । तरीहि न करा प्रकट । रहस्य हें ॥१८३॥ पुसतां वा न पुसतां । सांगाल जरी ही कथा । तरी मुकाल भगवंता । निश्चयानें ॥१८४॥ अंतरतां श्रीमुकुंद । तें नव्हें कल्याणप्रद । श्रवण करी नारद । शिवबोध हा ॥१८५॥) कल्याणाचा उपदेश । देतां झाला श्रीमहेश । परि तो नारदा लेश । रुचला नाहीं ॥१८६॥ भरद्वाज मुनीश्वरा ! । कौतुका श्रवण करा । प्रभूचीच बलवत्तरा । इच्छा खरी ॥१८७॥ श्रीराम जें इच्छीतसे । तैसें घडून येतसे ।

अन्यथा कराया नसे । समर्थ कुणी ॥१८८॥ शिवें जें उपदेशिलें । मुनि-मना तें न रुचलें । नारदें गमन केलें । सत्यलोकीं ॥१८९॥ (ब्रह्मलोकास जाऊन । करितां कालक्रमण । पडलें त्या विस्मरण । शिवबोधाचें ॥१९०॥) एकदां निज हातांत । घेऊन सुंदर वीणेप्रत । गानपटु गातगात । हरिगुणांतें ॥१९१॥ लक्षून क्षीरसागर । जाता झाला मुनीश्वर । जेथें बसे रमावर । वेदशीर्ष ॥१९२॥ आनंदें तैं उठून । भेटे रमानिकेतन । मुनि-सहवर्तमान । आसनीं बसे ॥१९३॥ बोलला स्मितपूर्वक । चराचराचा नायक । "कृपा केली मुने! निःशंक । बहुतां दिनीं" ॥१९४॥ निजागमनें करून । पाहून प्रभु प्रसन्न । हृष्ट नारदाचें मन । विशेषेंचि ॥१९५॥ भेटतांचि पुत्र-पिता । सहर्ष होती उभयतां । तैसी दोघां प्रसन्नता । परस्पर ॥१९६। आगमनाचें कौतुक । करितां जगन्नायक । नारद झाला उत्सुक । बोलावया ॥१९७॥) कामदेवाचें चरित । मुनि निवेदी समस्त । जरी वर्णी कैलासनाथ । प्रथमतांचि ॥१९८॥ श्रीरघुपतीची माया । आहे अति दुरत्यया । तिनें न मोहिलें जया । जन्मला कोण? ॥१९९॥ मुख करूनिया म्लान । मृदु वाणीनें वचन । शेषशायी भगवान् । काय वदे ॥२००॥ "तुमच्या स्मरणें केवळ । नष्ट होतात समूळ । मोह, मन्मथ प्रबळ । महाभिमान ॥२०१॥ (जरी जिंकिला मदन । शिरीं चढला अभिमान । म्हणून प्रभूचें वदन । म्लान झालें ॥२०२॥ अभिमान झाला अति । म्हणूनिया रमापति । करीतसे व्याजस्तुति । नारदाची ॥२०३॥) "मुने! करा हो श्रवण । मुग्ध होय त्याचें मन । ज्याचें ज्ञान वैराग्याविण । कोरडेंचि ॥२०४॥ ब्रह्मचर्यव्रतीं प्रीति । आहां तुम्ही धीरमति । कैसा पीडी तुम्हांप्रति । मन्मथ तो ॥२०५॥ (ऐकतां प्रभुवचन ।

पुष्ट मुनींचा अभिमान । परि प्रकट करून । न दावीच ॥२०६॥ चित्तीं धरून अभिमान । नारद बोले वचन । "ही तो सर्वहि भगवान् । तुमची कृपा" ॥२०७॥ तैं तो करुणासागर । पाही करून विचार । गर्वतरूचा अंकुर । स्फुरला मनीं ॥२०८॥ परि तो मी तत्काळ । खुडून टाकीन समूळ । भक्तकल्याण केवळ ब्रीद माझें ॥२०९॥ मुनीस हितकारक । माझेंहि व्हावें कौतुक । तो उपाय आवश्यक । योजीन मी ॥२१०॥ त्या समयीं मुनि नारद । शिरीं वंदून हरिपद । निघे, चित्तीं अहंमद । विशेषेंचि ॥२११॥ असो, पुढें रमापति । प्रेरी निज मायेप्रति । तत्करणी कठिण अति । श्रवण करा ॥२१२॥ मार्गी मायेनें सत्वर । निर्मिलें एक नगर । जयाचा असे विस्तार । शत-योजन ॥२१३॥ लक्ष्मीचें निवासस्थान । अधिक त्या वैकुंठाहून । नानाप्रकारेंकरून । रचना ज्याची ॥२१४॥ वास करिती त्या नगरीं । सुंदरशा नरनारी । जणुं अनेक देहधारी । काम-रति ॥२१५॥ त्या नगरीं करी वस्ती । शीलनिधि नामें नृपति । गजाश्व-सेना ज्याप्रति । असंख्यात ॥२१६॥ शत सुरेंद्रासम साचे । वैभव-विलास ज्याचे । तेजोरूपबल नीतीचें । अधिष्ठान जो ॥२१७॥ नामें विश्वमोहिनी । त्याची कन्या सुलक्षणी । लक्ष्मीहि मुग्ध पाहुनी । रूप तिचें ॥२१८॥ (दृष्टि पडतां रूपावरी । पुरुषातें मोहित करी । स्त्रीच्या सौंदर्याची खरी । तीच सीमा ॥२१९॥ अपूर्व सुंदरत्वास । वर्णिती तुलसी-दास । कला अपूर्व विशेष । वर्णनाची ॥२२०॥ पुरुष होतील मोहित । हें आश्चर्य न किंचित् । जिच्या सौंदर्यें स्त्रीजात । मुग्ध होय ॥२२१॥ सौंदर्याची अपूर्वता । तीच म्हणावी तत्त्वतां । जिच्या सौंदर्यें स्त्रीचित्ता । मोह पडे ॥२२२॥) तीच

हरिमाया जाण । सर्वहि गुणांची खाण । तिचें सौंदर्य संपूर्ण । अवर्णनीय ॥२२३॥ असो, ती राजकुमारी । स्वयंवर इच्छी अंतरीं । म्हणून आले त्या नगरीं । अनेक नृप ॥२२४॥ त्या पुरीं मुनिनायक । जाता झाला सकौतुक । पुसे सर्वांसी सोत्सुक । समाचार ॥२२५॥ ऐकून सर्व वृत्तान्त । येई भूपगृहाप्रत । मुनीस पूजी नृपनाथ । बैसवुनी ॥२२६॥ मग स्वयें पाचारुनी । दावी नारदालागुनी । भूप तो विश्वमोहिनी । कुमारीस ॥२२७॥ म्हणे, "सांगाहो मुनीश! । हिचे सर्व गुण-दोष । विचार करून विशेष । निजमानसीं ॥२२८॥ पाहून स्वरूपाप्रति । मुनि विसरे विरक्ति । न्याहळी तन्मुखाप्रति । फार वेळ ॥२२९॥ तिचीं लक्षणें पाहून । विसरला देहभान । प्रकट न केलीं कथन । मोद मनीं ॥२३०॥ "जो हिज वरील नर । निश्चयें होणार अमर । कुणीहि त्या रणभूवर । जिंकूं न शके ॥२३१॥ चराचर विश्व सकल । त्याची सेवा स्वीकारील । शीलनिधे! कन्या वरील । जयाप्रति ॥२३२॥ सर्व लक्षणें विचारुनी । गुप्त ठेविलीं स्वमनीं । कांहीं तरी नृपालागूनी । निवेदिलीं ॥२३३॥ कन्यकेचीं सुलक्षणें । सांगून नृपा कारणें । नारद निघे, परि मनें । चिंती असें-॥२३४॥ आतां जातांच योजून । हाचि करावा प्रयत्न । जेणें वरी मजलागून । राजकन्या ॥२३५॥ जपतपादिक कांहीं । या समयीं होत नाहीं । हे विधात्या! कन्यका ही । मिळेल कशी? ॥२३६॥ ऐशा अवसरीं एक । प्राप्त होणें आवश्यक । रूप-सौंदर्य अलौकिक । शोभाय-मान ॥२३७॥ जयातें अवलोकितां । भाळेल भूपति-सुता । तरीच जयमाळ आतां । मिळेल मज ॥२३८॥ तरी हरीसचि आतां । मागून घ्यावी सुंदरता । परि येतां जातां । विलंब-

बहु ॥२३९॥ हितचिंतक गरुडध्वजा– । समान कोणी नसे दुजा । या समयीं तोच माझा । साहाय्यक ॥२४०॥ नानाप्रकारें-करून । करीतसे तैं स्तवन । प्रभु कौतुकी दयाघन । प्रकट होय ॥२४१॥ प्रभुदर्शनें तत्काल । मुनीचे नेत्र शीतल । निश्चयें कार्य होईल । हर्ष मनीं ॥२४२॥ अति करून काकुळती । कथा निवेदी त्याप्रति । "कृपा करीं मजवरती । साह्य होय ॥२४३॥ प्रभो! स्वरूप आपुलें । मज पाहिजे त्वां दिलें । एरव्हीं वधू न मिळे । अन्योपायें ॥२४४॥ ज्या उपायें हे नाथ! । निश्चयें होय मद्धित । तोच योजावा त्वरित । दास मी तव" ॥२४५॥ (ऐकून ती नारदोक्ति । जींत लेश ना विरक्ति । उलट वाढे आसक्ति । विषयाची ॥२४६॥ आचरोनि घोर तपा । माझी प्राप्त केली कृपा । परि निष्काम मार्ग सोपा । विसरलासे ॥२४७॥ करून काम–पराभव । जय मिळवी अपूर्व । परि खटाटोप सर्व । व्यर्थ गेला ॥२४८॥ कृपा पावून संपूर्ण । कामाधीन अंतःकरण । इच्छितो व्हाया कल्याण । भक्त माझा ॥२४९॥ मम माया दुरत्यया । हेंचि येतसे प्रत्यया । मोह झाला मुनिराया । खरोखर ॥२५०॥ आपुल्या मायेचें बल । देखूनि अति विशाल । बोलला दीनदयाल । हांसून मनीं ॥२५१॥) ज्या ज्या उपायें करून । तुझें परम कल्याण । होय, तें करीं श्रवण । नारद मुने ! ॥२५२॥ त्याच उपायाची सत्य । करीन योजना अगत्य । वचन माझें असत्य । होणार ना ॥२५३॥ व्याकुळ होतांहि रोगें । रोगी कुपथ्य मागे । योगिन् ! वैद्य न तें सांगे । ऐक मुने ॥२५४॥ त्याचपरी तुझें हित । करीन मी सुनिश्चित" । प्रभु झाला अंतर्हित । सांगून हें ॥२५५॥ मायेसी वश होउनी । मूढ झाला नारदमुनि । अति गूढ हरि–वाणी । न कळेचि

त्या ॥२५६॥ तत्काल नारद ऋषि । जाता झाला त्या स्थलासी । मंडप स्वयंवरासी । उभारिला जेथ ॥२५७॥ आपापल्या आसनावरती । बसले होते भूपति । शृंगारून नानारीतीं । सपरिवार ॥२५८॥ हा आनंद मुनिचित्तीं । माझें रूप श्रेष्ठ अति । चुकून न वरी दुजांप्रति । राजकन्या ॥२५९॥ मुनीचें व्हावया हित । कृपानिधान भगवंत । देई कुरूप अत्यंत । न वर्णवे ॥२६०॥ ऐसें घडून ये चरित्र । कुणा न कळलें मात्र । नारद जाणून सर्वत्र । नमिति शिर ॥२६१॥ तेथें रुद्रगण दोन । राहिले होते येऊन । सर्व रहस्य जाणून । होतेच ते ॥२६२॥ धरून विप्राचा वेष । फिरत होते आसपास । होते विनोदी विशेष । उभयतांहि ॥२६३॥ ज्या समाजांत जाउनी । स्थित होय नारद मुनि । स्वरूपाचा गर्व मनीं । धरून बहु ॥२६४॥ तेथेंच रुद्रगण दोन । बसते झाले येऊन । विप्रवेषें न ये कळून । वर्म कुणा ॥२६५॥ नारदास ऐकूं जाय । ऐसें बोलती छद्ममय । 'उत्कृष्ट दिलें सौंदर्य । श्रीहरीनें ॥२६६॥ हें सौंदर्य विलोकितां । भाळेल राजदुहिता । विष्णु म्हणून विशेषतां । वरील यास' २६७॥ मोह झाला मुनिप्रत । पराधीन झालें चित्त । हांसतात आनंदांत । शंभुगण ॥२६८॥ यांच्या कुचेष्टेचें उक्त । ऐकूं ये नारदाप्रत । बुद्धिभ्रमास्तव किंचित् । उमगलें ना ॥२६९॥ (निज सौंदर्याची स्तुति । हें उभयतां करिती । ऐसेंच वाटलें चित्तीं । नारदाच्या ॥२७०॥) परि ऐसें हें चरित । कुणाहि न झालें ज्ञात । विलोकी त्या रूपाप्रत । राजकन्या ॥२७१॥ मर्कटासारिखें मुख । शरीरहि भयानक । आला कोप आत्यंतिक । पाहून त्या ॥२७२॥ सखीस सवें घेउनी । तेधवां राजनंदिनी । चालली राजहंसिनी । जणुं

काय ॥२७३॥ समस्तहि भूपावली । तेव्हां निरखूं लागली । घेऊन करकमलीं । जयमाला ॥२७४॥ रूपगर्वानें फुलुनी । जिकडे बैसला मुनि । पाही न राजनंदिनी चुकूनहि ॥२७५॥ तंव पुनःपुन्हां मुनि । खिन्न होय उसळुनी । हांसती दशा पाहुनी । रुद्रगण ॥२७६॥ (आपणांसचि पहावें । ही हांव धरून जीवें । बसल्या बसल्या उसळावें । मध्यंतरीं ॥२७७॥ जातां जातां राजसुता । ढुंकूनहि न बघतां । चित्तीं जडे व्याकुलता । तत्क्षणींच ॥२७८॥ क्षणांत वाटावी आशा । कीं पूर्ण होय मनीषा । तत्काल व्हावी निराशा । दुःखदात्री ॥२७९॥ ऐसा चालतां प्रसंग । काय करी रमारंग । तोहि ऐका कथाभाग । कौतुकाचा ॥२८०॥ ) तेथें नृपदेह धरून । गमन करी कृपाघन । कन्या अर्पी हर्षून । जयमाला त्या ॥२८१॥ तें तो लक्ष्मीनिवास । घेऊन गेला कन्येस । नृपसमाज निराश । झाला सारा ॥२८२॥ (आतां वरील कुमारी । ही निश्चितता अंतरीं । परि घडतां यापरीं । अकल्पित ॥२८३॥ ) मोहभ्रष्ट होतां मति । मुनि व्याकुल स्वचित्तीं । गांठींचा मणि ज्या रीतीं । हरवलासे ॥२८४॥ त्या समयीं शिवगण । हांसून करी भाषण । 'स्वमुख घेऊन दर्पण । पहा मुने !' ॥२८५॥ दोघेहि ऐसें बोलून सभीति जाती पळून । मुनि विलोकी वदन । जलांतरीं ॥२८६॥ पाहूनिया रूपाप्रति । क्रोध वाटतसे अति । शाप देई शीघ्रगति । नारदमुनि ॥२८७॥ "अरे जा तुम्ही सत्वर । व्हाल दोघे निशाचर । कपटी पातकी थोर । दुष्टमति ॥२८८॥ मज हंसला बहुसाल । त्याचें भोगा ऐसें फल । कुणा मुनीसं हंसाल । काय पुन्हां ?" ॥२८९॥ (तपस्वी मुनि नारद । न जाणेचि स्वप्रमाद । उलट होऊन क्रुद्ध । शाप देई ॥२९०॥ तपें सामर्थ्य वाढतें ।

अशक्यहि करितां येतें । वाढ होऊन लोभातें । व्यर्थ जाय ॥२९१॥ तपें वृद्धि पावे शांति । समाधित चित्तवृत्ति । क्रोधास येतां भरती । नष्ट होय ॥२९२॥ तपें वाढें समाधान । निर्वासन होय मन । परि काम बळावून । मूढ करी ॥२९३॥ तपें होऊनिया शुद्ध । अज्ञान व्हावा प्रबुद्ध । परि वृद्धि पावे मद । अहंपणें ॥२९४॥ तपें होऊन निःस्वार्थ । घडावा केवळ परमार्थ । परि तें होतसे व्यर्थ । स्वार्थवशें ॥२९५॥ तपःसामर्थ्येंकरून । व्हावें षडरिदमन । उलट तेचि थैमान । घालिती स्वैर ॥२९६॥ हा तो मायेचा प्रभाव । दुरत्ययत्वाचा अनुभव । असो रंक किंवा राव । सर्वांसहि ॥२९७॥ असो तो महा कर्मठ । करी साधन-खटपट । परि माया गालबोट । लावी तया ॥२९८॥ असो कुणी सिद्ध-योगी । परि माया तयालागीं । आपुला प्रभाव जगीं दावीतसे ॥२९९॥ परि जे प्रभुसेवक । प्रेमळ आणि भाविक । होऊन अनन्यगतिक । शरणागत– ॥३००॥ मायेचें बाधकपण । त्यासी होय विलक्षण । जागृति होऊन कल्याण । घडें त्याचें ॥३०१॥ ऐसें झालें नारदासी । मायाप्रभावें सायासीं । प्रत्यय ये अनु-भवासी । प्रमादाचा ॥३०२॥ एवंच मायेचा पाश । दुर्धर सान-थोरांस । परि होता मायाधीश । प्रसन्न तया ॥३०३॥ नारदें शिवगणां शापिलें । पुढें मग काय झालें । तें पाहिजे श्रवण केलें । अत्यादरें ॥३०४॥) पुन्हां पाहतां जलांत । निजरूप झालें प्राप्त । तरी संतोष मनांत । न वाटेचि ॥३०५॥ अंतरीं क्रोधाचा भर । ओठ करिती फुरफुर । लक्ष्मीपतीकडें सत्वर । जाऊं लागे ॥३०६॥° ( अभिमानाचा प्रताप । तेणें पावलें कुरूप । उपहासहि आपोआप । झाला अति ॥३०७॥ तरी न होतां जागृति । क्रोधास आली भरती । शापिलें रुद्रगणांप्रति । एकी-

कडे ॥३०८॥ प्राप्त होऊन निजरूप । शांत न झाला संताप । काय म्हणे तें सकोप । निजांतरीं ॥३०९॥ ) आतां शापीन विष्णूस । किंवा देईन प्राणास । जगीं माझा उपहास । करवि-लासे ॥३१०॥ चालतां मार्गाभीतरीं । भेटला प्रभु दानवारि । सवें ती राजकुमारी । आणि रमा ॥३११॥ देवादिदेव रमावर । वचन बोले मधुर । 'कोठें चाललां मुनिवर! । हताश असें' ॥३१२॥ ऐकून वचनाप्रति । उद्‌भवला क्रोध अति । विचार न राहे चित्तीं । मायावशें ॥३१३॥ (त्या समयीं मुनिवरें । मायावशें क्रोधभरें । प्रभुशींच दुरुत्तरें । बोललीं बहु ॥३१४॥) "पराचें ऐश्वर्य श्रेष्ठ । तुज ना देखवें स्पष्ट । विशेष ईर्ष्या, कपट । तुझ्या ठायीं ॥३१५॥ समुद्रमंथन केलें । तें त्या शिवा फसविलें । देवां प्रेरून करविलें । विषपान त्या ॥३१६॥ राक्षसां दिली मदिरा । विष घेवविलें शंकरा । कौस्तुभ, रमा सुंदरा । घेतली स्वयें ॥३१७॥ तूं महास्वार्थसाधक । तैसा विश्वासघातक । कपटी तुझा दंडक । सदोदित ॥३१८॥ पूर्ण स्वतंत्रता तूंतें । कुणी नाहीं शिरावरतें । म्हणून मन मानेल तें । करितोसि तूं ॥३१९॥ प्रबुद्धा करिसी मंद । मंदास करिसी प्रबुद्ध । न धरिसी हर्षविषाद । कांहीं मनीं ॥३२०॥ छिद्रें काढून सार्वत्रिक । झालास तूं परीक्षक । अति उल्लसित निःशंक । सदा मनीं ॥३२१॥ शुभाशुभ कर्म कधीं । करितां तुज न बाधी । आजवरी प्रतिस्पर्धी । भेटला न कुणी ॥३२२॥ आतां त्वां आपुल्या घरीं । वाण दिलें ब-यापरी । स्वयें केल्याचें सत्वरीं । भोगफल ॥३२३॥ ( मानितोस स्वयें श्रेष्ठ । परि भेटलों मी वरिष्ठ । माझ्याशीं पडली गांठ । आतां तुझी ॥३२४॥) ज्या देहास धरून । वंचिलें मजलागून । तोच देह करी धारण । शाप माझा ॥३२५॥ मर्कटाची जी आकृति ।

त्वां दिधली मजप्रति । तरि मर्कटचि करिती । साह्य तुज ॥३२६॥ अपकारानेंच शेखीं । अहित माझें केलेंस कीं । स्त्रीविरहें तूंहि दुःखी । होशील रे" ॥३२७॥ (मी इच्छित होतों कांता । प्राप्त व्हावी राजसुता । तूंच झालास कीं स्वतां । विघ्नरूप ॥३२८॥ सत्य असे कर्मवाद । हा सिद्धान्त सुप्रसिद्ध । तूंच कैसा अपवाद । होसी तया ॥३२९॥ स्त्रीवियोगाचें दुःख । भोगिसी तूं आवश्यक । हाचि निश्चयपूर्वक । शाप माझा ॥३३०॥) शाप धरूनिया शिरीं । आनंदून निजांतरीं । प्रभु बहु विनय करी । नारदासी ॥३३१॥ आपुली माया प्रबला । तिचा प्रताप आगळा कृपानिधीनें घेतला । आवरून ॥३३२॥ (नारदाचें व्हाया हित । कपट करी भगवंत । शापितांहि क्रोधान्वित । होऊनिया– ॥३३३॥ त्या शापाचा अनादर । न करितां रमावर । शिरीं धरून सादर । मान्य करी ॥३३४॥ होतांचि तो कार्यभाग । आवरिला मायावेग । आतां पुढील प्रसंग । श्रवण करा ॥३३५॥) जेव्हां प्रभूनें आपुली । माया सर्व निवारिली । ना तेथ राजकुमारी । रमाहि ना ॥३३६॥ तेव्हां मुनि भयें अति । धरून प्रभुपदांप्रति । वदे तैं 'पाहि मां उक्ति' । 'प्रणतार्ति हरा!' ॥३३७॥ (मोहमुक्त होतां क्षणीं । मुनि भ्याला निज मनीं । पश्चात्तापें प्रभुचरणीं । लीन होय ॥३३८॥ हेतु न झाला पूरित । तेणें होऊन संतप्त । करून घेतला प्राप्त । प्रसंग हा ॥३३९॥ प्रत्यक्ष प्रभुकारणें । मोहवशें शाप देणें । हा अन्याय क्षम्य होणें । कदापि ना ॥३४०॥ (झाला घोर अपराध । प्रभुवरी केला क्रोध । पश्चात्तापें चित्त दग्ध । नारदाचें ॥३४१॥) "हे कृपाळा! रमानाथा! । माझा शाप होवो वृथा । दीनदयाळा! सर्वथा । मदिच्छा ही ॥३४२॥ मीं दुरुत्तरें बहुत ।

बोलल्लोंसे तुजप्रत" । मुनि म्हणे, 'मद्‌दुरित । जाय कसें?" ॥३४३॥ (पूर्ण झाला पश्चात्ताप । ऐसें पाहून मायबाप । मुनीचें हराया पाप । उपाय सांगे ॥३४४॥ ) शंकराच्या नामाप्रत । शतवार जप जा निश्चित । शांति लाभेल त्वरित । हृदया-प्रति ॥३४५॥ शंकरासारिखा दुजा । प्रिय नाहीं कुणी माझा । हा विश्वास न ढळो तुझा । चुकूनहि ॥३४६॥ त्रिपुरांतक शिव-मूर्ति । कृपा न करी ज्या वरती । त्या न मिळे माझी भक्ति । नारदमुने ! ॥३४७॥ ऐसें जाणून अंतरीं । संचार करी भूवरी । आतां न माया स्पर्श करी । तुजप्रति ॥३४८॥ नानापरीं मुनिप्रत । समजावी भगवंत! तदुपरि अंर्तहित । होता झाला ॥३४९॥ सत्यलोकातें नारद । जातसे निर्मोहमद । करीत गुणानुवाद । राघवाचा ॥३५०॥ शिवगणें मुनिप्रत । जातां देखिलें मार्गांत । मोहमुक्त, प्रसन्नचित्त । विशे-षेंचि ॥३५१॥ होऊन भयभीत अति । नारदासान्निध येती । पद धरून बोलती । दीन वचें ॥३५२॥ (कपट करून विशेष । धरूनिया विप्रवेष । हंसलों आम्ही मुनीस । कुत्सितपणें ॥३५३॥ झाली कुचेष्टेची सीमा । मुनींनीं शापिलें आम्हां । आतां जाणिलें स्वकर्मा । पूर्णपणें ॥३५४॥ करावा उपाय स्वल्प । टाळाया उपहास-पाप । मागून घ्यावा उःशाप । नारदातें ॥३५५॥ ज्याची केली आम्हीं चेष्टा । विलोकिली अप्रतिष्ठा । तेचि नारद ही निष्ठा । दृढ झाली ॥३५६॥ होऊन शरणागत । प्रार्थिती नारदाप्रत । दयाळु असती संत । म्हणूनिया ॥३५७॥) "आम्ही नसून ब्राह्मण । आहों मुनींद्र! शिवगण । केल्या अन्यायाचें पूर्ण । पावलों फल ॥३५८॥ परंतु अनुग्रह आतां । करा करा हो कृपावंता!" दीनदयाळ नारद स्वतां । म्हणती

काय ? ॥३५९॥ "तुम्ही उभयतां जन्माल । निश्चयें निशाचर व्हाल । विपुलैश्वर्य पावाल । तेजोबल ॥३६०॥ भुजबलें करून विश्वा । जिंकाल तुम्ही जेधवां । नरदेह धरील तेव्हां । हरि स्वयें ॥३६१॥ हरिहस्तें समरांत । मृत्यु येईल तुम्हांप्रत । पुन्हां संसार न, मुक्त । व्हाल तुम्हीं" ॥३६२॥ मुनिपदीं ठेवून माथा । निघाले ते उभयतां । झाले समय पावतां । निशाचर ॥३६३॥ एका कल्पाभीतरीं । या हेतूनेंच श्रीहरि । स्वयें अवतार धरी । मानवाचा ॥३६४॥ करी देवांच्या रंजना । सुख देतसे सज्जनां । करी भूभारहरणा । श्रीहरि तो ॥३६५॥ यापरीचें सानुक्रम । श्रीहरीचे जन्मकर्म । सुखद, अलौकिक, उत्तम । अनेकविध ॥३६६॥ कल्पाकल्पाच्या भीतरीं । श्रीहरि अवतार धरी । सुंदर चरित्रें बहुपरी । करीतसे ॥३६७॥ त्या त्या प्रसंगींचें चरित्र । गाते झाले मुनीश्वर । प्रबंध परम पवित्र । रचूनिया ॥३६८॥ अनुपम प्रसंगाप्रति । वर्णिलें तें नानारीतीं । सुज्ञ आश्चर्य न करिती । ऐकून त्यां ॥३६९॥ श्रीहरि जैसा अनंत । त्याच्या कथाहि अनंत । सांगती ऐकती संत । नानापरी ॥३७०॥ रघुनाथाच्या कथा । अति सुंदर सर्वथा । कोटि कल्पवरी गातां । सरतीच ना ॥३७१॥ आतां वर्णिलें जें चरित । त्याचें हेंच मनोगत । मोहिते ज्ञानी मुनीप्रत । हरिमाया ही ॥३७२॥ लीलामय भगवान् । करी प्रणतकल्याण । सेवनें सर्व दुःखहरण । सुलभ होय । ॥३७३॥ सुर, नर, मुनि कुणीहि । ऐसा तो उरला नाहीं । प्रबल माया न मोही । जयाप्रति ॥३७४॥ अनुभव हा ऐशापरी । विचारून निजांतरीं । महामायापति हरि । भजावा तो ॥३७५॥ (सोपानींचा मार्ग भला । अति दीर्घ जरी वाटला । तदर्थ आठवा योजिला । विश्राम हा ॥३७६॥

रसिक भाविक श्रोत्यांस। विनवीतसे देवीदास। माझ्या बोबड्या बोलांस। मान्य करा ॥३७७॥)

—:०:—

## विश्राम ९ वा

श्रीगणेशाय नमः। श्रीसरस्वत्यै नमः। श्रीगुरुभ्यो नमः
श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः

"हे गिरिराजकुमारी!। अन्य हेतु श्रवण करीं। विशद करितों दुसरी। विचित्र कथा ॥१॥ ज्यायोगें जन्मरहित। तैसें रूपगुणातीत। ब्रह्म जाहलें साक्षात्। अयोध्याधीश ॥२॥ फिरतां ज्या प्रभुप्रत। त्वां देखिलें अरण्यांत। लक्ष्मणबंधुसमवेत। मुनिवेषें ॥३॥ ज्याचें चरित्र भवानी!। तूं स्वयें अवलोकुनी। गेलीस भ्रमित होउनी। सती-देहीं ॥४॥ भ्रम—छायेचा अन्त। अद्यापि न झाला खचित। भ्रमरोगांतक चरित। ऐक त्याचें ॥५॥ त्या अवताराभीतरीं। जी जी लीला करी हरि। ती मी यथामति सारी। निवेदितों" ॥६॥ यापरी ती शिववाणी। हे भरद्वाजा! ऐकुनी। पार्वती प्रेमें संकोचुनी। स्मित करी ॥७॥ मग श्रीशिव भगवान्। पार्वतीस करी कथन। त्या अवताराचें कारण। सविस्तर ॥८॥ तो कथाभाग समस्त। सांगतों मी तुम्हांप्रत। ऐका देउनिया चित्त। भरद्वाजा! ॥९॥ श्रीरामकथा निर्वाणीं। आहे कलिमलहारिणी। तैसी कल्याणकारिणी। सुंदर महा ॥१०॥ मनु जो का स्वायंभुव। शतरूपा स्त्रीचें नांव। झाली नृसृष्टि अपूर्व।

ज्यापासुनी ॥११॥ धर्म आणि आचरण । त्या दांपत्याचें उत्तीर्ण । ज्यांची मर्यादा अजून । वेद गाती ॥१२॥ उत्तानपाद नांवाचा । नृप होता पुत्र त्यांचा । हरिभक्त ध्रुव ज्याचा । पुत्र झाला ॥१३॥ त्या मनूचा कनिष्ट सुत । ज्याचें नांव प्रियव्रत । वेदपुराणें ज्याप्रत । प्रसंशिती ॥१४॥ देवहुति या नांवाची । अन्य एक कन्या त्याची । जी कर्दमाख्य मुनीची । प्रिय पत्नी ॥१५॥ देवाधिदेव केवल । दीनांविषयीं दयाल । गर्भी कृपालु कपिल । धरिला जिनें ॥१६॥ सांख्यशास्त्राचें वर्णन । जेणें दाविलें प्रकटून । तत्त्वविचारनिपुण । भगवान् जो ॥१७॥ तोचि मुनि पृथ्वीवरी । बहुकाल राज्य करी । पाळुनी सर्वतोपरी । प्रभूची आज्ञा ॥१८॥ परि विषयांपासून । विरक्त न झालें मन । घरीं राहतां वृद्धपण । प्राप्त झालें ॥१९॥ (सेवितां कितीहि विषय । तृप्ति कदापि ना होय । ऐसें चाललें वय । वरचेवर ॥२०॥ गेलें तारुण्य लोटुनी । तृप्ति न वाटेचि मनीं । विषयभोग निशिदिनीं । रुचेना ॥२१॥ तारुण्यसीमा सरतां । प्राप्त होय वृद्धावस्था । विषयवासना सर्वथा । वृद्धि पावे ॥२२॥ नये विषयाचा कंटाळा । सदाहि तयाचा चाळा । चित्तीं तयाचाच लळा । अधिकाधिक ॥२३॥ मनु ऋषिवर्यों वरिष्ठ । स्मृतिकारांमाजीं श्रेष्ठ । नसे विवेकभ्रष्ट । विषयांध तो ॥२४॥ शास्त्रमर्यादा ज्या रीतीं । तैसें सेवी विषयाप्रति । तथापि नव्हेचि तृप्ति । हृदयांतरीं ॥२५॥ प्राप्त होतां वृद्धपण । करी आत्मनिरीक्षण । पश्चात्तापें अंतःकरण । तळमळें तें ॥२६॥) म्हणून त्याचें अंतर्याम । दुःख करीतसे परम । हरिभक्तिविना जन्म । गेला वृथा ॥२७॥ तेव्हां आग्रहें करून । राज्य दिलें पुत्रालागून । नारीसह करी गमन । वनांतरीं ॥२८॥

नैमिष नामें विख्यात । एक आहे श्रेष्ठ तीर्थ । सिद्धिप्रद अति पुनीत । साधकांसी ॥२९॥ मुनि-सिद्ध-समुदाय । त्या स्थलीं करी वास्तव्य । तेथें मनुराजा जाय । मुदित मनें ॥३०॥ ते मतिधीर दंपती । पथीं चालतां शोभती । जणुं ज्ञान आणि भक्ति । मूर्तिमंत ॥३१॥ पथीं चालतांचि भले । गोमतीच्या तीरा आले । हर्षें त्यांनीं स्नान केलें । विमल जलें ॥३२॥ आले भेटायालागुनी । सिद्ध, मुनि आणि ज्ञानी । धर्मधुरंधर जाणुनी । राजर्षि त्या ॥३३॥ ज्या ज्या ठायीं वनभर । तीर्थें होतीं मनोहर । मुनींनीं करविलीं सादर । सर्वहि तीं ॥३४॥ देह झाला कृश अति । वल्कलें तीं पांघरिती । नित्य पुराण ऐकती । सत्समाजीं ॥३५॥ ज्या महामंत्राप्रति । द्वादश अक्षरें असतीं । तयाचा जप करिती । प्रेमभरें ॥३६॥ वासुदेव भगवंत । तत्पदपंकजांप्रत । त्या दांपत्याचें अत्यंत । जडलें मन ॥३७॥ आहार करितां शुद्ध । शाक, फळे आणि कंद । स्मरती सच्चिदानंद । ब्रह्माप्रति ॥३८॥ (अवाङ्मानसगोचर । परब्रह्म परमेश्वर । जें स्वरूप निरंतर । अव्यक्तचि ॥३९॥ चिंतितां कीं न चिंतितां । जें स्वतःसिद्ध तत्वतां । त्याच्या चिंतनेंचि चित्ता । लय होय ॥४०॥ आकाश सर्वगतिक । तेंवि जें तत्त्व व्यापक । तच्चिंतनें अखंडैक । रसानंद ॥४१॥ जेथें इंद्रिय–मनाचा । प्रवेश न व्हावयाचा । त्या रूपाच्या दर्शनाचा । ध्यास लागे ॥४२॥ निर्गुणीं होतां अनन्य । स्वभावेंचि जन्म धन्य । कुणाहि उपासका मान्य । सदोदित ॥४३॥ परि त्यांत तृप्ति न वाटे । सगुण रूप केव्हां भेटे । तत्प्रात्यर्थ नेटें । यत्न करिती ॥४४॥) पुन्हां हरीस भेटावया । करूं लागले तपश्चर्या । फलमूलहि त्यागूनिया । जलाहारी ॥४५॥ ( देहधर्मा अनुसरून । जठराग्नि

जातां भडकून । जलचि करून प्राशन । शांतवावें ॥४६॥)
निरंतर हृदयास । हाचि जडे अभिलाष । दृष्टीं त्या परम प्रभूस ।
विलोकावें ॥४७॥ जो निर्गुण अखंडित । अनादि आणि अनंत ।
परमार्थवादी ज्याप्रत । चिंतितात ॥४८॥ 'नेति नेति' निर्विवाद ।
ज्यातें निरूपिती वेद । निरुपाधि, निजानंद । अनुपम जो ॥४९॥
श्रीशंभु, चतुरानन । विष्णु षड्गुणैश्वर्यसंपन्न । जयाच्या अंशा-
पासून । होती नाना ॥५०॥ ऐसा महान् जगदीश । सेवकांतें
होतो वश । लीलेनें धरी देहास । भक्तास्तव ॥५१॥ जें हें
श्रुतीचें भाष्य । असेल सत्य निर्देश्य । आमुची इच्छा अवश्य ।
करील पूर्ण ॥५२॥ (व्हावा ईश्वर प्रत्यक्ष । ऐसा धरून कटाक्ष ।
घोर तपाचरणीं दक्ष । सदोदित ॥५३॥) तप करितां ऐशापरीं ।
वर्षें सहा सहस्रांवरी । राहूनिया जलाहारी । लोटलीं तीं ॥५४॥
सप्तसहस्र संवत् । तप तपून अत्यंत । राहिले ते वायुप्रत ।
भक्षूनिया ॥५५॥ संवत् दशसहस्र । त्यागून वायूचा आहार ।
उभे एका पायावर । उभयतांहि ॥५६॥ ब्रह्मा, विष्णु, महेश्वर ।
तप पाहून अपार । येते झाले बहुवार । मनुसमीप ॥५७॥
'मागा मागा वराप्रति' । लोभविलें नानारीतीं । चाळवितां ~~छिन्न~~
चळती । परम धीर– ॥५८॥ तप करितां अहोरात्र । देह झाला
अस्थिमात्र । परि मनीं तिळमात्र । उद्वेग ना ॥५९॥ सर्वज्ञ
जगन्नायक । जाणून निजसेवक । तपस्वी अनन्यगतिक । दांपत्य
तें ॥६०॥ 'वर मागा हो' म्हणुनी । झाली तेव्हां नभोवाणी ।
जी कृपामृतें भरुनी । गंभीर अति ॥६१॥ मृतास देई जीवन ।
ऐसें सुंदर वचन । हृदयीं गेलें बिंबून । श्रवणरंध्रें ॥६२॥
उभयतांचें शरीर । तें हृष्ट, पुष्ट, सुंदर । नुकतेंच सोडून घर ।
आलें जणुं ॥६३॥ श्रवणामृतासमान । ऐकूनिया तें वचन । गात्रें

पुलकायमान । प्रफुल्लित ॥६४॥ दंडवत् प्रणाम करी । मनु वदे तदवसरीं । प्रेम तें हृदयांतरीं । समावें ना ॥६५॥ "भक्तकाम-कल्पद्रुमा ! । कामधेनु तूं सकामा । वंदिती हरिहरब्रह्मा । त्वत्पद-रजा ॥६६॥ सुलभ तूं सेवा करितां । सर्वांसहि सुखदाता । ऐक चराचरनाथा ! । नतरक्षका! ॥६७॥ हे अनाथहितकारी! । प्रेम जरी आम्हांवरी । ऐसा वर द्यावा तरी । प्रसन्नपणें ॥६८॥ जें स्वरूप शिवमनीं । विराजतें रात्रं-दिनीं । प्रयत्न करिती मुनि । ज्याकारणें ॥६९॥ भुशुंडीमनोमानसीं । विहरे जें हंसा-सरसीं । सगुणनिर्गुण ज्यासी । म्हणती वेद ॥७०॥ आम्ही त्या स्वरूपालागून । पाहूं इच्छितों डोळे भरून । हे नतदुःखविमोचन! । कृपा करी" ॥७१॥ त्या दांपत्याचें भाषण । रुचलें अत्यंत जाण । मृदु, विनयें परिपूर्ण । प्रेमरसें ॥७२॥ भक्तवत्सल नारायण । जो का करुणानिधान । विश्वव्यापक भगवान् । प्रकटलासे ॥७३॥ विकसित नीलकमल । सुरत्ननील सुढाळ । श्यामवर्ण जणुं सजल । मेघापरी ॥७४॥ ऐसी तनुशोभा दृष्टीं । पाहून लाजती पोटीं । प्रत्यक्ष कोटचानुकोटि । शतकाम ॥७५॥ पूर्ण शरच्चंद्रमा । जणुं सौंदर्याची सीमा । ऐसी वदनाची सुषमा । विराजते ॥७६॥ हनुवटी आणि कपोल । अति सुंदर कोमल । प्रभूचा कंठ नितळ । शंखापरी ॥७७॥ अरुणवर्णाचे अधर । दंत—नासिका सुंदर । लाजवी हास्य मधुर । चंद्रकिरणा ॥७८॥ नवविकसित पद्म । तेंवि सुंदर नेत्रयुग्म । दृष्टिक्षेप हृदयंगम । मनोहर ॥७९॥ कामधनु—शोभेप्रति । वक्र भृकुटि लाजविती । तिलक भालपटला-वरती । लकाकतो ॥८०॥ कुंडलें मकराकृति । मस्तकीं मुकुट शोभे अति । जणुं भ्रमरांच्या पंक्ति । कुटिल केश ॥८१॥ हृदयीं श्रीवत्सलांछन । वनमाला शोभायमान । त्यापरी रत्नभूषण ।

पदकहार ॥८२॥ ज्याच्या सिंहस्कंधावर । यज्ञोपवीत सुंदर । तेंवि भुज–अलंकार । मनोरम ॥८३॥ गजशुंडांच्यासमान । भुजदंड शोभायमान । कटीं भाता, धनुर्बाण । करांमाजीं ॥८४॥ चपलेस लाजविणार । शोभतसे पीतांबर । त्रिवली उदरावर । सुंदर अति ॥८५॥ मनोहरता नाभीची । जणुं घेत असे साची । शोभा यमुनावर्ताची । हरूनिया ॥८६॥ पदकमल निश्चितीं । वर्णितां न वर्णवती । मुनि–मनोभृंगतति । राहे जिथें ॥८७॥ शोभते वामभागासी । अनुकूल जी सेवेसी । जगत्कारण शोभाराशि । आदिशक्ति ॥८८॥ जिच्या अंशापासुनी । उद्भवल्या गुणखाणी । उमा, रमा, ब्रह्माणी । असंख्यात ॥८९॥ जिच्या भृकुटिविलासें । जगत् निर्माण होतसें । रामवामभागीं असे । तीच सीता ॥९०॥ (प्रकट झाला श्रीहरि । त्याच्या रूपाची माधुरी । वर्णिलीसे येथवरी । तुलसीदासें ॥९१॥ जे कोणी साधक जन । करिती प्रभूचें ध्यान । त्यांसी योजिलें साधन । अनायासें ॥९२॥ अथवा जी मूर्ति ध्यानीं । राहे मनीं निशिदिनीं । तीच प्रकटविली वर्णनीं । गोड कथा ॥९३॥) शोभासागर निरुतें । पाहून हरिरूपातें । न हालतां नेत्रपातें । राहिलें स्तब्ध ॥९४॥ अनुपम रूपाप्रति । अत्यादरें विलोकिती । मनुशतरूपा तृप्ति । मानिती ना ॥९५॥ हर्षयुक्त तें होऊन । विसरलें देहभान । पडती दंडवत् धरून । पाय, हातीं ॥९६॥ (ही अनन्य तन्मयता । मान्य झाली भगवंता । प्रकटाया वत्सलता । काय वेळ ? ॥९७॥) स्वकरपद्म उभवी । प्रभु त्याच्या शिरीं ठेवी । तत्काल त्यांसी उठवी । करुणानिधि ॥९८॥ मग तो कृपानिधान । बोले अभय वचन । "मजला अति प्रसन्न । जाणूनिया ॥ ९९ ॥ मानेल जो का चित्ता । तोच वर मागा

आतां । मजलागीं महादाता । मानूनिया" ॥१००॥ ऐकतां प्रभूचें वचन । दोन्ही करांतें जोडून । भूप बोले धैर्य धरून । नम्रपणें ॥१०१॥ "नाथा! पदाब्ज आपुलें । निजदृष्टीं विलोकिलें । आमुचे मनोरथ पुरले । सर्व आतां ॥१०२॥ (प्रभूचें होतां दर्शन । काय एक पडे न्यून । इच्छेसरिसें निधान । प्राप्त होय ॥१०३॥ असती विषयवासना । तरी न जाते तपोवना । वरिलेंसे त्यांच्या मना । विरक्तीनें ॥१०४॥ शुद्ध होतें त्यांचें मन । विषयवासनेवांचून । म्हणून झालें दर्शन । भगवंताचें-॥१०५॥ प्रभुवांचूनिया आतां । कुणा वस्तूची महत्तता । जिच्या प्राप्तीची चित्ता । गमेल रुचि ॥१०६॥ द्रव्येषणा, लोकेषणा । दारेषणा, पुत्रेषणा । ऐशा असती ईषणा । चतुर्विध ॥१०७॥ द्रव्येषणा व्हावी मनीं । राज्य टाकून आला वनीं । त्याचपरी ती टाकुनी । लोकेषणा ॥१०८॥ असावी ती दारेषणा । तरी शतरूपा अंगना । पतिव्रता आली वना । समागमें ॥१०९॥ पुत्रेषणा आतां एक । तरी नव्हता निपुत्रिक । राज्य दिधलें निःशंक । स्वसुताप्रति ॥११०॥ कोणतीहि ती न्यूनता । उरली नसे पाहतां । वर म्हणून भगवंता । मागावी जी ॥१११॥ चित्तीं नसतां वासना । कैसी करावी याचना । हीन पडे विवंचना । तिळमात्रहि ॥११२॥ प्राप्त होतें जरी सर्व । त्यांचा टाकूनिया गर्व । मागूं इच्छितो अपूर्व । वरदान तें ॥११३॥ भूप मनु धन्य धन्य । प्रभूस शरण अनन्य । त्या सोडूनिया अन्य । न मागे वर ॥११४) "एक मात्र आशा अति । वास करी माझ्या चित्तीं । सुलभ किंवा दुर्लभ ती । सांगतां नये ॥११५॥ पूर्ण करितां तुजप्रति । स्वामिन्! ती सुलभ अति । मत्कार्पण्यें मजसी ती । दुर्लभ गमे ॥११६॥

ज्यापरी दरिद्र्याप्रति । होतां कल्पतरुप्राप्ति । मागतां बहु संपत्ति । संकोच गमे ॥११७॥ कल्पवृक्षाची महति । न कळे त्या दरिद्र्या-प्रति । तैसा माझ्याहि चित्तीं । संशय उरे ॥११८॥ हें सर्वहि तूं जाणसी । अंतर्यामींच असती । तरी मन्मनोरथासी । पूर्ण करी" ॥११९॥ (भूपें निज अंतःस्थिति । निवेदिली प्रभु-प्रति । ती ऐकून रमापति । काय म्हणे ॥१२०॥) "नृपा! संकोच टाकून । माग मज वरदान । द्यावया मजलागून । अशक्य काय?" ॥१२१॥ (ऐकतां ऐसें अभय । भूप झाला निःसंशय । प्रभुपाशीं मागें काय? । श्रवण करा ॥१२२॥ "हे दात्यांचे शिरोमणि! । कृपानिधे वरदानी! । खरा हेतु जो मन्मनीं । सांगतों मी ॥१२३॥ पुत्र तुझ्याच समान । व्हावा, इच्छी माझें मन । लपवूं प्रभुपासून । काय तरी?" ॥१२४॥ भूपाची प्रीति पाहून । ऐकून अमूल्य वचन । बोलला कृपा-निधान । 'तथास्तु' असें ॥१२५॥ "माझ्यासम पुत्र दुजा । कोठें तरी शोधूं राजा! । मीच पुत्र होऊन तुझा । अव-तरेन" ॥१२६॥ शतरूपा बद्धांजलि । उभी ठेली बिलोकिली । तिजलागीं वनमाली । बोल म्हणे ॥१२७॥ "हे नाथ! नृपें चतुर । मागितला जो का वर । तोचि कृपाळा प्रियकर । मजहि अति ॥१२८॥ परि प्रभो! या समयास । होत आहे हें धाडस । भक्तहितहि तुम्हांस । अभीष्टचि ॥१२९॥ ब्रह्मादि-कांचे तुम्हीं । जनक आहां जगत्स्वामी! । जाणत्यें सर्वांतर्यामीं । परब्रह्म ॥१३०॥ ऐसें जाणूनिया पूर्ण । साशंक अंतःकरण । प्रभूची आज्ञा प्रमाण । तरीहि पुन्हां ॥१३१॥ सर्वज्ञासी सर्व ठावें । अज्ञात काय मागावें । तुम्ही मागावया सांगावें । म्हणून मागें ॥१३२॥ तरी हे नाथ! निःशंक । जे तुमचे निजसेवक ।

त्या जें प्राप्त होय सुख । जी परम गति- ॥१३३॥ तेंचि सुख, तीच गति । तीच निष्कलंक भक्ति । निजचरणाची प्रीति । तीच तशी ॥१३४॥ तीच सद्सद्विवेकमति । आणि प्रभो! तीच रीति । वितरावी आम्हांप्रति । करून कृपा ॥१३५॥ रचना जयाची सुंदर । ऐकून मृदु गूढतर । मृदु वचें कृपासागर । काय म्हणे ॥१३६॥ "जी तुमच्या मनांत । इच्छा असेल सांप्रत । तें मीं सर्व दिलें, यांत । संशय नाहीं" ॥१३७॥ (भक्तकामकल्प-वृक्ष । परमात्मा तो प्रत्यक्ष । याचिलेंच द्याया दक्ष । ऐसा नव्हे ॥१३८॥ न करितांहि याचना । वर देई भक्तजनां । करी जो ब्रह्मांडरचना । इच्छामात्रें ॥१३९॥ ऐसा समर्थ भगवंत । राज्ञी शतरूपाप्रत । मातृपद समर्पित । काय म्हणे ॥१४०॥) "माते! तुझा हा विवेक । खरोखर अलौकिक । कधीं न लोपे निःशंक । मदनुग्रहें" ॥१४१॥ वंदून चरणांप्रति । पुन्हां बोले मनु नृपति । "आणखी एक विनंति । प्रभो! माझी ॥१४२॥ पुत्रविषयक निश्चितीं । तुझ्या पदीं जडो प्रीति । महामूर्ख मजप्रति । म्हणोत कुणी ॥१४३॥ सर्प जैसा मण्याविण । कीं पाण्यावांचून मीन । तुझ्या आधीन जीवन । तैसें मम" ॥१४४॥ (पारखा होतांचि मणि । जिवंत न राहे फणी । आटून जातांच पाणी । मीन मरे ॥१४५॥ तैसा जीवनाचा योग । जरी दोघांचा संयोग । मृत्यु ठेविला, वियोग । घडतां क्षणीं ॥१४६॥) ऐसें मागून वरदान । चरण धरी कळवळून । बोले करुणानिधान । 'तथास्तु' असें ॥१४७॥ आतां मदनुशासन । तुम्ही उभयतां मानून । राहा अमरपुरीं जाऊन । देवेंद्राच्या ॥१४८॥ त्या अमरावतीभीतरीं । भोग भोगून नानापरी । कांहीं काल गेल्यावरी । पुढें ताता! – ॥१४९॥ आयोध्या नगरीं व्हाल ।

जेधवां हो तुम्ही नृपाल। तेधवां तुमचें बाळ। होईन मी ॥१५०॥ मी आपुल्या इच्छेपरी । होऊन नृदेहधारी। प्रकट होईन मंदिरीं। तुमच्या तैं ॥१५१॥ अंशासहवर्तमान । ताता! मी देह धरीन । भक्त-सुखद करीन । चरित्रातें ॥१५२॥ ज्यातें ऐकतां सादर । महा भाग्यवंत नर । तरती भवसागर । अहंमम-त्यागें ॥१५३॥ निर्मिलें जगताप्रति । जिनें ऐसी आदिशक्ति । ती अवतरेल निश्चितीं । मन्माया ही ॥१५४॥ तुमचें होऊन अपत्य । इच्छा पुरवीन अगत्य । प्रतिज्ञा माझी सत्य । त्रिवार ही" ॥१५५॥ यापरीं कृपानिधान । पुनःपुन्हां आश्वासून । भगवान् तो अंतर्धान। पावलासे ॥१५६॥ तें दांपत्य हृदंतरीं । भक्तकृपाळातें धरी । त्या आश्रमीं वास करी । कांहीं काल ॥१५७॥ योग्य कालीं येतां मरण । देह त्यागिती कष्टाविण । वास करिती जाऊन । इंद्रलोकीं ॥१५८॥ श्रीयाज्ञवल्क्य म्हणती । "हा इतिहास पवित्र अति । शिवानें पार्वतीप्रति । निवेदिला ॥१५९॥ भरद्वाज मुनिवरा!। आणिक एक श्रवण करा । कारण घडलें रघुवीरा । अवतराया ॥१६०॥ ऐका ऐका मुनिनाथा! । प्राचीन पुनीत कथा । जी शिव झाला वर्णितां । पार्वतीप्रति ॥१६१॥ कैकय नामधारक । विश्वख्यात देश एक । होता सत्यकेतु नामक । भूप तेथें ॥१६२॥ महा धर्म-धुरंधर । केवल नीति भांडार । तेजस्वी, प्रतापी थोर । सुशील, बली ॥१६३॥ त्या झाले दोन कुमार । दोघेहि असती वीर । सर्व गुणांचें मंदिर । रणधीर महा ॥१६४॥ जो का राज्याधिकारी । ज्येष्ट सुत त्याभीतरीं । प्रतापभानु यापरीं । नाम त्याचें ॥१६५॥ अरिमर्दन नांवाचा । दुसरा पुत्र तयाचा । अतुल बाहुबलाचा । स्थिर युद्धीं ॥१६६॥ भावांभावांत निपट । मैत्री होती घनदाट।

निर्दोष आणि निष्कपट । प्रेम त्यांचें ॥१६७॥ प्रतापभानु ज्या नांव । राज्य अर्पून त्या राव । स्वयें हरिप्राप्तिस्तव । जाय वनीं ॥१६८॥ प्रतापभानु कुमार । झाला जेव्हां नृपवर । त्याची द्वाही देशभर । पसरलीसे ॥१६९॥ वेद मार्गास धरून । तो करी प्रजापालन । राहिला न राज्यांतून । पापलेश ॥१७०॥ (पाळून वेदमर्यादा । भोगितां राज्यसंपदा । तेथें संपर्क न कदा । पातकाचा ॥१७१॥ वेदें कथिलें तें करावें । निषेधिलें तें त्यागावें । ऐसें वागतां स्वभावें । दुःख कोठें? ॥१७२॥ दुःख पातकाचें फळ । पापें होय तें प्रबळ । वेदमार्गानें केवळ । सुखचि होय ॥१७३॥ त्या वेदमार्गें वर्ततां । नुरली पापांची वार्ता । ऐसा योग्य राज्यकर्ता । प्रतापभानु ॥१७४॥) राजाचा हितकारक । शहाणा सचिव एक । तो धर्मरुचि नामक । शुक्र-सम ॥१७५॥ प्रधान शहाणा फार । बंधुहि बलिष्ट वीर । स्वयें प्रतापी रणधीर । प्रतापभानु ॥१७६॥ चतुरंग दळभार । समागमेंहि अपार । अमित योद्धे झुंजार । सर्वहि रणीं ॥१७७॥ (शिर घेऊन तळहातीं । मारितां मारितां मरती । ते झुंजार म्हणविती । रणांगणीं ॥१७८॥ व्हावया राज्यरक्षण । योजिलासे सेनागण । केवळ न कराया भक्षण । आयतेंचि ॥१७९॥ कसें तरी जगायाचें । केव्हां तरी मरायाचें । जीवन हें कंठायाचें । कसें तरी ॥१८०॥ ऐसी अनास्था अंतरीं । ते सैनिक कैशापरी । माराया न जाती समरीं । मरायासचि ॥१८१॥ प्रतापभानूचे सैनिक । ऐसे नव्हते निःशंक । शत्रूस जयांचा धाक । रणां-गणीं ॥१८२॥ विलोकून निजसेना । हर्ष झाला भूपमना । वाजतीतेधवां नाना । रणवाद्यें ॥१८३॥ करावया दिग्विजय । घेई सैन्यसमुदाय । सुमुहूर्तीं निघे राय । वाद्यघोषें ॥१८४॥

ठायीं ठायीं भयानक । युद्धें माजलीं अनेक । जिंकिले बलपूर्वक । सर्व राजे ॥१८५॥ सप्तद्वीप वश केले। केवळ स्वबाहुबळें । दंड घेऊन सोडिले । भूप त्यानें ॥१८६॥ ऐशापरी तया कालीं । सकलहि भूमंडलीं । एक प्रतापभानु बली । सार्वभौम ॥१८७॥ बाहुबलें निजवश । करून सर्व विश्वास । स्वनगरीं तो प्रवेश । करीतसे ॥१८८॥ धर्म-अर्थ-कामत्रय । पुरुषार्थांचें सुख होय । तें भूपति यथासमय । सेवीतसे ॥१८९॥ (एक काम दुजा अर्थ । ऐसे दोन पुरुषार्थ । प्रपंचीं साधाया स्वार्थ । योग्य होती ॥१९०॥ तेथें धर्मप्रयोजन । आवश्यक काय म्हणून । आशंका घेतसे मन । अनाठायीं ॥१९१॥ केवळ हे अर्थ-काम । पुरुषार्थांचें जें युग्म । सुखाचि देई निस्सीम । हेंहि न घडें ॥१९२॥ केवळ काम आणि अर्थ । दोन मुख्य पुरुषार्थ । तेथें घडतो अनर्थ । निश्चयानें ॥१९३॥ नसतां धर्मबंधन । हे जे पुरुषार्थ दोन । देती निश्चयेंकरून । दुःख मात्र ॥१९४॥ धर्माचेंच अधिष्ठान तरी हे पुरुषार्थ दोन । निर्भेळ सुखालागून । द्याया पात्र ॥१९५॥) प्रतापभानु नृपराय । याचा पावून आश्रय । कामधेनुपरी होय । सुखद धरा ॥१९६॥ गुरु, देव, संतजन । पितर आणि ब्राह्मण । भूप सर्वांचें सेवन । करी सदा ॥१९७॥ (गुरूसी तनु अर्पण । पितृदेवां यज्ञतर्पण । अन्नें तृप्त करी ब्राह्मण । संतजन ॥१९८॥) जितुके वेदविहित । ते ते धर्म नृपनाथ । सादर आचरी समस्त । उल्लासानें ॥१९९॥ दानें तैसीं नानापरी । देतसे प्रतिवासरीं । वेद-पुराणें श्रवण करी । तैशीं शास्त्रें ॥२००॥ वापी, कूप घरोघर । सरोवरेंहि अपार । तैसीं उद्यानें सुंदर । पुष्पवाटिका ॥२०१॥ ब्राह्मणाकारणें घरें । देवादिकांचीं मंदिरें । सकल तीर्थें विचित्रें । बांधविलीं ॥२०२॥ श्रुतिपुराणांभीतरीं ।

सांगितलें जैशापरीं । एकूण एक बहुपरी । यज्ञयाग ॥२०३॥ एकेक सहस्रवार । ते ते याग नृपवर । करिता झाला सादर । प्रेमपूर्वक ॥२०४॥ तयाच्या हृदयीं कांहीं । फळाची अपेक्षा नाहीं । परम ज्ञाता विवेकीहि । प्रतापभानु ॥२०५॥ निज मनोवाचेंकरून । जें धर्मकर्माचरण । करी वासुदेवार्पण । ज्ञानी नृप ॥२०६॥ एकदां तो नृपवर । बसून मोठ्या अश्वावर । घेऊन सर्व संभार । मृगयेचा ॥२०७॥ विंध्याचलाचें घोर वन । तेथें करून गमन । मारी मेध्य मृगां-लागून । कितीतरी ॥२०८॥ फिरतां फिरतां वनांत । वराह पाही नृपनाथ । ग्रासूं पाही चंद्राप्रत । राहूच जणुं ॥२०९॥ शशि आकारें विशेष । मुखीं न होय समावेश । जणुं तोहि क्रोधवश । न वमी त्या ॥२१०॥ त्या वराहाचें दर्शन । कथिलें भयंकर म्हणून । देहहि विशेषेंकरून । विशाल पुष्ट ॥२११॥ अश्वाचा होतां स्वन । तो फुरफुराट ऐकून । विलोकी, आश्चर्यें कान । टवकारुनी ॥२१२॥ पर्वत जो नीलवर्ण । त्याच्या शिखरा-समान । विशाल वराहालागून । अवलोकितां– ॥२१३॥ नृपें चाबुक मारून । अश्व वेगें दामटून । म्हणे 'वराहा! निभाव न । आतां तुझा' ॥२१४॥ अधिकचि खिंकाळत । येतां पाही अश्वाप्रत । वराह चाले पळत । वायुवेगें ॥२१५॥ भूपानें त्वरें-करून । साधितां शरसंधान होई । बाण विलोकून । भुई-सपाट ॥२१६॥ नेम धरून समोर । राजा सोडीतसे शर । वराह वाचवी शरीर । कौशल्यानें ॥२१७॥ केव्हां प्रकट होतसे । केव्हां लपून पळतसे । भूप क्रोधें करीतसे । पाठलाग ॥२१८॥ वराह बहु दुरी । घोर अरण्याभीतरीं । गजाश्वासी तिळभरी । रीघ न जिथें ॥२१९॥ अगदीं एकला वनांत । क्लेश तैसे अतोनात ।

पिच्छा न सोडी नृपनाथ । सावजाचा ॥२२०॥ राजाची भारी चिकाटी । पाहून वराह शेवटीं । शिरे खोल गिरिकपाटीं । पळूनिया ॥२२१॥ मार्ग खुंटतां तो भूप । करी फार पश्चात्ताप । परते वनीं आपोआप । मार्ग चुके ॥२२२॥ श्रमें होऊन क्लांत । क्षुधित तैसा तृषित । निज अश्वासमवेत । भूपति तो- ॥२२३॥ व्याकुल होऊन फार । शोधी सरित्सरोवर । जलाविण अतितर । विव्हल होय ॥२२४॥ फिरतां फिरतां वनांत । पाही एका आश्रमाप्रत । कपटमुनिवेषें जेथ । भूप राहे ॥२२५॥ प्रतापभानूनें निश्चित । हरिलें ज्याच्या राज्याप्रत । पळाला जो समरांत । सोडून सैन्य ॥२२६॥ प्रतापभानूसी काळ । जाणूनिया अनुकूल । आपणांसी प्रतिकूल । तैशापरी ॥२२७॥ मनीं विमनस्क होऊन । न गेला गृहालागून । भूपा न गेला शरण । स्वाभिमानें ॥२२८॥ (क्षत्रियासी रणांगणीं । शरणागति केविल-वाणी । पलायनाहून मरणीं । श्रेय महा ॥२२९॥ जयसंपादना करितां । कालाची प्रतिकूलता । त्याच निराशेनें चित्ता । उबग होय ॥२३०॥ पाठ दावून शत्रूसी । परतावें स्वगृहासी । आप्तां दावावें अपेशी । काय तोंड ? ॥२३१॥ त्याहून मरण बरें । परि देहलोभ नावरे । त्यजून राज्य, आप्त सारे । वनीं जाय ॥२३२॥ शत्रूस जावें शरण । मरणाहून तें मरण । स्वाभिमानी अंतःकरण । मान्य न करी । ॥२३३॥ ऐसा होऊन हताश । वना गेला तो नरेश । धरून कपटवेष । वसे तेथ ॥२३४॥ जरी धरी कपट वेष । शत्रुविषयींचा द्वेष । तो कैसा जाईल रोष । अंत-रींचा ॥२३५॥) रोष ठेवून स्वचित्तीं । रंकापरी तो भूपति । तापसवेषें करी वसती । अरण्यांत ॥२३६॥ त्या तापसाच्या समीप । जाऊन पोंचला भूप । तेणें जाणिलें 'प्रताप- । भानूच

हा' ॥२३७॥ तृषाव्याकुल भूपानें । नोळखिलें त्याकारणें । सुवेष पाहून जाणे । महामुनि हा ॥२३८॥ घोड्यावरून उतरून । त्या करीतसे वंदन । स्वनाम न करी कथन । महाचतुर ॥२३९॥ (प्रतापभानु भूपति । जाणे योग्य राज्यनीति । म्हणून वागे या रीतीं । चातुर्यानें ॥२४०॥) तृषाक्रांत नृपवर । जाणून हें मुनिवर । दावीतसे सरोवर । तयाप्रति ॥२४१॥ अश्वासमवेत स्नान । पोटभरी जलपान । भूपति घेई करून । आनंदानें ॥२४२॥ सर्व श्रम परिहार । तेणें सुखी नृपवर । नेई तया मुनिवर । निजाश्रमीं ॥२४३॥ देई बसाया आसन । जाणूनिया अस्तमान । तपस्वी करी भाषण । मधुर वचें ॥२४४॥ "सांग तूं कोण अससी । वनीं एकाकी भटकसी । जीवावर उदार होसी । सुंदर तरुण? ॥२४५॥ चक्रवर्ति लक्षणेंहि । दिसतात तुझ्या ठायीं । दया उपजे मद्हृदयीं । पाहून तुज ॥२४६॥" (ऐकून तापसाचा प्रश्न । मनीं पावे समाधान । बोलता झाला वचन । प्रतापभानु ॥२४७॥ पूर्वीं नाम न कथिलें । त्याच चातुर्यानें भलें । प्रतापभानूनें केलें । निवेदन ॥२४८॥) "प्रतापभानु नांवाचा । राजा एक असे साचा । ऐका मुनीश्वरा ! त्याचा । प्रधान मी ॥२४९॥ (जरी जाणे राजनीति । परि पाहून मुनिप्रति । निष्कपट बोले उक्ति । भाविकपणें ॥२५०॥) आम्हां अभाग्यांलागून । दुर्लभ तुमचें दर्शन । कांहीं होणार कल्याण । ऐसें गमे" ॥२५१॥ "पडलासे अंधकार । ताता !" म्हणे मुनीश्वर । "सत्तर योजनें दूर । नगर तुझें ॥२५२॥ निशा पडे घोरतम । वन भयाण निस्सीम । मार्गहि नसे सुगम । ऐक सुज्ञा! ॥२५३॥ ऐसा जाणून अवसर । राहा येथें रात्रभर । उद्यां उजाडल्यावर । जावें गृहा ॥२५४॥" काय सांगूं अगा तुलसी! भवितव्यता ती

जैसी । परिस्थिति येते तैशी । घडूनिया ॥२५५॥ भवितव्य-ताचि स्वयें । त्याच्यापाशीं चालून ये । किंवा त्यासी निरुपायें । तेथ नेई ॥२५६॥ (अनुल्लंघ्य भवितव्यता । न टळेंचि टाळूं जातां । असंभाव्यहि तत्वतां । घडवीतसे ॥२५७॥) "बरें महाराज" म्हणून । अनुज्ञा शिरीं वंदून । अश्व वृक्षासी बांधून । बैसे नृप ॥२५८॥ नानाप्रकारें भूपति । प्रशंसी त्या मुनिप्रति । वर्णी स्वभाग्यमहति । वंदून पद ॥२५९॥ मृदु, सुंदर बहुवस । वच बोलतसे त्यास । "पिता मानून धाडस । करितों प्रभो! ॥२६०॥ तरी हे मुनिनायक! । जाणून सुत सेवक । कोण तुम्ही हे निःशंक । सांगा स्वामिन्" ॥२६१॥ नृपें नोळखिलें त्याप्रत । मुनीनें जाणिलें निश्चित । भूप सरळ, मुनि धूर्त । कपटी तसा । २६२॥ मुनीस आधीं वैरभाव । त्यांत क्षत्रिय आणि राव । स्वार्थानें कपटें डाव । साधूं इच्छी ॥२६३॥ स्मरे राज्यसुख स्वीय । आधींच दुःखी अतिशय । आव्यापरी तद्हृदय । जळे आतां ॥२६४॥ रायाचें सरळ भाषण । मुनीनें करितां श्रवण । होतां वैराचें स्मरण । हर्षे मनीं ॥२६५॥ कपट कालविलें ज्यांत । ऐशा मृदु वचाप्रत । मुनि तेव्हां युक्तियुक्त । बोलतसे ॥२६६॥ "ऐक राया! मजप्रत । भिकारी नाम सांप्रत । घरदारविरहित । निर्धन मी" ॥२६७॥ भूप वदे तैं वचन । "जे का विज्ञाननिधान । तैसे गलिताभिमान । तुम्हां-सम ॥२६८॥ ते ते आपणांकारणें । इच्छिती गुप्त ठेवणें । सर्वे-तोपरी ॥२६९॥ (प्रकटपणें वावरतां । वाढते मान-मान्यता । मान्यपणें स्वभावतां । पतन घडे ॥२७०॥ सोडून घरदारास । करून अमंगल वेष । टाकूनिया निजदेश । राहती वनीं ॥२७१॥) यास्तवचि संत-श्रुति । हांकारूनिया बोलती । प्रिय होय

हरिप्रति । अकिंचन ॥२७२॥ (ज्यासी नाहीं अहंपण । ममता गळाली संपूर्ण । झाली उभयतां बोळवण । अकिंचन तो ॥२७३॥) तुम्हांसाखिे निर्धन । जे दरिद्री गृहहीन । त्यांचा शिव–ब्रह्मालागून । संशय पडे ॥२७४॥ (हें दारिद्र्य की वैराग्य । दुर्भाग्य कीं महद्‌भाग्य । कळावया योग्यायोग्य । मार्ग नसे ॥२७५॥ बाह्य वेष, संभाषण । पाहून करून श्रवण । भूपाचें अंतःकरण । विश्वासलें ॥२७६॥) असाल ते असा तुम्ही । तुमच्या पदा मी नमी । आतां मजवरी स्वामी । कृपा करा" ॥२७७॥ भूपाची सहज प्रीति । अवलोकून या रीतीं । आपुल्या विषयीं निश्चितीं । विश्वास बहु ॥२७८॥ सर्व प्रकारें भूपास । आपुलासा करायास । अधिकाधिक स्नेहास । दावीतसे ॥२७९॥ (होतां मत्सराची वाढ । प्रवर्ते घ्यावयास सूड । सत्याची न ठेवी चाड । कपटपटु ॥२८०॥ विश्वास वाढून विशेष । भूप व्हावया निजवश । ठेवून अंतरीं द्वेष । काय म्हणे ॥२८१॥) "ऐक ऐक महिपाला ! । सद्‌भावें सांगतों तुला । बहुत काल लोटला । येथें मज ॥२८२॥ आजपर्यंत मजला । कुणीहि नसे भेटला । जाणविलें मी स्वतांला । कुणाहि ना ॥२८३॥ कांकीं लोकमान्यता । अग्निसमान तत्वतां । तपोरूप वनप्रांता । जाळीतसे" ॥२८४॥ म्हणती तुलसीदास । पाहूनिया सुवेषास । भूल पडते मूर्खास । चतुरास ना ॥२८५॥ यांचें पहा प्रत्यंतर । मोर दिसतो सुंदर । केका सुधेसम, मात्र । खाद्य सर्प ॥२८६॥ (वरी देखणा सुवेष । मुखींहि मधुरभाष । परि अंतरीं द्वेष । सूडबुद्धि ॥२८७॥ विश्वास संपादावया । वचनें पसरी माया । पुढें काय म्हणे राया । श्रवण करा ॥२८८॥) "या कारणेंच्च जगांत । राहिलों असे मी गुप्त । त्यजूनिया हरिप्रत । प्रयोजन काय ? ॥२८९॥ न सांगताहि

आगळें । प्रभुलागीं सर्व कळे । लोकरंजनें सांग मिळे । कवण सिद्धि ? ॥२९०॥ तूं तो पवित्र सन्मति । मज आवडसी अति । तुझीहि विश्वास-प्रीति । माझ्याचवरी ॥२९१॥ आतां मी तुजपासून । गुप्त स्वतांस ठेवीन । तरी लागे मजलागून । घोर पाप" ॥२९२॥ वैराग्याची जसजशी । गोष्ट सांगे तो तापसी । विश्वास जडे नृपासी । तैसा तैसा ॥२९३॥ तनुवाङ्मनेंकरून । स्ववश त्यानें जाणून । तापसी बोले वचन । बकध्यानी ॥२९४॥ "एकतनु अभिधान । बापा असे मजलागून" । ऐकतां पुन्हां वंदून । भूप म्हणे ॥२९५॥ "या नामाचा इत्थंभूत । विशद सांगा गुह्यार्थ । निस्सीम दास मजप्रत । जाणूनिया" ॥२९६॥ ( अनन्यता ही अंतरीं । जाणे भूपाची यापरी । तपस्वी कपटी भारी । काय म्हणे ॥२९७॥ ) सर्व सृष्टीचा प्रथम । जेव्हां जाहला उद्गम । माझाहि जाहला जन्म । त्याच वेळीं ॥२९८॥ याच हेतूनें विराजे । एकतनु नाम माझें । मी शरीर नाहीं दुजें । स्वीकारिलें ॥२९९॥ ( ऐकून हा चमत्कार । थक्क झाला नृपवर । तयासी गिरा गंभीर । वदे मुनीं ॥३००॥) "छे! छे! तूं निजांतरीं । याचें आश्चर्य न करीं । बाळा ! दुर्लभ नसे परि । तपापुढें ॥३०१॥ तपोबलें चतुरानन । सृष्टि करितो निर्माण । विष्णु करी परित्राण । तपोबलें ॥३०२॥ तपोबलेंचि शंकर । करी शेवटीं संहार । तपें सृष्टींत दुष्कर । कांहींच नसे" ॥३०३॥ हें ऐकून भूपाप्रति । भक्ति जडलीसे अति । तापसी तो कथा कथी । पुरातन ॥३०४॥ तैसे धर्मकर्मादिक । इतिहासहि अनेक । ठसवी वैराग्य-विवेक । निरूपणें ॥३०५॥ "उत्पत्ति-स्थिति-संहार । यांचाहि कथाप्रकार । आश्चर्यकारक अपार । वर्णीतसे ॥३०६॥ (ऐकतां मुनीचें व्याख्यान । साश्चर्य

भूपाचें मन । प्रशंसी तयाचें ज्ञान । अलौकिक ॥३०७॥ सृष्टि-आधीं ज्याचा जन्म । अघटित धर्मकर्म । याचें विचारितां वर्म। कुंठित मति ॥३०८॥ ऐसें तप, ऐसें ज्ञान । चिरंजीव तें जीवन। ऐसें वैराग्य गहन । वक्तृत्व ऐसें ॥३०९॥ हें सारेंचि अघटित। येतां तत्प्रत्ययाप्रत । प्रतापभानु चकित । होय मनीं ॥३१०॥ त्या तपस्व्याची महति !। खरी ठसली तच्चित्तीं । कपट, संशय-वृत्ति । मुळींच नुरे ॥३११॥ उलट त्याचा प्रभाव । हृदयाचा घेई ठाव । निष्कपट शुद्ध भाव । जडे पुन्हां ॥३१२॥ त्या विशुद्ध भावनेनें । पश्चात्ताप करी मनें । नांव चोरिलें चातुर्यानें । डांचे मनीं ॥३१३॥ भावना होतां विशुद्ध । झाला वाटे अपराध । कृपा–संपादना बाध । करी जो का ॥३१४॥ ज्ञात अथवा अज्ञात । घडलें पाप किंचित् । तयाच्या मार्जनाप्रत । उपाय तीन ॥३१५॥ पहिला तो पश्चाताप । जेणें नासे अर्धें पाप । उच्चारणें आपेआप । उपाय दुजा ॥३१६॥ तिसरा उपाय निश्चित । करणें तें प्रायश्चित्त । जेणें पाप उर्वरित । नष्ट होय ॥३१७॥ मुनीशीं कपट करून। चोरिलें जें अभिधान। तयाचा भूपालागून । पश्चात्ताप ॥३१८॥ पश्चात्ताप होतां मनीं। पापोच्चारास वदनीं । प्रवृत्त होय कथनीं । खरेंखरें ॥३१९॥)

निरूपण ऐकून महीश । झाला तापसासी वश । आपुलें नाम तयास । सांगतसे ॥३२०॥ "चुकलों मी महाराज। आतां राखा माझी लाज । मदपराधाची मज । क्षमा करा ॥३२१॥ राजनीतीस धरून । घडलें हें मद्वर्तन । नांव ठेविलें चोरून । जाणून मी ॥३२२॥ प्रतापभानूचा प्रधान । ऐसें केलें मीं कथन । परि माझेंचि अभिधान । प्रताप-भानु" ॥३२३॥ ऐसें पश्चात्तापयुक्त । नृप वदे छलत्यक्त ।

दोषापासूनिया मुक्त। होऊं इच्छी ॥३२४॥ ऐकून भूपाचें वचन। तरीहि शांतीस वरून। चातुर्ये करी भाषण। कपटपटु ॥३२५॥ तापसी म्हणे नृपाला। "मीं तों आळखिलें तुला। त्वां जें चोरिलें नांवाला। रुचलें मज ॥३२६॥ ऐक भूपते! या रीतीं। आहे मुळीं राजनीति। जेथें तेथें न सांगती। नाम नृप ॥३२७॥ माझी तरी अति प्रीति। जडलीसे तुजवरतीं। विचारितां निज चित्तीं। चातुर्य तुझें ॥३२८॥ (त्रिकालज्ञ स्वयमेव। ऐसा दावी आविर्भाव। त्याच्या पित्याचेंहि नांव। सांगतसे ॥३२९॥) प्रतापभानु म्हणून। तुझें स्वताचें अभिधान। तुझा पिता गेला होऊन। सत्यकेतु ॥३३०॥ गुरुप्रसादेंकरून। राया! सर्व ये कळून। स्वहानि होय म्हणून। सांगतां न ये ॥३३१॥ (स्वयें वर्णितां महति। हानि होय तपाप्रति। थोर पुण्य न वेंचिती। निष्कारण ॥३३२॥) स्वाभाविक सरलता। तुझी विलोकून ताता!। प्रीति, नीति, निपुणता। विश्वासहि ॥३३३॥ तुझ्या विषयीं ममता। उद्भवली माझ्या चित्ता। म्हणून कथिली कथा। तुझ्या प्रश्नें ॥३३४॥ मी सुप्रसन्न सांप्रत। संशय न धरीं किंचित्। इच्छा असे जी मनांत। माग राया!" ॥३३५॥ ऐकतां प्रिय वचन। भूपति हर्षायमान। विनवी पाय धरून। नानापरीं ॥३३६॥ "कृपासिंधो! मुनिनाथ!। तुमच्या दर्शनें येथ। झाले ~~ज्~~चारी पुरुषार्थ। हस्तगत ॥३३७॥ तथापि स्वामी-लागून। सुप्रसन्न विलोकून। शोकरहित होईन। दुर्लभ वरें ॥३३८॥ जरामृत्युदुःखरहित। होवो ऐसा देह स्थित। कुणींहि न समरांत। जिंको मज ॥३३९॥ शत्रुहीन महीवरी। निष्कंटकहि त्यापरी। चालो कल्पशतवरी। राज्य माझें" ॥३४०॥ (रायें मागतां वरदान। त्याच संधीस साधून। वर देई त्या-

लागून । कपटमुनि ॥३४१॥ देऊं जातां वरदाना । मनीं सूडाची कल्पना । त्याची सहज योजना । करीतसे ॥३४२॥ प्रसंग चमत्कारिक । आहे खरा आकर्षक । पुढील विश्रामीं भाविक । ऐकोत तो ॥३४३॥ (सोपानींचा मार्ग भला । जरी अति दीर्घ वाटला । तदर्थ नववा योजिला । विश्राम हा ॥३४४॥ रसिक भाविक श्रोत्यांस । विनवीतसे देवीदास । माझ्या बोबड्या बोलांस । मान्य करा ॥३४५॥)

—:०:—

# विश्राम १० वा

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्यो नमः
श्रीसीतारामचन्द्राभ्यां नमः

(रायें मागितला वर । त्याचें द्यावया उत्तर । तो कपटी मुनिवर । काय म्हणे ॥१॥) 'तथास्तु' म्हणे तापसी । "नृपा! इच्छिलें पावसी । परी कठिण गोष्ट ऐसी । तीहि ऐक ॥२॥ त्वत्पद प्रत्यक्ष काल । शिरीं धरून वंदील । एक सोडून विप्रकुल । महीप ते ॥३॥ तपोबलें सदोदित । ब्राह्मण ते बलवंत । रक्षिता त्यांच्या क्रोधांत । कुणीहि नसे ॥४॥ अगा! जरी तूं नृपते! । वश करिशील विप्रांतें । विधि–हरि–हर तूंतें । वश होती ॥५॥ ब्रह्मकुलासवें जाण । न चले वरचढपण । मी सत्य करितों भाषण । प्रतिज्ञेनें ॥६॥ भूपते! तूं करीं श्रवण । ब्राह्मणाच्या शापाविण । केव्हांहि न घडे जाण । नाश तुझा" ॥७॥

ऐकून मुनिवचन । राजा जाहला प्रसन्न । "स्वामिन् न होय येथून । नाश माझा ॥८॥ हे प्रभो! कृपानिधान! । तुमच्या प्रसादेंकरून । कल्याण मजलागून । सर्व काल" ॥९॥ यापरीं कपटमुनि । 'तथास्तु' ऐसें म्हणुनी । पुन्हां कुटिल वचनीं । बोलतसे ॥१०॥ "तुझी माझी झाली भेट । हें न करी कुणा प्रकट । प्रकटल्या होय उलट । दोष न मज" ॥११॥ या कारणें तुजप्रत । राया असे मी रोधित । प्रकटतां तुझा घात । होय महा ॥१२॥ त्वन्मुखें प्रकटपणीं । वार्ता होतांचि षट्कर्णी । नाश तुझा होय, वाणी । सत्य माझी ॥१३॥ हें प्रकट होय गुज । किंवा द्विजशाप तुज । एणें त्वन्नाश समज । प्रतापभानो! ॥१४॥ अन्य कारणानें कांहीं । नाश तुझा होणें नाहीं । कोपतां हरि-हरहि । निजमनांत" ॥१५॥ "खरेंच स्वामिन् हें वचन" । भूप बोले पाय धरून । "द्विजगुरुकोपापासून । कोण्ा रक्षी? ॥१६॥ जरी कोपला विधाता । तरी गुरु संरक्षिता । गुरुविरोधें कुणी त्राता । नाहीं जगीं ॥१७॥ तुमच्या अनुज्ञेपरी । मी न वागलों जरी । माझा नाश झाला तरी । दुःख नाहीं ॥१८॥ (परस्परभेटीची गोष्ट । षट्कर्णी होणें स्पष्ट । हें इष्ट आणि अनिष्ट । स्वाधीनचि ॥१९॥ तैसा नव्हे ब्रह्मशाप । चुकून घडतां पाप । तयाचा भोगणें ताप । अपरिहार्य ॥२०॥) एकाच भयें-करून । भयभीत माझें मन । प्रभो! अतिशय दारुण । ब्रह्म-शाप ॥२१॥ (ब्रह्मशाप तो दारुण । टाळाया एक कारण । वश करावे ब्राह्मण । सर्वां आधीं ॥२२॥ ब्राह्मण व्हावया वश । उपाय करणें अवश्य । तो पुसाया नरेश । प्रश्न करी ॥२३॥) कोणत्या उपायेंकरून । वश होतील ब्राह्मण । तेंहि कृपा करून । निवेदावें ॥२४॥ अहो हे दीनदयाला! । तुम्हां त्यजून आपुला ।

हितकर्ता न देखिला । अन्य कुणी" ॥२५॥ "ऐक नृपा ! नानापरी । यत्न असती भूवरी । कष्टसाध्य जरी परि । अनिश्चित ॥२६॥ तथापि अति सुगम । एक उपाय उत्तम । त्यांतहि कठिण वर्म । एक असे ॥२७॥ राया ! तें मात्र साधन । आहे माझ्याच स्वाधीन । त्वन्नगरीं माझें गमन । अशक्य परि ॥ २८॥ जेव्हां आलों जन्माप्रत । तैंपासून आजपर्यंत । कुणाच्या गृहीं, ग्रामांत । गेलों न मी ॥२९॥ जाणें झालें नाहीं जरी । तव कार्यहानि तरी । प्रसंग आला मजवरी । कठिण आज" ॥३०॥ हें ऐकतांच नृपति । बोलला विनम्र अति । "वेदीं कथिली नीति । नाथा ! अशी ॥३१॥ थोर असती ते प्रीति । करिती लहानावरतीं । गिरि तृणास धरिती । स्वशिरीं सदा ॥३२॥ अगाध असून सागर । फेन धरी शिरावर । पृथ्वी धरी निरंतर । धूल शिरीं" ॥३३॥ ऐसें बोलून भूपति । धरीतसे पदांप्रति । "हे स्वामिन् मजवरती । कृपा करा ॥३४॥ प्रभो ! मदर्थ म्हणून । कष्ट करा हो सहन । दयाळु तुम्ही सज्जन । दीनास्तव" ॥३५॥ आपुल्या तावडींत पूर्ण । भूप सांपडला जाणून । तापसी कपटी प्रवीण । काय म्हणे ॥३६॥ "ऐक ऐक गा भूपते ! । सत्यचि सांगतों तूंतें । जगीं दुर्लभसें मातें । कांहींच नसे ॥३७॥ तुझें जें का प्रयोजन । तें मी अवश्य करीन । तनुवाङ्मनेंकरून । मद्भक्त तूं ॥३८॥ तप-युक्ति-मंत्र-योग । सर्वांचा प्रभाव सांग । गुप्त करितां प्रयोग । फळासि ये ॥३९॥ मी स्वयंपाक करावा । तो तूं स्वयेंचि वाढावा । मी न ओळखिला जावा । कुणासहि ॥४०॥ जो जो ऐशा अन्नाप्रत । सेवील नर निश्चित । तो तो तुझा आज्ञांकित । होईल गा ! ॥४१॥ जो कुणी तयाचे घरीं । जाऊन भोजन

करी । तोहि त्वद्वश निर्धारीं । ऐक राया! ॥४२॥ तरी तूं जाऊन आतां । उपाय योजी नृपनाथा! । एक संवत्सरा करितां । संकल्प करीं ॥४३॥ प्रतिदिनीं नित्यनूतन । एक लक्ष ब्राह्मण । कुटुंबासहवर्तमान । निमंत्रावें ॥४४॥ त्वत्संकल्पानुसार । मीहि एक वर्षभर । स्वयंपाक करणार । प्रत्येक दिनीं ॥४५॥ या परीच्या उपायानें । राया! अल्प आयासानें । वश ब्राह्मणाकारणें । करिशील तूं ॥४६॥ हवन, यज्ञ-सेवन । करितील ते ब्राह्मण । जेणें वश देवगण । साहजिक ॥४७॥ त्यांतहि तुजकारणें । माझें आहे रे! सांगणें । या वेषानें माझें येणें । कधींहि नव्हें ॥४८॥ तुझा जो का पुरोहित । भूपते! मी तयाप्रत । हरून आणीन येथ । निज मायेनें ॥४९॥ तपोबलें त्यालागून । करून आपुल्या समान । एक वर्षभरी ठेवीन । याच ठायीं ॥५०॥ मग पुढें ऐक राया! । मी तद्वेष धरूनिया । साधीन गा! तुझ्या कार्या । सर्वतोपरी ॥५१॥ रात्र गेली लोटूनिया । निद्रा करीं या समया । तुझी माझी भेट राया । तिसरे दिनीं ॥५२॥ मी तपोबलें करून । अश्वासह तुजलागून । निद्रिस्तचि पोंचवीन । तुझ्या घरीं ॥५३॥ पुरोहिताच्या वेषानें । तेथें होय माझें येणें । तेव्हां त्वां मजकारणें । ओळखावें ॥५४॥ तेव्हां बघून एकांत । बोलावूनिया, समस्त । निवेदीन मी वृत्तांत । तुजलागुनी" ॥५५॥ मुनीची आज्ञा घेऊन । करी भूपति शयन । स्वासनीं बसे जाऊन । कपट मुनि ॥५६॥ श्रांत झालासे भूपति । निद्रा लागे गाढ अति । विवंचनेनें मुनिप्रति । निद्रा न ये ॥५७॥ (आतां उगवावा सूड । निश्चय हा झाला दृढ । त्यास कैंची निद्रा गाढ । प्राप्त होय ॥५८॥ योजिला जो मनोरथ । केव्हां जाय सिद्धिप्रत । तापसी या विचारांत । मग्न होय ॥५९॥ ) असो, कालकेतु

राक्षस । पातला त्या समयास । जेणें भटकविलें रायास। सूकरवेषें ॥६० त्या तापसी नृपाचा । तो परम मित्र साचा। कपटविद्येंत ज्याचा । हात खंडा ॥६१॥ त्या राक्षसाचे शतसुत। बंधूहि दहा त्याप्रत । देवपीडक, अजित । महा दुष्ट ॥६२॥ युद्धीं प्रथमचि भूपानें । मारिलें सर्वांकारणें । विप्र, संत, देवां जेणें । त्रस्त केलें ॥६३॥ तोहि दुष्ट निशाचर । साधाया मागील वैर । तापसी नृपाबरोबर । विचार करी ॥६४॥ जेणें होय शत्रुक्षय। ऐसाच योजिती उपाय । भावीवश परि राय। कांहीं नेणे ॥६५॥ स्वशत्रु तेजस्वी जरी । एकाकी असला तरी। क्षुद्र मानूं नये परि । तयाप्रति ॥६६॥ अद्यापहि दिसे स्पष्ट। चंद्रास देतसे कष्ट। राहूचें तें अवशिष्ट । शिरचि जरी ॥६७॥ असो, तापसी नृपनाथ। पाहून निज मित्राप्रत । उठून भेटे मुदित । सुखी होय ॥६८॥ मित्राकारणें समस्त । कथा करी निवेदित । राक्षस तो आनंदित । काय म्हणे ॥६९॥ "ऐक नरेशा ! सांप्रत । शत्रु झाला निजांकित । जें त्वां केलें यथा-स्थित । कथनानुसार ॥७०॥ सोड चिंतेची उपाधि । स्वस्थ झोप जा तूं आधीं। औषधाविण गेली व्याधि । दैवयोगें ॥७१॥ कुळासहवर्तमान । शत्रु निर्मूल करून । चौथे दिनीं मी येऊन। भेटेन तुज ॥७२॥ त्या तापसी नृपाप्रति । तोषवून बहुरीतीं। निघतसे क्रोधी अति । कपटी महा ॥७३॥ भानुप्रतापालागून। अश्वासहवर्तमान। घरीं पोंचवी नेऊन। क्षणामाजीं ॥७४॥ राणी समीप वहिलें। भूपासी पहुडविलें। अश्वा पागेंत बांधिलें। यथास्थित ॥७५॥ राजाचा जो पुरोहित । त्याच उपाध्याया-प्रत । घेऊन गेला तद्वत् । हरूनिया ॥७६॥ गिरिकंदरीं नेऊन। ठेवीतसे त्यालागून। त्याची बुद्धि भ्रंशवून। स्वमायेनें ॥७७॥

स्वयें आपण काय करी । पुरोहित–रूप धरी । सुंदर तच्छय्ये-वरी । जाऊन निजे ॥७८॥ दुजे दिनीं सुप्रभातीं । जागृत झाला भूपति । स्वगृह पाहून अति । आश्चर्य मानी ॥७९॥ तापसी मुनीची महति । जाणूनिया निजचित्तीं । न कळतां राणीप्रति । उठून जाय ॥८०॥ त्याच अश्वावरी बसून । वनांत करी गमन । पौर नारीनरांलागून । कळलें न तें ॥८१॥ लोटतां दोन प्रहर । परत आला नृपवर । उत्सव होय घरोघर । वाद्यघोषें ॥८२॥ ज्या समयीं रायाप्रत । दृष्टीं पडे पुरोहित । कार्यस्मृतीनें चकित । अवलोकी ॥८३॥ ( नूतन का पुरातन । ही न शंका घेई मन । वाटे तपस्वी–वचन । त्रिवार सत्य ॥८४॥) तेव्हां युगाच्या समान । लोटले ते दिन तीन । मुनीच्या पदीं लीन । बुद्धि त्याची ॥८५॥ समय जाणून निश्चित । प्राप्त झाला पुरोहित । भूपाप्रति सर्व वृत्त । कथीतसे ॥८६॥ ओळखितां गुरुप्रति । हर्षित झाला भूपति । भ्रमवशें नुरे चित्तीं । विचार तया ॥८७॥ पाचारिलें त्वरेंकरून । कुटुंबासहवर्तमान । लक्षावधि निमंत्रून । ब्रह्मवृंद ॥८८॥ पुरोहितें योजनाबद्ध । स्वयंपाक केला सिद्ध । षड्रस आणि चतुर्विध । श्रुत्युक्तिपरी ॥८९॥ आपुल्या मायेंकरून । तेणें शिजविलें अन्न । केले पदार्थ व्यंजन । अगण्य जे ॥९०॥ विविध पशूंचें आमिष । शिजवी तेव्हां राक्षस । तयांतचि विप्रमांस । रांधिलें खलें ॥९१॥ भोजनार्थ पाचारून । आणिले सर्व ब्राह्मण । आदरें पद क्षाळून । बैसवीले ॥९२॥ (पुरोहितें शिजवावें । भूपें स्वयेंचि वाढावें । पूर्वसंकेतें घडावें । क्रमप्राप्त ॥९३॥ ) ज्या समयीं अन्नाप्रति । वाढूं लागला भूपति । त्या क्षणीं झाली वरती । नभोवाणी ॥९४॥ "उठा विप्रहो ! समस्त । जा जा निजगृहांप्रत । अन्न खाऊं नका,

घात । थोर आहे ॥९५॥ विप्राचें मांस घालून । शिजविलें आहे अन्न" । उठले तें ते ब्राह्मण । विश्वासुनी ॥९६॥ (ऐकतां आकाशवाणी । नृपाच्या अंतःकरणीं । धडकीच गेली भरुनी । एकाएकीं ॥९७॥) विव्हल झाला भूपति । मोहें मूढ झाली मति । मुखें शब्द नुमटती । भावविवशें ॥९८॥ (तैशीच ती आकाशवाणी । पडतां विप्रांच्या श्रवणीं । उद्‌भवे अंतःकरणीं साश्चर्य क्रोध ॥९९॥) सक्रोध होऊन फार । बोलती तेव्हां द्विजवर । कांहीं न करितां विचार । त्याविषयीं ॥१००॥ "अहा ! भूपा, तूं भूवर । सहकुटुंब–परिवार । जा होशील निशाचर । मूढमते !" ॥१०१॥ "अहारे ! क्षत्रियधामा !। तूं बाहून विप्रोत्तमां । लावीत होतास कालिमा । सपरिवार ॥१०२॥ आमचें धर्मरक्षण । ईश्वरानें केलें पूर्ण । तूं मात्र पावसी मरण । सपरिवार ॥१०३॥ एकाच संवत्सरांत । त्वन्नाश होय निश्चित । पाणी द्याया त्वत्कुलांत । नुरेल कोणी" ॥१०४॥ शाप पडतांच कानीं । भयें व्याकुल नृमणि । सुंदर आकाशवाणी । होय पुन्हां ॥१०५॥ "विप्रहो ! विचार टाकून । न बोललां शाप-वचन । कांहीं केला अन्याय न । भूपतीनें" ॥१०६॥ (मांस-मिश्रित पक्वान्नें । स्वयें वाढिलीं नृपानें । तरी त्या नभोवाणी म्हणे । निरपराधी ॥१०७॥) ऐकतां नभोवाणीप्रत । विप्र तें झाले चकित । भूपति पाकशाळेंत । जाऊन बघे ॥१०८॥ तेथें अन्नहि न दिसे । पाककर्ता तोहि नसे । अति सचिंत मानसें । परत येई ॥१०९॥ मग सर्वहि वृत्तान्त । निवेदून विप्रांप्रत । होई व्याकुल, त्रस्त । भूवरी पडे ॥११०॥ (तो निरपराधी नृप । खरें पाहतां निष्पाप । परि तया दिला शाप ब्राह्मणांनीं ॥१११॥) "भवितव्यता कधींहि । भूपते ! न टळे पाहीं ।

जरी तुझा अत्यल्पहि । दोष नाहीं ॥११२॥ टाळाया यत्न करितां । मुळीं न टळे सर्वथा । हा विप्रशाप तत्त्वतां । घोर अति" ॥११३॥ ऐसें भूदेव बोलले । तेथून चालते झाले । मग हें वृत्त कळलें । पौरजनां ॥११४॥ तेहि चिंताग्रस्त होती । दैवासचि दोष देती । जें रचितां हंसाप्रति । काक करी ॥११५॥ ( विपरीत दैवगति । तेव्हां ते अनुभविती । प्रतापभानूची स्थिति । अवलोकुनी ॥११६॥ पुण्यात्मा भूप तत्त्वतां । व्हावा स्वर्गींची देवता । बलीयसी दैवसत्ता । असुर बने ॥११७॥ ) मग पुरोहितालागुनी । स्वसदनीं पोंचवुनी । राक्षस कळवी जाउनी । तापसातें ॥११८॥ (श्रवण करितांचि वृत्त । तापसी झाला प्रमुदित । योजिलें कार्य जें त्यांत । आलें यश ॥११९॥ मग तेथें काय उशीर । कशाचा उरतो धीर । पुढीलहि समाचार । श्रवण करा ॥१२०॥ ) पत्र लिहून त्या खलें । जेथें तेथें पाठविलें । ससैन्य सर्वहि आले । भूप तेथें ॥१२१॥ रणवाद्यें वाजवून । घेरिती नगरालागून । नित्य माजलें कंदन । नानापरीं ॥१२२॥ झुंजले सर्व सुभट । युद्ध करून अचाट । भूप तें बंधुसकट । पडला रणीं ॥१२३॥ सत्यकेतूच्या कुलांत । कोणी नुरला जिवंत । कैसा होय मिथ्याभूत । विप्रशाप ॥१२४॥ जिंकूनिया शत्रुप्रति । । नगर वसवून भूपति । यशोजय पावून जाती । स्वपुरासी ॥१२५॥ भरद्वाजा ! श्रवण करा । जयासी ज्या अवसरां । विधाता तो पाठमोरा । होत असे– ॥१२६॥ धूळ मेरूगिरिसम । जन्मदाता जैसा यम । सर्पापरी होय दाम । तयाप्रति ॥१२७॥ ऐका मुने ! तोचि राय । प्राप्त होतांचि समय । सहपरिवार होय । निशाचर ॥१२८॥ दहा मस्तकें जयास । भुजदंड तैसे वीस । चंड शूर, वीर ज्यास । रावण

नाम ॥१२९॥ भूपाचा अनुज जाण । नाम ज्याचें अरिमर्दन । तो बलिष्ट कुंभकर्ण । झाला असे ॥१३०॥ धर्मरुचि या नांवाचा प्रधान होता जो त्याचा । अनुज झालासे साचा । सापत्न तो ॥१३१॥ नाम ज्याचें बिभीषण । जग जाणे ज्यालागून । जो का विज्ञाननिधान। विष्णुभक्त ॥१३२॥ रायाचे सुत-सेवक । होते जे का अनेक । झाले घोर भयानक । राक्षस ते ॥१३३॥ दुष्टांच्या अनेक जाति । इच्छिल्या रूपा धरिती । कुटिल भयंकर अति । विवेकहीन ॥१३४॥ निर्दयी आणि हिंसक । महापापी सकलिक । अविश्वासी,तापदायक। अवर्णनीय ॥१३५॥ पुलस्त्याच्या सत्कुलांत । जरी आले जन्माप्रत । जें का निर्मल, पुनीत । निरुपम ॥१३६॥ तथापि ब्राह्मणशाप । त्या योगानें आपेआप । होते झाले पापरूप । सर्वहि ते ॥१३७॥ तिघांहि बंधूंनीं भलें । नानापरीं तप केलें । महाकठिण, वर्णिलें । नच जाय तें ॥१३८॥ (तप करितां नानाविधि । होते मनोरथ-सिद्धि । हा तो सिद्धान्त प्रसिद्धी । पावलासे ॥१३९॥ त्याचा जाणून प्रभाव । देव, दानव, मानव । यक्ष, किन्नर, गंधर्व । करिती तप ॥१४०॥ तप म्हणजे तापन । देह-मनाचें दंडन । जेणें होतसे वर्धन । सामर्थ्याचें ॥१४१॥ तें सामर्थ्य प्राप्त होतां । समर्थ देवांची सत्ता । मिळावयाची पात्रता । प्राप्त होय ॥१४२॥ समर्थ देवांची सत्ता । कनिष्ठासी प्राप्त होतां । सृष्टिक्रमीं अनवस्था । प्रसंग ये ॥१४३॥ ती अनवस्था झाल्यास । ब्रह्मा, विष्णु आणि महेश । सहजचि लघुत्वास । प्राप्त होती ॥१४४॥ तैसा प्रसंग न यावा । म्हणूनिया तिन्ही देवां । दक्षता ठेवणें तेव्हां । भाग पडे ॥१४५॥ तेव्हां होऊन प्रसन्न । देती अभीष्ट वरदान । जेणें तपःप्रयोजन । नुरेंचि पुढें ॥१४६॥ तिघांहि बंधूंचें तप । जेधवां झालें अमूप ।

ब्रह्मदेव आपोआप । प्रसन्न होय ॥१४७॥) त्यांचें तप विलोकून । निकट जाई चतुरानन । म्हणे, "मी सुप्रसन्न । मागा वर"॥१४८॥ धरूनिया पदांप्रति । रावण करी विनंति । "जगदीशा"! वदे उक्ति । श्रवण करा ॥१४९॥ "आम्हां कुणाहिकडून । मारितां न यावें मरण । नरवानर सोडून । दोन जाति" ॥१५०॥ (व्याघ्र–सिंह–सर्पादिक । पृथ्व्यादि पंचभौतिक । मृत्यूस कारण निःशंक । समर्थ हे ॥१५१॥ या सर्वांच्या पुढतीं । नर–वानर निश्चितीं । या जातींची कथा किती । नाशकार्यीं ? ॥१५२॥ म्हणून तो दशशिर । वर्जून नर–वानर । होऊं पाही स्वयें अमर । वरप्रतापें ॥१५३॥) 'तथास्तु' म्हणे चतुरानन । "तुम्ही तप केलें गहन । म्यां विधात्यानें भेटून । दिधला वर ॥१५४॥ कुंभ-कर्णाकडें नंतर । जातां झाला चतुर्वक्त्र । त्या पाहतां गमे फार । आश्चर्य मनीं ॥१५५॥ (तें अवाढव्य शरीर । बलहि तैसें अपार । तप आचरिलें घोर । तयांतचि ॥१५६॥ आश्चर्यानें तो विधाता । त्या कुंभकर्णाकरितां । भयें विचारी स्वचित्ता । प्रश्न एक ॥१५७॥) कीं हा दुष्ट निशाचर । नित्य करील आहार । तरी हा सारा संसार । नष्ट होय ॥१५८॥ प्रेरून सरस्वतीस । करी त्याचा बुद्धिभ्रंश । तेणें निद्राचि षण्मास । मागितली ॥१५९॥ कमलोद्भव नंतर । जाई बिभीषणासमोर । म्हणे, 'पुत्रा! माग वर । तूंहि कांहीं' ॥१६०॥ तेणें याचिलें वरा-प्रति । "भगवत्पदाब्जावरती । माझी असावी प्रीति । निर्मल अति" ॥१६१॥ (धर्मरुचि नांवाचा । प्रधान गतजन्मींचा । तेणें हा सत्त्वगुणाचा । याचिला वर ॥१६२॥ निर्मल प्रीतिलक्षण । कामनारहित पूर्ण । अखंड अनन्यपण । अव्यभिचारी ॥१६३॥) तिघांहि देऊन वर । जाता झाला चतुर्वक्त्र । पावले सहर्षभर ।

स्वगृहास ते ॥१६४॥ मयासुराची कन्यका । मंदोदरी नामें जी का । परम सुंदरी, प्रमुखा । स्त्रियांतरीं ॥१६५॥ मयासुरानें कन्या ती । अर्पिली रावणाप्रति । होय राक्षसाधिपति । जाणूनिया ॥१६६॥ उत्कृष्ट लाभतां नारी । रावणासी मोद भारी । दोघांहि बंधूंचे करी । विवाह मग ॥१६७॥ असो, समुद्राभीतरीं । त्रिकूटपर्वतावरी । एक गड होता भारी । विधि-निर्मित ॥१६८॥ पुनरपि मयासुरानें । शृंगारिलें त्याकारणें । हेमखचित रत्नभवनें । अपार तिथें ॥१६९॥ नागकुलाची वसती । पाताळांत भोगावती । इंद्राची अमरावती । स्वर्गीं जशी ॥१७०॥ किंबहुना त्याहूनिया । अधिक रम्यता जया । विश्वख्यात नाम तया । 'लंका' ऐसें ॥१७१॥ समुद्राचें अति थोर । खंदक महा गंभीर । लंकादुर्गाच्या चौफेर । भोंव-तालीं ॥१७२॥ रत्नखचित बळकट । सुवर्णाचा तया कोट । वर्णूं जातां दुर्घट । शिल्पकला ॥१७३॥ हरिप्रेरणेपरी । जो ज्या कल्पाभीतरीं । भूप होय सत्ताधारी । राक्षसांचा ॥१७४॥ तोचि तो प्रतापी शूर । अतुलनीय बलवत्तर । लंकेंत ससैन्यभार । वास करी ॥१७५॥ आधीं तेथें योद्धे थोर । राहात होते निशा-चर । रणीं वधिले समग्र । देवगणें ॥१७६॥ इंद्रप्रेरणेनें संप्रति । त्या दुर्गांतरी राहती । कोटि रक्षक यक्षपति । कुबेराचे ॥१७७॥ दशास्य रावणालागून । ऐसें कळे वर्तमान । घेरी लंकेस जाऊन । सैन्यासह ॥१७८॥ पाहून योद्धा भयंकर । अक्राळविक्राळ वीर । जीव घेऊन समग्र । पळाले यक्ष ॥१७९॥ सर्व नगरीं फिरून । अवलोकी दशानन । झालें चिंता निरसून । विशेष सुख ॥१८०॥ (स्वयें योद्धा महाशूर । समागमें सैन्यभार । स्थल ना तदनुसार । राहायासी ॥१८१॥ ती सुंदर सहजपणीं । इतरां दुर्गम जाणुनी ।

तेथें केली राजधानी । रावणानें ॥१८२॥ वांटिलीं योग्य प्रकारें । ज्यांस जैशीं तैशीं घरें । यावरी राक्षस सारे । सुखी केले ॥१८३॥ (सुख मिळालें सर्व परि । शांति कोठें तदंतरीं । परवैभवाची धरी । हांव मनीं ॥१८४॥) एकदां तो दशानन । कुबेरावरी धांवून । आणी पुष्पक विमान । जिंकूनिया ॥१८५॥ पुनरपि कौतुकानें । कैलासगिरिकारणें । उचलिलें रावणानें । जाऊनिया ॥१८६॥ निज बाहुबलाप्रत । जणुं का अजमावित । सुख मानून बहुत । जाता झाला ॥१८७॥ संपत्ति आणखी सुख । सुत, सैन्य, साहाय्यक । जय, प्रताप, विवेक, । महत्व, बल– ॥१८८॥ नित्यनूतन समस्त । होत जाई वृद्धिगत । प्रतिलाभें वाढे नित । लोभ जैसा ॥१८९॥ कुंभकर्णापरी बलिष्ट । भ्राता जयाचा कनिष्ट । ज्यासी जगीं प्रतिभट । जन्मला ना ॥१९०॥ करून मदिरापान । जो षण्मास निद्रामग्न । जागा होतां लोक तीन । त्रस्त होती ॥१९१॥ यद्यपि तो प्रतिदिनीं । राहे आहार करुनी । त्वरें जातें विध्वंसुनी । विश्व सारें ॥१९२॥ रणधीर ऐसा जाणा । ज्याचें वर्णन करवेना । बलिष्टसे वीर नाना । त्यासारिखे ॥१९३॥ रावणाचा ज्येष्ट सुत । मेघनाद नामें ख्यात । प्रथम गणना वीरांत । जगीं ज्याची ॥१९४॥ ज्याच्या संमुख रणांत । कुणी योद्धा नव्हे स्थित । पळापळ होय नित । देवलोकीं ॥१९५॥ या सर्वांच्या अतिरिक्त । दुर्मुख, अकंपन, वज्रदंत । धूमकेतु बलवंत । अतिकायहि ॥१९६॥ सामर्थ्यवंत एकेक । जगत् जिंकी सकलिक । ऐसे असती अनेक । वीर योद्धे ॥१९७॥ स्वेच्छेनें रूपें धरिती । माया सर्वहि जाणती । स्वप्नींहि नाहीं ज्यांप्रति । दया–धर्म ॥१९८॥ एकदां निज सभेंत । रावण असतां स्थित । स्वपरिवार

अमित । विलोकन करि ।। १९९ ।। पुत्रपौत्र, कौटुंबिक । आप्तेष्ट आणि सेवक । राक्षसजाति अनेक । कोण गणी ? ।।२००।। पाहून सेना संभार । स्वभावें मानी दशशिर । गर्वयुक्त क्रोधभर । वचन वदे ।।२०१।। "ऐका ऐका सकलिक । निशाचर हो ! सैनिक ! । आपुला वैरी निःशंक । देवगण ।।२०२।। परि संमुख येऊन । न करिती रणकंदन । बलिष्ट शत्रु पाहून । पळून जाती ।।२०३।। एका उपायेंकरून । त्यांचें होतसे मरण । तो सांगतो समजावून । ऐका आतां ।।२०४।। (देवांचें बलवर्धन । होय ज्यायोगेंकरून । तुम्ही आधीं ते साधन । ध्यानीं धरा ।।२०५)।। प्रथम ब्राह्मणभोजन । श्राद्ध, यज्ञ, होम, हवन । जाऊन तुम्ही करा विघ्न । सर्वांसहि ।।२०६।। (अग्नि आणखी ब्राह्मण । हीं देवांचीं मुखें दोन । त्यांच्या द्वारां त्यांलागून । आहार मिळे ।।२०७।। तरी प्रयत्नेंकरून । यांसी करितांच विघ्न । देव ते आहारहीन । सहजचि ।।२०८।।) क्षुधायोगें क्षीणतर । बलहीन होतां सुर । होती निज सहचर । अनायासें ।।२०९।। तेव्हां मारूं त्यांलागून । अथवा देऊं सोडून । जरी येतील शरण । आपणांतें ।।२१०।। मग मेघनादालागून । पाचारी हांक मारून । वाढवी देऊन उत्तेजन । वैरबल ।।२११।। "पुत्रा ! जे का सुरवर । रणांत बलिष्ट धीर । ज्यांना अभिमान थोर । लढायाचा ।।२१२।। त्यांसीं रणांत जिंकून । आण रे ! येथें बांधून । मान पितरानुशासन । ऊठ बाळा !" ।।२१३।। ऐशा प्रकारेंकरून । सर्वांसहि । आज्ञापून । स्वयें निघाला घेऊन । गदा हातीं ।।२१४।। चालतांना दशानन । धरा होय दोलायमान । गर्जतां गर्भपतन । सुरनारींचें ।।२१५।। होऊन क्रोधभरित । येतो ऐकून लंकानाथ । मेरुगिरीच्या गुहेंत । दडती देव ।।२१६।। दिक्पालांचे जे लोक ।

सुंदर मनोहारक । शून्य दिसले सकळिक । रावणातें ॥२१७॥ पुनःपुन्हां तदवसरीं । सिंहगर्जना करी भारी । शिव्या देई, हांक मारी । देवांप्रति ॥२१८॥ रणमदें होई मत्त । फिरे धांवत जगांत । प्रतियोद्धा नव्हे प्राप्त । शोधितांहि ॥२१९॥ सूर्य, चंद्रमा, पवन । कुबेर आणि वरुण । अग्नि, काल, यम मिळून । सर्वाधिकारी– ॥२२०॥ किन्नर आणि सिद्ध वर्ग । मानव, देवता, नाग । हटें करी पाठलाग । सर्वांचाहि ॥२२१॥ ब्रह्म-सृष्टींत जोंवरी । जीव होते देहधारी । वश साऱ्या नरनारी । रावणातें ॥२२२॥ भयभीत सर्वजण । करिती आज्ञापालन । पदां वंदिती येऊन । विनयें नित ॥२२३॥ निज भुजबलें वश । करूनिया जगतास । स्वतंत्र ऐसें कुणास । राहूं न दे ॥२२४॥ मांडलिक– शिरोमणि । एक रावण त्रिभुवनीं । स्वेच्छेस अवसरुनी । राज्य करी ॥२२५॥ (जिंकूनिया लोकपति । प्राप्त केलीसे संपत्ति । अर्थपुरुषार्थ जगतीं । प्राप्त झाला ॥२२६॥ परि अर्थाचा सहचर । काम पुरुषार्थ थोर । तोहि साधाया दशशिर । काय करी ? ॥२२७॥) यक्ष आणि सुरवर । त्यापरीं गंधर्व, नर । नाग आणखी किन्नर । तत्कुमारी– ॥२२८॥ स्वबाहुबलेंकरून । त्यासी वरिलें जिंकून । सुंदर स्त्रियांचा गण । अन्य बहु ॥२२९॥ जें इंद्रजिताकारणें । कथिलेंसे रावणानें । तें सर्वहि आधीं तेणें । केलें जणुं ॥२३०॥ त्यापूर्वीच ज्यांलागून । दिधलें अनुशासन । पाळिलें, तें वर्तमान । श्रवण करा ॥२३१॥ दिसण्यांत ते सकळ । पापी अक्राळ-विक्राळ । दुःखद राक्षसदळ । देवादिकां ॥२३२॥ राक्षसांचा समुदाय । देत असे उपद्रव । मायेनें धरी अभिनव । नानारूपें ॥२३३॥ ज्या ज्या प्रकारेंकरून । होय धर्मनिर्मूलन । तें वेदविरुद्ध वर्तन । करिती सर्व ॥२३४॥ ज्या ज्या

प्रदेशांमधून । दिसती गायी–ब्राह्मण । तें नगर, ग्राम जाळून । भस्म करिती ॥२३५॥ (करी लोकांचें धारण । तेंच धर्मजीवन । तदस्तित्वाचें लक्षण । हेंचि असे ॥२३६॥ धारणेचें मुख्य काम । त्यागेंचि होय निस्सीम । त्याग जेथें महत्तम । धर्म तेथें ॥२३७॥ सुखत्याग, स्वार्थत्याग । भोगत्याग, रागत्याग । सद्धर्माचें महदंग । त्याग एक ॥२३८॥ जेथें त्यागाचें महत्त्व । तेथें धर्माचें अस्तित्त्व । त्यागच्च धर्माचें तत्त्व । प्रमुखत्वें ॥२३९॥ त्यागेंचि परोपकार । त्यागें परसुखविचार । त्यागचि धर्माचें सार । सर्वस्वहि ॥२४०॥ त्याग एक नैसर्गिक । दुजा स्वभावें मानुषिक । गायी–ब्राह्मण प्रतीक । उभयतांचें ॥२४१॥ म्हणून गायी–ब्राह्मण । हे धर्माचे महाप्राण । यांचें होतांचि रक्षण । धर्म राहे ॥२४२॥ कराया धर्मनिर्मूल । गायीब्राह्मणांचा छल । याकारणें सर्वकाल । होत असे ॥२४३॥ म्हणूनिया तो लंकेश । होतां क्षणीं सत्ताधीश । क्रमानेंच धर्मनाश । होऊं लागे ॥२४४॥ राक्षसांचा अत्याचार । वाढतसे वरच्चेवर । लोक होती भयातुर । त्या योगानें ॥२४५॥) शुभ कर्माचें आचरण । कोठेंहि न ये घडून । देव–गुरु–विप्रालागून । न मानी कुणी ॥२४६॥ (ब्राह्मणांसी अन्नदान । देवांसी यज्ञहवन । गुरुपितरां श्राद्धतर्पण । लुप्त झालें ॥२४७॥) राहिली ना हरिभक्ति । यज्ञयागतप नुरती । स्वप्नींहि न ऐकूं येतीं । वेदपुराणें ॥२४८॥ जपयोगतपोविराग । यज्ञीं दैवतांचा भाग । श्रवणीं पडतांचि प्रसंग । रावणाच्या– ॥२४९॥ स्वयें उठून धांवत । कांहीं न राही उर्वरित । धरूनिया सर्वांप्रत । उध्वस्त करी ॥२५०॥ ऐशापरीं भ्रष्टाचार । माजलासे जगभर । 'धर्म' शद्ब कानावर । मुळीं न ये ॥२५१॥ नानाप्रकारें त्रासवून । देई काढून देशांतून । वेद आणखी पुराण ।

सांगती जे ॥२५२॥ वर्णितां न वर्णवती । अत्याचार नाना-
रीतीं । निशाचर जे करिती । भयंकर ॥२५३॥ हिंसाकर्मांवरी
अति । राक्षसांची दिसे प्रीति । कोठून असणार मिति । त्यांच्या
पापां ॥२५४॥ दुष्ट, चोरटे, जुगारी । यांची संख्या वाढे भारी ।
परनारीधनावरी । लोलुप जे ॥२५५॥ मातृपितृदेवांप्रति ।
कुणीहि नच मानिती । साधूंकडून करविती । आपुली
सेवा ॥२५६॥ शिव सांगे "हे भवानी ! । हें वर्तन ज्या ज्या
स्थानीं । राक्षसचि सर्व प्राणी । जाणावे ते ॥२५७॥ यापरीची
धर्मग्लानि । अतीव अवलोकुनी । अति भयानें धरणी । व्याकुळ
होय ॥२५८॥ (धर्म सुखाचेंच सार । धर्म विश्वाचा आधार ।
त्याची ग्लानि अनावर । धरेप्रति ॥२५९॥) गिरि–सरिता–
सागर । भार न यांचा मजवर । एक परद्रोह्याचा भार । वाटे
जसा ॥२६०॥ ती सकल धर्माप्रत । पाहूनिया विपरीत । बोलूं
न शके किंचित् । रावणभयें ॥२६१॥ विचार करून मनीं ।
गायीचें रूप धरूनी । जेथें लपले सुरमुनि । जाई तिथें ॥२६२॥
निज दुःख निवेदून । करूं लागली रुदन । झाला न कुणाकडून ।
कार्यभाग ॥२६३॥ (रावणाच्या भयेंकरून । उभयतां दुःखमग्न ।
सुखवितील कोठून । परस्परां ॥२६४॥ परि समदुःखी उभय ।
करून विचारविनिमय । काढिती तेव्हां उपाय । शोधूनिया ॥२६५॥
दुष्टकरें पीडा होतां । शरण जावें समर्था । तत्पदीं ठेवून माथा ।
अभय घ्यावें ॥२६६॥ समर्थ आपणांहून । सृष्टिकर्ता चतुरानन ।
त्यासीच जावें शरण । निश्चयानें ॥२६७॥ विधात्याचें वरदान ।
त्यायोगानें दशानन । करी धर्मविध्वंसन । बलात्कारें ॥२६८॥
तोच त्याचें निर्दालन । करील निश्चयेंकरून । निघाले सर्व
मिळून । या विचारे ॥२६९॥) सुर, गंधर्व आणि मुनि । सर्व

एकत्र मिळुनी । सत्यलोकालागुनी । जाते झाले ॥२७०॥ सर्वे गोतनुधारिणी । दीनमुखी ती धरणी । भयातिशोकेंकरुनी । व्याकुळ जी ॥२७१॥ ब्रह्मा सर्वहि जाणून । करी चित्तीं अनुमान । कीं यांत माझ्या स्वाधीन । कांहीं नसे ॥२७२॥ "तूं आहेस ज्याची दासी । हे पृथ्वि! तोच अविनाशी । आहे तुजसी मजसी । साह्यकर्ता ॥२७३॥ अगे धरणी! निजांतरीं । निश्चयें तूं धीर धरीं । अनन्यत्वें स्मरण करीं । हरिपदाचें ॥२७४॥ स्वजनांच्या दुःखाप्रत । जाणतो तो प्रभु खचित । नष्ट करील निश्चित । विपत्तीतें" ॥२७५॥ बैसूनिया सर्व सुर । एकत्र करिती विचार । हांक मारितां ईश्वर । भेटेल कुठें? ॥२७६॥ जावें वैकुंठभुवनीं । यापरीं म्हणती कुणी । क्षीराब्धींत चक्रपाणि । म्हणती कुणी ॥२७७॥ ज्याच्या हृदयाभीतरीं । प्रीतिभक्तिहि ज्यापरी । तेथें प्रकटे श्रीहरि । तैसाचि सदा ॥२७८॥ त्या समाजाभीतरीं । मीहि होतों गिरिकुमारी! । बोललों त्या अवसरीं । वचन एक ॥२७९॥ "सर्वभुवनांभीतरीं । समव्यापक श्रीहरि । प्रेमें प्रकटे, यापरीं । जाणतों मी ॥२८०॥ देश, काल आणि दिशां । तैसाचि व्यापला विदिशां । जेथें प्रभु नाहीं ऐसा । ठाव सांगा ॥२८१॥ चराचरामाजीं व्याप्त । अलिप्त, सर्वांविरहित । प्रेमें प्रकटे भगवंत । अग्नीपरीं ॥२८२॥ (अग्नि तो काष्ठामधून । अंतर्बाह्यच असे व्यापून । अरणिमंथनेंकरून । प्रकट होय ॥२८३॥ तैसाच व्यापक हरि । अव्यक्त सर्वांभीतरीं । तो व्यक्त होतसे परि । प्रेमेंचि एक ॥२८४॥ ऐसें हें माझें वचन । रुचलें सर्वांलागून । ब्रह्मा 'साधु साधु' म्हणून । प्रशंसा करी ॥२८५॥ माझें वचन ऐकुनी । ब्रह्मा हृष्ट मनीं । तनु पुलकित, नयनीं । नीर लोटे ॥२८६॥ जोडून

स्वकर्तारांप्रति । करीतसे तेव्हां स्तुति । होऊनिया धीरमति । सावधान ॥२८७॥ "जय जय सुरनायका ! । स्वजनसुखदायका ! । जय जय प्रणतपालका ! । भगवंता ! ॥२८८॥ गोब्राह्मण-हितकर्ता । तूं तों असुरसंहर्ता । श्रीलक्ष्मीचा प्रिय भर्ता । जय जय प्रभो ! ॥२८९॥ पाळिसी देवधरणी । तुझी अद्‌भुत करणी । परि तिचें मर्म कुणी । जाणूं न शके ॥२९०॥ स्वभावेंचि जो कृपाळ । दीनां विषयीं दयाळ । अनुग्रह करो तत्काळ । आम्हांवरी ॥२९१॥ जयजयाजी अविनाश । सर्व घटीं तुझा वास । परमानंद जगदीश । व्यापक तूं ॥२९२॥ अज्ञेय, इंद्रियातीत । तुझें चरित्र पुनीत । मुकुंदा ! मायारहित । असली तूं ॥२९३॥ ज्याच्या प्राप्त्यर्थ विरागी । होऊन अति अनुरागी । निरसिती मोहालागी । मुनिवृंद ॥२९४॥ रात्रंदिन ज्यास ध्याती । ज्याचे गुणगण गाती । तो परमात्मा जयति । सच्चिदानंद ॥२९५॥ जेणें सृष्टीतें निर्मिलें । त्रिविध त्यापरीं केलें । संगे साह्य न घेतलें । दुजें कुणी ॥२९६॥ (ब्रह्मा-विष्णु-शिवात्मक । स्वयेंचि होऊन एक । सृष्टि ही त्रिगुणात्मक । निर्मिलीसे ॥२९७॥ निमित्त वा उपादान । कारण न ठेवितां भिन्न । कारण-निमित्तोपादान । कारण जो ॥२९८॥) तोच पापनाशकर्ता । वाहो कीं आमुची चिंता । आम्ही पूजा-भक्तिपथा । जाणतों ना ॥२९९॥ जो भवभयाचें भंजन । करी मुनिमनोरंजन । जोका विपत्तींचा गण । नष्ट करी ॥३००॥ कायावाचामनेंकरून । सोडून शहाणपण । सर्व सुरगण शरण । तयाप्रति ॥३०१॥ श्रुति-शेष-सरस्वती । समस्तहि ऋषिपंक्ति । यांत कुणीहि ज्याप्रति । जाणती ना ॥३०२॥ ज्यासी आवडती दीन । वेद सांगे हें गर्जून । आम्हांविषयीं

भगवान् । तोच द्रवो ॥३०३॥ भवाब्धींचा जो मंदर । सर्वतोपरी सुंदर । जो का गुणांचें मंदिर । सुखराशी ॥३०४॥ सर्व सिद्ध, मुनि, सुर । अतिशय भयातुर । त्वत्पदाब्जीं नमस्कार । करितों नाथा" ॥३०५॥ देवता आणि धरणी । भयसंत्रस्त जाणुनी । त्यांचें वचन ऐकुनी । भक्तियुक्त ॥३०६॥ गंभीर आकाशवाणी । होती झाली तयाक्षणीं । शोकसंदेहहारिणी । असे जी का ॥३०७॥ "मुनिसिद्धसुरस्वामी ! । भिऊं नका अंतर्यामीं । नरवेष धरीन मी । तुम्हांसाठीं ॥३०८॥ अंशासहित साचार । मनुष्याचा अवतार । घेणार आहे पवित्र । सूर्यवंशीं ॥३०९॥ दांपत्य कश्यप–आदिति । यांनीं तप केलें अति । पूर्वीच मी तयाप्रति । दिधला वर ॥३१०॥ कौसल्या आणि दशरथ । यांच्या रूपांनीं सांप्रत । नरपति अयोध्येंत । प्रकटले ते ॥३११॥ त्यांच्या सदनीं जाऊन । मी स्वयें अवतरेन । रघुकुलीं चौघेजण । बंधु आम्हीं ॥३१२॥ नारद मुनींचें वचन । सर्वहि सत्य करीन । पराशक्तीस घेऊन । अवतरेन ॥३१३॥ पृथ्वीचा भार सकल । करीन जाणा निर्मूल । देववृंदहो ! सकळ । सोडा भय" ॥३१४॥ नभीं ऐसी ब्रह्मवाणी । ऐकूनिया निजकर्णीं । देव परतले तत्क्षणीं । शांत मनें ॥३१५॥ तें ब्रह्मा पृथ्वीलागुनी । सांगतसे समजावुनी । निर्भयपणें तीहि मनी । धैर्य धरी ॥३१६॥ स्वसत्यलोकालागून । जातसे चतुरानन । हीच शिकवण देऊन । देवांप्रति ॥३१७॥ कीं "वानरांचें शरीर । धरूनिया महावीर । जाऊन सेवा निर्भर । हरिपदातें" ॥३१८॥ (रावणें याचिला वर । सोडून नरवानर । न ओढवो मजवर । मृत्यु कुठें ॥३१९॥ त्या नरवानरांतून । नर होतसे भगवान् । व्हाहो ! वानर म्हणून । देवांस कथी ॥३२०॥) आपापल्या लोकांप्रति । सर्वहि

सुरवर जाती । मनीं पावून विश्रांति । भूमिसह ॥३२१॥ जें कांहीं अनुशासन । देता झाला चतुरानन । अविलंबें आनंदून । वागती सुर ॥३२२॥ वानरांचेंच शरीर । धरून आले भूवर । बलप्रताप अपार । तयांठायीं ॥३२३॥ ते सर्वहि होते वीर । गिरि, तरू, नख हें शस्त्र । वाट पाहती मतिधीर । श्रीहरीची ॥३२४॥ अरण्यांत, पर्वतावर । जेथें तेथें भरपूर । सजवून सैन्य सुंदर । राहिले ते ॥३२५॥ हें तों सुंदर सगळें । चरित्र मीं निवेदिलें । आतां ऐका जें वर्तलें । मध्यंतरीं ॥३२६॥ (सोपानींचा मार्ग भला । अतिदीर्घ जरी वाटला । तदर्थ वहावा योजिला । विश्राम हा ॥३२७॥ रसिक भाविक श्रोत्यांस । विनवीतसे देवीदास । माझ्या बोबड्या बोलांस । मान्य करा ॥३२८॥)

—:०:—

# विश्राम ११ वा

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्यो नमः
श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः

अयोध्येचा नृपनाथ । शिरोमणि रघुकुलांत । वेदविख्यात दशरथ । नाम ज्याचें ॥१॥ ज्ञानी धर्मधुरंधर । केवळ गुण-भांडार । हृदयीं भक्ति, भगवत्पर । मति ज्याची ॥२॥ कौसल्या आदिकरुनी । आवडत्या त्याच्या राज्ञी । त्या सर्वहि आचरणीं । पवित्रचि ॥३॥ पत्यनुकूल निरंतर । प्रेम ज्यांचें दृढतर । श्रीहरिपदाब्जांवर । विनीत अति ॥४॥ ( करितां कालक्रमण । बहु वर्षें गेलीं लोटून । पोटीं न पुत्रसंतान । भूपतीच्या ॥५॥ व्यर्थ चाललें यौवन । होतां न दिसे संतान । या विचारीं रात्रंदिन । मग्न भूप ॥६॥) असो, एका अवसरीं । भूपाच्या हृदयांतरीं । निपुत्रिकपणें भारी । दुःख झालें ॥७॥ तेव्हां भूपति त्वरित । जाई गुरुगृहाप्रत । पद वंदून बहुत । विनय करी ॥८॥ सुख-दुःख जें आपुलें । गुरूसी तें निवेदिलें । वसिष्ठें बहुपरीं कथिलें । समजावुनी ॥९॥ "धीर धरी रे! मनांत । तुज होतील चार सुत । भक्तभयांतक ख्यात । त्रिभुवनीं जे" ॥१०॥ (दुःख ऐकून घेतलें । मग समाधान केलें । पुढें तदर्थ चालविलें । प्रयत्नातें ॥११॥ सद्गुरूसारखा सखा । होता त्याचा पाठीराखा । तेथें कोठूनिया सुखा । उणें पडे ॥१२॥) शृंगऋषिलागून । वसिष्ठांनीं पाचारून । करविला शुभ यज्ञ । पुत्रकामेष्टि ॥१३॥ मुनीनें भक्तिसहित । अर्पितां आहुतिप्रत । अग्नि प्रकटे, हातांत ।

घेऊन चरु ॥१४॥ (साक्षात् प्रकट होऊन। करीं घेई हविष्यान्न। भूपा अग्निनारायण । काय म्हणे– ॥१५॥) "वसिष्ठांनीं जो जो कांहीं । विचार केलासे हृदयीं । तें तुझें कार्य सर्वहि । सिद्ध झालें ॥१६॥ राया! घे हें हविष्यान्न । वांटी स्वस्त्रियांलागून । यथायोग्य भाग करून । जिचा तिज" ॥१७॥ तेव्हां अग्नि-नारायण । पावलासे अंतर्धान । सर्वहि समजावून । सभे-प्रति ॥१८॥ भूप तया अवसरीं । प्रिय स्त्रियांतें पाचारी । तेथें आल्या त्या सत्वरीं । कौसल्यादि ॥१९॥ प्रसाद अर्धभाग भला । कौसल्याकारणें दिला । शेष तोहि विभागिला । दोन भागीं ॥२०॥ दोन भागांतून एक । कैकेयीस दे नरनायक । उर्वरित केले सम्यक् । भाग दोन ॥२१॥ कौसल्या आणि कैकेयी । यांचे हातीं भाग देई । संतोषें देती त्याहि । सुमित्रेसी ॥२२॥ (उभय स्त्रियांचे हातीं । कां दिधले भागांप्रति । घ्यावया त्यांची संमति । ऐसें करी ॥२३॥ एक पट्टाधिकारिणी । दुजी आवडती राणी । दोघींच्याहि अंतःकरणीं । भेद नसो ॥२४॥ म्हणून त्यांची संमति । अवश्य गमे रायाप्रति । यास्तव दिले त्यांच्या हातीं । दोन भाग ॥२५॥ त्या दोघींनींहि भले । ते दोन भाग घेतले । प्रसन्न मनानें दिलें । सुमित्रेसी ॥२६॥ त्या तिघींहि महिषींनीं । तो प्रसाद स्वीकारुनी । सेविला नृपाज्ञेकरुनी । अत्यादरें ॥२७॥ प्रसाद करितां भक्षण । जाऊन त्यांचें वंध्यापण । पुत्रवतीचें लक्षण । दिसूं लागे ॥२८॥) असो, तेव्हां ऐशा रीतीं । सर्व राज्ञी गर्भवती । आनंदित झाल्या चित्तीं । अतीव सुखें ॥२९॥ ज्या दिवसापासून हरि । राहिला गर्भाभीतरीं । व्यापिलें सर्व लोकांतरीं । संपत्ति सुख ॥३०॥ राजमंदिरामधुनी । शोभती सर्वहि राज्ञी । शीलशोभातेजःखनि । मूर्तिमती ॥३१॥ यापरी

ऐशा सुखांत । कांहीं काल झाला व्यतीत । प्रभु प्रकटायाचा प्राप्त- । समय होय ॥३२॥ योग, लग्न आणि वार । ग्रह, तिथि अवसर । तेव्हां जाहले समग्र । अनुकूलचि ॥३३॥ वस्तुमात्र चराचर । जाहले हर्षनिर्भर । सुखाचें मूल साचार । राम-जन्म ॥३४॥ तिथि नवमी पवित्र । प्रथम मास तो चैत्र । हरि-प्रिय अभिजित् नक्षत्र । शुक्ल पक्ष ॥३५॥ दोन प्रहर मध्य दिन। नव्हतें अति शीतोष्ण । लोकविश्राम पावन । अवसर जो ॥३६॥ मंद आणि सुगंधित । तैसा पवन वाहे शीत । उल्लसित चित्तीं संत । हर्षित सुर ॥३७॥ कुसुमित वनोपवन । मणियुक्त गिरिगण । वाहती सर्व नद्यांतून । अमृतधारा ॥३८॥ तो सुमंगल अवसर । जाणे जेव्हां चतुर्वक्त्र । विमानें सजवून सुर । चालले सर्व ॥३९॥ निर्मल नभ समस्त । देवगणांनीं मंडित । गंधर्वगण गुणांप्रत । गान करी ॥४०॥ सुंदर अंजुलि करून । वर्षू लागले सुमन । दुमदुमे नभांतून । दुंदुभि-ध्वनि ॥४१॥ भगवंताची स्तुति । देव, नाग मुनि करिती । आपुली भेट अर्पिती । नाना-परीं ॥४२॥ यापरीं देवतागण । प्रभूची प्रार्थना करून । आपुल्या स्थानालागून । जाते झाले ॥४३॥ समस्त लोकांलागुनी । शांतिदाता जो निर्वाणीं । प्रकटे प्रभु त्या क्षणीं । जगदाधार ॥४४॥ प्रकट झाला तो कृपाळू । जो दीन जनांचा दयाळू । कौसल्येचा तो मायाळू । हितकर्ता ॥४५॥ माता झाली प्रमुदित । जें हरी मुनीचें चित्त । ऐसें तें रूप अद्भुत । विचारुनी ॥४६॥ जो का नयनाभिराम । तनु ज्याची घनश्याम । चहुहातीं धरी उत्तम । निजायुधें ॥४७॥ वनमाला विभूषणें । विशाल ज्याचीं नयनें । शोभासिंधु पूर्णपणें । खरांतक ॥४८॥ म्हणे, जोडून द्वयकरीं । "तुझी स्तुति या अवसरीं । हे अनंता! कैशापरी । करूं

सांग ? ॥४९॥ मायागुण ज्ञानातीत । केवल प्रमाणरहित । ऐसें म्हणती ज्याप्रत । वेदपुराणें ॥५०॥ दयासुखाचा सागर । सर्व गुणांचें भांडार । ज्यातें गाती निरंतर । श्रुति-संत ॥५१॥ तोचि माझ्या हितास्तव । स्वजनीं ज्याचा प्रेमभाव । प्रकटलास तूं देव । लक्ष्मीपते! ॥५२॥ ब्रह्मांडें अपरिमित । निजमायेनें निर्मित । भरलीं रोमरोमांत । वेद म्हणे ॥५३॥ तो तूं मद्‌गर्भी बद्ध । हें तो उपहासास्पद । ऐकतां चंचल प्रबुद्ध– । मति होय" ॥५४॥ मातेप्रति होतां ज्ञान । प्रभूचें सुहास्य वदन । नानापरीं लीला गहन । करूं इच्छी ॥५५॥ कथून पूर्वकथा उत्तम । माता तोषविली परम । ज्या योगानें पुत्रप्रेम । उपजे तिज ॥५६॥ (पूर्व जन्माच्या भीतरीं । अदिति कश्यपाची नारी । पुत्रास्तव प्रार्थना करी । श्रीहरीची ॥५७॥ त्या वराची आठवण । देता झाला नारायण । तेणें भरें अंतःकरण । वात्सल्यानें ॥५८॥) मातेची पालटे मति । पुन्हां बोले प्रभुप्रति । "आटोपून घे संप्रति । रूप बापा! ॥५९॥ आणि होऊनिया बाळ । लीला करी तूं प्रेमळ । परम सुखाचें मूळ । निरुपम हें" ॥६०॥ ऐकून ऐसें वचन । ज्ञाता प्रभु करी रूदन । तत्काल बालक होऊन । देवपति ॥६१॥ जें हें जन्मचरित्र गाती । पावती हरिपदाप्रति । भवकूपीं न पडती । कदापि ते ॥६२॥ गो-ब्राह्मण-सुर-संत । यांचें करावया हित । मनुजावत्तार भगवंत । घेता झाला ॥६३॥ निज इच्छेनुसार । निर्माण करी शरीर । मायागुणांहून पर । इंद्रियातीत ॥६४॥ (अज्ञानमयी मलिन । ऐसें मायेचें लक्षण । सत्त्वरजस्तम तीन । गुण हे तिचे ॥६५॥ हस्तपादादि कर्मेंद्रियें । नेत्रकर्णादि ज्ञानेंद्रियें । मनोबुध्यादि इंद्रियें । अंतरींची ॥६६॥ हीं अंतर्बाह्येंद्रियें ।

याहून अलिप्त जो स्वयें । ज्याचेनि यांचीं कार्यें । व्यक्त होतीं ॥६७॥ असतां कर्माचें बंधन । बाधक होती त्रिगुण । तेणें जीव करी धारण । भौतिक तनु ॥६८॥ परि सर्वशक्ति ईश्वर । स्वयें प्रेरक स्वतंत्र । स्वेच्छेनें दिव्य शरीर । धरीतसे ॥६९॥) बाळाचा रूदन-ध्वनि । परम प्रिय-कर परिसुनी । पातल्या सर्वहि राज्ञी । औत्सुक्यानें ॥७०॥ दासी प्रमुदित चित्तीं । जिकडे तिकडे धांवती । नागरिक मग्न होती । आनंदांत ॥७१॥ पुत्रजन्माचें वर्तमान । दशरथें श्रवण करून । जणुं ब्रह्मानंदासमान । मानिलें सुख ॥७२॥ परम प्रेम चित्तांत । तनु झाली रोमांचित । उठूं इच्छी, धीर देत । बुद्धिप्रत ॥७३॥ ( आनंदातिशयेंकरून । अधीरता बुद्धिलागून । धीर द्यावया कारण । हेंचि असे ॥७४॥ प्रेमातिशयेंकरून । शिथिलता तनु-लागून । उठूं इच्छी सांभाळून । म्हणूनिया ॥७५॥) ज्याचें नांव करितां श्रवण । होय निश्चयें कल्याण । माझ्या गृहीं तो नारा-यण । प्रकटलासे ॥७६॥ भूपाचें अंतःकरण । परमानंदें परिपूर्ण । करी वाजंत्र्यां पाचारण । मंगल वाद्यार्थ ॥७७॥ गुरु वसिष्ठासी भलें । निमंत्रण पाठविलें । तेहि विप्रांसह आले । राजद्वारीं ॥७८॥ अनुपम बाळाप्रति । जाऊन ते विलोकिती । सौंदर्यनिधि, न सरती । वर्णितां गुण ॥७९॥ नांदीश्राद्ध तदनंतर । करीतसे नृपवर । जातककर्मादि संस्कार । सर्व करी ॥८०॥ धेनु आणखी सुवर्ण । वसनें, मणि, भूषण । भूपति करी अर्पण । विप्रां-प्रति ॥८१॥ ध्वज, पताका, तोरण । उभारिले नगरांतून । कैसें शोभेचें वर्णन । करावें तें ॥८२॥ वरून आकाशांतून । होतसें पुष्पवर्षण । ब्रह्मानंदांत निमग्न । सर्व लोक ॥८३॥ थवेच्या थवे करून । निघतां झाला स्त्रीगण । सहजशृंगारें उठून । धांव-

घेती ॥८४॥ हेमकलश घेऊन । मंगल द्रव्यें पात्रीं भरून । शिरती राजद्वारांतून । गात गात ॥८५॥ करून मंगलारती । नाना वस्तु ओवाळिती । बालपदां नमस्कारिती । वारंवार ॥८६॥ (जरी असला प्रेमादर । तरी बाळा नमस्कार । करणें हें उचित खरोखर । उचित काय? ॥८७॥ ऐसा असून प्रकार । कां केलासे नमस्कार । संक्षेपें करूं विस्तार । तद्हेतूचा ॥८८॥ असूनिया तीन कांता । संतान ना नृपनाथा । तेणें यज्ञ केला स्वतां । पुत्रकामेष्टि ॥८९॥ यज्ञाचें पर्यवसान । आलें फलद्रूप होऊन । जन्मलें पुत्र संतान । महद्भाग्यें ॥९०॥ जरी संततीची आशा । झाली होतीच निराशा । दया आली जगदीशा । प्रकट दिसे ॥९१॥ केवळ नव्हे तें संतान । प्रत्यक्ष स्वयें नारायण । दशरथकुलीं जनन । पावलासे ॥९२॥ एक तरी प्रत्यक्ष हरि । दुजें तोचि राज्याधिकारी । म्हणून त्या नमस्कारी । नारीगण ॥९३॥) सूत मागध मिळून । गायक आणि बंदीजन । वर्णिती पवित्र गुण । राघवाचे ॥९४॥ सर्व जनांनीं आपुलें । सर्वस्वहि दान केलें । त्यांनींहि नाहीं ठेविलें । मिळालें ज्यां ॥९५॥ (रामजन्माचा प्रसंग । आनंदित अंतरंग । तदर्थ जो तो करी त्याग । प्रेमादरें ॥९६॥ दान मिळे जयाप्रति । त्याची नुरे स्वार्थी वृत्ति । तेहि इतरां अर्पिती । म्हणूनिया ॥९७॥) कस्तुरी, कुंकुम, चंदन । यांचा कर्दम होऊन । नगरमार्गांमधून । पसरलासे ॥९८॥ घरोघरीं सुमंगल । वाद्यें वाजतीं विपुल । प्रभु सौंदर्याचें मूळ । प्रकटलासे ॥९९॥ जेथें तेथें सर्वजन । असती आनंदमग्न । नर आणि नारीगण । नागरिक ॥१००॥ कैकेयी आणि सुमित्रा । दोघीहि नृपकलत्रां । प्रसव झालासे पुत्रां । सुंदर अशा ॥१०१॥ तें सुख आणि संपत्ति । तो समय, समाजस्थिति । वर्णन करूं

न शकती । शारदा–शेष ॥१०२॥ ती अयोध्यापुरी भली । ऐशा प्रकारें शोभली । प्रभूस भेटाया आली । रात्र जणुं ॥१०३॥ परि सूर्यातें पाहुनी । जणुं संकोचे स्वमनीं । तथापि संध्या बनोनी । राहिलीसे ॥१०४॥ अगरु धूप बहुत । संध्यासमयींच ध्वांत । अबीर उडे जो साक्षात् । रक्तिमा तो ॥१०५॥ मंदिरीं रत्नांची रास । तेच तारे बहुवस । राजगृहाचा कलश । श्रेष्ठ शशी ॥१०६॥ वेदध्वनि अति मधुर । होतसे जो घरोघर । खगकूजित सुख-कर । समयोचित ॥१०७॥ पाहून त्या कौतुकाप्रति । सूर्य विसरे निज गति । मासावधि लोटतां ती । न कळे तया ॥१०८॥ लोट-ल्याहि एक मास । त्याचा होय एक दिवस । परि याच्या रहस्यास । जाणे न कुणी ॥१०९॥ रथासहवर्तमान । सूर्य राहिला थांबून । मग होईल कोठून । रात्र कशी ॥११०॥ परि यांतलें इंगित । कळलें नाहीं कुणाप्रत । सूर्य गुण गात गात । गमन करी ॥१११॥ तो महोत्सव पाहून । देव, नाग, मुनिजन । निज भाग्य प्रशंसून । जाती गृहीं ॥११२॥ आणिक एक गुजगोष्ट । तुजपाशीं करितों स्पष्ट । ऐक गिरिजे! दृढनिष्ठ । बुद्धि तुझी ॥११३॥ काक-भुशुंडी मी मिळून । संगें होतों दोघेजण । मनुष्यरूप म्हणून । कळलें न कुणा ॥११४॥ परमानंदें पूरित । प्रेमसुखें प्रफुल्लित । भान विसरून मार्गांत । फिरलों मग्न ॥११५॥ ऐसें पावन चरित । त्यासचि होय ज्ञात । कृपा करी रघुनाथ । जयावरी ॥११६॥ असो, तया अवसरीं । जो जो आला जैशापरी । भूप देई ज्या–अंतरीं । इच्छा जशी ॥११७॥ गज, रथ, आणि सोनें । तुरंगम, गायी, रत्नें । भूपें अर्पिलीं वसनें । नानापरीं ॥११८॥ सर्वांचीं अंतःकरणें । तोषविलीं भूपतीनें । जेथें तेथें आशीर्वचनें । देतीं जन ॥११९॥

राजतनय ते सर्व । होवोत कीं चिरंजीव । जे का ईश स्वयमेव । तुलसीदासाचे ॥१२०॥ ऐशापरी कांहीं दिन । गेले असती लोटून । दिनरात्र कळे चि न । लोटतांहि ॥१२१॥ कराया नामकरण । समय पातला जाणून । ज्ञानीमुनींस निमंत्रण । धाडी नृप ॥१२२॥ त्यांची करूनिया पूजा । काय बोले तेव्हां राजा । 'मनीं योजिलीं तीं योजा । नामें मुने!'॥१२३॥ (भूत, भविष्य वर्तमान । कळतें वसिष्ठांलागून । म्हणून केलें कथन । ऐशापरी ॥१२४॥ कुणाचीं कैशीं लक्षणें । सामान्य वा विलक्षणें। तैशींच नामें योजणें । पुत्रांप्रति ॥१२५॥ भूपतीचें मनोगत । जाणूनिया मुनिनाथ । काय म्हणती त्याप्रत । श्रवण करा ॥१२६॥) "एकेका पुत्राचीं नामें । अनेक आणि निरुपमें । राया! सांगतों यथाक्रमें । यथामति ॥१२७॥ जो आनंदाचा सागर । जो का सुखाचें भांडार । एका कणें सुखी निर्भर । लोकत्रय ॥१२८॥ सकल सुखाचें धाम । त्याचें 'राम' ऐसें नाम। सर्व लोकांसी विश्राम- । दायक जो ॥१२९॥ विश्व-पालन-पोषण । करीतसे जो नंदन । त्याचें ठेविलें अभिधान । 'भरत' ऐसें ॥१३०॥ जयाचें करितां स्मरण । होय शत्रु-निर्दलन । वेद प्रसिद्ध 'शत्रुघ्न' । नाम त्याचें ॥१३१॥ शुभ लक्षणांचें सदन । रामाचें प्रेमभाजन । सर्व जगतालागून । आधार जो ॥१३२॥ श्रीसद्गुरु वसिष्ठांनीं । ठेविलें तयालागुनी । लक्ष्मण ऐसें जाणुनी । श्रेष्ठ नाम ॥१३३॥ हृदयीं करून विचार । गुरूंनीं केला नामोच्चार । राया! तुझे चारी पुत्र । वेदतत्त्व ॥१३४॥ मुनिजनांचें वैभव । शिवप्राण भक्तसर्वस्व । बाललीला रसभाव । सुखकारक ॥१३५॥ (सद्गुरुमुखेंकरून । पुत्रलक्षणें ऐकून । झालें प्रमुदित मन । भूपतीचें ॥१३६॥)

निज बालपणापासुनी । परम हितकर्ता जाणुनी । प्रीति धरी रामचरणीं । लक्ष्मण तो ॥१३७॥ भरत आणि शत्रुघ्न । बंधु परस्पर मिळून । स्वामीसेवकासमान । प्रेम करिती ॥१३८॥ सुंदर श्याम–गौर वर्ण । यापरीं तीं युग्में दोन । शोभा निरखून तृण । तोडिती माता ॥१३९॥ (आशीर्वाद–भावें चित्तीं । जैसें अलाबला घेती । तैसें तिकडें[1] तृण तोडिती । रूढि ऐसी ॥१४०॥) शीलस्वरूपगुणांचें । चारी पुत्र धाम साचें । त्यांत सुखसिंधु रामाचें । विशेषत्व ॥१४१॥ श्रीरामाच्या हृदयांत । कृपाचंद्र प्रकाशित । तद्रम्य हास्यें सूचित । किरणें त्याचीं ॥१४२॥ कधीं मांडीवरी बसवी । सुंदर पाळण्यांत निजवी । लडिवाळ शद्बें खेळवी । माउली ती ॥१४३॥ जो व्यापक सर्वगत । परब्रह्म मायातीत । हर्षशोकविरहित । निर्गुण जो ॥१४४॥ जन्म नाहींच जयास । भक्तिप्रेमा होऊन वश । कौसल्येच्या ओसंगास । तोच क्रीडे ॥१४५॥ कोटिकामापरी सुंदर । प्रभूचें श्याम शरीर । नीलपद्म कीं गंभीर । मेघ जणुं ॥१४६॥पदकमल आरक्त । नखप्रभा कैसी तेथ । कमलदलावरी स्थित । मोतेंच जणुं ॥१४७॥ ध्वजवज्रांकुश चिन्ह । पदतलीं शोभायमान । ऐकतां मुग्ध मुनिमन । नूपुररव ॥१४८॥ कटिभागीं ती किंकिणी । उदरावरी रेखा तीन्ही । पाहिली खोल नाभी ज्यांनीं । जाणती ते ॥१४९॥ बहुभूषणें मंडित । प्रभूचे विशाल हस्त । सिंहनखाची अतुलित । शोभा हृदीं ॥१५०॥ (व्याघ्रसिंहनखाप्रत । करुनी सुवर्णमंडित । स्त्रिया मुलाच्या कंठांत । बांधितात ॥१५१॥ कुणाची न लागो दृष्ट । बाधो न भय संकट । ऐसा असे परिपाठ । जनांतरीं ॥१५२॥)

---

१ उत्तर भारतांत

रत्नजडित मुक्ताहार । विप्रपद पाहतां अंतर । शोभतसे ॥१५३॥ कंठ शंखापरी असे । हनु अति सुंदर दिसे । असंख्य कामांची विलसे । शोभा मुखीं ॥१५४॥ दंत तेंवि दोन दोन । ओष्ट ते आरक्त वर्ण । नासिका, तिलक वर्णन । करवें कुणा? ॥१५५॥ सुंदर कर्णयुगुल । त्यापरी गोंडस गाल । मधुर बोबडे बोल । अत्यंत प्रिय ॥१५६॥ नील कमलासमान । विशाल नयनें दोन । वक्र भृकुटि, पिंपळपान । भालावरी ॥१५७॥ कोमल आणि कुरळे । जावळ अतीव काळे । जे मातेनें सांवरिले । परोपरी ॥१५८॥ अंगरखें तें अंगांत । परिधान केलें पीत । कर-जानूवरी रांगत । आवडे मज ॥१५९॥ (हें बाल-रूपाचें ध्यान । मज आवडे म्हणून । सांगे पार्वतीलागून । भगवान् शिव ॥१६०॥ तुलसीदासांचें चित्तीं । तीच नित्य ध्यानमूर्ति । सगुणोपासनेची प्रीति । व्यक्त झाली ॥१६१॥) वर्णितां प्रभुरूपास । असमर्थ श्रुति-शेष । स्वप्नीं तरी दिसलें ज्यास । तोचि जाणे ॥१६२॥ जो का सुखाचें सदन । जेथें नसेचि अज्ञान । वाणी-ज्ञानेंदियाहून । वेगळा जो ॥१६३॥ दशरथ-कौसल्येप्रत । प्रेमें जो वश अत्यंत । करीत असे पुनीत । बाललीला ॥१६४॥ यापरी श्रीराम स्वतां । जगताचा मातापिता । नागरिकां सुखदाता । अयोध्येच्या ॥१६५॥ श्रीरामचरणीं ज्यांनीं । प्रीति धरिली रात्रंदिनी । त्यांची ऐसी ही भवानी ! । प्रत्यक्ष गति ॥१६६॥ (ज्यांच्या प्रीतिकारणें । प्रभूस लागलें येणें । भाग पडलें करणें । बाललीला ॥१६७॥) राम-विन्मुख होऊन । कोटयवधि करितां यत्न । कोण भवबंधांतून । सोडवूं शके? ॥१६८॥ स्थावरजंगम जीवास । जिनें केलें निजवश । वाटतसे त्या मायेस । प्रभूचें भय ॥१६९॥ तो भृकुटिविलासें-करून । नाचवी मायेलागून । सांगा ऐसा प्रभु सोडून । भजावें कुणा?

कुणा? ॥१७०॥ कायावाचामनेंकरून । त्यजून चातुर्याभिमान । भजतां तो रघुनंदन । कृपा करी ॥१७१॥ करून ऐशा रीतीनें । बाललीला भगवंतानें । सर्व नागरिकांकारणें । सुख दिलें ॥१७२॥ कधीं ओसंगीं घेऊन । माता हालवी त्यालागून । कधीं झोके दे निजवून । पाळण्यांत ॥१७३॥ यापरीं कौसल्या माता । प्रेममग्न झाली असतां । न कळे तिज लोटतां । रात्रदिन ॥१७४॥ निज पुत्रस्नेहाप्रत । होऊन माता अंकित । करीतसे बालचरित- । गायनातें ॥१७५॥ एके समयीं जननी । रामचंद्रातें स्नापुनी । निजवी त्या शृंगारुनी । पाळण्यांत ॥१७६॥ निजकुलींचा भगवान् । इष्टदेव नारायण । त्याच्या पूजेस्तव पक्वान्न । सिद्ध करी ॥१७७॥ देवपूजा ती सारून । नैवेद्य केला अर्पण । जाती झाली तैं आपण । पाकगृहीं ॥१७८॥ पुनरपि देवघरांत । कौसल्या परतली परत । राम बसलासे जेवीत । अव- लोकी ॥१७९॥ चित्तीं भयभीत होई । बालकासमीप जाई । पुन्हां तिथें तया पाही । पहुडलेला ॥१८०॥ पुन्हां येऊन परत । देवगृहीं पाही सुत । हृदय कांपे, मनांत । धीर सुटे ॥१८१॥ येथें तेथें दोन्ही स्थानीं । बालकातें विलोकुनी । गमे भ्रम झाला मनीं । कीं बाळ दुजें ॥१८२॥ माता घाबरली फार । हें पाहून रघुवीर । करीतसे हास्य मधुर । गोजिरवाणें ॥१८३॥ त्याच समयीं दाविलें । मातेकारणें आपुलें । अद्भुत अखंड भलें । विराट् रूप ॥१८४॥ प्रभूच्या रोमरोमांत । कोटयानुकोटि अनंत । ब्रह्मांडें दिसतीं तेथ । लागलेलीं ॥१८५॥ चंद्रसूर्य असंख्यात । चतुरानन उमाकांत । बहु सरित्सिंधुपर्वत । पृथ्वी, वनें ॥१८६॥ काल, कर्म आणि गुण । स्वभाव त्यापरीं ज्ञान । जें केलें न अवलोकन । ऐकिलेंहि ॥१८७॥ सर्वतोपरी वलवती ।

माया झाली अवलोकिती । हात जोडून उभी होती । अति-भयें ॥१८८॥ माया नाचवी जयांसी । त्याहि पाहिलें जीवांसी । भक्ति हि पाहिली त्यांसी । सोडवी जी ॥१८९॥ तनु रोमांचित होऊन । शद्व न निघे मुखांतून । नमवी नेत्र झांकून । चरणीं शिर ॥१९०॥ अति आश्चर्यचकित । पाहूनिया मातेप्रत । प्रभु बालरूपाप्रत । धरी पुन्हां ॥१९१॥ करूं न शकली स्तुति । भय मानी निज चित्तीं । कीं मी जगत्पित्याप्रति । मानित्यें सुत ॥१९२॥ मातेकारणें श्रीहरि । समजावी नानापरीं । कुठेंहि हें प्रकट न करीं । ऐक माते! ॥१९३॥ कौसल्या रामजननी । वरचेवर त्या क्षणीं । आपुले कर जोडोनी । प्रार्थीतसे ॥१९४॥ "कधींहि आजपासून । न टाकावें गा! मोहून । मायेनें मज लागून । प्रभो ! तुझ्या" ॥१९५॥ बाललीला नानापरी । करूनिया तो श्रीहरि । अत्यानंद अर्पण करी । भक्तांप्रति ॥१९६॥ असो, ते बांधव चारी । कांहीं काळ लोटल्यावरी । मोठे झाले सुख-कारी । परिजनांचे ॥१९७॥ मग चूडाकर्माप्रत । जाऊन करिती मुनिनाथ । दक्षिणा मिळाली बहुत । विप्रांस पुन्हां ॥१९८॥ असो, परम मनोहर । चरित्र अपरंपार । करीत फिरती सुकुमार । चौघेहि ते ॥१९९॥ कायावाचा मनाप्रति । अगोचर जो निश्चितीं । तोचि खेळे जगत्पति । दशरथांगणीं ॥२००॥ करीत असतां भोजन । राजा घेई बोलावून । संवगड्यांतें टाकून । न येचि तो ॥२०१॥ जेव्हां बोलवायाप्रत । कौसल्या जाई धांवत । प्रभु ठुमकत ठुमकत । पळून जाई ॥२०२॥ वेद 'नेति' म्हणे ज्यास । अंत न लागे शिवास । माता धरूं धांवे त्यास । अट्टाहासें ॥२०३॥ धूलीनें भरलें शरीर । तैसाचि येई रघुवीर । अंकीं बसवी नृपवर । हास्यभरें ॥२०४॥ भोजन करी रघुनाथ । परि

चंचलचि चित्त । पाहतांचि संधिप्रत । मध्यंतरीं ॥२०५॥ हळूंच उठून पळे । ओरडत मुखें बळें । जें का असें ओशटलें । दध्योदनें ॥२०६॥ सरल सुंदर अति । ऐशा बालचरिताप्रति । शारदा, शेष शिव, श्रुति । वर्णितात ॥२०७॥ या चरित्रीं अनुरक्त । होय न जयाचें चित्त । ते जन केवळ वंचित । विधात्यानें ॥२०८॥ जेव्हां कुमारावस्थेतें । प्राप्त झाले सर्व भ्रातें । गुरु, माता, पिता त्यांतें । जानवीं देतीं ॥२०९॥ (उपनयनसंस्कार करून । यज्ञोपवीत घालून । गायित्री मंत्रोच्चारण । करविलें तैं ॥२१०॥) गुरुगृहासी जाऊन राम करी विद्याध्ययन । सकल विद्या स्वाधीन । अल्पकालीं ॥२११॥ ज्याच्या सहजश्वासांतून । चारहि वेद निर्माण । तो करितो अध्ययन । महदाश्चर्य! ॥२१२॥ विद्याविनयें निपुण । अंगीं शील आणि गुण । राजेपणाचे चौघेजण । खेळती खेळ ॥२१३॥ ज्याच्या हातीं धनुःशर । दिसे शोभायमान फार । रूप पाहून चराचर । मुग्ध होय ॥२१४॥ ज्या ज्या मार्गांभीतरीं । खेळती बांधव चारी । पाहतां सर्व नरनारी । थक्क होती ॥२१५॥ अयोध्या नगराभीतरीं । जनगण जो वास करी । बालक वृद्ध त्यापरी । नारीनर ॥२१६॥ त्यां आपुल्या प्राणांहुनी । प्रिय गणी विशेषपणीं । कृपाळु सर्वांलागुनी । रामचंद्र ॥२१७॥ निज बांधव मित्रगण । संगे घेई पाचारून । जातसे मृगयेलागून । सदोदित ॥२१८॥ मेध्य पावन जाणावें । त्या मृगासचि मारावें । प्रतिदिनीं आणून दावावें । भूपतीतें ॥२१९॥ (क्षात्रधर्मामाजीं भली । मृगया अवश्य बोलली । तदुक्त पशूंस योजिली । 'मेध्य' संज्ञा ॥२२०॥ पूर्वजन्मीं कर्म चांग । परि किंचित् कर्मभोग । म्हणून जाहले मृग । दैवयोगें ॥२२१॥

ते ते सारे मृगगण । चित्तीं जाणून 'पावन' । अर्पी त्या वैकुंठ-भुवन । वधूनिया ॥२२२॥) श्रीराम--बाणेंकरून । जे मृग पावती मरण । ते देवलोकालागून । प्राप्त होती ॥२२३॥ बंधुमित्रांच्या समागमें । भोजन करावें श्रीरामें । आज्ञेनें वर्तावें नेमें । मातापित्यांच्या ॥२२४॥ ज्या ज्या वर्तनेंकरून । सुखी होती पुरजन । तेंचि आणावें घडवून । कृपानिधीनें ॥२२५॥ वेद--पुराणें बरवीं । लक्ष्यपूर्वक ऐकावीं । स्वयें समजावून द्यावीं । भावंडांतें ॥२२६॥ श्रीराम रघुनंदन । प्रातःसमयीं उठून । मातापित्यालागून । वंदीतसे ॥२२७॥ अनुज्ञा घेऊन त्यांची । कामें करावीं अयोध्येचीं । लीला पाहून दशरथाची । उदित वृत्ति ॥२२८॥ व्यापक आणखी अगम । निरिच्छ ज्या नसे जन्म । नाहीं रूप, नाहीं नाम । निर्गुण जो ॥२२९॥ भक्त-जनांच्या हेतुस्तव । नानाप्रकारें राघव । करी अद्भुत अभिनव । चरित्रातें ॥२३०॥ येथवर कथानक । मीं वर्णिलें सकलिक । ऐका लक्ष्यपूर्वक । पुढील कथा ॥२३१॥ (सोपानींचा मार्ग भला । अति दीर्घ जरी वाटला । तदर्थ अकरावा योजिला । विश्राम हा ॥२३२॥ रसिक भाविक श्रोत्यांस । विनवीतसे देवीदास । माझ्या बोबड्या बोलांस । मान्य करा ॥२३३॥)

—:०:—

# विश्राम १२ वा

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्यौनमः
श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः

विश्वामित्र महामुनि । होते जे परम ज्ञानी । पवित्र आश्रम जाणुनी । वसती वनीं ॥१॥ मुनीश्वर वनप्रांतीं । योग-याग-जप करिती । मारीच-सुबाहूंतें भीती । अतिशय ॥२॥ यज्ञ होतो हें पाहती । राक्षस धांवून येती । उपद्रव देती, पावती । दुःख मुनि ॥३॥ विश्वामित्रांच्या चित्तीं । चिंता व्यापिलीसे अति । पापी राक्षस न मरती । हरिविण ॥४॥ त्या समयीं मुनीश्वर । मनीं करिती विचार । प्रभु हराया भूभार । अवतरलासे ॥५॥ याच निमित्तेंकरून । पाय पाहीन जाऊन । विनंति करून आणीन । दोघां भावां ॥६॥ (राक्षसांचा नाश व्हाया । मुनि समर्थ असूनिया । चिंता उद्‍भवे कासया । हृदंतरीं ॥७॥ समर्थ असती मुनिराय । परि हें क्षत्रियकार्य । स्वयें करितां पुण्यक्षय । होय वृथा ॥८॥ वधार्थ येतसे क्रोध । तेणें तया होय बाध । म्हणून न करिती वध । स्वयें मुनि ॥९॥) ज्ञानवैराग्यादिकरून । सकल गुणांचें सदन । तो प्रभु डोळे भरून । पाहीन मी ॥१०॥ ऐशा प्रकारें करून । मनोरथ मनीं योजून । करितां मार्गक्रमण । अविलंबें ॥११॥ शरयु नदीसी येउनी । स्नान करिती गाधिजमुनि । थेट राजसभेलागुनी । प्राप्त झाले ॥१२॥ गाधिजमुनीचें आगमन । भूपें करितांच श्रवण । सर्वे विप्रांस घेऊन । भेटतसे तो ॥१३॥ साष्टांग-

प्रणामेंकरुनी । मुनिप्रति संमानुनी । बैसवी त्यांतें आणुनी । निजासनीं ॥१४॥ तच्चरणां प्रक्षाळुन । करी उत्कृष्ट पूजन । म्हणे 'अन्य न मत्समान । धन्य आज' ॥१५॥ नानापरींचें भोजन । करवी मुनिलागून । हृष्ट होय मुनिमन । अतिशयें ॥१६॥ मग निजपुत्र चारी । घाली मुनिपदांवरी । त्यां शुद्धि नुरे शरीरीं । रामदर्शनें ॥१७॥ मुखशोभा अवलोकितां । मुनिलागीं तन्मयता । जणुं चकोरा लुब्धता । पूर्णचंद्रीं ॥१८॥ तैं हृष्टमनेंकरून । राव बोलला वचन । "मुने ! ऐसी कृपा केली न । आजवरी ॥१९॥ आपुलें हें आगमन । किंनिमित्त आलें घडून । विलंब न लावितां करीन । निवेदा तें" ॥२०॥ (अकल्पित होतां आगमन । घडलें संमान–पूजन । रायें मागतां अनुशासन । म्हणती मुनि ॥२१॥) "धाकट्या बंधुसहित । दे मजला रघुनाथ । राक्षसवधानें सनाथ । होईन मी ॥२२॥ करून प्रसन्न मन । राया ! दे पुत्रांलागुन । मोह आणखी अज्ञान । टाकूनिया ॥२३॥ (पुत्रवात्सल्य तो मोह । अज्ञान केवळ संदेह । कैसा बाळांचा निर्वाह । राक्षसांपुढें ? ॥२४॥) धर्म आणि यशःप्राप्ति । राया एणें तुजप्रति । कल्याण होईल अति । पुत्रांचेंहि" ॥२५॥ अत्यंत अप्रिय वाणी । भूपाच्या पडतां श्रवणीं । तोंडचें पळालें पाणी । हृदय कांपें ॥२६॥ "वृद्धपणीं मजलागून । लाभले चारी नंदन । मुने! बोललां वचन । न विचारितां ॥२७॥ मागा भूमि, मागा गोधन । मागा धनकोश संपूर्ण । आज सर्वस्व देईन । अत्यानंदें ॥२८॥ देहप्राणांहून कांहीं । प्रिय ऐसें दुजें नाहीं । एका निमिषांत तेंहि । देईन मुने! ॥२९॥ प्राणापरी सारे सुत । प्रिय आहेत मजप्रत । परि स्वामिन् न देववत । श्रीराम हा ॥३०॥ अति भयानक कठोर । कोठें ते हो!

निशाचर । कोठें परम सुकुमार । सुंदर सुत" ॥३१॥ पूर्ण प्रेमरसेंकरुनी । ऐकून ती भूपवाणी । आनंदती मुनि ज्ञानी । हृदयांतरीं ॥३२॥ (परि रायाचें मनोगत । कळलें विश्वामित्रांप्रत । रामासी न दे दशरथ । कांहीं केल्या ॥३३॥ राजसभेमाजीं भले । वसिष्ठ होते बैसले । त्यांनीं मनोगत जाणिलें । भूपतीचें ॥३४॥ मोहें आणि अज्ञानें । जरी का दशरथानें । न दिलें पुत्राकारणें । मुनिप्रति ॥३५॥ तरी तें होईल व्यर्थ । घडेल मोठाच अनर्थ । कोपतील महा समर्थ । विश्वामित्र ॥३६॥ ज्या हेतुस्तव श्रीराम । आला घेऊन नरजन्म । तो हेतु पावे उपशम । निष्कारण ॥३७॥ 'मागाल तें मी देईन । ऐसें दिलें अभिवचन । तें न पाळितां ये घडून । वचनभंग ॥३८॥ दिलें वचन तें प्रमाण । केव्हांहि नव्हें अप्रमाण । जरी लया गेला प्राण । त्या कारणें ॥३९॥ मुनीचा कोप दारुण । भूपाचें तें आश्वासन । आणि अवतार कारण । श्रीरामाचें ॥४०॥ या तीनहि गोष्टींप्रत । आणून निजध्यानांत । संमति देती मुनिनाथ । वसिष्ठ ऋषि ॥४१॥) तें नानाप्रकारें करूनी । समजाविलें वसिष्ठांनीं । संशय गेला निरसुनी । भूपतीचा ॥४२॥ अति आदरेंकरून । पाचारी दोन्ही नंदन । नानापरीं दे शिकवण । आलिंगुनी ॥४३॥ म्हणे, "हे दोघे कुमार । असती प्राणाचे आधार । अन्य न कुणी मुनीश्वर । तुम्हीच पिता" ॥४४॥ मग पुत्रांतें भूपालें । ऋषिलागीं सोंपविलें । आशीर्वादहि दिधले । नानापरीं ॥४५॥ निज मातेच्या मंदिरीं । श्रीराम गमन करी । शिर ठेवून पायांवरी । निघता झाला ॥४६॥ (लक्ष्मणहि त्याचपरीं । जाऊन मातेचे मंदिरीं । वंदूनिया अत्यादरीं । निघता झाला ॥४७॥) पुरुषसिंह साचार ।

रामलक्ष्मण दोघे वीर । कराया मुनिभय दूर । चालले मुदें ॥४८॥ कृपासिंधु दोघेजण । मति ज्यांची धैर्यपूर्ण । सर्व विश्वाचें कारण । साधनहि ॥४९॥ (श्रीराम ब्रह्म परिपूर्ण । जगाचें आदिकारण । विश्वस्थितीसी लक्ष्मण । साधन रूप ॥५०॥ घेऊन राम–सौमित्र । निघाले जें विश्वामित्र । कैसा शोभे राजीवनेत्र । रामचंद्र ॥५१॥) अरुण नेत्रयुगुल । हृदय, बाहु विशाल । नीलाब्ज–श्यामतमाल । तैसी तनु ॥५२॥ कटीं कसिला पीतांबर । भाताहि तो मनोहर । सुंदर धनुष्य शर । दोन्ही हातीं ॥५३॥ एक श्याम, एक गौर । दोघेहि बंधु सुंदर । लाभलें महा भांडार । विश्वामित्रा ॥५४॥ म्हणे, "जाणिलें सुनिश्चित । कीं प्रभु ब्राह्मणभक्त । मदर्थ त्यजिलें पित्याप्रत । भगवंतानें" ॥५५॥ असो, चालतां वाटचाली । मुनींनीं जी दाखविली । क्रोधें ताटिका धांवली । ऐकून ती ॥५६॥ (सुकेतु यक्षाची कन्यका । नाम तियेचें ताटिका । सहस्र हस्तींचें बल देखा । होतें तिज ॥५७॥ ताटिका येतां वयांत । अर्पी तो तिज सुंदाप्रत । तिचे पोटीं झाला सुत । मारीचि तो ॥५८॥ अगस्तिशापेंकरून । सुंद पावलासें निधन । पुत्रासह जाई धांवून । मुनीवरी ॥५९॥ 'यापुढें राक्षसयोनि । मिळेल तुजलागुनी । ऐसें अगस्तिमुनींनीं । शापिलें तिज ॥६०॥ ) एकच प्रेरून बाण । हरिला ताटिकेचा प्राण । दीन जाणून केलें अर्पण । स्वपद रामें ॥६१॥ विश्वामित्र निजचित्तीं । जाणून स्वस्वामीप्रति । विद्यानिधिप्रति देती । ऐसी विद्या– ॥६२॥ ज्या विद्येच्या प्रभावें । क्षुधा, तृषा मुळीं न पावे । अंगीं अतुल प्रकटावें । तेजोबल ॥६३॥ आयुधें शस्त्रास्त्रादिक । अर्पूनिया सकळिक । आणिती रघुनायक । निजाश्रमीं ॥६४॥ कंद, मूल'

फल उत्तम । देऊन जेवविला राम । भक्तकाम कल्पद्रुम । जाणूनिया ॥६५॥ सुप्रभातीं रघुराय । मुनिप्रति म्हणे काय । 'तुम्ही जाऊन निर्भय । यज्ञ करा' ॥६६॥ ( ऐकून मुनीचें चित्त । झालें मुदित अत्यंत । गुरुशिष्याचें हृद्‌गत । एक झालें ॥६७॥) सर्वहि मुनि मिळून । करूं लागलें हवन । यज्ञ-रक्षक रघुनंदन । स्वयें होय ॥६८॥ हा ऐकतां समाचार । क्रोधी मारीचि निशाचर । घेऊन पातला सहचर । मुनि-द्रोहें ॥६९॥ त्यासी निष्फळचि बाण । मारितां श्रीरघुनंदन । जाऊन पडे शतयोजन । समुद्रपार ॥७०॥ ( अमोघ श्रीराम-बाण । मारितां घे शत्रुप्राण । केवळ कराया निस्त्राण । ऐसें करी ॥७१॥ मारिलें न मारिचाप्रत । काय प्रभूचें मनोगत । जाणून पुढील संकेत । करी ऐसें ॥७२॥ ) मग प्रेरून अग्नि-बाण । सुबाहूचा घेतला प्राण । राक्षस–सैन्य लक्ष्मण । नष्ट करी ॥७३॥ मारून राक्षसगण । निर्भय करी ब्राह्मण । स्तुति करिती सर्वजण । मुनिदेवता ॥७४॥ कांहीं दिवसपर्यंत । त्या स्थळींच रघुनाथ । राहे होऊन दयावंत । विप्रांवरी ॥७५॥ भक्तिभावानें बहुत । पुराणींच्या कथांप्रत । विप्र सांगती, जरी ज्ञात । राघवातें ॥७६॥ ( करी जनक नृपवर । जानकीचें स्वयंवर । तदर्थ धनुर्यज्ञ थोर । योजिला तेणें ॥७७॥ धनुर्यज्ञाचें निमंत्रण । आलें गाधिजालागून । तें काय बोलती वचन । विश्वामित्र ॥७८॥ ) तें म्हणती मुनिवर । समजावून सादर । पहावें एक चरित्र । जाऊन प्रभो ! ॥७९॥ धनुर्यज्ञ ऐसे शब्द । ऐकतां राम सुखकंद । विश्वामित्रांसवें सानंद । निघता झाला ॥८०॥ क्रमीत असतां मार्ग । आश्रम देखे दुर्भंग । जेथें नाहीं खग, मृग, । जीवजंतु ॥८१॥ शिला पाहून रघुपति । पुसे

विश्वामित्रांप्रति । मुनि सर्व कथा सांगती । सविस्तर ॥८२॥ (मानसकन्या धात्याची । होती अहल्या नांवाची । अतुल सुंदरता जिची । अवर्णनीय ॥८३॥ तिचें सौंदर्य पाहून । मोहित झाला सुरगण । तिचें व्हावें संरक्षण । इच्छी विधि ॥८४॥ तपस्वी गौतम ऋषि । ठेव म्हणून त्यापाशीं । विधाता त्या अहल्येसी । ठेवीतसे ॥८५॥ कांहीं कालानंतर । कन्या मागे चतुर्वक्त्र । परत देई मुनीश्वर । कुमारी ती ॥८६॥ मुनीची जितेंद्रियता । अवलोकून विधाता । प्रमोदें झाला अर्पितां । गौतमासी ॥८७॥ हें कळतां वर्तमान । रागावले सुरगण । इंद्र विशेषेंकरून । क्रुद्ध झाला ॥८८॥ संधि पाहून एके दिनीं । गौतमाचा वेष घेउनी । इंद्र तयाच्या सदनीं । प्राप्त झाला ॥८९॥ अनुष्ठाना गेला ऋषि । पाहून त्या एकांतासी । इंद्र धरी बाहुपाशीं । अहल्येतें ॥९०॥ अकालीं अविधि कर्म । न करीच पति गौतम । परि पतिव्रता परम । भोग देई ॥९१॥ ऋषि आला तितुक्यांत । तंव अहल्या साशंकित । पुसे तेव्हां इंद्राप्रत । कोण तूं गा? ॥९२॥ तेणें कथिलें निजनाम । तैं पतिव्रता ससंभ्रम । लपवीतसे अधम । एकीकडे ॥९३॥ विलंबें उघडी द्वार । साशंक तैं ऋषिवर । पुसतसे समाचार । विलंबाचा ॥९४॥ भयातिशयें प्रपन्न । विषय करून प्रच्छन्न । मनीं होऊनिया खिन्न । मौन धरी ॥९५॥ तैं तपोबलेंकरून । गौतमें मर्म ओळखून । बोलिलें शापवचन । इंद्राप्रति ॥९६॥ "वेष घेऊन संप्रति । केली जी का कपटकृति । पडतील शरीराप्रति । सहस्र भगें" ॥९७॥ होऊन लज्जायमान। इंद्र जातांचि निघून । मग अहल्येलागून । शापीतसे ॥९८॥ पाप तियेचें अज्ञात । ऋषीस जाहलें ज्ञात । परि तिनें मत्याप्रत । वंचिलेंसे ॥९९॥



त्वच्चरणां । रक्ष रक्ष ॥११५॥ मुनीनें जें का शापिलें । तें अत्यंत भलें केलें । अनुग्रहचि त्या मानिलें । शापास मीं ॥११६॥

असत्याचें महापाप। त्यायोगें देतसे शाप । "पडशील शिलारूप। होऊनिया" ॥१००॥ मनीं झाला पश्चात्ताप । अहल्या मागे उःशाप । तैं मुनि टाकून कोप । काय म्हणे ॥१०१॥ "जेव्हां श्रीरघुनंदन । देईल तुजला दर्शन । उद्धार निश्चयेंकरून। होय तुझा" ॥१०२॥ यापरीं कथा सविस्तर । सांगूनिया विश्वा-मित्र । काय म्हणती सादर । श्रवण करा ॥१०३॥ ) "गौतम ऋषींची कामिनी । शापास वश होउनी । पाषाणदेह धरोनी। धीर धरी ॥१०४॥ पदकमलाच्या रजातें। अहिल्या मनीं इच्छिते। यास्तव तूं रघुपते ! । कृपा करीं" ॥१०५॥ ( वाट चालतां चालतां । श्रीराम समीप येतां । पदरज पडलें तत्त्वतां । शिळे-वरी ॥१०६॥) शोकनाशक पावन । स्पर्श पावतांच चरण । प्रकटली त्या शिलेंतून । तपोमूर्ति ॥१०७॥ पाहून रघुनायक। भक्तांतें सुखदायक । कर जोडून संमुख । उभी राहे ॥१०८॥ अति प्रेमानें अधीर । रोमांचित झालें शरीर । शद्व न बोलवे साचार । मुखावाटें ॥१०९॥ ती महद्‌भाग्यशालिनी । मिठी मारी प्रभुचरणीं । वाहे नेत्रयुगुलांतुनी । प्रेमाश्रुधारा ॥११०॥ धैर्य धरूनिया चित्तीं । तिनें जाणिलें प्रभुप्रति । श्रीरामकृपेनें भक्ति । प्राप्त झाली ॥१११॥ अति निर्मल वाणीनें । स्तुति आरंभिली तिनें । "जय रघुनाथ ! ज्ञानें । कळतोस तूं ॥११२॥ मी तो अपवित्र नारी । तूं जगत्पावन हरि । भक्तजनां सुख-कारी । रावणरिपो ! ॥११३॥ (प्रतिकल्पाचे अंतरीं । श्रीराम अवतार धरी । याचि ज्ञानें म्हणे नारी । रावणरिपो ॥११४॥) अगा ! राजीवलोचना! । संसार–भय–मोचना! । शरण आल्यें त्वच्चरणां । रक्ष रक्ष ॥११५॥ मुनीनें जें का शापिलें । तें अत्यंत भलें केलें । अनुग्रहचि त्या मानिलें । शापास मीं ॥११६॥

तेणेंचि डोळे भरून । पाहिला भवमोचन । या लाभाचें महिमान । शिव जाणे ॥११७॥ माझी इतुकीच विनंति । मी तो आहे मूढमति । प्रभो, अन्य वराप्रति । मी न मागे ॥११८॥ त्वत्पद-पद्मपराग । तद्रसाचे सानुराग । या अहल्येचा मनोभृंग । पान करो ॥११९॥ ज्या चरणीं पवित्र अति । सुरसरिता भागीरथी । शिव धरी शिरावरती । प्रकटतांचि ॥१२०॥ ज्यातें पूजीतसे धाता । तेंचि पदाब्ज आतां । मच्छिरीं झालास धरिता । कृपाळो हरे!" ॥१२१॥ स्तवून ऐशा प्रकारीं । अहल्या गौतम-नारी । लोळे प्रभुपदांवरी । वारंवार ॥१२२॥ जो अभीष्ट स्वमनांत । पावून त्या वराप्रत । पतिलोकीं आनंदांत । जाती झाली ॥२२३॥ श्रीरामचंद्र श्रीहरि । दीनवत्सल यापरीं । कारणाविण दया करी । दयाघन ॥१२४॥ अरे शठा तुलसी-दासा! । कां न भजसी प्रभु ऐसा । कपटसंसार-पाशा । तोडू-निया ॥१२५॥ (लाभ आपुला स्वतंत्र । वा न पाही दयापात्र । दया करितो सर्वत्र । निर्हेतुक ॥१२६॥ पश्चात्ताप होऊन चित्ता । उद्‌भवतांचि अनन्यता । दया करी ही निश्चितता । कारणाविण ॥१२७॥ निर्हेतुक दयावंत । ऐशा या श्रीरामा-प्रत । कां न भजावें संसारांत । जीवमात्रें ? ॥१२८॥) विश्वा-मित्राचे संगतीं । रामलक्ष्मण चालती । जगत्पावनी गंगेप्रति । प्राप्त झाले ॥१२९॥ गाधिसुतें तया कालीं । सर्व कथा निवे-दिली । कैसी पृथ्वीवरी आली । देवगंगा ॥१३०॥ तें ऋषि-सह वर्तमान । प्रभूनें केलें गंगास्नान । ब्राह्मणां मिळालें दान । नानापरीं ॥१३१॥ मुनिवृंदासमवेत । हर्षें चालत चालत । वेगें जनकपुराप्रत । प्राप्त झाले ॥१३२॥ नगरींची रम्यता जेव्हां । दृष्टीं पडली राघवा । लक्ष्मणासह तेधवां । हर्षें

अति ॥१३३॥ वापी, कूप, सरोवर। सरिताहि असती फार। रत्नांच्या पायऱ्या, नीर। अमृतासम ॥१३४॥ मधुमत्त ऐसे भ्रमर। गुंजारव करिती मधुर। खगकूजन सुंदर। नाना-वर्णी ॥१३५॥ नाना वर्णांचीं भलीं। कमलेंहि विकासलीं। त्रिविध वायु सर्वकालीं। सुखदायक ॥१३६॥ (सुगंधित, शीत, मंद। ऐसा वायु वाहे त्रिविध। सर्व ऋतूंत सुखद। सारखाचि ॥१३७॥) पुष्पवाटिका, उद्यानें। नानापरी वनोपवनें। जेथें बहु पक्षिगणें। वास केला ॥१ ८॥ फलपुष्पपल्लवांनीं। जीं समूळ पूर्णपणीं। शोभतीं चोहींकडुनी। नगराच्या ॥१३९॥ नगराचेंहि सौंदर्य। तैसेंच अवर्णनीय। जेथें जेथें मन जाय। तेथेंचि लुब्ध ॥१४०॥ हाट दिसे मनोहर। अंबरखाने विचित्र। स्वयें रची चतुर्वक्त्र। मणिमय जणुं ॥१४१॥ धनकनक-संपन्न। श्रेष्ठी कुबेरासमान। सर्वहि बसले घेऊन। नाना वस्तु ॥१४२॥ मनोहर राजपथ। आळीहि त्या सुशोभित। सदा राहती सिंचित। सुगंधित ॥१४३॥ मंगलमय निश्चितीं। सर्वांचींहि घरें असतीं। चित्रें काढिलीं ज्यांवरतीं। मदनेंच जणुं ॥१४४॥ स्त्रीपुरुष नगरांत। सभाग्य पवित्र संत। ज्ञानी आणि गुणवंत। धर्मशील ॥१४५॥ जनकाचें निवासस्थान। अत्यंत अनुपम जाण। देवहि विलास पाहून। थक्क होती ॥१४६॥ पाहूनिया कोटाप्रत। चकित होतसें चित्त। आडविली जणुं त्यांत। त्रैलोक्य शोभा ॥१४७॥ उज्ज्वल राजमंदिरें। मंडित रत्नभांडारें। जीं का नाना प्रकारें। घडविलेलीं ॥१४८॥ जानकीचें निवासस्थान। जें का सुंदर सदन। त्याच्या शोभेचें वर्णन। होय कैसें ? ॥१४९॥ द्वारेंहि सुंदर सारीं। कपाटें तीं वज्रापरी। भूप–परिचारिकांची सारी। भीड जिथें ॥१५०॥ अश्वशाला, गजशाला। रथशा

ज्यांची विशाला । अश्वगजरथें संकुला । सर्व । कालीं ॥१५१॥ सेनापति आणि प्रधान । अनेक शूर असून । राजगृहापरी सदन । प्रत्येकाचें ॥१५२॥ नगराच्या बहि:प्रांतीं । सरित्कासार–समीपवर्ती । उतरले असंख्य भूपति । जेथें तेथें ॥१५३॥ अनुपम आम्रवन । त्यांतून एक पाहून । सोयीस्कर शोभायमान । सर्वतोपरी ॥१५४॥ कौशिक बोलती वचन । 'आवडले मनांतून । सुज्ञ राघवा! आपण । उतरूं इथें' ॥१५५॥ 'बरें नाथ' म्हणून । राम कृपानिकेतन । सर्व मुनींस घेऊन । उतरे तिथें ॥१५६॥ महामुनि विश्वामित्र । आले असती येथवर । हा कळला समाचार । जनका-प्रति ॥१५७॥ स्वयें प्रधान शुचिष्मंत । योद्धेहि अपरिमित । गुरु, विप्र, प्रज्ञावंत । ज्ञातिजन, ॥१५८॥ विश्वामित्र मुनि-नायक । त्यां भेटाया निघे सम्यक् । ऐशा थाटें राय जनक । आनंदानें ॥१५९॥ चरण मस्तकीं धरून । भूप करीतसे वंदन । मोदें दिलें आशीर्वचन । मुनिनाथें ॥१६०॥ विप्रसमुदाया समग्र । वंदन करी सादर । स्वभाग्य जाणून थोर । हर्षे नृप ॥१६१॥ क्षेमकुशलतेचा प्रश्न । वारंवार विचारून । बसविती भूपा-लागून । विश्वामित्र ॥१६२॥ दोघे बंधु त्या समयां । प्राप्त झाले तया ठायां । गेले होते पहावया । पुष्पोद्यान ॥१६३॥ वर्ण ज्यांचा श्याम, गौर । वयें किशोर सुकुमार । विश्वनेत्रानंदकर । चित्तचोर ॥१६४॥ आला जेव्हां रघुपति । सर्वहि उत्थापन देती । विश्वामित्रें निकटवर्ती । बैसविलें ॥१६५॥ दोघां बांधवां पाहुनी । सुख झालें सर्वांलागुनी । प्रेमानंदाश्रु लोचनीं । रोमांच देहीं ॥१६६॥ मधुर मनोहर अति । अवलोकून ती मूर्ति विदेहत्व विदेहाप्रति । विशेषेंचि ॥१६७॥ (आधींच विदेह

भूपति । जीवन्मुक्त त्याची स्थिति । रामदर्शनें देहभ्रांति । समूळ जाय ॥१६८॥ जलीं अर्ध बुडाला । तो अनुभवी शीतोष्णाला । वरी उन्ह, खालीं जला । एके काळीं ॥१६९॥ तैसा विदेहपणें जनक । प्रपंचपरमार्थविषयक । भोगीतसे सुखदु:ख । एके काळीं ॥ १७० ॥ केवळ साक्षीभूत होऊन । भोक्तेअभोक्तेपण । करीतसे अवलोकन । विदेहत्वें ॥१७१॥ रामदर्शनें विदेहाचें । विदेहत्त्व वाढे साचें । तें ताटस्थ्य मुळीं वाचें । वर्णवे ना ॥१७२॥ ) त्या प्रेमामाजीं निमग्न । रायें जाणून निज मन । धीर धरिला करून । विवेक तें ॥१७३॥ मुनीच्या चरणावर । नमवून निज शिर । बोलला वच गंभीर । सद्गदित ॥१७४॥ "सांगा हो! मुनिनायक! । हे दोघे सुंदर बालक । मुनिकुलतिलक वा पालक । राजवंशाचे ॥१७५॥ 'नेति' ऐसें म्हणितलें । वेदें जें ब्रह्म गायिलें । तेंचि कां हो ! धरून आलें । दोन वेष ? ॥१७६॥ स्वभावेंचि माझें मन । वैराग्यरूप असून । चंद्रचकोरीसमान । मुग्ध होय ॥१७७॥ ( पंच विषयहि सेवून । अभोक्ते विदेहाचें मन । ऐसें वैराग्यसंपन्न । पूर्णपणें ॥१७८॥ मनासह इंद्रियांप्रति । ज्या ज्या वस्तु आकर्षिती । त्यांत जनकाची आसक्ति । स्वप्नींहि ना ॥१७९॥ मोहकहि न आकर्षी । जें विषयासी न स्पर्शी । त्या जनकाच्या मनासी । काय झालें ? ॥१८०॥ होतां श्रीरामदर्शन । विरक्तिहि पालटून । चंद्रचकोरासम मन । तल्लीन होय ॥१८१॥ ) मुनिवर ! मी याकरितां । सद्भावें होय विचारितां । कांहीं गुप्त न ठेवितां । सांगा नाथा ॥१८२॥ यांतें करितां अवलोकन । प्रेमातिशयेंकरून । ब्रह्मसुखहि त्यागी मन । अट्टाहासें ॥१८३॥ ( संकल्प-विकल्पात्मक । परिविषयपरा-

ङ्मुख । निरतिशयें भोगी सुख । निर्विकल्पीं ॥१८४॥ निर्विकल्प ब्रह्मसुख । त्यासी होऊन विमुख । पाहून श्रीराममुख । लुब्ध होय ॥१८५॥ ) मुनि म्हणती हांसूनिया । "योग्य बोललास राया ! । तुझें वचन नव्हें वांया । असत्य कधीं" ॥१८६ (नेति ऐसें वदे निगम । तेंचि ब्रह्म झालें राम । तें वचन सत्य परम । भूपतीचें ॥१८७॥) त्या वाक्यानें रघुनाथ। करीतसे मनीं स्मित । ज्ञात्यास जाहलें ज्ञात । वर्म त्याचें ॥१८८॥ म्हणून विश्वामित्र ऋषि । प्रकट न करितां त्यासी । काय म्हणती भूपासी । यथोचित ॥१८९॥ "जेथवरी प्राणीमात्र । हे सर्वांचें प्रियपात्र" । वचन ऐकून राजीवनेत्र । हांसे मनीं ॥१९०॥ "रघुकुलमणि दशरथ । त्याचे हे असती सुत । रायें पाठविलें यांप्रत । मद्‌हितार्थ ॥१९१॥ लक्ष्मण आणि राघव । दोघेहि श्रेष्ठ बांधव । रूप-शील-बला ठाव । चिरंतन ॥१९२॥ यांनीं यज्ञातें रक्षिलें । यासी साक्ष जग सगळें । युद्धाभीतरीं जिंकिलें । राक्षसांतें ॥१९३॥ भूप म्हणे, "मुनि-नाथा ! । युष्मच्चरण पाहतां । पुण्यप्रभाव सांगतां । न येचि मम ॥१९४॥ "एक श्याम, एक गौर । दोघेहि बंधु सुंदर । आनंददाते निर्भर । आनंदातें ॥१९५॥ यांची परस्पर प्रीति । आहे हो! पवित्र अति । कळे सौष्ठव मनाप्रति । न वर्णवे" ॥१९६॥ विदेह मुनिनायका । आनंदें म्हणे, "हो ! ऐका । प्रेमा जीव-ब्रह्मासारिखा । सहज यांचा" ॥१९७॥ प्रभुकडे वारंवार । निरखीतसे नृपवर । उल्हास मनीं अधिकतर । रोमांच गात्रीं ॥१९८॥ मुनिप्रति प्रशंसून । चरणीं शिर ठेवून । जाई नगरीं घेऊन । भूपाल तो ॥१९९॥ सर्वकालीं सुखकर । ऐसें सदन सुंदर । तेथें नेऊन नृपवर । उतरवी त्यां ॥२००॥ पूजून

सर्वतोपरी । त्या सर्वांची सेवा करी । निरोप घेऊन मंदिरीं । जाई नृप ॥२०१॥ ऋषींसहवर्तमान । तो रघुकुलभूषण । भोजनातें आटोपून । विश्राम घे ॥२०२॥ बंधु लक्ष्मणासहित । बसलासे रघुनाथ । तेव्हां दिन उर्वरित । प्रहरभर ॥२०३॥ लक्ष्मणाच्या हृदयास । इच्छा उद्‌भवे विशेष । यावें पाहून नगरास । जाऊनिया ॥२०४॥ प्रभूचें भय वाटलें । मुनीच्या संकोचबलें । प्रकट कांहीं न बोले । हांसे मनीं ॥२०५॥ अनुजाचें मनोगत । जाणतसे रघुनाथ । भक्तवात्सल्य उल्लसित । हृदयांतरीं ॥२०६॥ नम्रपणेंच अत्यंत । संकोचें करून स्मित । गुर्वाज्ञा करून प्राप्त । काय म्हणे ॥२०७॥ "हा लक्ष्मण मुनि-नाथ! । पाहूं इच्छी नगराप्रत । प्रकट नाहीं बोलत । संकोच-भयें ॥२०८॥ जरी आपुलें अनुशासन । मिळेल मजलागून । त्वरें नगर दा ख्खवून । आणितों मी" ॥२०९॥ तें एकून मुनीश्वर । बोलती सप्रेमभर । "कां न करिशील रघुवीर । नीति-रक्षण? ॥२१०॥ (प्रबोधिते नीति-धर्म । ऐसे जे निगमागम । पावले असती उद्‌गम । तुजपासुनी ॥२११॥ नीतिधर्माचें तूं धाम । तें तव स्वाभाविक कर्म । मर्यादापुरुषोत्तम । अससी तूं ॥२१२॥ त्या मर्यादेचें पालन । घडतें जें तुजकडून । यांत आश्चर्य तें कोण । रघुनंदना! ॥२१३) धर्मसेतूचा पालक । अससी बापा तूंच एक । सेवकां सुखदायक । प्रेमवशें ॥२१४॥ जा, या अवलोकून । विदेहनगरीलागून । दोघेहि सुखनिधान । बंधु तुम्ही ॥२१५॥ फेडा नेत्रांचें पारणें । सकल नागरिकां कारणें । आपुल्या सुंदर दर्शनें-। करूनिया" ॥२१६॥ मुनींच्या पदकमलांतें । वंदून दोघेहि भ्राते । जननयनां सुखदाते । निघाले तें ॥२१७॥ सौंदर्यशोभा अतिशय । पाहून बालसमुदाय ।

लोभून मन, नेत्रद्वय । चाले सवें ॥२१८॥ कसिलासे पीतांबर । कटीस भाते मनोहर । हातीं चाप-बाण सुंदर । शोभतसे ॥२१९॥ अंगीं यथायोग्य भली । चंदनाची उटी लाविली । शाम–गौर जोडी शोभली । मनोहर ॥२२०॥ सिंहासम स्कंध भले । बाहूहि विशाल वहिले । गजमुक्तामाला खुले । हृदयावरी ॥२२१॥ आरक्तकमलासमान । सुंदर दोन्ही नयन । करी त्रितापमोचन । मुखचंद्रमा ॥२२२॥ कर्णफूल कर्णांतरीं । शोभा देत असे भारी । जणुं काय चित्त चोरी । प्रेक्षकांचें ॥२२३॥ दृष्टिहि अति मनोहर । वक्र भृकुटी सुंदर । सौंदर्यमर्यादा थोर । तिलक-रेखा ॥२२४॥ चौकोनी टोपी सुंदर । शोभतसे शिरावर । काळे कुरळे मनोहर । केश तैसे ॥२२५॥ नखशिखांत मनोरम । दोघेहि बांधवोत्तम । सकल सौंदर्याचें धाम । अवर्णनीय ॥२२६॥ अवलोकाया नगर । आले दोन्ही राजकुमार । कळला हा समाचार । नागरिकां ॥२२७॥ गृहकृत्यांतें त्यागिती । सर्वहि धांवून येती । दरिद्री लुटूं पाहती । निधिच जणुं ॥२२८॥ स्वभावेंचि सुंदर दोन । बांधव ते विलोकून । नेत्रसाफल्य पावून । सुखी होती ॥२२९॥ घराच्या झरोक्यांतून । त्यापरी युवतीगण । पाही रामरूपालागून । प्रेमयुक्त ॥२३०॥ बोलती आपसांतुनी । वचन प्रेमेंकरुनी । 'कोटि–काम–शोभा यांनीं । जिंकिली गडे ॥२३१॥ सुरांत वा असुरांत । नाग-मुनि-मानवांत । नाहीं कुठें ऐकण्यांत । सौंदर्य असें ॥२३२॥ विष्णूसी तो चार भुज । चार मुखांचा तो अज । शिव भयानक सहज । पंचमुखी ॥२३३॥ (ब्रह्मा, विष्णु, महेश्वर । असूनि सौंदर्यें थोर । तुळितां न येती साचार । याकारणें ॥२३४॥) दुसरा देवहि कुणी । शोधितां न ये दिसुनी । गडे ! या सौंदर्या तुळुनी । पहा-

वया ॥२३५॥ यांची अवस्था किशोर । हे सौंदर्याचें मंदिर । एक श्याम, एक गौर । सौख्यधाम ॥२३६॥ प्रतिअवयवावरून । टाकावेत ओंवाळून । शतकोटि कोटि मदन । निश्चयानें ॥२३७॥ गडे! ऐसा कोण तरी । सांग मानवतनुधारी । पाहूनि या रूपावरी । मुग्ध न जो" ॥२३८॥ (चराचरींहि समस्त । पाहून या रूपाप्रत । एवंच होय मोहित । निश्चयेंचि ॥२३९॥) दुजी एक प्रेमेंकरुनी । बोलतसे मृदु वाणी । "मी जें ऐकिलें साजणी ! । ऐकाच तें ॥२४०॥ हे दशरथ राजाचे । दोघे पुत्र असती साचे। सुंदर बालहंसाचें । युग्म जणुं ॥२४१॥ कौशिक मुनीच्या यज्ञातें । हेचि असती रक्षणकर्ते । रणीं अजिंक्य, राक्षसांतें । वधिलें यांनीं ॥२४२॥ हा जो दिसे श्यामगात्र । सुंदर राजीवनेत्र । मारीच–सुबाहूंचा पार । गर्व हरी ॥२४३॥ जो कौसल्येचा नंदन । सुखाची केवळ खाण । करीं धरी धनुर्बाण । तन्नाम राम ॥२४४॥ गौरवर्णाचा किशोर । वेष धरिलासे सुंदर । करीं ज्याच्या चापशर । रामामागें–॥२४५॥ लक्ष्मण नांवाचा तत्वतां । रामाचा लघुभ्राता । सुमित्रा तयाची माता । ऐक गडे! ॥२४६॥ विश्वामित्रकार्या करून । बांधव हे दोघेजण । मार्गीं अहल्येलागून । उद्धरिती ॥२४७॥ येथें धनुर्यागास या । आले असती पहावया" । हें ऐकून सर्व स्त्रिया । आनंदती ॥२४८॥ पाहून रामरूपातें । दुजी सखी काय म्हणत्ये । "हाचि वर जानकीतें । योग्य होय" ॥२४९॥ (केवळ मजचि-प्रति । ऐसें न वाटतें चित्तीं । यास्तव झाली बोलती । काय पुढे ? ॥२५०॥) "गडे! जरी का भूपाल । यालागीं अव-लोकील । याशींच विवाह करवील । टाकून पण" ॥२५१॥ तदुपरी दुजी म्हणे । "यातें आणिलें भूपानें । मुनींसवें आदरानें ।

संमानिलें ॥२५२॥ परंतु गडे! भूपति। त्यागीच ना पणाप्रति। दुर्दैवें अविचारें अति। हेकाच धरी" ॥२५३॥ दुजी बोलतसे तीस। "धाता जरी समंजस। ऐकतों, देतो सर्वांस। योग्य फल ॥२५४॥ तरी मग सीतेप्रति। हाचि वर मिळे निश्चितीं। गडे! नाहीं तिळरति। संदेह इथें ॥२५५॥ जरी सुदैवेंकरून। हा योग येईल जुळून। कृतार्थ जातील होऊन। सर्व लोक ॥२५६॥ या योगेंचि आम्हांप्रति। गडे! आतुरता अति। या नात्यानेंच येती। केव्हां तरी ॥२५७॥ न तरी आम्हांलागून। सखये तूं करीं श्रवण। या उभयतांचें दर्शन। दुर्लभ अति ॥२५८॥ ऐसा संयोग तेधवां। घडून येतसे जेधवां। पूर्व सुकृतांचा ठेवा। विपुल असें" ॥२५९॥ दुजी म्हणे तिजप्रत। "सखे! बोललीस उचित। या विवाहें परम हित। सर्वांचेंहि" ॥२६०॥ दुजी एक म्हणे "फार। शिवचाप असे कठोर। हा सांवळा नृपकुमार। कोमलगात्र ॥२६१॥ अगे! साजणी सगळे। विचित्रचि हें आगळें"। हें ऐकून दुजी बोले। कोमल वचें ॥२६२॥ "गडे! यां उभयांप्रति। कुणी कुणी ऐसें म्हणती। 'दिसाया लघु दिसती। प्रभावें महा ॥२६३॥ पदपंकजाची धूलि। स्पर्श पावतां त्या कालीं। महा पापिनी तरली। अहल्या ती ॥२६४॥ तो शिवचापालागून। राहील का तोडल्याविण। ऐसा निश्चय चुकून। विसरूं नका ॥२६५॥ चातुर्यें ज्या विधात्यानें निर्मिलें सीते कारणें। विचारेंचि निर्मिला त्यानें। श्याम वर" ॥२६६॥ तिचें वचन ऐकुनी। आनंदल्या सर्वजणी। बोलती मृदवचनीं। 'ऐसेंचि होवो' ॥२६७॥ होऊन मुदित चित्तीं। वर्षिती सुमनांप्रति। सुमुखी सुनेत्रा युवती। सर्वहि त्या ॥२६८॥ ज्या ज्या स्थलासी गमन। करिती बंधु दोघेजण। तेथें तेथें गेला भरून।

परमानंद ॥२६९॥ तदनंतर बंधुद्वय । नगराच्या पूर्वेस जाय । धनुर्यज्ञार्थ भू होय । सिद्ध जेथें ॥२७०॥ सुंदर विस्तारपूर्ण । सुदृढ ऐसें पटांगण । स्वच्छ सुबक वेदीस्थान । रचिलें मध्यें ॥२७१॥ चोहींकडूनिया भले । सोन्याचे मंच मोठाले । भूपास्तव तेथें ठेविले । बैसावया ॥२७२॥ त्याच्याच समीपवर्ती- । पाठीमागें, सभोंवतीं । अन्य मंच विराजती । मंडलाकार ॥२७३॥ कांहीं थोडे उंचावर । सर्वतोपरी सुंदर । जेथें होते बसणार । पौरजन ॥२७४॥ त्याच्याच निकटवर्ति । विशाल सुंदर अति । धवल मंदिरें असतीं । नानावर्णी ॥२७५॥ बसून ज्याच्या भीतरीं । पाहती नगरींच्या नारी । कुलाच्या योग्यतेपरी । यथाक्रम ॥२७६॥ नगरबालकें नाना । बोलून कोमल वचना । प्रभूस सादर रचना । दाखविती ॥२७७॥ सर्व बालकें या मिषें । प्रेमवश अनायासें । मनोहर अंगस्पर्शे । राघवाच्या–॥२७८॥ देह होय रोमांचित । हृदयीं हृष्ट अत्यंत । पाहून दोघा बंधुप्रत । वरचेवर ॥२७९॥ सर्वहि मुलांलागुनी । राम प्रेमवश जाणुनी । प्रशंसी प्रेमेंकरुनी । स्थानांप्रति ॥२८०॥ (अत्यंत आदरपूर्वक । स्थान दाविती बालक । दोघे होऊन उत्सुक । अवलोकिती ॥२८१॥ परस्पर प्रेमभाव । वाढतसे अभिनव । कौतुक ऐसें राघव । करीतसे ॥२८२॥ त्या योगानें बालकांस । वाटे विशेष उल्हास । आनंद प्रेम बहुवस । उत्तरोत्तर ॥२८३॥) आपापल्या आवडीपरी । जो तो तयास पाचारी । बंधद्वय गमन करी । प्रेमभरें ॥२८४॥ यज्ञभूमीची रचना । राम दाखवी लक्ष्मणा । बोलून मनोज्ञ वचना । मधुर मृदु ॥२८५॥ न लोटितां निमिषार्ध । ब्रह्मांडें अनेकविध । ज्याच्या अनुज्ञेनें सिद्ध । माया करी ॥२८६॥ तोच दीनदयाघन ।

भक्तांचा हेतु जाणून । धनुर्यज्ञशाला बघून । आश्चर्य करी ॥२८७॥ रचना ती विलोकिती । गुरुकडे जाया निघती। विलंबास्तव मानिती । चित्तीं भय ॥२८८॥ ज्याच्या धाकानें निश्चितीं । भयासहि वाटे भीति । तोचि भजनाची महति । दावीतसे ॥२८९॥ मृदु, मधुर मनोहर । गोष्टी सांगून रघुवीर। निरोप देई सत्वर । बाळांस बळें ॥२९०॥ (सोडून तयांचा संग । बाळें न इच्छिती वियोग । परतणें असे भाग । विलंब-भयें ॥२९१॥ त्यांची घालून समजूत । बळें धाडी गृहांप्रत । बंधुसवें ये परत । गुरुसंनिध ॥२९२॥) भयें परि प्रेमयुक्त । नम्रपणानें अत्यंत । त्यापरीं संकोचासहित । उभयतांहि ॥२९३॥ गुरुपद्मावर । नमवून निजशिर । बसती आसनावर । तदाज्ञेनें ॥२९४॥ (येथें भयाचें कारण । जाणतीच विचक्षण । विलंब होईल म्हणून । परतावया ॥२९५॥ प्रेम-संकोच-विनय । हा तो गुणसमुच्चय । वडिलांसंमुख होय । यथायोग्य ॥२९६॥) प्रवेशतांचि रजनी । आज्ञापिती गाधिज मुनि । संध्यावंदन सर्वांनीं । आटोपिलें ॥२९७॥ कथा, इतिहास प्राचीन । करीत असतां कथन । लोटली प्रहर दोन । रम्य निशा ॥२९८॥ मुनीश्वर करितां शयन । त्याच समयीं जाऊन । करिती पादसंवाहन । दोघे बंधु ॥२९९॥ ज्यांचें पदाब्जदर्शन । आपणां व्हावें म्हणून । जप-योग विरक्त जन । करिती बहु ॥३००॥ तेच बंधु दोघेजण । प्रेमास वश होऊन । गुरुपदाब्जसंवाहन । करिती प्रेमें ॥३०१॥ तदुपरी वारंवार । आज्ञापिती मुनीश्वर । तें जाऊन रघुवीर । शयन करी ॥३०२॥ श्रीरामाचेहि चरण । मन लावून चुरी लक्ष्मण । भयें परि प्रेमपूर्ण । संकोचें बहु ॥३०३॥ (येथें भयाचें कारण । जाणती कीं विचक्षण । माझे हात हे कठिण ।

चरण मृदु ॥३०४॥ चुरितां प्रभुचरणींस । हातांचा कठिण स्पर्श । निद्रा भंगून रामास । जागवील ॥३०५॥) वारंवार रघुराज । म्हणतां 'बापा ! जा नीज' । चित्तीं धरून पदाब्ज । निद्रा करी ॥३०६॥ (सोपानींचा मार्ग भला । जरी अति दीर्घ वाटला । तदर्थ बारावा योजिला । विश्राम हा ॥३०७॥ रसिक भाविक श्रोत्यांस । विनवीतसे देवीदास । माझ्या बोबड्या बोलांस । मान्य करा ॥३०८॥)

---

## विश्राम १३ वा

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्योनमः
श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः

रात्र जातांच सरुनी । उठला लक्ष्मण ऐकुनी । कानीं पडला जो ध्वनि । कुक्कुटाचा ॥१॥ गुरुआधींच प्रभातीं । जगताचा अधिपति । जागृत झाला सन्मति । रामचंद्र ॥२॥ प्रातर्विधि उरकून । जाऊन करीतसे स्नान । नित्यकर्में सारून । वंदिती गुरूंतें ॥३॥ जाणून पूजासमया । गुर्वाज्ञा ती घेऊनिया । चालले फुलें आणाया । बंधु दोघे ॥४॥ सुंदर नृपोद्यानाप्रति । जाऊनिया विलोकिती । जेथें वसंत करी वसती । लोभूनिया ॥५॥ तेथें वृक्षहि अनेक । लागले मनोवेधक । वेलींचे मंडप सुबक । नानावर्णी ॥६॥ नवपल्लवें पल्लवित । पुष्पफलें सुशोभित । लाजविती सुरतरूंप्रत । निजशोभेनें ॥७॥ कोकिल आणि चातक । चकोर त्यापरी शुक । पक्षी कूजती मोहक । नाचती मोर ॥८॥

मध्यभागीं मनोहर । शोभतसे सरोवर । पायऱ्या केल्या विचित्र । रत्नांच्या ज्या ॥९॥ भीतरीं निर्मल जलीं । नानावर्णी पद्मावलि । गुंजारव करिती अलि । कूजती खग ॥१०॥ सरोवर आणि उद्यान । अवलोकून रघुनंदन । लक्ष्मणासहवर्तमान । मुदित होय ॥११॥ रमणीय आत्यंतिक । हेंचि असें उद्यान एक । जें होय सुखदायक । राघवातें ॥१२॥ अवलोकून सभोंवतीं । माळ्याप्रति विचारिती । पत्रपुष्पांतें तोडिती । प्रसन्न मनें ॥१३॥ ऐसें होतां त्याच कालीं । तेथें जानकी पातली । गिरिजापूजना धाडिली । तन्मातेनें ॥१४॥ समागमें सख्या सुंदर । सर्वहि असती चतुर । निज वाणीनें मधुर । गीत गाती ॥१५॥ सरोवराच्या सान्निध्यांत । दुर्गामंदिर सुशोभित । पाहतां मन मोहित । अवर्णनीय ॥१६॥ सरोवरीं करून स्नान । सख्यांसहवर्तमान । मंदिरीं करी गमन । प्रसन्न मनें ॥१७॥ देवीपूजा करूं लागे । अतिशय अनुरागें । निज अनुरूप मागे । सुंदर वर ॥१८॥ एक सखी त्यांच्यांतून । सीतेस तेथें सोडून । गेली होती पुष्पोद्यान । पहावया ॥१९॥ दोघांहि बंधुलागून । विलोकीतसे जाऊन । आली होऊन प्रेममग्न । सीतेपाशीं ॥२०॥ तिच्या अवस्थेलागुनी । पाहिलें इतर सख्यांनीं । तनु रोमांचित, नयनीं । आनंदाश्रु ॥२१॥ 'सांग तुझ्या अनंदाचें । काय कारण तें साचें ! । सर्वहि मधुर-वचें । विचारिती ॥२२॥ (ऐकून तयांचा प्रश्न । मन करून प्रसन्न । निजानंदाचें कारण । सांगतसे ॥२३॥) "पहाया उद्यान थोर । आले दोन राजपुत्र । वयें लहान सुंदर । सर्वतोपरी ॥२४॥ श्याम आणि गौरवर्ण । कैसें करूं मी वर्णन । वाणी आंधळी, नयन । असती मुके" ॥२५॥ (जैसें दृष्टीनें पहावें । तैसेंच मुखें वर्णावें । परि हें कैसें संभवें । असंभवनीय ॥२६॥ पाहणारे

असती नेत्र । त्यांनींच सांगावें मात्र । नाहीं मुळीं त्यासी वक्त्र । सांगावया ।।२७।। मुखानें करावें कथन । परि तें असमर्थ पूर्ण । न पाहता कोठून । सांगू शके ? ।।२८।। द्रुष्टयास नाहीं वदन । वदनास नसती नयन । मग यथार्थ वर्णन । होय कैसें ? ।।२९।।) चतुर सख्या समस्त । ऐकून झाल्या मुदित । सीतेचें मन उत्कंठित । जाणून अति ।।३०।। त्यांत एक सखी बोले । "गडे ! तेचि राजसुत भले । ऐकिलें जे काल आले । मुनिसंगें ।।३१।। ज्यांनीं निज स्वरूपाची । मोहिनी घालून साची । नर नारी मिथिलेची । स्ववश केली ।।३२।। सर्व लोक जेथें तेथें । वर्णिती तत्सौंदर्यातें । अवश्य पहावें त्यांतें । दर्शनीय ते" ।।३३।। तिचें वचन तें अति । आवडलें सीतेप्रति । दर्शनास आतुर होती । नेत्र तिचे ।।३४।। पुढें तीच प्रिय सखि । करून निघे जानकी । प्रीति पुरातन विलोकी । कुणीहि ना ।।३५।। ( रामदर्शनीं लालसा । उद्भवे जानकी–मानसा । तिची न अन्य मीमांसा । निश्चयेंचि ।।३६।। कोण, कोठील, तो राम । कां वाटावें त्याचें प्रेम । कां मर्यादा निस्सीम । हीच असे ? ।।३७।। याचें करूं समाधान । अल्प विस्तारेंकरून । जेणें संशय–निरसन । निश्चयें होय ।।३८।। पूर्व जन्मींची इंदिरा । सीता होऊनि सुंदरा । जनक राजाच्या मंदिरा । पातलीसे ।।३९।। स्वयें विष्णु परब्रह्म । तोचि होऊन श्रीराम । अवतरला पूर्णकाम । मनुजरूपें ।।४०।। त्या उभयतांचें प्रेम । अनादि आणि निस्सीम । येथें विकल्पाचें काम । मुळीं नसे ।।४१।। ) नारद मुनीचें वचन । स्मरतां सीतेलागून । प्रीति जाहली उत्पन्न । पवित्र अति ।।४२।। करी चकित होऊन । चोहींकडे अवलोकून । जणुं काय भयापन्न । बाल मृगी ।।४३।। (नारदाचें वचन काय ।

ऐसा वाटेल संशय । तरी देतों परिचय । संक्षेपानें ।।४४।। सीता नित्यनेमें–करून । घेतसे दुर्गा–दर्शन । एकदां करितां गमन । मंदिरातें ।।४५।। मार्गांत नारदमुनि । भेटले तिजलागुनी । तिनें वंदिलें चरणीं । ठेवून शिर ।।४६।। प्रसन्न होऊन नारद । तिज देती आशीर्वाद । त्याचेच तिजला शद्ब । आठवले ।।४७।। बोलले मुनिसत्तम । "येथेंचि तुज श्रीराम । भेटून त्वन्मनःकाम । पुरवील तो ।।४८।। या स्वयंवरीं निश्चितीं । तोच होय तुझा पति । या विषयीं शंका चित्तीं । धरूं नको" ।।४९।। सीता म्हणे, नारदास । "कैसें जाणावें मीं त्यास" । मुनि सांगती तियेस । खूण एक ।।५०।। "ज्या पुरुषातें पाहुनी । मोह उपजे तुझ्या मनीं । तोचि निश्चयेंकरुनी । जाण राम" ।।५१।। या वचनाची स्मृति । झाली असतां सीतेप्रति । प्राप्त तिज ऐशा रीतीं । अवस्था ही ।।५२।।) नूपुर–कंकण–किंकिणी । यांचा परिसून ध्वनि । राम म्हणे विचार करुनी । लक्ष्मणातें ।।५३।। "जणुं प्रत्यक्ष कंदर्प । दुंदुभी वाजवी सदर्प । विश्वविजयाचा संकल्प । व्यक्त करी" ।।५४।। ऐसें बोलून वहिलें । सीतेकडे विलोकिलें । तन्मुखचंद्रा चकोर झाले । रामनेत्र ।।५५।। त्याचीं लोचनें सुंदर । तत्क्षणीं जाहलीं स्थिर । निमि त्यजी दृग्वस्त्र । संकोचें जणुं ।।५६।। ('निमि' शद्बातें योजून । साधिली उत्प्रेक्षा पूर्ण । त्याचें करूं विवरण । संक्षेपानें ।।५७।। सीतेसी अवलोकितां । नेत्रां आली तटस्था । पापणीची चंचलता । स्थिर झाली ।।५८।। एकसारखी तें टक । लावितां रघुनायक । राहिली उघडझांक । पापणीची ।।५९।। निमि नांवाचा भूभुज । होता जनकाचा पूर्वज । पापणीवरी सहज । वास ज्याचा ।।६०।। यज्ञ कराया निमीनें । बाहिलें वसिष्ठाकारणें । परि त्यांचें झालें

जाणें । इंद्राकडें ॥६१॥ अन्य पुरोहितद्वारां । यज्ञविधि केला पुरा । वसिष्ठ पातले माघारां । निमीकडें ॥६२॥ परस्परांची भेट होतां । कोपूनिया उभयतां । शाप देती 'पुढें आतां । देह नुरो' ॥६३॥ वसिष्ठांनीं त्याउपर । त्यजून पूर्वशरीर । धारण केला सत्वर । अन्य देह ॥६४॥ निमीचा देह पतित । होतां, त्याचा पुरोहित । त्या रहावया जिवंत । उपाय सांगे ॥६५॥ परि तैसें न इच्छितां । निमि झाला वर मागतां । 'राहीन यापुढें आतां । पापणीवरी' ॥६६॥ 'तथास्तु' म्हणती ऋषि । तैंपासून अहर्निशीं । वास्तव्य घडलें त्यासी । पापणीवरी ॥६७॥ कथानुसंधानें येथें । निमि त्यजी दृग्वस्त्रातें । नेत्रीं वरिलें ताटस्थ्यातें । राघवाच्या ॥६८॥ सीता ही निजकुलींची । कन्या सभाग्या साची । जडताहे प्रीति तिची । राघवाशीं ॥६९॥ निमि कुलाचा पूर्वज । संकोच न वाटो तिज । म्हणून जाय सहज । एकीकडें ॥७०॥ असो, ऐसी होतां भेट । झाली तेव्हां दृष्टादृष्ट । कथा पुढची उत्कृष्ट । श्रवण करा ॥७१॥) सीता-सौंदर्य पाहून । संतोषे रघुनंदन । मनीं प्रशंसी, वचन । न बोलवें ॥७२॥ ( सौंदर्य तें अलौकिक । म्हणून करी कौतुक । तयासी वाटे निःशंक । ऐशापरी ॥७३॥) जणुं काय विधात्यानें । आपुल्या नैपुण्याकारणें । रचूनिया प्रकटपणें । दाविलें जगा ॥७४॥ प्रत्यक्ष सौंदर्याप्रति । सौंदर्य देई निश्चितीं । शोभा गृहाची दीप–ज्योति । तळपे जणुं ॥७५॥ (विधात्यानें जें निर्मिलें । सर्वहि सौंदर्य वहिलें । जणुं काय तें लोपलें । अंधकारीं॥७६॥ जानकीच्या सौंदर्यानें । त्याहि सौंदर्यकारणें । केलें निजस्वरूपानें । प्रकाशित ॥७७॥ ) कवींच्या उपमा अनेक । उच्छिष्ट झाल्या सकळिक । मग कोणती द्यावी एक । जानकीतें ॥७८॥

सीतेच्या सौंदर्याप्रति । प्रभु वर्णून स्वचित्तीं स्वस्थितीचाहि पुढतीं । विचार करी ॥७९॥ शुद्ध मानसेंकरून । बोलले लक्ष्मणालागून । समयास अनुसरून । काय तेव्हां ?॥८०॥ "ती हीच असे ताता !। जनकाची कन्या सीता । होतसे जिच्या-करितां । धनुर्यज्ञ ॥८१॥ गौरीपूजनालागुनी । आणिलें तिज सख्यांनीं । प्रकाश पाडीत उद्यानीं । तीच फिरे ॥८२॥ जियेची अवलोकितां । अलौकिक सुंदरता । सहज शुद्ध मच्चित्ता । क्षोभ होय ॥८३॥ त्या सर्वांचें कारण । जाणे एक चतुरानन । शुभांगें पावती स्फुरण । ऐक बंधो !॥८४॥ रघुवंशीय जे जन । हाचि तत्प्रकृतिगुण । पाय न घाली तन्मन । कुमार्गीत ॥८५॥ माझ्या मनाचा निर्धारीं । मजला विश्वास भारी । जेणें स्वप्नींहि परनारी । पाहिली ना ॥८६॥ ज्यांची पाठ रणांगणीं । न दिसेचि शत्रूंलागुनी । मनेंहि जे परकामिनी । पाहती ना ॥८७॥ (सुंदर स्त्री दृष्टीं पडे । दृष्टीस दृष्टीहि भिडे । हें तो राहिलें एकीकडें । शरीरानें ॥८८॥ परि आधीं स्त्रीसंकल्प । योजून कामकलाप । चिंतेनें न घडें पाप । मनानेंहि ॥८९॥) याचकांसाठीं नकार । ज्यांकडून न मिळ-णार । ऐसे जगीं श्रेष्ठतर । थोडेच कीं" ॥९०॥ लक्ष्मणासी संभाषण । करीत असतां रघुनंदन । सीतेच्या रूपावरी मन । लुब्ध झालें ॥९१॥ मुख हेंचि अरविंद । सौंदर्य तन्मकरंद । होऊन स्वयें षट्पद । पान करी ॥९२॥ सीता होऊन आतुर । अवलोकी सभोंवार । कोठें गेले राजपुत्र । चिंता मनीं ॥९३॥ बालहरिणाक्षी जानकी । जेथें तेथें अवलोकी । शुभ्रकमलांची वृष्टिच कीं । होय तेथें ॥९४॥ ( तीनवर्णी नेत्रपद्म । आरक्त, श्वेत, श्याम । तयांचे तीन परिणाम । वेगळाले ॥९५॥ श्वेत-

वर्ण तो अमृत । दृष्टिपातें करी जिवंत । मरणोन्मुखा जीवित । प्राप्त होय ॥९६॥ विषयुक्त तोचि श्याम । विपरीत तत्परिणाम । करी प्राणांचा उपशम । दृष्टिपातें ॥९७॥ मदयुक्त तोचि आरक्त । भान नुरेंचि किंचित्। मदें होतसे उन्मत्त । दृष्टिपातें ॥९८॥ सीतेचें नेत्र कमल । श्वेतवर्ण अति निर्मल। दृष्टिपातेंचि तत्काल। प्रसन्न करी ॥९९॥) लतेआड असलेले । सख्यांनीं तेव्हां दाविले । श्याम आणि गौर । भले । राजकुमार ॥१००॥ रूप करितां विलोकन । नेत्र झाले रक्तवर्ण । ठेव आपुली ओळखून । हर्षले जणुं ॥१०१॥ श्रीराम-सौंदर्याप्रत । पाहून नेत्र चकित । झाली तयांची स्थगित । उघडझांक ॥१०२॥ अतिस्नेहें विवश होई । देहभान लया जाई । जणुं चकोरीच पाही। शरच्चंद्रा ॥१०३॥ (रवितापानें तापली । चकोरी जी त्रस्त झाली । शरच्चंद्राची किरणावलि । विलोकी तैं ॥१०४॥ त्या किरणां विलोकून। नुरें तिचें देहभान । तीच दशा गेली होऊन । जानकीची ॥१०५॥ कठिणपण हाचि रवि । तेणें सीता कष्टी जीवीं । ती संत्रस्तता घालवी । अनायासें ॥१०६॥ शरच्चंद्राच्या समान । राममुखा विलोकून । तिचें नुरें देहभान । आनंदानें ॥१०७॥ परि निज सख्यांप्रति । कळूं न दे ऐशी स्थिति । यास्तव ती चातुर्यवती । काय करी ॥१०८॥) नेत्रमार्गानें आणून । रामास हृदयीं कोंडून । घेई कपाटें लावून । पापण्यांचीं ॥१०९॥ परि जेव्हां प्रेमवश । सख्यांनीं जाणिलें सीतेस । कांहीं न बोलवें तीस । संकोचे मनीं ॥११०॥ लता-मंडपामधून । झाले तेव्हां दृश्यमान । त्या समयीं रामलक्ष्मण । बंधुद्वय ॥१११॥ जणुं का अति निर्मल । प्रकटलें चंद्रयुगुल । सारूनजलद-पटल । एकीकडे ॥११२॥ सौंदर्याची सीमा पुरती ।

कठिण प

दोघेहि वीर असती । नील पीताब्जापरी कांति । शरीराची ॥११३॥ मयूरपिच्छें सुंदर । शोभा देती शिरावर । माजीं खोविलीं मनोहर । पुष्पगुच्छें ॥११४॥ तिलक तो भालावरती । श्रमबिंदु ते शोभती । दिव्यालंकाराची कांति । सुंदर कर्णीं ॥११५॥ भृकुटी त्या वक्राकृति । केश कुरळे शोभती । नेत्र आरक्त विलसती । कमलांपरी ॥११६॥ हनुवटी आणिक नाक । कपोल शोभादायक । त्यापरीं मनोहारक । हास्यविलास ॥११७॥ मुखश्रीचें तें वर्णन । न करवें मजलागून । लाजवी अनेक मदन । पाहून जी ॥११८॥ वक्षस्थळीं रत्नमाळ । शंखापरी मान नितळ । भुजदंड अतिप्रबळ । कामगजशुंडापरीं ॥११९॥ सुमनांनीं परिप्लुत । द्रोणमंडित वाम हस्त । तो श्यामकुमार अत्यंत । सुंदर गडे ! ॥१२०॥ कटि ती सिंहासमान । कसिलें पीत वसन । शोभाशीलाचें निधान । केवळ जो ॥१२१॥ तो रघुकुलभूषण । दृष्टीनें अवलोकून । विसरती देहभान । सर्व सख्या ॥१२२॥ त्यांतील एक चतुर । सखी धरून धीर । बोले धरूनिया कर । सीतेप्रति ॥१२३॥ ( रामस्वरूपाच्या ध्यानीं । मग्न जनकाची नंदिनी । उभी होतीच झांकुनी । नेत्रांप्रति ॥१२४॥ ऐसें असतांहि परंतु । खोंचून बोलावें हा हेतु । ठेवून स्वमनीं किंतु । हात धरी ॥१२५॥) "गौरी माउलीचें ध्यान । करितां येईल मागाहून । आधीं घेई निरखून । राजपुत्र" ॥१२६॥ (ऐकतां सखीचें उत्तर । सीता येई देहावर । नेत्र उघडाया धीर । राहिला ना ॥१२७॥) जानकी तें संकोचून । उघडीतसे निज नयन । रघुकुलसिंह ते दोन । सन्मुख बघे ॥१२८॥ राघवाची शोभा निकी । नखशिखांत अवलोकी । स्मरतां पितृ–पण शेखीं । क्षोभे मनीं ॥१२९॥ परवश सीतेप्रति । सख्या जेव्हां

विलोकिती । 'बहु विलंब झाला' म्हणती । समस्त भयें ॥१३०॥ 'याच वेळीं उदयीक । येऊं येथें सकळिक' । ऐसें म्हणून सखि एक । हांसे मनीं ॥१३१॥ ऐकतां गूढ वैखरी । लाजली जनक-कुमारी । मातृभय मानी अंतरीं । विलंबास्तव ॥१३२॥ धरून अत्यंत धीर । हृदयीं आणी रघुवीर । जाणे पितृवंश निर्भर । स्वप्रतिज्ञा ॥१३३॥ वृक्ष, विहंग, हरिण । करावे अवलोकन । याचि निमित्तेंकरून । पुनःपुन्हां ॥१३४॥ रामाच्या सौंदर्याप्रति । सीता झाली विलोकिती । अंतरीं वाढली प्रीति । उत्तरोत्तर ॥१३५॥ शिवचापाचें भंजन । कठिण ऐसें आठवून । चालली हृदयीं धरून । श्याममूर्ति ॥१३६॥ रामें विलोकिली स्वतां । जानकी जात असतां । प्रेम–सुख–सुंदरता– । गुणांची खाण ॥१३७॥ कोमल सुरंगी ऐसी । प्रेमाची करुनी मसी । रेखी चित्त–भिंतीसी । मूर्ति तिची ॥१३८॥ मग गौरी–मंदिरा-लागुनी । जातसे जनकनंदिनी । कर जोडुनी, पद वंदुनी । प्रार्थीतसे ॥१३९॥ "जय जय भवानी गौरी ! । जय जय गिरि-राज कुमारी ! । महेशमुखचंद्रचकोरी ! । उदयोस्तुते ॥१४०॥ गजमुखषडाननाची । तैसी माता जगताची । विद्युत्प्रभेसम साची । त्वत्तनुकांति ॥१४१॥ आदि–मध्य–अवसान । नाहीं माते ! तुज लागुन । नेणे अमित महिमान । वेदहि स्वयें ॥१४२॥ विश्वोत्पत्तिपालन । तूंच करिसी संहारण । मोहिसी विश्वा-लागून । स्वतंत्र तूं ॥१४३॥ माते ! पतिव्रता नारी । ज्या असती विश्वांतरीं । तुझी गणना त्यांभीतरीं । प्रामुख्यानें ॥१४४॥ तुझें अगाध महिमान । करूं न शकती वर्णन । शारदा शेष मिळून । सहस्रावधि ॥१४५॥ सेवितां तव पादपद्म । चारी पुरुषार्थ सुगम । वरदात्री ! तूं प्रिय परम । शंकरातें ॥१४६॥

तुझ्या पदाब्जालागुनी । पूजून देवी! अनन्यपणीं । सर्वहि सुरनर-
मुनि । सुखी होती ॥१४७॥ माझिया मनोगतासी । तूं यथार्थत्वें
जाणसी । सर्वांतर्यामीं वससी । सदोदित ॥१४८॥ या कारणा-
स्तव मीहि। तें प्रकट न केलें पाहीं" । ऐसें म्हणून वैदेही । पाय
धरी ॥१४९॥ तद्विनय-प्रेमेंकरुनी । प्रसन्न झाली भवानी ।
मूर्ति हांसे, पडे गळुनी । पद्महार ॥१५०॥ सीता सादर, सानंद ।
हृदयीं धरी तो प्रसाद । हृष्ट मनें वदे शद्ब । भवानी तें ॥१५१॥
"ऐक सीते ! तूं यथार्थ । माझा आशीर्वाद समर्थ । तुझे सर्व
मनोरथ । पूर्ण होती ॥१५२॥ नारदाचें जें भाकित । सत्य,
पवित्र, सदोदित । पावसी त्या वराप्रत । इच्छिसी जो ॥१५३॥
ज्यावरी जडलें त्वच्चित्त । तोचि वर मिळे निश्चित । श्याम
सुंदर अत्यंत । स्वाभाविक ॥१५४॥ तो स्वयें करुणानिधान ।
सुशील तैसा सज्ञान । तुझ्या सहज प्रेमालागून । जाणतसे" ॥१५५॥
भवानीचा आशीर्वाद । ऐसा परिसून विशद । सीतेसह सखि-
वृंद । मनीं हर्षे ॥१५६॥ पुनःपुन्हां भवानीतें । पूजून मुदित
चित्तें । तेथून निघे जावयातें । निज मंदिरा ॥१५७॥ प्रत्यक्ष गौरी
भवानी । अनुकूल आपणां जाणुनी । हर्ष जानकीच्या मनीं ।
अवर्णनीय ॥१५८॥ परम आनंदाचें मूल । वामांग तिचें कोमल ।
स्फुरण पावें तत्काल । साहजिक ॥१५९॥ सीतेच्या सौंदर्याप्रत ।
मनामाजीं प्रशंसित । उभय बंधु गेले त्वरित । गुरुसमीप ॥१६०॥
घडलें तें तें वर्तमान । राम कथी गुरुलागून । सरलस्वभावी,
स्पर्शलें न । कपट जया ॥१६१॥ त्या सुमनांतें घेऊन । मुनि
करिती देवतार्चन । देती उभयतांलागून । आशीर्वाद ॥१६२॥
"तुमचे सर्व मनोरथ । होतील परिपूरित" । ऐकतां होती प्रमु-
दित । रामलक्ष्मण ॥१६३॥ महाज्ञानी मुनीश्वर । भोजन

सारिल्यामंतर । पुराणकथा सविस्तर । निवेदिती ।।१६४।। दिनावसरीं अस्तमाना । घेऊन अनुशासना । करावया संध्या-वंदना । जाती दोघे ।।१६५।। पूर्व दिशेस अनुपम्य । उगवे चंद्रमा रम्य । बघून सीतामुखसाम्य । सुख वाटे ।।१६६।। परि मनीं विचारितां । ऐसें वाटलें चित्ता । सीतामुखाची समता । चंद्रास नसे ।।१६७।। क्षार सिंधूंत जनन । बंधु जया विषासमान । दिवसां होतसे म्लान । कलंकी जो ।।१६८।। यापरी सर्वथा दोषी । असतां बापडा शशी । साम्य सीतामुखासी । पावेल कसा ? ।।१६९।। वृद्धि–क्षय जया पुरता । विरही जीवां दुःख-दाता । संधि पाहून राहू स्वतां । ग्रासी जया ।।१७०।। चक्र-वाका दुःखकारी । कमलपुष्पांचा जो वैरी । तुझे गुण कुठवरी । सांगूं चंद्रा ! ।।१७१।। सीतामुखा समानता । करूं गेलों मी अवचिता । प्रमाद घडला तत्त्वतां । अयोग्यसा ।।१७२।। ऐसा उपरोधून चंद्रमा । सीतामुखाची सुषमा । सारूनिया संध्या-कर्मा । वाखाणिती ।।१७३।। रात्र लोटली प्रहरवरी । ऐसें जाणून अंतरीं । उभयतां येती सत्वरीं । गुरुपाशीं ।।१७४।। मुनीश्वरांचें पदपद्म । त्यांतें करून प्रणाम । आज्ञा घेऊन विश्राम । पावती ते ।।१७५।। रात्र उरतां नावेक । जागा होय रघुनायक । पाहून लक्ष्मणा संमुख । काय वदे ।।१७६।। "पहा लक्ष्मणा ! बालका ! । अरुणोदय होय निका । जो कमल-चक्रवाकां । सुखदायक" ।।१७७।। तें ऐकूनिया लक्ष्मण । बोले करद्वय जोडून । प्रभु-महिमासूचक वचन । मृदु वाणीनें ।।१७८।। "अरुणोदयीं रघुनंदना ! । म्लानता ये कुमुदगणां । नभीं नक्षत्रें नाना । मंद होतीं ।।१७९।। तैसें तुमचें आगमन । झालें ऐसें परिसून । भूप सारे बलहीन । जाहले कीं ।।१८०।। राजे हे

नक्षत्रांपरिस । जरी देती कांहीं प्रकाश । परि चापतमाचा नाश। करूं न शकती ॥१८१॥ कमल आणि चक्रवाक । ऐसे इतर पक्षी अनेक । निशावसानीं सकळिक । आनंदले ॥१८२॥ रघु-राय! तयापरीं । तुमचे भक्तहि नानापरीं । धनुभंग होतां अंतरीं । तुष्टतील ॥१८३॥ सूर्योदयें अनायासें । अंधकार अवघा नासे । लोपतीं नक्षत्रें, प्रकाशें । तेजें जगीं ॥१८४॥ निजोदयेंकरून रवि । प्रभाव तुमचाच सुचवी । प्रकट करूनिया दावी । सर्व भूपां ॥१८५॥ तुमची बाहुबल–महति । प्रकट करी तो दिनपति । धनुर्भंगाची पद्धति । निदर्शुनी" ॥१८६॥ ऐसी लक्ष्मणाची उक्ति । ऐकून हांसे रघुपति । स्नानें पवित्र होती । स्वयंपवित्र ॥१८७॥ नित्यकर्मातें सारिती । गुरुसन्नि-धानीं येती । सुंदर शिरें नमवितीं । तत्पदाब्जीं ॥१८८॥ तिकडें शतानंदाप्रति । पाहून जनक नृपति । पाठवी त्वरित्‌गति । गाधिजांकडें ॥१८९॥ जनकाचें अभ्यर्थन । त्यांनीं केलें निवेदन। मुनि हर्षें घेती बाहून । रामलक्ष्मणां ॥१९०॥ शतानंद–पदां-प्रति । वंदीतसे रघुपति । उभयतां जाऊन बसती । गुरु-सन्निध ॥१९१॥ मुनि म्हणती, "हे तात !। बोलावी मिथिला-नाथ । तरी जाऊं यां सांप्रत । शीघ्रगति ॥१९२॥ जानकीच्या स्वयंवरीं । जगच्चालक श्रीहरि । पाहूं या कुणास तरी । महत्त्व देतो" ॥१९३॥ लक्ष्मग म्हणे, "हे नाथ! । ज्यावरी तुम्ही कृपावंत । तोच पात्र होय निश्चित । यशाप्रति" ॥१९४॥ लक्ष्मणाची उत्कृष्ट वाणी । ऐकतां हृष्ट सर्व मुनि । आशीर्वाद दिला त्यांनीं । प्रसन्न मनें ॥१९५॥ दयाघन रघुनंदन । मुनि-सहवर्तमान । निघे कराया विलोकन । यज्ञशाला ॥१९६॥ धनुर्यज्ञ–मंडपांत । आले लक्ष्मण–रघुनाथ । वार्ता कळली

समस्त । नागरिकां ॥१९७॥ कामधंदा विसरून । आबाल वृद्ध तरुण । जाती नरनारी मिळून । मंडपाकडें ॥१९८॥ भीड झाली आत्यंतिक । ऐसें पाहून जनक । पाचारून शुचि सेवक । काय म्हणे ॥१९९॥ (सेवा धर्मातें जाणती । नम्रपणें सत्कारिती । तेचि शुचि सेवक असती । राजभृत्य ॥२००॥) "तुम्ही जाऊन त्वरित । आल्या सर्व लोकांप्रत । बसवा हो! यथोचित । आसनांवरी" ॥२०१॥ बोलून विनयें मधुर । सेवकांनीं नारीनर । त्यांच्या योग्यतेनुसार । बैसविलें ॥२०२॥ रामलक्ष्मण तितुक्यांत । आले यज्ञमंडपांत । जणुं सौंदर्य प्रतिबिंबित । देहामाजीं ॥२०३॥ ते गुणसागर चतुर । महावीर अतिसुंदर । ज्यांचा श्याम आणि गौर । देहवर्ण ॥२०४॥ जैसे नक्षत्रगणांत । पूर्ण दोन निशानाथ । तैसे राजमंडळांत । शोभती जणुं ॥२०५॥ तेथें जयांच्या अंतरीं । भावना होती ज्यापरीं । त्यांना दिसली त्यापरीं । प्रभुमूर्ति ॥२०६॥ पाहून रामरूपास । वाटे महारणधीरास । अवतरला वीर रस । मूर्तिमंत ॥२०७॥ कपटी राजे जे कुणी । ते प्रभूतें विलोकुनी । भयभीत निजमनीं । होते झाले ॥२०८॥ गुप्तपणें राजवेष । घेऊन बसले राक्षस । प्रत्यक्ष काळापरी त्यांस । भासे प्रभु ॥२०९॥ नेत्रांतें सुखदायक । ते लक्ष्मण–रघुनायक । मानिती नगरलोक । नरभूषण ॥२१०॥ आपुल्या आवडीपरीं । हृष्ट होऊन अंतरीं । विलोकिती नगर–नारी । राघवातें ॥२११॥ अति निरुपम देहास । धारण करून प्रत्यक्ष । मूर्तिमान् शृंगाररस । शोभे जणुं ॥२१२॥ पंडितांस रघुनंदन । दिसे विराट्‌रूपासमान । नेत्र, मुख, कर, शिर, चरण । अनेकविध ॥२१३॥ जनकगृहींचा परिवार । तयाप्रतें वाटे प्रियकर । आप्तेष्ट स्वकीय नर । तैशापरी ॥२१४॥ राणीसह-

जनकाप्रति । अवलोकून राममूर्ति । वाटूं लागे पुत्रप्रीति । अवर्णनीय ॥२१५॥ योगीजनां तत्त्वमय । वाटूं लागे रामराय । संत-शुद्धमनीं होय । प्रकाशरूप ॥२१६॥ हरिभक्त जे निष्काम । त्यांतें लक्ष्मण श्रीराम । निज इष्टदेवतेसम । सुख-दायक ॥२१७॥ अवलोकून श्रीराम । सीतेस जें वाटें प्रेम । अनिर्वचनीय परम । मुखास तें ॥२१८॥ हृदयीं अनुभवून । सांगूं न शके आपण । मग इतर कवि कोठून । वर्णील तें? ॥२१९॥ जयांच्या हृदयांतरीं । वसे भावना ज्यापरीं । तयांस दिसे त्यापरीं । कोसलाधीश ॥२२०॥ अखिल राजसमा-जांत । दशरथाचे ते सुत । शोभूं लागले अत्यंत । देदीप्य-मान ॥२२१॥ एक श्याम, एक गौर । ऐसें जयांचें शरीर । आकर्षून घेती नेत्र । विश्वजनांचे ॥२२२॥ स्वभावें सुंदर अति । त्या उभयतांच्या मूर्ति । कोटि कामोपमा ठरती । गौण तिथें ॥२२३॥ लाजवी शरश्चंद्रास । ऐसें मुख तें गोंडस । प्रसन्न करिती चित्तास । कमलनेत्र ॥२२४॥ मदनाचा गर्व हरी । दृष्टि सुंदर त्यापरीं । हृदयासचि कळे परि । न वर्णवें ॥२२५॥ कपोल गोंडस फार । कर्णीं कुंडलें मनोहर । हनुवटी, ओष्ट सुंदर । मधुर बोल ॥२२६॥ लाजवितें चंद्राप्रत । ऐसें प्रभूचें मंदस्मित । वक्र भृकुटी, हरी चित्त । नासिका ती ॥२२७॥ भालप्रदेश विशाल । तिलक झळके सोज्ज्वल । केश पाहून लज्जाकुल । भ्रमरपंक्ति ॥२२८॥ पीतवर्णी टोप निका । शोभा देतसे मस्तका । भीतरीं पुष्पकलिका । गुंफि-लेल्या ॥२२९॥ ग्रीवा तैसी शंखोपमा । माजीं रेखा निरुपमा । त्रैलोक्यशोभेची सीमा । जणुं काय ? ॥२३०॥ गजमौक्तिकांचा हार । कंठीं शोभे मनोहर । माला वक्षस्थलावर । तुल-

सीची ॥२३१॥ स्कंध वृषभासमान । सिंहाची ऐट पूर्ण । बाहु विशाल, निधान । शक्तीचें ते ॥२३२॥ कटिभागीं पीतांबर । तैसेंचि कसिले तूणीर । धनुष्य वामस्कंधावर । बाण हातीं ॥२३३॥ पीतवर्ण यज्ञोपवीत । दिसे अति शोभिवंत । लावण्य नख-शिखांत । अप्रतिम ॥२३४॥ अवलोकून सर्व लोक । मुदित झाले आत्यंतिक । दृष्टि लागली एकटक । परतेचि ना ॥२३५॥ पाहून उभय बंधूंस । हर्ष झाला जनकास । धरी मुनिपदाब्जांस । जाऊन तैं ॥२३६॥ विनयपूर्वक आपुली । तेणें कथा निवेदिली । रंगभूमि दाखविली । तयां सारी ॥२३७॥ कुमार श्रेष्ठ ते दोन । जिकडें करिती गमन । लोक चकित होऊन । पाहती त्यां ॥२३८॥ रुचिपरत्वें सर्वांनीं । पाहिलें रामालागुनी । परि मर्म त्याचें कुणी । जाणिलें ना ॥२३९॥ "राया!" म्हणती विश्वामित्र । "यज्ञभू-रचना सुंदर" । महत्सुख पावे नृपवर । मोदभरें ॥२४०॥ उज्ज्वल आणि महान् । अति सुंदर सर्वांहून । सभामंडपीं सिंहासन । होतें एक ॥२४१॥ विश्वामित्रमुनिसहित । त्या दोघांहि बंधूंप्रत । जनकराज मिथिलानाथ । बैसवीतसे ॥२४२॥ अवलोकुनी प्रभुप्रति । विमनस्क सर्व भूपति । जणुं तारे निस्तेज होती । चंद्रोदयीं ॥२४३॥ सर्व भूपांच्या चित्तीं । ऐसीच गमे प्रतीति । राम भंगील चापाप्रति । निःसंशय ॥२४४॥ वा धनुर्भंगाविण सोज्ज्वला । रामचंद्राच्याच गळां । सीता घालील जयमाळा । निःसंशय ॥२४५॥ या विचारें म्हणती भूप । "तेजोबल यशःप्रताप । गमावून आपोआप । घरीं जाऊं" ॥२४६॥ अविवेकें जे गर्वांध । ते ऐकून ऐसे शद्ब । वाटूनिया असंबद्ध । हंसते झाले ॥२४७॥ म्हणती "धनुर्भंग करूनहि । ऐसा विवाह शक्य नाहीं । न भंगितां कोण पाही । वरील तिज? ॥२४८॥

येईल काळ स्वयमेव । तरी आम्ही सीतेस्तव । युद्ध करून पराभव । करूं त्याचा" ॥२४९॥ ऐसें भाषण गर्वयुक्त । ऐकून जे हरिभक्त । धर्मशील ज्ञाते हंसत । काय म्हणती ॥२५०॥ "बलाचा ज्या अहंकार । करून तद्गर्व-परिहार । जानकीसी रामचंद्र । वरील इथें ॥२५१॥ दशरथाचे पुत्र वीर, । शूर आणि समरधीर । कोण समर्थ जिंकणार । रणीं त्यांतें ॥२५२॥ वृथा वल्गना करून । कां ओढून घेतां मरण? । मनींचे मांडे खाऊन । भूक न शमे ॥२५३॥ बोध आमुचा अमोलिक । अत्यंत हित-कारक । सीता जगदंबा निःशंक । जाणा मनीं ॥२५४॥ राम-चंद्र जगत्पिता । हें आणूनिया चित्तां । डोळे भरून सुंदरता । पहा त्यांची ॥२५५॥ सकल गुणांचें भांडार । सुखदायक सुंदर । शिव हृदयवासी निर्धार । उभयतां हे ॥२५६॥ सुधाब्धि असतां जवळ । सुदूर पाहून मृगजळ । मागें धांवून निष्फल । मरतां कां हो? ॥२५७॥ असो, जया जें रुचेल । करा जा हो! तें खुशाल । पावलोंसें जन्मफल । आज आम्ही" ॥२५८॥ बोलून हें सज्जन नृप । प्रेम ज्यां हृदयीं अमूप । पाहती निरुपम रूप । राघवाचें ॥२५९॥ देव बैसून विमानीं । पाहती गगनांतुनी । करिती गीत गाउनी । पुष्पवृष्टि ॥२६०॥ योग्य जाणून अवसर । तेव्हां जनक नृपवर । बोलावूं धाडी सत्वर । जानकीतें ॥२६१॥ सीतेच्या सख्या सुंदर । सर्व मिळूनिया चतुर । तिजलागुनी सादर । घेऊन येती ॥२६२॥ सीता रूपगुणखनि । साक्षात् जगदंबा भवानी । शद्ब न पुरती वर्णनीं । सौंदर्य तें ॥२६३॥ सर्व उपमा मजलागून । वाटती अतिशय गौण । करितां सामान्यस्त्रीवर्णन । योजिती ज्या ॥२६४॥ सीतावर्णनीं त्या योजून । अधम कवि म्हणवून । पदरीं घेईल कोण । अपयश

तें ॥२६५॥ स्त्रीचीच उपमा बरवी । सीतावर्णनीं योजावी । ब्रह्मांडीं कोठें शोधावीं । रम्य युवती? ॥२६६॥ (मानवी स्त्रियांत तैसें । सौंदर्य कोठेंहि न दिसे । देवांगनामाजीं असे । तरी कुठें? ॥२६७॥) वाचाळ आहे सरस्वती । अर्धतनु ती पार्वती । अनंगपति म्हणून रति । अति दुःखी ॥२६८॥ विष आणि वारुणी । जिचे प्रिय बंधुभगिनी । ती लक्ष्मी होय कोठुनी । जानकीसम? ॥२६९॥ (जानकीच्या सौंदर्यास । योग्य उपमा द्यावयास । युक्ति योजिती तुलसीदास । चातुर्यानें ॥२७०॥) सौंदर्यसुधेचा सागर । असेल एखादा जर । अत्यंत रमणीय थोर । कच्छप तो ॥२७१॥ शोभा हीच रज्जु प्रबल । शृंगार हा मंदराचल । स्वकरकमलें मंथील । मदन जरी ॥२७२॥ ऐशा प्रकारें केवल । सौंदर्यसुखाची मूल । नूतन लक्ष्मी होईल । निर्माण जरी ॥२७३॥ सीतेच्या तुलनेप्रत । योग्य ठरेल कदाचित् । हेंहि कवि भीत भीत । सांगतील ॥२७४॥ असो, सीतेस घेउनी । मंजुस्वरें गात गाणीं । तिच्या चतुर साजणी । चालल्या तैं ॥२७५॥ जानकीच्या अंगावरी । नूतन साडी साजिरी । जगन्मातेची शोभा भारी । अतुलनीय ॥२७६॥ सीतेच्या अंगांगावर । उत्कृष्टसे अलंकार । घालून केला शृंगार । सखिजनीं ॥२७७॥ जेव्हां रंगभूमीवरी । पाय ठेवी जनककुमारी । रूप पाहून नरनारी । मुग्ध होती ॥२७८॥ हृष्ट होती सुरवर । करिती दुंदुभी–गजर । पुष्पें वर्षतीं, मधुर । अप्सरा गाती ॥२७९॥ तिच्या करकमलीं एक । जयमाला अलौलिक । पाहतां जाहले थक्क । सकल राजे ॥२८०॥ जानकी चकितचित्तें । पाहूं इच्छी राघवातें । मोहवश त्या समयातें । भूप सारे ॥२८१॥ मुनीश्वरांच्या सान्निध्यांत । दोघे बंधु होते स्थित ।

नेत्र झाले अनुरक्त। लाभतां निधि ॥२८२॥ अलोट जनसमाज। गुरुजनांचीहि लाज। संकोच वाटला सहज। जानकीतें ॥२८३॥ म्हणून त्या अवसरां। हृदयीं आणून रघुवीरा। पाही सखींच्या शरीरां। संकोचुनी ॥२८४॥ बघतां दिव्य रामरूप। सीतेची शोभा अमूप। जननेत्रीं उघडझांप। स्थगित झाली ॥२८५॥ सारे चिंतातुर होती। संकोचानें न बोलती। मनीं प्रार्थना करिती। विधात्याची ॥२८६॥ "हे विधात्या! तूं सत्वरीं। रायाचें बुद्धिमांद्य हरी। सद्बुद्धि आमुच्यापरी। त्यास देई ॥२८७॥ न करितां उहापोह। सोडून पणाचा आग्रह। सीतारामाचा विवाह। करो भूप ॥२८८॥ जग म्हणेल भलें त्यास। मानवेल तें सर्वांस। आग्रहें होईल विशेष। हृदय-दाह" ॥२८९॥ हीच लालसा धरून। सर्व लोक झाले मग्न। जानकीस योग्य म्हणून। सांवळा वर ॥२९०॥ (सोपानींचा मार्ग भला। जरी अतिदीर्घ वाटला। तदर्थ तेरावा योजिला। विश्राम हा ॥२९१॥ रसिक भाविक श्रोत्यांस। विनवीतसे देवीदास। माझ्या बोबड्या बोलांस। मान्य करा ॥२९२॥)

-----

# विश्राम १४ वा

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्योनमः
श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः

रायें बंदीजनांप्रत । पाचारिलें मंडपांत । तेहि श्रीदावलि गात । प्राप्त झाले ॥१॥ भूप म्हणे, "तुम्ही जाऊन । निवेदा हो! माझा पण" । अति प्रसन्न होऊन । निघाले ते ॥२॥ योग्य शद्बेंकरून । म्हणती ते बंदीजन । "सकल भूपहो! श्रवण । करा तुम्ही ॥३॥ विशाल बाहु उभारून । राय विदेहाचा पण । करीत आह्मीं निवेदन । ऐका ऐका ॥४॥ नृपबाहुबल--चंद्रास । शिवचाप राहूपरिस । अति जड, कठिण सर्वांस । विदित असे ॥५॥ रावणबाणासुरापरी । शूर योद्धे जे का भारी । दृष्टि टाकून चापावरी । चालते झाले ॥६॥ तेंचि जड कठोर भारी । शिवचाप या अवसरीं । राजसमाजाभीतरीं । भंगील जो– ॥७॥ विचार न करितां मनांत । त्रैलोक्यविजयासहित । सीता घालील त्याप्रत । जयमाला ही" ॥८॥ ऐकतांचि पण ऐसा । सर्व भूपांसी लालसा । अति मानी, ते सहसा । क्रुद्ध झाले ॥९॥ कमर बांधून सत्वर । उठले होऊन अधीर । इष्टदेवा नमवून शिर । सरसावले ॥१०॥ न्याहाळून आवेशांत । चापास घालिती हात । बाहुबल वेचितां बहुत । उचलें न तें ॥११॥ कांहींतरी ज्यांच्या चित्तीं । विचाराची शक्ति होती । चापासमीप न जाती । ऐसे भूप ॥१२॥ जे का राजे मूढमति । आवेशें चाप धरिती । नुचलतां परत जाती । लाजूनिया ॥१३॥ त्या वीरांचा भुज-

प्रताप । हिरावून आपेआप । जणुं जड होय चाप । अधिकाधिक ॥१४॥ दशसहस्त्र राजे बलें । तदर्थ एकत्र भिडले । परि तें किमपि न हाले । कैशा परी? ॥१५॥ कामांधाचे पाहून चाळे । जैसें सतीचें मन न चळें । तैसें हालवितांहि बळें । न हालें तें ॥१६॥ यापरीं तो भूपवृंद । झाला उपहासास्पद । जैसा संन्यासी प्रसिद्ध । वैराग्यहीन ॥१७॥ थोर पूर्वजांची कृति । विजय आणि शूर वृत्ति । चापास वाहून जाती । परतूनिया ॥१८॥ हिरमोड होतां सहज । राजे जाहले निस्तेज । जाऊन बसले सलज्ज । निजसमाजीं ॥१९॥ पाहून त्या भूपांप्रति । जनक झाला व्याकुळ अति । क्रुद्ध होऊनिया अंतीं । काय म्हणे ॥२०॥ "मीं जो योजिला पण एक । तो ऐकोनिया सम्यक् । द्वीपद्वीपींचे भूप अनेक । पातले येथ ॥२१॥ मनुज–रूप धरून । आले देवदैत्यगण । तैसेचि रणनिपुण । विपुल वीर ॥२२॥ कुमारी सुंदर अति । तैसी स्पृहणीय कीर्ति । विजय होणार दिगंतीं । त्याचसवें ॥२३॥ धनुष्यभंग करुनी । या लाभाच्या संपादनीं । जणुं निर्मिला नाहीं कुणी । विधात्यानें ॥२४॥ ऐसा हा लाभ कोणाला । सांगा नसेल जरि रुचला । कुणीहि शिवचापाला । चढविलेंना ॥२५॥ चाप चढविणें, तोडणें । हें तर राहोच बोलणें । शक्य न झालें हलविणें । जागचेंहि ॥२६॥ यावरी 'वीर' म्हणोनी । प्रौढी मिरवूं नये कोणीं । निर्वीर झाली धरणी । जाणिलें मीं ॥२७॥ आतां आशेस सोडून । जा हो ! स्वगृहालागून । लिहिलें न सीतेचें लग्न । विधात्यानें ॥२८॥ प्रतिज्ञा सोडीन जरी । पाणी पडेल पुण्यावरी । राहो, राहील कुमारी । मत्कन्या ही ॥२९॥ वीर नाहीं पृथ्वीवरी । आधींच हें कळतें जरी । हंसें न होतें यापरी ।

प्रतिज्ञेनें" ॥३०॥ ऐकून रायाचें भाषण । नरनारी सर्वजण । दुःखित झाले पाहून । जानकीतें ॥३१॥ शद्ब पडतां श्रवणपुटीं । लक्ष्मणाची चढे भृकुटी । क्रोधानें आरक्त दृष्टि । स्फुरती ओष्ट ॥३२॥ जनकाचें तें भाषण । झोंबलें जणुं तीक्ष्णबाण । श्रीरामाच्या भयेंकरून । बोलूं न शके ॥३३॥ रामपदकमलावर । नम्र करून निज शिर । बोलता झाला गंभीर । समयोचित ॥३४॥ "रघुवंशीय कुणी जरी । ज्या स्थानीं निवास करी । न वदे ऐसी वैखरी । कुणीहि तिथें ॥३५॥ जनकें केलें भाषण । तैसें अनुचित वचन । रघुकुलमणि विद्यमान । असतां इथें ॥३६॥ रविकुलाब्ज-दिनकरा ! । ऐका प्रभो ! रघुवीरा ! । अभिमानें न वदे गिरा । स्वभावेंचि ॥३७॥ जरी मिळेल मजलागून । तुमचें अनुशासन । हें ब्रह्मांड उचलीन । कंदुकापरीं ॥३८॥ त्यातें कांच–घटापरीं । फोडून टाकीन सत्वरीं । चिरडीन पद्मनालापरीं । मेरूलागीं ॥३९॥ प्रतापमहिमा तुमचा । भगवंता असे साचा । बापुडच्या जीर्ण चापाचा । पाड काय ? ॥४०॥ हें जाणून आपण । आज्ञा द्यावी मजकारण । कौतुक करून दावीन । पहावें तें ॥४१॥ कमलनालासमान । शिवचापातें चढवीन । करीं घेऊन धांवेन । शतयोजनें ॥४२॥ तुमच्या प्रतापबलानें । छत्रकदंडाप्रमाणें । शकलें करून छिन्नभिन्नें । टाकीन मी ॥४३॥ प्रभुपदाचीच शपथ । न तरी सांगतों नाथ! । पुन्हां न धरी हातांत । चाप–भाते" ॥४४॥ क्रोधयुक्त तो लक्ष्मण । करितां ऐसें भाषण । दिग्गज कंपायमान । डळमळे धरा ॥४५॥ लोक आणि भूप समस्त । झाले तेव्हां भयभीत । हर्ष सीतेच्या मनांत । ओशाळे राय ॥४६॥ विश्वामित्र, रघुपति, । सर्व मुनि निज चित्तीं । मुदित, रोमां-

चित होती । पुनःपुन्हां ॥४७॥ खुणेनें रघुनंदनें । वारिलें लक्ष्मणाकारणें । बसविलें अतिप्रेमानें निजसन्निध ॥४८॥ योग्य समय जाणून । अत्यंत प्रेमेंकरून । बोलते झाले वचन । विश्वामित्र ॥४९॥ "ऊठ बा रामा! सत्वरीं। शिवचापाचा भंग करीं। आधीं चिंता करीं दुरीं। मिथिलेशाची" ॥५०॥ गुरूची आज्ञा ऐकतां । रामपदीं ठेवी माथा । हर्षविषाद न रामचित्ता । कांहीं एक ॥५१॥ स्वभावेंचि रघुपति । उठलासे शीघ्रगति । लाजवी सिंहच्छाव्याप्रति । ऐट त्याची ॥५२॥ सिंहासन उंच थोर । त्याच उदयाचलावर । श्रीराम बालभास्कर । उदित होय ॥५३॥ प्रभूचे जे भक्त संत । तींच कमलें विकसित । त्यायोगें झाले मुदित । लोचनभृंग ॥५४॥ भूपमनींची लालसा । तीच नष्ट झाली निशा । वल्गना-तारकाप्रकाशा । वांव नुरे ॥५५॥ अभिमानी जे भूपति । संकोचें तत्कुमुदपंक्ति । कुटिल-नृप-उलूकतति । लुप्त झाली ॥५६॥ देवमुनिचक्रवाक् । होते जाहले विशोक । पुष्पवृष्टीनें निःशंक । करिती सेवा ॥५७॥ गुरुपदां प्रेमयुक्त । वंदूनिया रघुनाथ । अनुज्ञा मागे विनीत । ऋषींचीहि ॥५८॥ अखिल ब्रह्मांडाचा स्वामी । मत्तसुंदरगजगामी । चालतांना पदक्रमीं । स्वाभाविक ॥५९॥ चालतांना रघुनाथ । नगर-नरनारी समस्त । हृष्टमनीं रोमांचित । देह त्यांचे ॥६०॥ करून पितरां वंदन । सर्व सुकृतांचें स्मरण । "पुण्यप्रभाव प्रमाण । असेल जरी ॥६१॥ तरी हे प्रभो! गणेश!। मृदु पद्मनालापरिस । भंगील शिवचापास । श्रीराम हा" ॥६२॥ वात्सल्यप्रेमेंकरुनी । श्रीरामातें विलोकुनी । पाचारी सख्यांलागुनी । निकटवर्ती ॥६३॥ जानकीची ती जननी । पूर्ण स्नेहवश होउनी । बोले त्या सख्यांलागुनी । काकु-

ळतीनें ॥६४॥ "सख्यानों! आमुचे असती । हितकर्ते जे म्हणविती । तेहि कौतुक पाहती । बैसूनिया ॥६५॥ कुणीतरी भूपाप्रति । समजावून न सांगती । हा हट्ट न बरा, असती । बालक हे ॥६६॥ रावणबाणादिकांनींहि । चापस्पर्श केला नाहीं । हरले इतर भूप तेहि । करून यत्न ॥६७॥ देती तें धनुष्य । भारी । बाल कुमारांच्या करीं । उचलील का मंदरगिरि । बालहंस? ॥६८॥ भूपाचें शहाणपण । सर्व गेलेंसे लोपून । सख्यांनो! न ये कळून । दैवगति" ॥६९॥ चतुर सखि त्या समयीं । बोधून तिज धीर देई । "तेजस्वी जे, लघु कधींहि । न मानावे ते ॥७०॥ कोठें अगस्तिसम नर । कोठें समुद्र अपार । शुष्क करून जगभर । यश संपादी ॥७१॥ सूर्यबिंब गगनांत । दिसावया लघु अत्यंत । उदयें तम लया नेत । त्रिभुवनींचें ॥७२॥ ब्रह्मा—विष्णु—महेश्वर । तैसेचि सर्व सुरवर । जेणें वश, तेहि मंत्र । परमलघु ॥७३॥ महामत्त गजराज । त्या वश करी सहज । महाराज्ञी! लघु समज । अंकुश तो ॥७४॥ पुष्पांचेंच धनुर्बाण । कामदेवें केलें धारण । परि सोडिलें वश करून । त्रिभुवनासी ॥७५॥ हें जाणून महाराज्ञी!। संशय द्यावा सोडुनी । राम भंगील निःशंकपणीं । धनुष्यतें" ॥७६॥ सखीचें ऐकून वचन । राणी विश्वासली पूर्ण । प्रीति झाली वर्धमान । निश्चितपणें ॥७७॥ श्रीरामातें विलोकुनी । भयभीत जनकनंदिनी । ज्या त्या देवतेचा मनीं । धांवा करी ॥७८॥ काकुळतीनें स्वमनीं । करुणा भाकी स्तवूनी । "मजवरी महेश-भवानी! । प्रसन्न व्हा हो! ॥७९॥ माझ्या सेवेचें सार्थक । करा तुम्ही आवश्यक । हलकें होऊं द्या पिनाक । अभीष्ट चिंता ॥८०॥ अगा भक्तवरदायका!। देवा श्रीगणनायका!।

तुझी सेवा केली जी का । आजवरी ॥८१॥ प्रार्थित्यें मी वारंवार । ऐकावें तें सत्वर । हलका करावा भार । धनुष्याचा" ॥८२॥ पुनःपुन्हां राघवास । पाहून स्तवी देवतांस । जानकी निजमनास । धीर देई ॥८३॥ प्रेमाश्रूंनीं तिचे नयन । वरचेवर येती भरून । रोमांचित गेलें होऊन । शरीर तिचें ॥८४॥ श्रीरामाची मूर्ति निकी । डोळे भरून विलोकी । स्मरतां मनीं धुकधुकी । पितृ–पणाची ॥८५॥ "हर हर ! ताता ! आपण । पण मांडिला दारुण । लाभ कीं हानि यांतून । कळेचि ना ॥८६॥ मंत्री हे भ्याड समस्त । बोधिती न भूपाप्रत । होय पंडितांच्या सभेंत । अन्याय मोठा ॥८७॥ वज्राहून कठोर अति । कोठें शिवचाप निश्चितीं । कोठें ती सांवळी मूर्ति । सुकुमार? ॥८८॥ विधात्या ! मी कैशापरीं । मनीं धीर धरावा तरी । काय हिऱ्याचा वेध करी । शिरीष पुष्प ? ॥८९॥ सर्वंहि सभेची मति । झाली दिसे गुंग अति । आतां तुजविण नाहीं गति । शिवचापा ! ॥९०॥ पाहूनिया रघुनाथा । तूं तरी आपुली जडता । सभेवरी टाकून आतां । सूक्ष्म हो गा !" ॥९१॥ या परी सीतेच्या चित्तीं । तळमळ वाढली अति । शतयुगासम वाटती । लवनिमिष ॥९२॥ एकदां रामास पाही । पुन्हां निरखी तळीं महि । चंचल नेत्र त्या समयीं । शोभती कैसे ? ॥९३॥ जणुं कामदेवाचे दोन । अत्यंत चंचल मीन । चंद्रमंडळीं बसून । झोके घेती ॥९४॥ लज्जा ती निशासिद्ध । तेणें मुखकमल रुद्ध । शब्दभृंग आंत बद्ध । प्रकटूं न शके ॥९५॥ परम कृपणाचें सोनें । गृहकोनीं गुप्तपणें । दडले अश्रु त्याप्रमाणें । नेत्रकोनीं ॥९६॥ व्याकुलता अति वाढली । तेणें सीता संकोचली । धीर धरून विश्वासली । हृदयांतरीं ॥९७॥

"तनुवाङ्मनेंकरून । मत्प्रेमासी सत्यपण । रामपदाब्जीं मन्मन । रतलें असे ॥९८॥ तरी सकलांतर्वासी तो परमात्माच मजसी । करील निश्चयें दासी । राघवाची ॥९९॥ ज्याची ज्यावरी सत्प्रीति । त्याची तया होय प्राप्ति । कदापि या सिद्धान्तीं । संदेह नाहीं" ॥१००॥ प्रभुमूर्ति विलोकिली जी प्रेम-प्रतिज्ञा केली । तीहि संपूर्ण जाणिली । राघवानें ॥१०१॥ जानकीस न्याहाळून । चापा निरखी रघुनंदन । पाही लघुसर्पालागुन । गरुड जैसा ॥१०२॥ रघुकुलावतंसानें । पाहतां चापाकारणें । काय केलें लक्ष्मणें । पाहून तें ॥१०३॥ गात्रें झालीं रोमांचित । पदें ब्रह्मांड दाबित । सावध कराया निश्चित । बोलला तो ॥१०४॥ "अहो हे कच्छप ! दिग्गज ! । हे वराह ! शेषराज ! । धैर्यें सांवरा धरा आज । डळमळूं न द्या ॥१०५॥ श्रीराम रघुनायक । तोडूं इच्छितो पिनाक । ममाज्ञा ऐकून सम्यक । सिद्ध रहा" ॥१०६॥ चापासमीप जाण । येतांचि रघुनंदन । स्वदेवता-पुण्य-स्मरण । करिती लोक ॥१०७॥ सर्वांच्या मनींची शंका । तैसेंचि अज्ञान जें का । मूर्ख भूपतींचा फुका । अभिमान जो- ॥१०८॥ परशुरामाची अहंता । तिची जी असे जडता । मुनीश्वरांची कातरता । देवतांचीहि- ॥१०९॥ जानकीची तळमळ । जनक-परिताप केवळ । कठिण दुःख-दावानळ । महिषींचा – ॥११०॥ शिव-चापाची नाव थोर । प्राप्त होतां तिच्यावर । हे सर्वहि होऊन एकत्र । चढते झाले ॥१११॥ राम–बाहुबल–सागर । अथांग आणि अपार । जाऊं इच्छिती परपार । नाविक न कुणी ॥११२॥ एकवार रघुनाथें । पाहिलें सर्व लोकांतें । तटस्थ दिसले तैं ते । चित्रापरीं ॥११३॥ मग त्या कृपायतनें । पाहिलें सीतेकारणें । विकल ती सचिंत

मनें । दिसली तदा ॥११४॥ जानकी ती अत्यंत पाहिलीसे विकलित । कंठी एक निमिषाप्रत । कल्प सम ॥११५॥ तृषित करी हाय हाय । जलाविण प्राण जाय । सुधातडागाचा काय । उपयोग मग? ॥११६॥ शेतें गेल्यास वाळून । वृष्टीचें काय प्रयोजन । समय चुकतां निष्कारण । पश्चात्ताप ॥११७॥ मनीं विचारून ठाम । सीतेकडें पाही राम । बघून विशेष तत्प्रेम । पुलकित होय ॥११८॥ मनेंचि सद्गुरु-प्रत । प्रणाम करी रघुनाथ । सहज लीलेनें उचलीत । धनुष्यातें ॥११९॥ वीज चमकून मेघोदरीं । लय पावते ज्यापरीं । धनु उचलितां त्यापरीं । चमकलें तें ॥१२०॥ चाप चढवितां वर । तोंच झालें मंडलाकार । अद्भुत हा चमत्कार । घडला तेथ ॥१२१॥ कैसें धनुष्य घेतलें । उचलिलें आणि चढविलें । तें कुणासहि न कळलें । तटस्थ सर्व ॥१२२॥ रघुनाथें धनुप्रत । भग्न करितां मध्यांत । घोर ध्वनि ब्रह्मांडांत । भरून राहे ॥१२३॥ तो ध्वनि अति कठोर । त्रैलोक्यीं भरला घोर । रविरथाश्व चालती स्वैर । सोडून पथ ॥१२४॥ दिग्गज ते चीत्कारले । पृथ्वीगोल डळमळे । शेष-कूर्म-वराह सगळे । कळमळती ॥१२५॥ सुरासुर मुनीश्वर । कानीं धरितां स्वकर । करूं लागले विचार । व्याकुलतेनें ॥ १२६ ॥ शिवचाप तें प्रचंड । रामें केलेंसे दुखंड । करिती प्रभूचा उदंड । जयजयकार ॥१२७॥ श्रीरामाचें बाहुबल । तोच सागर विशाल । तेथें जहाज अनुकूल । शिवचाप तें ॥१२८॥ परि होऊन मोहातुर । आधीं चढले जे त्यावर । ते सर्वहि नृपवर । बुडते झाले ॥१२९॥ रामें चापखंड दोन । दिले भूवरी फेंकून । तें पाहून सर्व जन । आनंदले ॥१३०॥ महामुनि विश्वामित्र । असती सागर पवित्र ।

प्रेमजल अथांग थोर । ज्यांत शोभे ॥१३१॥ पाहून राघवाप्रति । येती झाली त्वरित गति । रोमांचरूपी भरती । अधिकाधिक ॥१३२॥ दुंदुभीनादेंकरून । नभ गेलें दुमदुमून । करूं लागल्या नृत्यगान । देवांगना ॥१३३॥ ब्रह्मादिक सुरवर । सिद्ध आणि मुनीश्वर । प्रभूस देती आशी फार । प्रशंसुनी ॥१३४॥ नानावर्णी पुष्पहार । वर्षती श्रीरामावर । करिती गान मधुर । किन्नर गण ॥१३५॥ तो जयजयकार ध्वनि । भरलासे त्रिभुवनीं । पूर्वध्वनि परि कानीं । ऐकूं न ये ॥१३६॥ जेथें तेथें नरनारी । म्हणती मुदें परस्परीं । तोडिलें शिवचाप भारी । राघवानें ॥१३७॥ बंदी, मागध, सूतगण । चतुर सर्वहि मिळून । गाती प्रभुयशोगान । गर्जूनिया ॥१३८॥ गज, अश्व, धन, मणि । वस्त्रें अमोल घेउनी । सर्व जन रामावरुनी । ओवाळिती ॥१३९॥ टाळ, मृदंग, सनई, शंख । ढोल, भेरी, दुंदुभी आदिक । नानाविध हीं अनेक । मधुर अति ॥१४०॥ ऐसीं बहु वाद्यें वाजतीं । एकत्र मिळून युवती । मंगलशीं गीतें गाती । ठायीं ठायीं ॥१४१॥ सर्व सख्यांसह प्रिय । राणी प्रसन्न अतिशय । शुष्क धान्यावरी होय । वृष्टि जणुं ॥१४२॥ धनुर्भंग होता क्षणीं । निस्तेज ती भूपश्रेणी । दीपतेजा होय हानि । दिवसां जशी ॥१४३॥ जानकीतें सुख झालें । तें केंवि जाय वर्णिलें । जणुं स्वातिजल लाभलें । चातकासी ॥१४४॥ श्रीरामातें तैं लक्ष्मण । कंसें करी विलोकन । ज्यापरी चंद्रालागून । बालचकोर ॥१४५॥ शतानंदें आज्ञापितां । त्या समयीं सती सीता । निघे जावया करितां । प्रभुसन्निध ॥१४६॥ अति सुंदर चतुर । सख्या तिच्या बरोबर । गाऊं लागती मधुर । मंगल गीतें ॥१४७॥ सुशोभित देहकांति । जनककन्या ऐशी रीतीं । बालहंसगतीनें ती । चालूं लागे ॥१४८॥ सखी-

गणांच्या मध्यवर्ती । कैसी शोभे जानकी ती । सौंदर्यसमूहीं ज्या रीतीं । लावण्य तें ॥१४९॥ सीता–करकमलांत । जयमाला विराजत । विश्वविजयशोभा तेथ । नांदे जणुं ॥१५०॥ संकोच दिसे शरीरीं । परि अत्युत्साह अंतरीं । कुणासहि न कळे परि । गूढ प्रेम ॥१५१॥ समीप जाऊन जानकी । रामरूपातें निरखी । दिसे कुमारी नेमकी । चित्रलिखित ॥१५२॥ चतुर सख्या त्या काला । समजावून म्हणती तिला।घाल सुंदर जयमाला । रामकंठीं'॥१५३॥ ऐकतांचि द्वयकरीं । माला ती वरती धरीं । कंठीं घालवें न परि । प्रेमवशें ॥१५४॥ जणु का देंठासहित । दोन कमलें भीत भीत । घालूं पाहती चंद्राप्रत । जयमाला ती ॥१५५॥ रामरूप विलोकिती । सख्या गोड गीत गाती । सीता घाली जयमाला ती । रामकंठीं ॥१५६॥ यापरी ती जयमाला । पाहून रामाच्या गळां । देव करिती त्या वेळां । पुष्पवृष्टि ॥१५७॥ सकल भूपांचें वदन । गेलें तेव्हां उतरून । रवि पाहून कुमुदगण । कोमेजे जणु ॥१५८॥ नगरीं आणि नभांत । वाद्यें वाजती अमित । दुर्जन म्लान समस्त । प्रसन्न साधु ॥१५९॥ सुरवर किन्नर नर । नाग आणि मुनीश्वर । करून जयजयकार । आशीस देती ॥१६०॥ मिळून अप्सरागण । करिती नृत्यगायन । पुष्पवृष्टि होय वरून । वारंवार ॥१६१॥ जेथें तेथें विप्रपंक्ति । वेदघोषातें करिती । भाट ते उच्चारिती । ब्रीदावलि ॥१६२॥ स्वर्ग–मृत्यु–पाताळांत । व्यापलें यश हें प्रथित । चाप भंगून सीतेप्रत । वरिलें रामें ॥१६३॥ नगरनरनारी करिती । तें दंपतीची आरति । वित्त ओवाळून देती । दान तेव्हां ॥१६४॥ वधुवर रामसीता । शोभती तैं उभयतां । जणुं शृंगार–सुंदरता । एकवटली ॥१६५॥ सख्या म्हणती, "हे

सीते ! । धरीं प्रभूच्या पदांतें । परि स्पर्श करायातें । न धजे भयें ॥१६६॥ गौतमपत्नीची गति । तिज आठवली चित्तीं । हात न लावी पदांप्रति । त्या कारणें ॥१६७॥ तिचें अलौकिक प्रेम । जाणून तें निस्सीम । रघुवंशमणि राम । हांसे मनीं ॥१६८॥ (येथें भयाचें कारण । त्याचें करूं स्पष्टीकरण । अहल्याकथेचें स्मरण । देऊनिया ॥१६९॥ स्पर्शें अहल्या उद्धरली । तत्काल स्वर्गास गेली । तैशी न यावी पाळी । म्हणून भय ॥१७०॥ अंगावरील आभरणें । त्यांत जीं असतीं रत्नें । स्त्रीत्व पावतील स्पर्शानें । म्हणून भय ॥१७१॥ जरी झाल्या त्या कामिनी । प्रभुप्रीतीच्या विभागिनी । निश्चयें होतील जीवनीं । म्हणून भय ॥१७२॥) तेव्हां सीतेतें पाहुनी । भूप लालचावले मनीं । कांहीं गेले संतापुनी । कपटी मूर्ख ॥१७३॥ उठूनिया त्यांनीं स्वतां । अंगीं लेवून चिलखतां । चालविली वाचाळता । एकसारखी ॥१७४॥ कोणी म्हणती गर्जून । "घ्या सीतेस हिरावून । दोघां नृपबालकांलागून । धरून बांधा ॥१७५॥ धनुष्य भंगिलें म्हणून । नव्हें आमुचें समाधान । आम्ही असतां वरी कोण । कुमारीतें ? ॥१७६॥ यद्यपि राजा जनक । यासी झाला साहाय्यक । तरी त्यासवें निःशंक । जिंकू रणीं" ॥१७७॥ त्यांची वल्गना ऐकून । बोलती राजे सज्जन । "लाजवी भूपांलागून । निर्लज्जता ही ॥१७८॥ बल-प्रताप-शूरता । स्वर्ग आणि महत्तता । चापासवें गेली असतां । निघूनिया– ॥१७९॥ तो गेलेला शूरपणा । कोठून आला सांगा ना ? । काळिमा फासिला वदना । विधात्यानें ॥१८०॥ ईर्ष्या, कोप, अभिमान । द्या हो ! सर्वहि टाकून । पहा हो ! डोळे भरून । रामरूप ॥१८१॥ धगधगीत अत्यंत । लक्ष्मणाच्या क्रोधाग्नींत ।

उडच्या घेऊं नका व्यर्थ । शलभासम ॥१८२॥ गरुड पक्ष्याचा बळी । इच्छी मनीं काक, छळी । सश्यानें सिंहाच्या कवळीं । धरावी हांव ॥१८३॥ जैसा निष्कारण क्रोधी । कल्याणाची धरी बुद्धि । सुखसंपत्तीची सिद्धि । शिवद्रोहीं ॥१८४॥ लोभी, लंपट, स्वचित्तीं । इच्छी व्हावी निज कीर्ति । कामुका कोठून प्राप्ति । निष्कलंकत्वाची? ॥१८५॥ हरिपदविमुखानें । परम गति इच्छिणें । युष्मल्लालसा त्याप्रमाणें । भूपतींनो!" ॥१८६॥ ऐसा ऐकून कोलाहल । सीता साशंक व्याकुल । तिज नेती सख्या सकल । राज्ञीकडे ॥१८७॥ सहजचि कोसलाधिप । जाई सद्-गुरुसमीप । स्वमनीं वर्णीत अमूप । सीतासौंदर्य ॥१८८॥ सीता महाराणीसहित । होती जाहली सचिंत । म्हणे, "धात्याचें घटित । काय पुढें?" ॥१८९॥ भूप-वल्गना ऐकतां । लक्ष्मण पाही इतस्ततां । परि त्या न येचि बोलतां । रामभयें ॥१९०॥ आरक्त जाहले नेत्र । भृकुटी चढल्या वक्र । भूपांस पाही सर्वत्र । क्रोधयुक्त ॥१९१॥ बलिष्ठ सिंहाचा छावा । मत्त हत्तींच्या जमावा । पाहून जणुं चढावा । आवेश त्या ॥१९२॥ ऐसी खळ-बळ पाहून । तेथील सर्व स्त्रीगण । त्या भूपांतें गालिप्रदान । करीतसे ॥१९३॥ (सोपानींचा मार्ग भला । जरी अति दीर्घ वाटला । तदर्थ चौदावा योजिला । विश्राम हा ॥१९४॥ रसिक भाविक श्रोत्यांस । विनवीतसे देवीदास । माझ्या बोबड्या बोलांस । मान्य करा ॥१९५॥)

---:o:---

# विश्राम १५ वा

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्यो नमः
श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः

धनुर्भंगवार्ता ऐकुनी । भृगुकुलाब्जवासरमणि । त्याच समयीं सभास्थानीं । प्राप्त झाले ॥१॥ विलोकून तयांप्रति । सर्व भूप संकोचती । श्येन पाहून दडती । लावे जणुं ॥२॥ अति गौर तनुकांति । सर्वांगीं शोभे विभूति । तैसेंचि भाला-वरती । त्रिपुंड्र तें ॥३॥ मस्तकीं तो जटाभार । मुखचंद्र तो अति सुंदर । आरक्त छटा त्यावर । क्रोधवशें ॥४॥ वक्र भृकुटी,
५५ क्रुध्दनयन । सहज करितां विलोकन । वाटती तें क्रोधपूर्ण । प्रेक्षकांतें ॥५॥ वृषभतुल्य स्कंध प्रबल । हृदय–बाहु विशाल । जानवें, मृगाजिन, माळ । सुंदर तो ॥६॥ मुनिवसन, भाते दोन । कटीस बांधिले कसून । स्कंधीं परशु, धनुर्बाण । करा-माजीं ॥७॥ वेष शांत दिसे वर । परि करणी कठोर । अवर्ण-नीय खरोखर । स्वरूप तें ॥८॥ धरून मुनिवेषाप्रत । वीररस मूर्तिमंत । जणुं नृपसमाजांत । अवतरलासे ॥९॥ भार्गवाचा वेष कठिण । संमुखचि विलोकून । उठले भूप होऊन । भय-व्याकुल ॥१०॥ स्वपित्याच्या नांवांसवें । सांगून आपुलीं नांवें । साष्टांग दंडवत बरवे । घालिती तें ॥११॥ परशुराम जयाप्रति । हितार्थंहि विलोकिती । त्या वाटे झाली भरती । आयुष्याची ॥१२॥ मग जनकें येऊन । वंदिलें शिर नमवून । सीतेस घातलें बाहून । पायांवरी ॥१३॥ मुनींनीं दिला आशीर्वाद । तें चतुर सख्या

सानंद । नेती तिजला, स्त्रीवृंद । जया स्थानीं ॥१४॥ मग विश्वामित्र येती । परशुरामातें भेटती । दोघा बांधवां घालिती । तत्पदांवरी ॥१५॥ म्हणती, "हे राम, लक्ष्मण । दशरथाचे नंदन" । पाहून देती आशीर्वचन । भार्गव तयां ॥१६॥ मदनाचा हरी गर्व । ऐसें रामरूप अपूर्व । पाहूं लागले भार्गव । डोळे-भरीं ॥१७॥ मग जनकभूपाप्रति । पाहून ते प्रश्न करिती । "सांग कशास्तव अति । भीड ऐसी ?" ॥१८॥ कळून अजाणा-सम । पुसती तैं परशुराम । कोपें व्यापला निस्सीम । देह त्यांचा ॥१९॥ ज्या कारणानिमित्त । राजे जमले समस्त । रायें केला निवेदित । समाचार ॥२०॥ ऐकून जनकवचन । अन्यत्र करिती विलोकन । पाहती चापखंड दोन । पृथ्वीवरी ॥२१॥ अति क्रोधें तया क्षणीं । बोलती कठोर वाणी । "धनुर्भंग केला कुणीं । सांग मूर्खा ? ॥२२॥ त्यातें मूढा ! त्वरें दावी ! । न तरी राज्यसीमा ठावी । पालथी घालीन पृथ्वी– । तेथवरी" ॥२३॥ जनक अति भयभीत । उत्तर न दे किंचित् । कुटिल भूप तैं मनांत । आनंदती ॥२४॥ सुर–नाग–मुनीश्वर । नगरींचे नारीनर । हृदयीं झाले अपार । दुःखी तदा ॥२५॥ जानकीची माता मनीं । सचिंत गेली होउनी । धाता बिघडी सांवरूनी । गोष्ट सारी ॥२६॥ भार्गवाच्या स्वभावास । जाणून, भयें सीतेस । लोटूं लागे अर्धनिमिष । कल्पा–परी ॥२७॥ यापरी लोक समस्त । अतिशय भीतिग्रस्त । जानकीहि मनीं त्रस्त । विलोकुनी ॥२८॥ हर्ष वा विषाद कांहीं । हृदयीं मानिला नाहीं । बोलूं लागे राम पाहीं । भार्ग-वातें ॥२९॥ "शिवचाप–भंग करी । ऐसा असे कुणी जरी । तुमचाच दास तो तरी । असेल नाथ ! ॥३०॥ आपुलें आज्ञा-

वचन । कां न करितां कथन" । ऐकतां क्रुद्ध होऊन । बोलती मुनि ॥३१॥ "सेवा करी जो निःशंक । तोचि म्हणावा सेवक । रिपुसम करी वर्तणूक । रणपात्र तो ॥३२॥ ऐक रामा ! शिव-चाप हें । जेणें भग्न केलें आहे । तो सहस्रार्जुनासम पाहे । शत्रु माझा ॥३३॥ तेणें समाजाबाहेरी । वेगळें व्हावें सत्वरीं । मारिले जातील ना तरी । सर्वहि राजे" ॥३४॥ ऐकून मुनि-भाषण । किंचित् हांसे लक्ष्मण । टाकून बोले वचन । भार्ग-वातें ॥३५॥ "असंख्य धनुष्यें आम्हीं । बालपणीं तोडिलीं स्वामी ! । इतुकें कोपलां तुम्ही । कधींहि ना ॥३६॥ याच धनुष्यावरती । कां तरी इतुकी प्रीति" । ऐकतां क्रोधें वदती । परशुराम ॥३७॥ "अरे राजपुत्रा! तुज । काळें घेरिलें गमे मज । शुद्धि नुरलीसे सहज । बोलण्याची ॥३८॥ त्रिभुवनीं जें विख्यात । शिवचाप बलवंत । सामान्य चापासमवेत । गणितोस का ?" ॥३९॥ लक्ष्मण म्हणे हांसून । "ऐका मुनिनाथ ! वचन । सर्वहि धनुष्यें समान । मानितों आम्ही ॥४०॥ जीर्ण चापा-लागुनी । तोडितां काय लाभहानि । नवेंचि ऐसें मानुनी । देखिलें रामें ॥४१॥ तुटलें तें करितां स्पर्श । यांत रामाचा काय दोष । निष्कारण कां करितां रोष । मुनीश्वरा ?" ॥४२॥ परशुकडे दृष्टिपात । करून वदती मुनिनाथ । "माझा स्वभाव न विदित । शठा ! तुज ॥४३॥ बालक असती म्हणून । मी न मारी तुजलागून । मज केवळ ब्राह्मण । मानिसी मूर्खा ! ॥४४॥ मी तो बालब्रह्मचारी । माझा क्रोध असे भारी । मी क्षात्रकुलाचा वैरी । विश्वख्यात ॥४५॥ निज भुजबलेंकरुनी । भूपहीन केली धरणी । अर्पिली ब्राह्मणांलागुनी । अनेकदां ॥४६॥ सहस्रार्जुना-च्या करां । परशु माझा छेदणारा । एकदां राजकुमारा ! ।

पाहून घे ॥४७॥ निज मातापित्यांप्रत । तूं निष्कारण दुःखांत । लोटूं नकोस सांप्रत । राजपुत्रा ! ॥४८॥ गर्भींच्या अर्भकाप्रत । कापून काढी निश्चित । ऐसा निर्दय अत्यंत । परशु माझा" ॥४९॥ स्मित करून मृदुगिरा । वदे लक्ष्मण "मुनीश्वरा ! । महायोद्धा तुम्हांस पुरा । अभिमान हा ॥५०॥ पुनःपुन्हां मजप्रत । दावितां परशु येथ । उडवूं इच्छितां पर्वत । फुंकरानें ॥५१॥ तांबडा भोपळा म्हणुनी । मानूं नका इथें कोणी । जो दावितांचि तर्जनी । गळून पडे ॥५२॥ परशु आणि धनुर्बाण । तुमचे करून विलोकन । कांहीं बोललों वचन । अभिमानें मी ॥५३॥ आह्मां भृगुकुलोत्पन्न । जाणिलें उपवीत पाहून । न कोपतां करीन सहन । बोलाल तें ॥५४॥ देवता, विप्र, धेनु, संत । शौर्य दावणें यांप्रत । ही तो आमुच्या कुलांत । रीत नाहीं ॥५५॥ तयांचा करितां वध । महापाप हें प्रसिद्ध । जिंकितांहि परि सिद्ध । अपकीर्ति ॥५६॥ तुम्ही माराल मजप्रत । त्याची नसे मुळीं खंत । युष्मत्पदांवरी निश्चित । पडेन मी ॥५७॥ केवळ युष्मद्वचन । कोटि वज्रांच्या समान । व्यर्थ कुठार-धनुर्बाण । धरिलेंत हे ॥५८॥ अहो धीर मुनीश्वरा । पाहून युष्मच्छस्त्रास्त्रां । बोललों अयोग्य गिरा । क्षमा करा" ॥५९॥ लक्ष्मणोक्ति ही ऐकुनी । सक्रोध होऊन मुनि । बोलले भृगुवंशमणि । गंभीर गिरा ॥६०॥ "ऐका विश्वामित्रा ! आधीं । पोर कुटिल, मंदबुद्धि । इच्छी मरणाची संन्निधि । कुलघातकी ॥६१॥ रविवंशरूपी मयंक । त्यास हा केवळ कलंक । निरंकुश, मूढ निःशंक । पूर्णपणें ॥६२॥ एका क्षणाच्या माझारीं । पडेल मृत्युमुखांतरीं । निक्षून सांगतों, मजवरी । दोष नाहीं ॥६३॥ ह्याच्या जीविताची आस । तरी त्वरें आवरा यास । माझा

बल–प्रताप–रोष । वर्णूनिया" ॥६४॥ लक्ष्मण म्हणे "मुनीश ! । तुम्ही असतां प्रत्यक्ष । तुम्हांविण युष्मद्यश । कोण वर्णी? ॥६५॥ तुम्हीं स्वमुखेंचि स्वतां । वर्णिली स्वमहत्तता । कितीकदां तरी आतां । उदंडपणें ॥६६॥ झाली नसेल तृप्ति । तरी पुन्हां सांगा पुढतीं । राग दाबून दुःख अति । साहूं नका ॥६७॥ वीरवृत्ति क्षोभरहित । तुम्ही असून धैर्यवंत । गालिप्रदान अनुचित । तुम्हां न शोभे ॥६८॥ शूर ते समरांगणीं । दाविती निज करणी । स्वमुखें वाखाणणी । करितीच ना ॥६९॥ शत्रु उभा असतां रणीं । भेकड जे असती कोणी । केवल करिती स्वमुखांनीं । पराक्रमा ॥७०॥ जणुं तुम्ही काळालागून । सवें आणिलें हांकारून । मदर्थ बाहतां म्हणून । वारंवार" ॥७१॥ ती कठोर लक्ष्मणोक्ति । ऐकतांच भृगुकुलपति । घोर परशु करीं घेती । उभारुनी ॥७२॥ "आतां मात्र समाजानें । दोष न द्यावा मजकारणें । बालक कटुवादित्वानें । वधास योग्य ॥७३॥ बालक म्हणून याप्रत । वाचविलें आतांपर्यंत । आतां मात्र हा निश्चित । मरणारचि" ॥७४॥ विश्वामित्र म्हणती तदा । "क्षमा करा अपराधा । बालगुण-दोष कदा । बघती न साधु" ॥७५॥ निष्ठुर कोपी मजपरी । परशु धरूनिया करीं । संमुख गुरुद्रोही वैरी । अपराधी हा– ॥७६॥ प्रत्युत्तर असतां देत । सोडितों मी या जिवंत । तुमच्या सौजन्यें निश्चित । कौशिकमुने ! ॥७७॥ कठोर कुठारें यास । न तरी कापून अनायास । मुक्त झालों असतों विशेष । गुरुऋणांतुनी" ॥७८॥ हांसूनिया निजचित्तीं । विश्वामित्र तें म्हणती । "भार्गव वैरीच मानिती । भगवंतासी ॥७९॥ जेणें इक्षुदंडापरिस । तोडिलें शिवचापास । तज्ज्ञान या अज्ञान्यास । अजूनि

नव्हें" ॥८०॥ लक्ष्मण म्हणे, "मुनिनाथ! । युष्मत्स्वभाव क्रोधवंत। कोण न जाणे विश्वांत । विख्यात तो ॥८१॥ मातृपितृऋणांतुनी । मुक्त झालां उत्कृष्टपणीं । परि दुःख वाटे मनीं । गुरुऋणाचें ॥८२॥ तें ऋण आमुच्या शिरीं । काढूं पाहतां अंतरीं । व्याज वाढलें कितीतरी । दीर्घकालें ॥८३॥ धनकोस आणा बाहून । बसलों पिशवी उघडून । व्याजासह फेडीन ऋण । आतांच मी" ॥८४॥ ऐसी ऐकून कटु उक्ति । भार्गव परशु सांवरिती । हाहाःकारें तैं गर्जती । लोक सारे ॥८५॥ "नृपद्रोही भृगुवरा! । मज दावितां कुठारा । तुम्हां सोडितों या अवसरां । विप्र म्हणुनी ॥८६॥ करडा वीर रणांतरीं । मिळाला न आजवरी । शौर्य गाजे घरच्याघरीं । द्विजदेवतेचें" ॥८७॥ "अहो हें भाषण अनुचित" । गर्जती लोक समस्त । खुणेनें वारी रघुनाथ । लक्ष्मणातें ॥८८॥ भार्गव-कोप-वैश्वानर । ज्वलित कराया अतितर । आहुतीपरिस उत्तर । लक्ष्मणाचें ॥८९॥ पाहूनिया वर्धमान । जलासारखें भाषण । तेव्हां श्रीरघुनंदन । करीतसे ॥९०॥ "अहो हे मुनिनायका! । कृपा करा या बालका । शुद्ध दूधमुखी, नका । कोपूं त्यावरी ॥९१॥ प्रभो! तुमची महत्तता । जरी अज्ञ हा जाणता । कैसी करिता समता । आपुली हा? ॥९२॥ बाल अनुचित करणी । करी जरी कांहीं चुकुनी । गुरु, माता, पिता मनीं । आनंदती ॥९३॥ जाणून शिशु सेवकापरी । दया करावी यावरी । क्षमशील तुम्ही तरी । ज्ञानी मुनि" ॥९४॥ ऐकून रामभाषित । मुनि झाले थोडे शांत । कांहीं बोलून करी स्मित । लक्ष्मण तें ॥९५॥ दृष्टीं तें स्मित पाहतां । क्रोध व्यापी भृगु-

सुता । म्हणती, "रामा ! तुझा भ्राता । महा पापी ॥९६॥ शरीरें हा गौर पूर्ण । परि काळा मनांतून । दुग्धमुखी हा नसून । विषमुखीच ॥९७॥ हा कुटिलचि स्वभावतां । करूं न शके तुझी समता । काळासारिखा मी असतां । न बघे नीच" ॥९८॥ पुन्हां करूनिया स्मित । लक्ष्मण म्हणे "मुनि-नाथ ! । पापाचें मूळ निश्चित । क्रोध होय ॥९९॥ वश होऊन ज्याप्रत । कर्म करी अनुचित । मानव वागे विपरीत । जगाविरुद्ध ॥१००॥ हे भार्गवमुनीश्वरा ! । मी तुमचा सेवक खरा । आतां मजवरी दया करा । टाकून राग ॥१०१॥ चाप भंगलेलें कांहीं । रागावून जुळत नाहीं । बसा गोळे येतील पायीं । उभ्या उभ्या ॥१०२॥ जरी चाप प्रिय अति । उपाय करावा शीघ्रगति । बाहून कारागिराप्रति । जोडून घ्या" ॥१०३॥ लक्ष्मण ऐसें बोलतां । भय वाटे जनकचित्ता । म्हणे, "हें अनुचित सर्वथा । गप्प रहा" ॥१०४॥ नगरींच्या पुरुष-युवती । थरथर कांपती, म्हणती । "सान बाल परि अति । खोड-साळ" ॥१०५॥ लक्ष्मणाची निर्भय वाणी । भार्गवें श्रवण करुनी । देह क्रोधें जळे, हानि । शक्तीची होय ॥१०६॥ श्रीरामातें उद्देशून । भार्गव बोलती वचन । "हा तव अनुज म्हणून । वांचवितों ॥१०७॥ स्वरूपें सुंदर वरी । परि मलिन अंतरीं । विषपूरित ज्यापरी । सुवर्णघट" ॥१०८॥ याहि भार्गवाच्या बोला । लक्ष्मण पुन्हां हंसला । तें नेत्रें दापिलें त्याला । रामचंद्रें ॥१०९॥ आपुलें वक्र भाषण । लक्ष्मणानें आवरून । जातसे तो संकोचून । गुरुसंनिध ॥११०॥ जोडू-निया दोन्ही हात । नम्रपणें रघुनाथ । बोले मृदु आणि शांत । भार्गवातें ॥१११॥ "तुम्ही सुज्ञ स्वभावतां । बाल-बोल मुनि-

नाथा !। घेऊं नयेत सर्वथा । कानावरी ॥११२॥ विषारी प्राणी, बालक । दोघांचा स्वभाव एक । यांसी कधीं सुज्ञ लोक । छेडिती ना ॥११३॥ निरपराधी मदनुज । याचा दोष न महाराज !। आपुला अपराधी आज । मीच खरा ॥११४॥ कृपा, कोप किंवा बंध । वधायोग्य जरी प्रमाद । करूं इच्छितां तरी वध । माझाचि करा ॥११५॥ ज्यायोगें आपुला राग । शांत होईल सवेग । उपाय करा तो सांग । मुनिनायका! ॥११६॥ "अगा रामा !" म्हणती मुनि । "राग शांत होय कैसेनि । तव अनुज पाही अजुनी । वक्रदृष्टीं ॥११७॥ जरी याच्या मानेवरी । कुठार न घातला तरी । क्रुद्ध होऊन मीं अंतरीं । काय केलें ?॥११८॥ ज्या मत्कुठाराची गति । ऐकूनिया घोर अति । राण्यांचे गर्भ स्रवती । पृथ्वीवरी ॥११९॥ ऐसा परशु मत्करीं । असतां हा माझा वैरी । जिवंत बघतों अद्यापवरीं । राजपुत्र ॥१२०॥ हात न वाहे यावर । क्रोधें जळतें अंतर । कुंठित झालें कुठार । नृपघातकी ॥१२१॥ दैवहि होय उलटें । स्वभाव माझा पालटे । दया कोठून प्रकटे । माझ्या मनीं? ॥१२२॥ कैसें विधात्यानें आज । दुःख साहविलें मज" । ऐकतां सस्मित रामानुज । मस्तक नमी ॥१२३॥ "नाथ ! तुम्ही दयामूर्ति । तैसीच बोलतां उक्ति । कृपावायूनें झडतीं । पुष्पेंच जणुं ॥१२४॥ मुनीश्वरा ! दयेनें जर । दग्ध होतीं गात्रें, तर । देहाचा वाली ईश्वर । क्रुद्ध होता" ॥१२५॥ भार्गव म्हणती जनका ! । पहा या हट्टी बालका । घर करूं पाही नरका । यमपुरांत ॥१२६॥ तरी माझ्या दृष्टि-आड । कां न करिसी पोर जड । दिसे सान परि द्वाड । राजकुमार" ॥१२७॥ तेव्हां लक्ष्मण हांसोनी । बोले भार्गवालागुनी । "डोळे झांकितां कोठें कुणी । दिसणार

नाहीं" ॥१२८॥ हे शद्ब ऐकतां क्षणीं । भार्गव तैं चवताळुनी । बोलती राघवालागुनी । काय तदा ॥१२९॥ "मूर्खा! भंगून चापासी । तूंच उलटा मजसी । ज्ञानाच्या गोष्टी सांगसी । आणखी वर । ॥१३०॥ तुझ्याच चिथावणीनें । टाकून बोलिलें ह्यानें । तूं कर जोडून नम्रपणें । करिसी छल ॥१३१॥ तरी युद्ध करीं मजशीं । शांतवीं माझ्या क्रोधासी । न तरी 'राम' या नांवासी । टाकून दे ॥१३२॥ शिवद्वेष्ट्या या अवसरीं । छल टाकून युद्ध करीं । तुज वधीन ना तरी । बंधुसहित" ॥१३३॥ ऐसें बोलून भृगुपति । निजकुठार उगारिती । मनीं हांसून रघुपति । नमस्कारी ॥१३४॥ "लक्ष्मणाचा अपराध । मजवरीं करितां क्रोध । सबलत्वीं दोष अबद्ध । कधीं कधीं ॥१३५॥ वक्र पाहून चंद्रास । सर्वहि वंदिती त्यास । राहूस नव्हे साहस । गिळावया" ॥१३६॥ राम म्हणे, "मुनीश्वरा! । स्वक्रोधाचा त्याग करा । करीं कुठार, पुढारा । मन्मस्तक ॥१३७॥ जेणें हा क्रोध शांतवे । तेंचि अवश्य करावें । मज सेवक मानावें । आपुलाच ॥१३८॥ स्वामीसेवकांभीतरीं । युद्ध होय कैसें तरी । आतां राग करा दुरी । विप्रश्रेष्ठा! ॥१३९॥ आपुला पाहून वेष । बाळ बोलला विशेष । या माजीं तयाचा दोष । मुळीं नाहीं ॥१४०॥ परशु आणि धनुर्बाण । केले पाहून धारण । वीरचि मानून लक्ष्मण । पावला ईर्ष्या ॥१४१॥ नाम आपुलें विदित । प्रत्यक्ष तों अपरिचित । वंशस्वभावें किंचित् । बोलला तो ॥१४२॥ मुनिवेषें येतां सहज । तरी युष्मत्पदरज । धरिलें असतें महाराज । मस्तकावरी ॥१४३॥ अजाणतां झाली चूक । क्षमा करावी आवश्यक । दया असावी आत्यंतिक । विप्रहृदयीं ॥१४४॥ तुमची आमुची समता । कैसी होय मुनिनाथा! ।

कुठें चरण, कुठें माथा । सांगा तरी ? ॥१४५॥ माझें जें का 'राम' नाम । तें तर असे लघुतम । आपुलें परि महन्नाम । परशुराम ॥१४६॥ आमुच्यांत केवळ एक । धनुष्यचि भूषणात्मक । आपुल्या ठायीं निःशंक । नवहि गुण ॥१४७॥ (शम-दम-तपः-शुचिता । आर्जव आणि शांतता । ज्ञान-विज्ञान-आस्तिकता । ब्राह्मणासी ॥१४८॥) सर्व प्रकारें सांप्रत । आम्ही झालों पराभूत । क्षमा करा हो मुनिनाथ! । मदपराध" ॥१४९॥ 'मुनिनाथ' 'विप्रवर' । म्हणूनिया वारंवार । भार्गवातें रघुवीर । संबोधितां– ॥१५०॥ अति क्रोधें परशुराम । म्हणती, "तूंहि भावासम । कुटिल दिसतोस परम । रामचंद्रा! ॥१५१॥ केवळ ब्राह्मण मजसी । काय रामा! तूं मानिसी । विप्र कैसा तें तुजसी । सांगूं काय ? ॥१५२॥ चाप हेंच यज्ञपात्र । आहूति त्या नाना शर । अतीव अग्नि प्रखर । कोप माझा ॥१५३॥ उत्तम चतुरंग सेना । समिधा करून त्यांना । मोठमोठे राजे नाना । तेच पशु– ॥१५४॥ याच परशूनें कांपून । त्या सर्वां बलि देऊन । जपयुक्त रणयज्ञ । कोटि केले ॥१५५॥ (मंत्रोच्चारें त्या आहूति । 'स्वाहा' शब्दें जैशा देती । राजे बाहून त्यारीतीं । बलि दिले ॥१५६॥) यापरीच्या मत्प्रभावा । मुळीं नेणसी राघवा! । केवळ 'विप्र' देसी नांवा । अनादरें ॥१५७॥ शिवचाप-भंग केला । तेणें तुज गर्व चढला । 'मीच जिंकिता जगाला' । ऐसे वाटे" ॥१५८॥ तें वदे रघुनायक । "बोला हो! विचार-पूर्वक । आमची किंचित् चूक । क्रोध हा भारी ॥१५९॥ हातीं घेतांचि उचलून । दुभंगलें चाप जीर्ण । गर्व कराया कारण । काय मज ? ॥१६०॥ 'विप्र' म्हणून संबोधितां । 'थट्टाच' ऐसें म्हणतां । तरी मज भृगुनाथा! । खरें सांगा ॥१६१॥

ज्यापुढें आम्ही भिऊन । वांकवावी निज मान । ऐसा वीर तरी कोण । आहे जगीं? ॥१६२॥ देव किंवा दैत्यादिक । योद्धे भूपति अनेक । समबल किंवा अधिक । आम्हांहुनी ॥१६३॥ जरी आम्हां रणांगणीं । आव्हान करील कोणी । झुंजूं मोदें प्राणपणीं । प्रत्यक्ष काळा ॥१६४॥ धरून क्षात्रशरीर । युद्धाविषयीं कातर । तरी जाणावा पामर । कुलकलंक तो ॥१६५॥ प्रशंसितां न कुलाप्रत । स्वभाव सांगतों निश्चित । माघार न घेईल रणांत । रघुवंशीय ॥१६६॥ (रणीं काळास न भीसी । मग येथें कां कचरसी । मनीं घेतील शंका ऐसी । भार्गव मुनि ॥१६७॥) विप्रकुल-महिमा थोर । तुम्हांस होईल नम्र । तोच क्षात्रवंशी वीर । निर्भय होय" ॥१६८॥ अति गूढ परि कोमल । ऐकून रामाचे बोल । दूर झालें बुद्धिपटल । भार्गवांचें ॥१६९॥ "हे विष्णुचाप घेऊन । ओढी रामा! यालागून । तेणें होईल निरसन । संशयाचें" ॥१७०॥ देतांक्षणीं विष्णुचाप । सज्ज झालें आपोआप । भार्गवमनीं अमूप । विस्मय गमे ॥१७१॥ श्रीरामाची महत्तता । भार्गवां कळून येतां । तेणें झाली रोमांचिता । तनु त्यांची ॥१७२॥ प्रेम न मावें हृदयांत । तैं श्रीराम प्रभुप्रत । स्तवूं लागले मुनिनाथ । कर जोडुनी ॥१७३॥ "रघुवंशकमलवना । भानु तूं रघुनंदना! । दुष्ट दैत्यांच्या दहना । कृशानु तूं ॥१७४॥ गोब्राह्मणदेवहिता । कर्ता तूंच भगवंता! । मोह-क्रोध-भ्रम-अहंता । निवारिता तूं ॥१७५॥ करुणागुण, विनय, शील । यांचा सिंधु तूं केवल । वाग्विलासातिकुशल । राघवा! तूं ॥१७६॥ निजभक्तसुखकर । तूं सर्वांग मनोहर । तुझा असो जयजयकार । कोटिकाम- सुंदरा! ॥१७७॥ एकमुख मी विश्वेशा! । तुझी स्तुति करूं कैसा । शिवमनोमानसहंसा! ।

विजयोस्तुते ॥१७८॥ मी अज्ञानें तुम्हां फार । बोललों अयोग्य उत्तर । उभयतां क्षमामंदिर । क्षमा करा ॥१७९॥ हे रघुवंशभूषण!" । ऐसा जयजयकार करून । तपार्थ भृगुनंदन । वनीं गेले ॥१८०॥ तैं कुटिल जे जे भूप । त्यांस सुटे थरकांप । पळ काढिती आपोआप । भेकड ते ॥१८१॥ नभीं मिळोनिया देव । करिती दुंदुभीरव । तेंवि पुष्पांचा वर्षाव । रामावरी ॥१८२॥ नगरींचे नारीनर । आनंदले मनीं फार । भ्रमभय त्यांचें दूर । पळून गेलें ॥१८३॥ वाद्यांचा कडकडाट । होऊं लागला अचाट । शुभ साहित्य उत्कृष्ट । सिद्ध झालें ॥१८४॥ सुमुखनेत्रा नारीगण । आपापले मेळे करून । करिती मधुर गायन । कोकिलरवें ॥१८५॥ जेंवि जन्मदरिद्र्याप्रति । निधि सांपडला हातीं । तेंवि मोद जनकचित्तीं । अवर्णनीय ॥१८६॥ निश्चिंतपणें जानकी । निजचित्तीं झाली सुखी । चकोर कुमारीच कीं । चंद्रोदयीं ॥१८७॥ कौशिका वंदून जनक । म्हणे, "युष्मत्कृपें निःशंक । धनुर्भंग रघुनायक । करिता झाला ॥१८८॥ उभय बंधूंनीं मजप्रत । आज केलेंसे कृतार्थ । यापुढें जें जें उचित । करा स्वामिन्" ॥१८९॥ गाधिज म्हणती, "नृपनाथा! । तूं चतुरचि सर्वथा । विवाह अवलंबून होता । धनुष्यावरी ॥१९०॥ होतांक्षणीं धनुर्भंग । विवाह झाला अभंग । सुरवर-नर-नाग । साक्ष यासी ॥१९१॥ तथापि तूं नृपवरा! । जाऊन निजमंदिरा । आतां निजकुलाचारा । करून घे ॥१९२॥ कुलवृद्ध, गुरु, ब्राह्मण । यांची संमति घेऊन । करावे आचार पूर्ण । वेदविदित ॥१९३॥ दूत धाडून अयोध्येस । महाराज दशरथास । बोलावून मिथिलेस । आणून घे" ॥१९४॥ 'बरें महाराज' म्हणून । जनकें मुदित होऊन ।

दूत दिले पाठवून । त्याच वेळीं ॥१९५॥ सर्व प्रतिष्ठित जन । रायें घेतले बाहून । मुजरे करिती लवून । येतांचि सर्व ॥१९६॥ हाट, मार्ग, राहतें घर । एवंच सर्वहि नगर । शृंगाराया सभोंवार । आज्ञा करी ॥१९७॥ ते प्रसन्नतेनें निघाले । आपापल्या गृहा आले । त्यांनीं परिचारकां कथिलें । पाचारूनी ॥१९८॥ 'चित्रविचित्र सुंदर । मंडप उभवा सत्वर' । आज्ञा धरून शिरावर । निघाले मुदें ॥१९९॥ कराया मंडपरचना । चतुर आणि कुशल नाना । पाचारिलें गुणिजनां । तयांनींहि ॥२००॥ त्यांनीं धात्यास वंदिलें । मंडपकार्य आरंभिलें । सुवर्णमय उभारिले । कर्दळीस्तंभ ॥२०१॥ हरितरत्नें गुंफिलीं । पर्ण—फलें बनविलीं । त्यापरीं पुष्पेंहि केलीं । माणिकांचीं ॥२०२॥ ऐसी विचित्र रचना । ब्रह्मदेवाच्याहि मना । अवलोकून क्षणक्षणा । भुरळ पडे ॥२०३॥ कनकांचें वृक्ष सर्व । हरित मण्यांचे अभिनव । सरळ, सपर्ण अपूर्व । नेणवती ॥२०४॥ सोन्याची गुंफून तार । नागवेली केली सुंदर । पर्णांसह मनोहर । ओळखूं न ये ॥२०५॥ सुवर्णतारेचीं बंधनें । दाट खचिलीं कौशल्यानें । मधून गोंविले ओळीनें । मौक्तिकसर ॥२०६॥ माणिक, नीळ, हिरे, पाच । चिरून तीं दलें साच । मध्यें बसवूनिया गच्च । कमलें केलीं ॥२०७॥ त्याचपरी केले भृंग । नाना रंगांचे विहंग । वायूचा घडतां संग । रव काढिती ॥२०८॥ मंगल द्रव्यें घेउनी । उभ्या ऐशा येती दिसुनी । कोरिल्या ज्या स्तंभांतुनी । देवप्रतिमा ॥२०९॥ किती तरी प्रकारचे । चौरंग ते स्वस्तिकाचे । माणकें जडवून साचे । सुंदर केले ॥२१०॥ नीलमण्याकारणें । कोरून कुशलतेनें । बनविलीं आम्रपर्णें । सुंदरशीं ॥२११॥ रेशमी दोरींत भली । नीळाची कैरी ओविली । तशीं सुवर्णाचीं

केलीं । आम्रफलें ॥२१२॥ तोरणें अतिसुंदर । उभारिलीं मार्गावर । जणुं मदनाचे दृढतर । पाशचि ते ॥२१३॥ मंगल कलश मनोहर । सजविले अपरंपार । ध्वज, पताका, पट, चामर । शोभा देती ॥२१४॥ दीप नाना रत्नमय । झळकें तयांचें वलय । विचित्र अवर्णनीय । मंडप-शोभा ॥२१५॥ जेथें वधू सीतासती । वर्णाया त्या मंडपाप्रति । कोणत्या कवीची मति । समर्थ आहे ? ॥२१६॥ सौंदर्य-सद्‌गुण-सागर । ज्या मंडपीं राम वर । तो मंडप उजागर । तीन्ही लोकीं ॥२१७॥ जनकाचें राजमंदिर । तेथ जैसी शोभा सुंदर । प्रतिगृहीं दृग्गोचर । त्याच रीतीं ॥२१८॥ त्या समयीं ज्यानें त्यानें । विलोकिलें पुराकारणें । त्या चतुर्दश भुवनें । वाटतीं गौण ॥२१९॥ तेथील निकृष्ट गृहांत । जी संपत्ति होती स्थित । ती पाहून इंद्राप्रत । मोह होय ॥२२०॥ स्त्रीवेष घेऊन छद्मी । साक्षात् श्रीमहालक्ष्मी । ज्या नगरीं दिनयामीं । वास करी- ॥२२१॥ त्या नगरींची सुंदरता । यथासांग वर्णूं जातां । शेष-शारदाहि स्वतां । संकोचती ॥२२२॥ ( सोपानींचा मार्ग भला । जरी दीर्घतम वाटला । तदर्थं पंधरावा योजिला । विश्राम हा ॥२२३॥ रसिक भाविक श्रोत्यांस । विनवीतसे देवीदास । माझ्या बोबड्या बोलांस मान्य करा ॥२२४॥)

———

## विश्राम १६ वा

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्योनमः
श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः

पोंचले जनकदूत । पवित्र अयोध्येप्रत । बघतां संतुष्ट मनांत । रम्य नगर ॥१॥ राजद्वारीं ते जाऊन । कळविती स्ववर्तमान । दशरथें तें ऐकून । बाहिलें त्यां ॥२॥ दूतांनीं मुजरे केले । पत्र द्यायास काढिलें । तें रायें मोदें घेतलें । उठून स्वयें ॥३॥ वाचीत असतां पत्र । प्रेमाश्रूंनीं भरले नेत्र । हृदय भरून ये, गात्र । रोमांचित ॥४॥ रामलक्ष्मण हृदयांतरीं । सुंदर पत्रिका ती करीं । बरेंवाईट न वदे परि । मुग्ध होय ॥५॥ पुन्हां धीर धरुन । पत्रिका घे वाचून । ऐकिलें तें खरें म्हणून । सभा हर्षे ॥६॥ तिकडें होते खेळत । त्यांना कळतांचि मात । शत्रुघ्न आणि भरत । येते झाले ॥७॥ अतीव प्रेमेंकरून । संकोचें करिती प्रश्न । "पत्रिका आली कोठून । तात ! सांगा. ॥८॥ बंधु आमुचे प्राणप्रिय । कुशल असती का उभय । कोणत्या देशीं वास्तव्य । सांगा त्यांचें" ॥९॥ प्रेमयुक्त त्यांचा प्रश्न । दशरथानें ऐकून । पुन्हां दाविली वाचून । पत्रिका ती ॥१०॥ ऐकतां पत्रिकावृत्त । दोघे बंधु रोमांचित । प्रेमातिशय हृदयांत । समावे ना ॥११॥ भरताचें प्रेम पुनीत । पाहून सभा समस्त । सुखी जाहली अत्यंत । त्या समयीं ॥१२॥ तदनंतर तो भूप । दूतास बसवी समीप । मधुर मोहक अमूप । बोलतसे ॥१३॥ "सांगा माझे दोघे सुत । असती ना आनंदांत ।

तुम्ही प्रत्यक्ष त्यांप्रत । पाहिलें का? ॥१४॥ श्याम आणि गौरवर्ण । चाप-भाते करिती धारण । वयें लहान, गाधिनंदन । समागमें ॥१५॥ तुम्ही ओळखिले बांधव । सांगा कैसा तत्स्व-भाव" । प्रेमवशें पुसे राव । पुनःपुन्हां ॥१६॥ "घेऊन गेले गाधिज । त्या दिवसापासून आज । कळलें तद्वृत्त मज । निश्चित् हें ॥१७॥ जनकरायें त्यांलागुन । कैसें जाणिलें करा कथन" । तो ऐकून प्रिय प्रश्न । हांसती दूत ॥१८॥ बोलती नम्र वचनीं । "हे भूपालमुकुटमणि ! । तुम्हांसारखा धन्य कुणी । अन्य नाहीं ॥१९॥ श्रीराम आणि लक्ष्मण । सर्वविश्व-विभूषण । हे जयाचे नंदन । दोन ऐसे ॥२०॥ पुरुषसिंह पुत्रांविषयीं । पुसतांच न ये कांहीं । तिन्हीं लोक केले जिहीं । दीप्तिमान् ॥२१॥ यशःप्रतापापुढतीं । मलिन होय निशापति । मंद तेजें, शीत अति । प्रत्यक्ष सूर्य ॥२२॥ कैसें ओळखिलें त्यास । म्हणून पुसतां आम्हांस । काय सूर्या पहायास । दीप लागे? ॥२३॥ सीता-स्वयंवराप्रति । असंख्यात महीपति । जमले बलाढ्य अति । एकाहून एक ॥२४॥ परि शंकराचें चाप । भंगूं न शके कुणी भूप । सर्व वीरांचा प्रताप । हरून गेला ॥२५॥ त्रैलोक्यामाजीं असती । योद्धे अहंमन्य अति । सर्वांची हरिली शक्ति । शंभुचापें ॥२६॥ देव-दैत्य ते समस्त । उचलूं शकती ते मेरु-प्रत । हार खाऊन मनांत । परत फिरले ॥२७॥ कैलास पर्वत ज्यानें । उचलिलासे लीलेनें । पराभूत पूर्णपणें सभेंत तोहि ॥२८॥ रघुवंशशिरोमणि । रामचंद्रें तया स्थानीं । चोज केलें घ्या ऐकुनी । महाराज ॥२९॥ त्या शिवचापाकारणें । भंगिलें सहज लीलेनें । जैशापरी कुंजरानें । कमलनाल ॥३०॥ धनुर्भंगातें परिसुनी । क्रोधें आले भार्गवमुनि । बहुप्रकारें तयांनीं ।

वटाविलें ॥३१॥ पाहून रामाची शक्ति । स्वचाप दिलें त्या–
हातीं । विनयें स्तवून त्याप्रति । वना गेले ॥३२॥ बलवान्
अप्रतिम । महाराज तो श्रीराम । लक्ष्मणहि तेजोधाम । तैसाचि
तो ॥३३॥ जयांतें अवलोकितां । कंप सुटे भूपां समस्तां ।
सिंहच्छाव्यास पाहतां । गजांस जसा ॥३४॥ आपुले दोन्ही
कुमार । महाराज ! पाहिल्यावर । डोळ्यांत न भरे इतर ।
कुणीहि पुन्हां" ॥३५॥ दूतांची भाषणशैली । प्रेमवीर–रसें
भरली । ऐकतां बहु आवडली । सर्वांसहि ॥३६॥ सभेसह अयो-
ध्यापति । प्रसन्न झाला स्वचित्तीं । पारितोषकें त्यांप्रति । दिलीं
तेणें ॥३७॥ 'अधर्म' मानून दूत । कानावर ठेविती हात । या
धर्मविचारें समस्त । हृष्ट झाले ॥३८॥ मग उठून दशरथ ।
वसिष्ठाकडें जाय त्वरित । देता झाला तयाप्रत । पत्रिका
ती ॥३९॥ बाहून घेतसे दूतां । त्यांकडून गुरुनाथां । सादर
सर्व वृत्तान्ता । ऐकवीतसे ॥४०॥ ऐकतां वसिष्ठमुनि । म्हणती
संतुष्ट होउनी । "पुण्यात्म्यांसाठीं सुखांनीं । भरली धरा ॥४१॥
जैशा सरिता समस्त । जाऊन मिळती सिंधूंत । जरी इच्छा
तयाप्रत । मुळींहि नसे ॥४२॥ तैशाच सुख–संपत्ति । इच्छा न
धरितां चित्तीं । धर्मशीलां प्राप्त होती । स्वाभाविक ॥४३॥
गोविप्रगुरुदेवता । यांचा सेवक तूं दशरथा ! । पुण्यशीला
पतिव्रता । कौसल्याहि ॥४४॥ पुण्यात्मा तुजसम थोर ।
झाला नाहीं पृथ्वीवर । नसे विद्यमान, होणार ।
पुढेंहि कुणी ॥४५॥ तुजहून पुण्य अधिक । ऐसा कोण दुजा
देख । ज्याचा रामासम तोक । कोसलेशा ? ॥४६॥
वीर, नम्र, गुणसागर । पूर्ण धर्म–धुरंधर । ऐसे तव पुत्र चार ।
सर्वोत्तम ॥४७॥ तुजलागीं सर्वोदित । कल्याण असे निश्चित ।

जा सिद्ध करीं वरात । वाद्य-गजरें" ॥४८॥ गुर्वाज्ञा ती परिसून । निज मस्तक नमवून । 'बरें महाराज' म्हणून । निघे वेगें ॥४९॥ आधीं त्या दूतांलागुनी । योग्य निवास देउनी । भूपति निज भवनीं । जाता झाला ॥५०॥ अंतर्गृहांत भूपति । बाहूनिया राण्यांप्रति । वाचून दावी पत्रिका ती । सर्वांसहि ॥५१॥ ऐकतां पत्रिकाशय । राज्ञी हर्षल्या अतिशय । इतर वृत्तान्त राय । वर्णून सांगे ॥५२॥ प्रेमें त्या राज्ञी समस्त । होत्या झाल्या प्रफुल्लित । जणुं ऐकिलें घनगर्जित । मयूरांनीं ॥५३॥ मोदें गुरुपत्नी वृद्ध । देती झाली आशीर्वाद । माता आनंदीं विशुद्ध । मग्न होती ॥५४॥ पत्रिका अति प्रियकर । घेऊनिया परस्पर । शांत करिती हृदंतर । धरून पोटीं ॥५५॥ रामलक्ष्मणाची कृति । तैसी तत्प्रसृत कीर्ति । स्वमुखें वर्णी भूपति । वारंवार ॥५६॥ हा मुनि-प्रसाद म्हणून । महाद्वारीं करी गमन । राज्ञींनीं विप्रांलागून । बाहिलें तें ॥५७॥ आनंदें त्या ब्राह्मणासी । दानें बहु देती महिषी । तेहि देऊन आशीसी । जाते झाले॥५८॥ मग याचकांकारणें । पाचारून आनंदानें । दिलीं कोटयवधि दानें । तयांप्रति ॥५९॥ "रामलक्ष्मण, शत्रुघ्न, भरत । चक्रवर्ती राजसुत । चिरंजीव होवोत" । आशीस देती ॥६०॥ आनंदें गर्जत जाती । नाना वस्त्रें पांघरती । निशाणें वाजूं लागतीं । कडाक्यानें ॥६१॥ नगरजनां समाचार । कळाला सर्वां सत्वर । होऊं लागला घरोघर । थाट तेव्हां ॥६२॥ सीतारामाचा विवाह । म्हणून परमोत्साह । चौदा भुवनीं अथाह । भरून गेला ॥६३॥ ऐकतां तें शुभवृत्त । प्रेमानें लोक समस्त । गृह-मार्ग-चाळींप्रत । शृंगारिती ॥६४॥ जरी ती अयोध्या नगरी । श्रीरामाची रम्य पुरी । मंगलमय पवित्र खरी । सर्वंदाहि ॥६५॥

परि प्रीतीची रीत खरी। प्रकटविती परोपरीं। मंगल रचना सारी। करूनिया ॥६६॥ ध्वजा, पताका, वस्त्रें। तसीं सुंदर चामरें। लावून हाट, पथ सारे। शृंगारिले ॥६७॥ सुवर्णकलश ठेविले। तोरणमण्यांचें जाळें। हरिद्राक्षता, हार गुंफिले। दधिदुग्धादि ॥६८॥ यापरीं नागरिकांनीं। मंगल वस्तु जमवुनी। निज निज गृहालागुनी। शृंगारिलें ॥६९॥ गल्ली गल्लीमधून। केलें चतुरसम-सिंचन। सुंदर ओटे रचून। प्रतिद्वारीं ॥७०॥ (चंदन आणि केशर। कस्तुरी आणि कर्पूर। सुगंधित द्रव्यें एकत्र। चतुरसम तें ॥७१॥) षोडश शृंगार करून। स्त्रिया एकत्र होऊन। चमकती विद्युत्समान। जेथें तेथें ॥७२॥ बाल-मृगीसम लोचन। मुख तें चंद्रासमान। स्वरूपें हरिती मान। रती-चाहि ॥७३॥ मंजुल स्वरें कामिनी। गाती मंगल गाणीं। कोकिला लाजती ऐकुनी। मधुरकंठ ॥७४॥ दशरथाचें राज-भवन। त्याचें न करवें वर्णन। रचिलें सुंदर वितान। विश्व-मोहक ॥७५॥ मंगल द्रव्यें शोभतीं। विविध मनोज्ञ अति। निशाणेंहि ती वाजतीं। नानापरीं ॥७६॥ कोठें कोठें बंदीजन। म्हणती बिरुदावलि गर्जून। कोठें करिती ब्राह्मण। वेदघोष ॥७७॥ राम-सीता, राम-सीता। नांवें घेऊन तत्त्वतां। स्त्रिया गाती मंगल गीतां। कोठें कोठें ॥७८॥ उत्साह पाहतां अमित। स्थल पाहतां संकुचित। जणुं उचंबळून वाहत। चोहींकडें ॥७९॥ दशरथाचें मंदिर। त्याची शोभाच अपार। त्याचा वर्णील पार। कवि कोणता? ॥८०॥ सर्व सुरांचा शिरोमणि। तो श्रीराम चापपाणि। जेथें अवतार घेउनी। आला असे ॥८१॥ मग रायें भरतासी। बाहून आज्ञा केली ऐसी। "जा, हय-गजरथांसी। सिद्ध करी ॥८२॥ रामचंद्राची वरात। निघाली

पाहिजे त्वरित" । ऐकतां होती पुलकित । दोघे बंधु ॥८३॥ मग सर्व प्रधानांतें । पाचारुनिया भरतें । आज्ञापितां निघाले ते । आनंदानें ॥८४॥ रुचिपरत्वें तयांनीं । तेव्हां अश्व नानावर्णी । वरी खोगीर घालुनी । सज्ज केले ॥८५॥ चंचलगति अति सुंदर । जैसे तप्त लोहावर । तैसे पद भूमीवर । ठेविती ते ॥८६॥ त्या अश्वांच्या नाना जाति । तितुक्या न वर्णवती । मार्गे सारून वायुप्रति । उडूं बघती ॥८७॥ त्या सर्वहि अश्वांवर । भरतासम राजपुत्र । समवयस्क झाले स्वार । एकंदर ॥८८॥ सर्वहि अति सुंदर । सर्वां अंगीं अलंकार । करांमाजीं चापशर । कटींस भाते ॥८९॥ सडपातळ सुंदर । समवयस्क चतुर । सर्वहि शूरवीर । तरणे बांड ॥९०॥ प्रतिस्वाराच्या मागून । सेवक ते दोन दोन । जे असिकला-प्रवीण । पादचारी ॥९१॥ रणगाढे वीर सगळे । ब्रीदें चढवून निघाले । जाऊन उभे राहिले । वेशीवरी ॥९२॥ कुशलतेनें नानागतीं । निजाश्वांतें फिरविती । भेरी, निशाणें हृष्ट होती । ऐकूनिया ॥९३॥ सारथ्यांनीं रथ सुंदर । सजविले चित्रविचित्र । ध्वज, पताका, रत्नालंकार । घालूनिया ॥९४॥ सुंदर चवऱ्या त्यांवरी । घंटांची नादमाधुरी । हरून घेती शोभा सारी । रविरथाची ॥९५॥ श्यामकर्ण अश्व तेथ । होते जे का अगणित । सारथ्यांनीं रथांप्रत । जुंपिले ते ॥९६॥ अश्व सुंदर समस्त । सजविले सालंकृत । पाहतां मुनींचें चित्त । मुग्ध होय ॥९७॥ भूमीपरी जलावरती । जे सहज चालूं शकती । परि टापा मुळी न बुडती । अतिवेगेंहि ॥९८॥ सर्व शस्त्रास्त्रांसहित । सजवून साज समस्त । सारथ्यांनीं रथींप्रत । पाचारिलें ॥९९॥ रथी चढले रथांवरी । तेव्हां नगराबाहेरी । जुळूं लागली यापरीं । वरात ती ॥१००॥

जो ज्या कार्यांकारण । जेथें करीतसे गमन । तयास होती शकुन । उत्तमचि ॥१०१॥ सुंदर मोठ्या हत्तींवर । अंबाऱ्या चढविल्या थोर । त्या सर्वांचाहि शृंगार । अवर्णनीय ॥१०२॥ मदोन्मत्त हत्ती चालती । तयांच्या घंटा वाजती । जणुं वळल्या मेघपंक्ति । श्रावणाच्या ॥१०३॥ ज्यांचे प्रकार अनेक । इतरहि शिबिकादिक । सुबक सुखकारक । वाहनें होतीं ॥१०४॥ तयांवरी आरूढले । प्रतिष्ठित विप्र सगळे । जणुं काय अवतरले । श्रुतिछंद ॥१०५॥ सूत, मागध, बंदीजन । स्तुतिपाठक आदिकरून । निघाले वाहनीं आरोढून । योग्यतेपरी ॥१०६॥ खेचरें,वृषभ, उष्ट्र । ऐशा नाना वाहनांवर । भरून चालल्या अपार । विविध वस्तु ॥१०७॥ कावडी भरून धीवर । चालूं लागले कोटीवर । त्यांतील वस्तूंचा पार । कोण वर्णी ? ॥१०८॥ सेवकसमूह निज । करून एकत्र समाज । अंगावरी घालून साज । निघता झाला ॥१०९॥ सर्वांच्या हृदयांतरीं । हर्ष दाटलासे भारी । रोमांच उठले शरीरीं । त्याकारणें ॥११०॥ रामलक्ष्मण वीर दोन्ही । केव्हां पाहूं डोळे भरुनी । हीच उत्कंठा तन्मनीं । लागलीसे ॥१११॥ राजघंटा घोर गर्जती । रथांचे घडघडाट होती । तेंवि अश्व खिकाळती । चोहींकडें ॥११२॥ निशाणादि वाद्यें वाजतीं । मेघरवातें लोपवितीं । ध्वनि कांहीं न ऐकूं येती । आपपर ॥११३॥ राजद्वारीं निरवधि । अतिशय झाली गर्दी । पाषाणाची फरसबंदी । चूर होय ॥११४॥ तबकीं मंगलारति । घेऊन आपुल्या हातीं । युवती चढून पाहती । गच्चीवरी ॥११५॥ कामिनी अतिसुस्वर । गीतें गाती मनोहर । आनंद अति निर्भर । न वर्णवे ॥११६॥ मग सुमंतानें दोन । शृंगारूनिया स्यंदन । त्या रम्य सूर्याश्वांहून । जुंपिले घोडे ॥११७॥ ते दोन रथ

उत्कृष्ट । आणी भूपानिकट । ज्यांचें वर्णन दुर्घट । शारदेतें ॥११८॥ एक राजमंडलार्थ । सजविला होता रथ । दुजा दीप्तिमान् अत्यंत । तेजःपुंज ॥११९॥ त्या सर्वोत्कृष्ट रथांत । दशरथें वसिष्ठांप्रत । बैसविलें तें अत्यंत । आनंदानें ॥१२०॥ शिव, गुरु, गौरी, गजानन । यांचें करून स्मरण । स्वयें बैसला आपण । रथीं मग ॥१२१॥ वसिष्ठांसह दशरथ । कैसा दिसे शोभिवंत । बृहस्पतिसवें स्वर्गांत । इंद्र जैसा ॥१२२॥ वेदविधि कुलाचार । करितां झाला नृपवर । पाहून व्यवस्था समग्र । सर्वतोपरी ॥१२३॥ स्मरून रघुनाथातें । घेऊन गुर्वाज्ञेतें । फुंकीत मग शंखातें । चालूं लागे ॥१२४॥ वरात पाहून दृष्टीं । आनंदली सुरसृष्टि । मंगलप्रद पुष्पवृष्टि । करूं लागे ॥१२५॥ गजाश्वादिक गर्जती । माजे कोलाहल अति । नभींहि वाद्यें वाजतीं । वरातीच्रीं ॥१२६॥ देवांगना, नारीगण । करी मंगल गायन । निघे राग सनईंतून । रसाळ अति ॥१२७॥ घंटाकिंकिणींचा थोर । अवर्णनीय घणत्कार । क्रीडती सेवक चतुर । पादचारी ॥१२८॥ हासकुशल विदूषक । संगीतपटु गायक । करूं लागले कौतुक । नानापरीं ॥१२९॥ मृदंग निशाणांचा ध्वनि । त्याच्या तालास धरुनी । नाचविती अश्वांलागुनी । राजकुमर ॥१३०॥ अश्व ऐसे नृत्य करिती । किंचित्हि ताल न चुकती । ते पाहून चकित होती । नाटयपटु ॥१३१॥ वरातीची अपूर्वता । न वर्णवेचि वर्णितां । शुभ शकुन होती जातां । सुखकारक ॥१३२॥ डावीकडें जाई तास । हेंच जणुं सुचवायास । मंगलमय सर्वांस । सर्व कांहीं ॥१३३॥ सव्य भागास अनेक । सुक्षेत्रीं बसले काक । सर्वांस शुभकारक । नकुल दर्शन ॥१३४॥ त्रिविधप्रकारें अनिल । वाहूं लागे अनु-

कूल । सुवासिनी सघट सबाल । संमुख येती ॥१३५॥ फिर-
फिरुनी पक्षी लावी । वारंवार मुख दावी । धेनु वत्सास पाजवी ।
संमुखचि ॥१३६॥ हरिणांचे कळप अति । सव्य भागीं उभे राहती ।
जणुं मंगल सुचविती । सर्वांप्रति ॥१३७॥ क्षेमकर्त्या खगतति ।
क्षेम सर्वां सुचविती । वामभागीं श्यामा दिसती । वृक्षांवर ॥१३८॥
दृष्टीं पडती दधि, मीन । विप्रयुगुल विद्वान् । करीं पुस्तक
घेऊन । संमुख येती ॥१३९॥ यापरीं मंगलयुत ।
कल्याणकारी समस्त । शकुन होती वांछित । फल-
दायक ॥१४०॥ जणुं आपुली सत्यता । स्थापित व्हाया करितां ।
एकदांच येती स्वतां । एकत्र ते ॥१४१॥ सर्वहि शुभ शकुन ।
सुगम तयालागून । ज्याचा सुंदर नंदन । सगुण ब्रह्म ॥१४२॥
रामासारिखा वर । सीता वधु अति सुंदर । दशरथ जनक
पवित्र । व्याही ऐसे ॥१४३॥ ऐसा विवाह ऐकून । नाचूं
लागले शकुन । आज आम्हां सत्यपण । देई धाता ॥१४४॥
ऐशा रीतीं ती वरात । चालूं लागली थाटांत । अश्व, गज,
गर्जतात । वाजतीं वाद्यें ॥१४५॥ येतसे भानुकुलकेतु । हा
धरून मनीं हेतु । जनक बांधवी सेतु । सरितांवरी ॥१४६॥
मार्गांतरीं ठायीं ठायीं । मंदिरांच्या केल्या सोयी । भोग ठेवून
सुखदायी । स्वर्गतुल्य ॥१४७॥ खाद्य, शय्या, उंचीं वसनें ।
आपुल्या इच्छेप्रमाणें । सर्वहि लोकांकारणें । प्राप्त होय ॥१४८॥
नित्य नवेंनवें सुख । प्राप्त, पाहूनिया लोक । विसरले स्वाभा-
विक । स्वगृहातें १४९॥ वाद्यांचा कडकडाट । श्रवण करून
अचाट । वरात आलीसे निकट । जाणूनिया ॥१५०॥ गजाश्व-
रथपायदळ । सज्ज करूनिया सकळ । सामोरे जाती तत्काळ ।
आणावया ॥१५१॥ कनककलश सुंदर अति । तैशाच ताटें–

पराती । भाजनें तीं श्रेष्ठ जाति । नानाविध ॥१५२॥ सुधेसम ज्या सर्वांत । पक्वान्नें भरलीं अमित । त्यांचे प्रकार अगणित । न वर्णवती ॥१५३॥ प्रसन्न होऊन मनें । भेटीस्तव जनकानें । फलपदार्थ या रीतीनें । पाठविले ॥१५४॥ अमित वस्त्रें, भूषणें । अमोल किती तरी रत्नें । गजाश्व–खग–मृग–वाहनें । नानापरीं ॥१५५॥ शुभकारक वस्तुजात । तैसे सुगंधित पदार्थ । पाठवी मिथिलानाथ । नानाविध ॥१५६॥ दहीपोहे आदिकरून । उपहारांचें सामान । चालले धीवर भरून । कावडींत ॥१५७॥ वरातीचे जन सारे । पाहती लोक सामोरे । पुलकित झाली तद्गात्रें । हर्षून मनीं ॥१५८॥ पाहून स्वागतयोजना । वऱ्हाडी मंडळी नाना । करिती वाद्यगर्जना । आनंदानें ॥१५९॥ उभय पक्षांतील नर । भेटावया परस्पर । चालून जाती दूरवर । किंचिन्मात्र ॥१६०॥ दोन आनंद–सागर । जणुं भेटती परस्पर । स्वमर्यादा लवमात्र । उल्लंघुनी ॥१६१॥ देवांगना गीत गाती । पुष्पांचा वर्षाव करिती । देव दुंदुभी वाजविती । आनंदानें ॥१६२॥ दशरथ भूपापुढतीं । सर्व पदार्थ ठेविती । अति प्रीतीं विनविती । स्वीकारार्थ ॥१६३॥ त्या पदार्थांचा स्वीकार । करून भूपें सप्रेमभर । वांटून दिले समग्र । याचकांतें ॥१६४॥ पूजा, सत्कार, संमान । होतां वरातीचे जन । जानवशासी नेऊन । पोंचविले ॥१६५॥ वसनें घेऊन विविध । पायघड्या केल्या सिद्ध । कुबेराचा धनमद । पाहून हरे ॥१६६॥ जानवशाचें मंदिर । दिलें अतिशय सुंदर । जें सर्वांस सुखकर । सर्वतोपरीं ॥१६७॥ वरात पातली नगरीं । जाणून जनककुमारी । स्वप्रभाव प्रकट करी । किंचिन्मात्र ॥१६८॥ स्मरून हृदयांतरीं । सर्व सिद्धींतें पाचारी । भूपाच्या पाहुणचारीं ।

धाडून दे ॥१६९॥ सीतेची आज्ञा ऐकतां । ऋद्धि-सिद्धि त्या समस्ता । गेल्या, ज्या स्थळीं होता- । जानवसा ॥१७०॥ भोग-विलास स्वर्गांतील । संपदासौख्य सकल । ऋद्धि-सिद्धि-सवें तत्काल । नांदती तिथें ॥१७१॥ वऱ्हाडी मंडळी सारी । आपुल्या निवासांतरीं । सेविती सर्वतोपरीं । स्वर्गसुखें ॥१७२॥ वैभवदृष्टचा कुणासहि । न्यूनाधिक्य मुळीं नाहीं । प्रशंसा करिती सर्वहि । मिथिलेशाची ॥१७३॥ जानकीचें तें कर्तृत्व । जाणता एक राघव । ओळखून मनोभाव । हर्षे मनीं ॥१७४॥ पितरागमन ऐकतां । रामलक्ष्मणां उभयतां । अत्यानंद झाला चित्ता । मावेचि ना ॥१७५॥ पित्याचें दर्शन घ्यावें । उत्कंठा घेतली जीवें । परि संकोचें न वदवें । गुरुपाशीं ॥१७६॥ दोघांचा विनय थोर । पाहूनिया विश्वामित्र । संतुष्ट जाहले फार । हृदयांतरीं ॥१७७॥ त्या दोघां बंधुंप्रति । हर्षें हृदयीं आलिंगिती । देहीं रोमांच उठती । प्रेमाश्रु नेत्रीं ॥१७८॥ दशरथाच्या निवासा । निघाले तेव्हां सहसा । तडाग पहावा जैसा । तृषार्तांनीं ॥१७९॥ निज पुत्रातें घेउनी । येतां विश्वामित्र मुनि । दशरथानें स्वनयनीं । अवलोकिले ॥१८०॥ ह्या समयीं तो राव । उठून हर्षें अतीव । सुखसिंधूचा ठाव । घेत सुटे ॥१८१॥ मुनीश्वरां अत्यादरीं । भूप दंडप्रणाम करी । पदरज मस्तकीं धरी । वारंवार ॥१८२॥ विश्वामित्र भूपाप्रति । उचलून पोटीं धरिती । क्षेम विचारून देती । आशीर्वाद ॥१८३॥ मग ते बंधु उभयतां । पित्यास करिती दंडवता । सुख न समावें पाहतां । भूप-मनीं ॥१८४॥ पुत्रां पोटाशीं धरिलें । दुःसह दुःख लोपलें । मृत शरीरा भेटले । प्राण जणुं ॥१८५॥ मग वसिष्ठाचे चरण । वंदिती रामलक्ष्मण । आलिंगिती ते त्यांलागून ।

प्रेमानंदें ॥१८६॥ सर्व ब्रह्मवृंदाप्रत । करिती दोघे प्रणिपात । प्राप्त करून घेती इच्छित । आशीर्वाद ॥१८७॥ शत्रुघ्नासह भरतें । वंदितां रघुनाथातें । तेणें उचलून दोघांतें । आलिंगिलें ॥१८८॥ पाहून दोघां बंधूंतें । लक्ष्मण हर्षित चित्तें । प्रेमपूर्णगात्रें त्यांतें । भेटता झाला ॥१८९॥ अयोध्येंचे नागरिक । आप्त स्वकीय अनेक । अमात्य, मित्र, याचक । इत्यादि जे– ॥१९०॥ ऐशा सर्व लोकांप्रत । परम कृपालु विनीत । श्री रघुनाथ यथोचित । भेटता झाला ॥१९१॥ पाहून राघवाप्रति । सर्व लोक प्रसन्न होती । त्यांच्या प्रेमाची पद्धति । अवर्णनीय ॥१९२॥ भूपासमीप चारी सुत । शोभूं लागले अत्यंत । पुरुषार्थ मूर्तिमंत । चारीहि जणुं ॥१९३॥ पुत्रांसहवर्तमान । दशरथासी पाहून । हृष्ट मिथिलेचे जन । विशेषेंचि ॥१९४॥ करून पुष्पवर्षाव । दुंदुभी वाजविती देव । नाचती गाती अपूर्व । स्वर्गांगना ॥१९५॥ कुलगुरु शतानंद । सचिव, विप्रवृंद । विदूषक, सूत, मागध । बंदीजन ॥१९६॥ वरातीसहवर्तमान । दशरथातें संमानून । परत फिरले घेऊन । निरोप त्यांचा ॥१९७॥ लग्नाआधींच वरात । आली म्हणून नगरांत । आनंद झाला अत्यंत । सर्वांसहि ॥१९८॥ मिथिलेचा जनसमुदाय । घेई ब्रह्मानंदानुभव । म्हणती, "दिनरात्रि वाढीव" । धात्याप्रति ॥१९९॥ रामचंद्र आणि सीता । सौंदर्यसीमा उभयतां । पुण्याची सीमा तत्त्वतां । भूप दोघे ॥२००॥ जिकडें तिकडें नागरिक । नरनारी सकळिक । यापरी बोलून कौतुक । वाखाणिती ॥२०१॥ जनकसुकृताची मूर्ति । विराजते सीता सती । दशरथ-सुकृत-निष्पत्ति । रामरूप ॥२०२॥ त्यांच्यासम कुणीहि ना । केलीसे शिवाराधना । त्यांच्यासम फळहि कुणा ।

लाभलें नाहीं ॥२०३॥ त्यांच्यासमान कुणीहि । भूतकाळीं झाले नाहीं । सांप्रतहि ना पुढेंहि । होणार नाहीं ॥२०४॥ आम्हीहि जन समस्त । आहों खरे पुण्यवंत । जगीं जन्मून मिथिलेंत । राहिलों कीं ॥२०५॥ सीता–रामांची सुंदरता । ज्यांनीं विलोकिली स्वतां । त्या आम्हांहून परता । सुकृती कोण ? ॥२०५॥ रामाचा विवाह त्यांत । पाहूं आम्हीं यथास्थित । नेत्रसाफल्य यथोचित । करून घेऊं ॥२०७॥ परस्पर कोकिलस्वनीं । बोलती तेव्हां कामिनी । 'हा विवाह सुनयनीं । लाभचि महा' ॥२०८॥ आपुल्या थोर भाग्यानें । योग आणिला विधात्यानें । नेत्रांचें अतिथि होणें । उभय बंधु ॥२०९॥ वात्सल्यप्रेमेंकरून । जनक सीतेलागून । माहेरीं घेईल आणून । वारंवार ॥२१०॥ तिज न्यावया सारीं । सुंदर कोटिकामांपरी । येतील मिथिला नगरीं । उभयतां हे ॥२११॥ नानापरीं पाहुणचार । जेथें होय वरचेवर । ती कुणास न रुचणार । सासुरवाडी ॥२१२॥ निज दृष्टीनें तेधवां । पाहून लक्ष्मण-राघवां । सुख होईल कीं सर्वां । नागरिकां ॥२१३॥ 'रामलक्ष्मण ज्यापरी । जोडी शोभे साजिरी । भूपासवें त्याचपरी । दोन पुत्र ॥२१४॥ एक श्याम, एक गौर । असती सर्वांग सुंदर । पाहून आले ते ते नर । सांगती ऐसें ॥२१५॥ त्यांत एकानें कथिलें । मीं आजचि विलोकिले । जणुं धात्यानें घडविले । स्वहस्तेंचि ॥२१६॥ रामासारखाच भरत । भेद कांहीं उभयतांत । पाहतां प्रेक्षकांप्रत कळूं न शके ॥२१७॥ लक्ष्मण आणि शत्रुघ्न । दोघेहि दिसती समान । निरुपम सर्वांगें पूर्ण । नखशिखांत ॥२१८॥ मनचि जाणे सुखा तया । मुखें न येचि वर्णाया । त्रिभुवनीं उपमा द्याया । नाहींच कुणी ॥२१९॥

उपमा नसे उपलब्ध । असला जरी प्रसिद्ध । कोठून कविकोविद । देईल तरी ॥२२०॥ विद्या-विनय, आणि बल।शोभा सागर,सुशील यांच्यासमान केवल। हेचि असती ॥२२१॥ नगरींच्या सर्व स्त्रिया । निज पदर पसरूनिया । प्रार्थिती तेव्हां धातया ऐशापरीं ॥२२२॥ "या चौघांहि भावंडांचीं । लग्नें येथें व्हावीं साचीं । आणि आम्हीं गावीं त्यांचीं । मंगल गीतें" ॥२२३॥ शरीरें तीं रोमांचित । नेत्र प्रेमाश्रुपूरित । बोलूं लागल्या आपसांत । नगर-स्त्रिया ॥२२४॥ "सख्यांनो! भगवान् शंकर । सर्वहि पूर्ण करणार । कीं हे पुण्याचे सागर । भूप दोघे" ॥२२५॥ यापरी स्त्रिया समस्त । करूं लागल्या मनोरथ । लाटा उसळती हृदयांत । आनंदाच्या ॥२२६॥ सीतास्वयंवरास्तव । राजे जे आले सर्व । ते घेती सुखानुभव । बंधुदर्शनें ॥२२७॥ रामाची विमल कीर्ति । सप्रेम आनंदें गाती । आपापल्या स्थानाप्रति । जाते झाले ॥२२८॥ (सोपानींचा मार्ग भला । जरी दीर्घतम वाटला । तदर्थ सोळावा योजिला । विश्राम हा ॥२२९॥ रसिक भाविक श्रोत्यांस । विनवीतसे देवीदास । माझ्या बोबड्या बोलांस । मान्य करा ॥२३०॥)

---

# विश्राम १७ वा

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्योनमः

श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः

यापरीं वऱ्हाडी पुरजन । या सर्वांचे कांहीं दिन । गेले असती लोटून । आनंदांत ॥१॥ मंगलमूल लग्नदिवस । आला तया समयास । शुचि मार्गशीर्ष मास । हेमंतऋतु ॥२॥ ग्रह, योग, तिथि, नक्षत्र । वार, मुहूर्त पवित्र । काढीतसे चतुर्वक्त्र । शोधूनिया ॥३॥ नारदाहातीं दे धाडुनी । जनकाच्याहि ज्योतिष्यांनीं । ठेविला होता काढुनी । तोच मुहूर्त ॥४॥ ऐकून वृत्त अपूर्व । म्हणूं लागले लोक सर्व । असती प्रति ब्रह्मदेव । ज्योतिषी हे ॥५॥ सकल मंगलांचें मूल । गोरज मुहूर्त केवल । पवित्र आणि निर्मल । सुविख्यात ॥६॥ सर्व ब्रह्मसमुदाय । जनका सांगे निश्चय । अनुकूल हाचि समय । योग्य आहे ॥७॥ आपुल्या कुलपुरोहिता । जनक झाला विचारिता । विलंब करावा आतां । किन्निमित्त? ॥८॥ तेधवां शतानंदांनीं । बाहिलें सर्वत्रांलागुनी । आणिलीं सिद्ध करुनी । मंगल द्रव्यें ॥९॥ शंख, पणव, निशाण । होतसे वाद्य--वादन । सिद्ध केले शुभशकुन । मंगल कलश ॥१०॥ सुंदर सुवासिनी युवती । सुमंगल गीतें गातीं । शुचि श्रुति--घोष करिती । ब्रह्मवृंद ॥११॥ समारंभें ऐशा रीतीं । वरास आणाया जाती । ज्या जानवसीं असती । वऱ्हाडी ते ॥१२॥ दशरथाचा समाज । विलोकूनिया सहज । त्यांतें प्रत्यक्ष सुरराज । तुच्छ वाटे ॥१३॥ 'मुहूर्त समीप आला । चला विबाह-

स्थला । चौघडा झडूं लागला' । ऐकतां हें ॥१४॥ विचारून गुरुप्रत । कुलाचार सारून त्वरित । साधु-मुनिजनांसहित । निघे राव ॥१५॥ दशरथाचें तें वैभव । भाग्य तैसेंच अपूर्व । प्रत्यक्ष ब्रह्मादिदेव । अवलोकुनी ॥१६॥ करिती त्याची प्रशंसा । सहस्र मुखांनीं अशेषा । जन्म आपुला व्यर्थसा । वाटूं लागे ॥१७॥ सुमंगल अवसर । जाणून तें सुरवर । करिती वाद्यगजर । पुष्पवृष्टि ॥१८॥ शिवब्रह्मादि समस्त । स्वपरिवारासहित । नानाविध विमानांत । बैसूनिया ॥१९॥ प्रेमें रोमांचित देह । हृदयीं अत्यंत उत्साह । पहाया रामविवाह । निघते झाले ॥२०॥ पाहून मिथिलेप्रत । देवहि झाले मोहित । वाटूं लागे यःकश्चित् । निजलोक त्या ॥२१॥ मंडपाची रचना सारी । अपूर्व सर्वतोपरीं । पाहून देव अंतरीं । थक्क झाले ॥२२॥ स्त्रीपुरुष नागरिक । कुलीन ते सकलिक । सुशील, सुज्ञ, धार्मिक । सुस्वरूप ॥२३॥ दृष्टीं विलोकून त्यांना । निस्तेज देवदेवांगना । जणुं का नक्षत्रें नाना । चंद्रोदयीं ॥२४॥ आपुलें कर्तृत्व कांहीं येथ दिसून येत नाहीं । म्हणून थक्क धाताहि । विशेषेंचि ॥२५॥ तैं सर्व देवांकारणें । समजाविलें शिवानें । "तुम्ही आश्चर्य न करणें । चुकूनहि ॥२६॥ धीर धरूनिया साचा । विचार करा तुम्ही याचा । कीं सीता-रामचंद्राचा । विवाह हा" ॥२७॥ शुभनाम घेतां ज्यांचें । समूळचि अमंगलांचें । निराकरण व्हायाचें । विश्वांतरीं ॥२८॥ चतुर्विधहि पुरुषार्थ । करतलामलकवत् । ते हे सीता-रघुनाथ" । सांगे शिव ॥२९॥ ऐसें सर्व देवांप्रति । सांगून कैलासपति । निज नंदिकेश्वर पुढतीं । हांकारीतसे ॥३०॥ जात असतां दशरथ । पाहून देव समस्त । गात्रें होऊन पुलकित । हर्षले चित्तीं ॥३१॥ दशरथाचे संगतीं । विप्र-संतजन

शोभती । जणुं सर्व सुखें सेविती । मूर्तिमंत ॥३२॥ तैसे अति भाग्यवंत । शोभती ते चारी सुत । जणुं अपवर्ग समस्त । मूर्तिमंत ॥३३॥ सुवर्ण आणि इंद्रनील । तैसें तें सुंदर युगुल । पाहून देव सकल । प्रेममुग्ध ॥३४॥ रामचंद्रातें पाहुनी । देव हृष्ट झाले मनीं । करिती भूपा प्रशंसुनी । पुष्पवृष्टि ॥३५॥ रमणीय नखशिखांत । ऐशा रामरूपाप्रत । डोळे भरून पहात । वारंवार ॥३६॥ उमेसह कैलासनाथ । होऊन गात्रें रोमांचित । नेत्र प्रेमाश्रुपूरित । होता झाला ॥३७॥ मयूरकंठापरी कांति । शोभे श्याम देहाकृति । पीतांबर लाजवी अति । विद्यु-ल्लतेसम ॥३८॥ विवाहाचे अलंकार । त्यांचे विविध प्रकार । मंगलमय सुंदर । सर्वतोपरीं ॥३९॥ शारदीय निष्कलंक । चंद्रासमान श्रीमुख । नेत्र लाजविती निःशंक । नूतन पद्मा ॥४०॥ ऐसें सौंदर्य सकलिक । अवर्णनीय अलौकिक । मनचि त्या अनुभविक । तेंचि जाणे ॥४१॥ सांगाती तिघेहि बांधव । तेहि मनोहर अतीव । नाचवीत जाती अश्व । चपल अति ॥४२॥ ऐसे ते राजकुमर । अश्व नाचविती सुंदर । भाट गाती प्रशंसापर । ब्रीदावलि ॥४३॥ ज्यापरी रघुनंदन । श्रीराम विराजमान । गरुडहि लाजे पाहून । चाल त्याची ॥४४॥ त्या रामाश्वाचें सौंदर्य । सर्वथा अवर्णनीय । जणुं स्वयेंचि झाला हय । कामदेव ॥४५॥ जणुं स्वयें कामदेव । होऊन रामाचा अश्व । मिरवतसे अतीव । शोभायमान ॥४६॥ निज वयोरूप, बल । गुण तेविं चंचल । इहीं मुग्ध करी सकल । भुवनाप्रति ॥४७॥ साज त्याचा अलौ-लिक । रत्नें, माणकें, मौक्तिक । जडवलेलीं अमोलिक । तया-प्रति ॥४८॥ जडित किंकिणी सुस्वर । लगाम तोहि सुंदर ।

पाहून देव, मुनि, नर । मुग्ध होती ॥४९॥ जैसें प्रभूचें मनोगत। स्वमन करून तद्गत । चालतां अश्व अत्यंत । शोभूं लागे ॥५०॥ तारका आणि विद्युत्- । भूषणांनीं विभूषित । नाचवी मत्त मयूराप्रत । मेघचि जणुं ॥५१॥ (येथें प्रत्यक्ष श्रीराम । स्वयमेव घनश्याम । पीतांबर विद्युत्सम । देदीप्यमान् ॥५२॥ श्रीरामाचे अलंकार । तेचि तारे सभोंवार । अश्व तोचि मत्तमयूर । नाचतसे ॥५३॥) ज्या थोर अश्वावर । आरूढला रघुवीर । तद्वर्णनीं न लागे पार । शारदेस ॥५४॥ असो, श्रीकैलासनाथ। रामरूपीं अनुरक्त । पंचदशनेत्र अत्यंत । प्रिय वाटती ॥५५॥ (पंचमुखी श्रीशंकर । प्रति मुखा तीन नेत्र । नेत्रसंख्या एकंदर । पंचदश ॥५६) अश्वासह रघुनाथ । विलोकितां प्रेम-भरित । विष्णूहि लक्ष्मीसहित । मुग्ध होय ॥५७॥ रामरूप विलोकितां । हर्षित झाला विधाता । आठचि नेत्र हा चित्ता । पश्चात्ताप ॥५८॥ जरि कार्तिकस्वामीला । उल्लास भारी वाटला । धात्याच्या दिढीनें झाला । नेत्रलाभ ॥५९॥ परि देवेंद्र तो चतुर । पाहून श्री रघुवीर । मानी परम हितकर । गौतमशाप ॥६०॥ परि सकलहि देवां । इंद्राचा वाटला हेवा । कीं तत्सम भाग्य-ठेवा । कुणाचाहि ना ॥ ६१ ॥ (गौतमशापें इंद्राप्रत । भगें सहस्रसंख्यान्वित । कथा अन्यत्र वर्णित । सविस्तर ॥६२॥ परि सहस्र भगें तीं । कालांतरें नेत्रें होतीं । तितुक्या नेत्रीं शचिपति । पाहतसे ॥६३॥) विलोकून रामाप्रत। देव झाले प्रमुदित । उभय राजसमाजांत । हर्ष बहु ॥६४॥ दोन्ही नृपमंडलांत । हर्ष नांदे अतोनात । दुंदुभी त्या निनादित। उच्च गजरें ॥६५॥ हर्षें समुदाय देवांचा । करी वर्षाव पुष्पांचा । करून रघुकुलमणीचा । जयजयकार ॥६६॥ वाद्यें

वाजतीं अगणित । ऐकून त्या ध्वनिप्रत । येऊं लागली वरात । जाणून हें ॥६७॥ मिथिलेची महाराणी । सुवासिनींतें बाहुनी । ठेवीतसे सिद्ध करुनी । मंगलारति ॥६८॥ मंगलद्रव्यें नानाविध । सर्व केली तदा सिद्ध । ओवाळावया सुप्रसिद्ध । वराप्रति ॥६९॥ ओवाळावयाकारणें । कुलीन स्त्रिया आनंदानें । चालल्या गजगतीनें । मिळूनिया ॥७०॥ कामिनी त्या चंद्रवदना । सर्वहि हरिणलोचना । हरिती रतीच्या अभिमाना । स्वसौंदर्यें ॥७१॥ वस्त्रें तीं विविधवर्णी । भारीचीं परिधानुनी । शृंगारला भूषणांनीं । देह त्यांचा ॥७२॥ मंगल द्रव्यें मंडित । अंगें त्यांचीं सुशोभित । गानें करिती लज्जित । कोकिलेसी ॥७३॥ कंकण, किंकिणी, नूपुरें । वाजूं लागतीं सुस्वरें । गति पाहून लज्जा भरे । कामगजा ॥७४॥ नानाविध वाद्यगजर । होऊं लागे वरचेवर । नभीं, पुरीं मंगलाचार । सुरू झाले ॥७५॥ शची आणि सरस्वती । तैशी लक्ष्मी, पार्वती । सुज्ञ, शुचि सुर–युवती । स्वाभाविक– ॥७६॥ धरून सुंदर स्त्रीवेष । येत्या झाल्या सावकाश । करिती हळूंच प्रवेश । अंतःपुरीं ॥७७॥ कोकिल-कंठेंकरून । करिती मंगल गायन । सर्वहि आनंदीं मग्न । नेणती कुणी ॥७८॥ कोणास ओळखे कोण । सर्वहि आनंदीं मग्न । निघाल्या ओवाळायालागून । परब्रह्म वरा ॥ ७९ ॥ गीतें चाललीं मधुर । वाद्यें वाजतीं सुस्वर । पुष्पें वर्षती सुरवर । थाट मोठा ॥८०॥ आनंदकंद वराप्रति । पाहून सर्व युवती । होत्या झाल्या निजचित्तीं । हर्षभरित ॥८१॥ त्यांच्या पद्म-नेत्रांतून । होय प्रेमाश्रु सिंचन । मृदु देह गेले व्यापून । रोमांचांनीं ॥८२॥ रामचंद्राचा विशेष । पाहून सुंदर वेष । सुख सीतेच्या मातेस । जाहलें जें– ॥८३॥ त्यातें शेष-सरस्वती ।

वर्णन करूं न शकती । जरी लक्ष कल्प जाती । लोटूनिया ॥८४॥ प्रेमाश्रु दाटले नयनीं । मंगल समय जाणुनी । रोधून ओवाळी राणी । मुदित मनें ॥८५॥ तियेनें वेदविहित । आणि परंपरागत । केले आचार समस्त । यथायोग्य ॥८६॥ पंचविध वाद्यें गर्जतीं । मंगलाचार होती । विविध वस्त्रांच्या पडती । पाथघड्या ॥८७॥ ओवाळूनिया राज्ञीनें । जामात पूजिला अर्घ्यदानें । मग केला रघुनाथानें । मंडप–प्रवेश ॥८८॥ समाजासहवर्तमान । दशरथ विराजमान । लज्जित वैभव पाहून । लोकपति ॥८९॥ समयोचित देवगण । पुष्पें वर्षे नभांतून । करिती स्वस्तिवाचन । ब्रह्मवृंद ॥९०॥ नभीं आणि पुरांतुनी । कोलाहल तो माजुनी । शब्दहि नायके कोणी । आपपर ॥९१॥ ऐशा थाटें रघुनाथ । प्रवेशला मंडपांत । बैसविलें तयाप्रत । अर्घ्यदानें ॥९२॥ आसनावरी वराप्रति । बैसवून ओवाळिती । दृष्टीं पाहून पावती । आनंदातें ॥९३॥ वस्त्रें भूषणें अनेक । ओवाळून रत्नादिक । गाती स्त्रिया सकळिक । मंगल गीतें ॥९४॥ ब्रह्मादिक सुरगण । विप्रवेषातें घेऊन । करीतसे विलोकन । कौतुक तें ॥९५॥ रघुकुलाब्जरवीचें । सौंदर्य पाहून साचें । मानिती निज जीवनाचें । साफल्य ते ॥९६॥ सर्व ओवाळणी भाट । नापित, तांबोळी, नट । घेऊन झाले संतुष्ट । निजांतरीं ॥९७॥ निज मस्तक नमविती । मोदें आशीर्वाद देती । आनंद न मावे चित्तीं । तयांचिया ॥९८॥ आचार वैदिक, लौकिक । करूनिया सकळिक । भेटती दशरथ–जनक । अति प्रेमें ॥९९॥ महाराजे उभयतां । शोभूं लागले भेटतां । उपमा शोधितां शोधितां । लाजे कवि ॥१००॥ कोठेंहि न मिळे म्हणुनी । हार खाऊनिया मनीं । ह्यांच्यासम हेच मानी । उपमा अशी ॥१०१॥ पाहून

त्या व्याह्यांप्रति । देव अनुरक्त होती । सुमनें वाहून गाती । तद्यशातें ॥१०२॥ "धाता निर्मी सृष्टीप्रत । तेव्हांपासून निश्चित । पाहिले, ऐकिले अमित । विवाह आम्हीं १०३॥ समसमान सुसज्ज । थाट-माट, जनसमाज । समसमान व्याही आज । पाहिले आम्हीं" ॥१०४॥ ऐकून देवांची उक्ति । सत्य-पूर्ण सुंदर अति दोन्ही समाजीं दाटे प्रीति । लोकोत्तर ॥१०५॥ पायघड्या अमोलिक । अर्घ्य देऊन जनक । आणी आदरपूर्वक । मंडपांत ॥१०६॥ मंडपरचना विचित्र । शोभा पाहून अपार । मुनींचेंहि हृदंतर । मुग्ध होय ॥१०७॥ त्या चतुर जनकानें । सर्वांसहि स्वहस्तानें । बैसविलें आदरानें । सिंहासनीं ॥१०८॥ कुलदेवतेसमान । वसिष्ठ मुनीतें पूजून । केला त्यांचा संपादन । आशीर्वाद ॥१०९॥ पूजितां गाधिजांप्रत । विदेहाच्या हृदयांत । वाटे प्रेम जे अत्यंत । सांगतां न ये ॥११०॥ इतर वामदेवा-दिक । ऋषि तेहि सकळिक । पूजिता झाला जनक । आनंदानें ॥१११॥ दिव्य आसनें देऊन । बैसवी सर्वांलागून । तयांचें आशीर्वचन । घेता झाला ॥११२ मग दशरथालागून । पूजी ईश्वरासमान । भेद कांहीं न मानून । उभयतांत ॥११३॥ जोडून स्वकरांप्रति । विनयें करीतसे स्तुति । निज भाग्योत्कर्ष अति । निवेदून ॥११४॥ जे कोणी वऱ्हाडी जन । त्यांचेंहि करी पूजन । सादर व्याह्यासमान । सर्वतोपरीं ॥११५॥ दिली सर्वांहि-कारणें । यथायोग्य सुखासनें । किती वर्णूं एक मुखानें । उत्साह तो ॥११६॥ ऐशापरी जनकानें । दानें, मानें, विनयानें । सकल बरातीकारणें । गौरविलें ॥११७॥ ब्रह्मा–विष्णु–महेश्वर । अष्ट दिक्पाल, भास्कर । श्रीराम–प्रभाव थोर । जाणती जे ॥११८॥ विप्रवेषें ते सकलिक । अत्यंत प्रेमपूर्वक । येऊनिया तें कौतुक ।

विलोकिती ॥११९॥ नोळखिलें जनकानें । मानून देवाप्रमाणें । देऊनिया सुखासनें । पूजिलें त्यां ॥१२०॥ कोणास ओळखी कोण । विसरले देहभान । आपुली आपणांलागून । शुद्धि नाहीं ॥१२१॥ उभय पक्षीं लोक सर्व । आनंदकंद राघव । पाहून मग्न अतीव । आनंदांत ॥१२२॥ परम चतुर राघवानें । जाणिलें देवांकारणें । आसनें देऊन, मनें । पूजिलें त्यां ॥१२३॥ (उठून आसनावरून । करावें देवपूजन । तरी येईल दिसून । उचित न तें ॥१२४॥ कपटवेष घेऊन । आला होता देवगण । प्रकट होय निष्कारण । भेद त्यांचा ॥१२५॥ ध्यानामाजीं उत्कट । मानसपूजा श्रेष्ठ । यास्तव पूजिलें उत्कृष्ट । मनानेंचि ॥१२६॥) प्रभूचा शील-स्वभाव । अवलोकूनिया देव । चित्तीं जाहले अतीव । प्रमुदित ॥१२७॥ श्रीराममुख निशानाथ । तच्छोभा तेंचि अमृत । सुंदर चकोर तेथ । देवनेत्र ॥१२८॥ अति आदरेंकरून । करिती ते अमृत-पान । तो प्रेमानंद संपूर्ण । अवर्णनीय ॥१२९॥ वसिष्ठें मुहूर्त जाणिलें । पुरोहिता पाचारिलें । ऐकतां सादर पातले । शतानंद ॥१३०॥ 'घेऊन या वधूप्रत' । आज्ञा होतां पुरोहित । निघते झाले त्वरित । आनंदानें ॥ १३१॥ चतुर राज्ञी परिसून । पुरोहिताचें वचन । सख्यांसहवर्तमान । आनंदली ॥१३२॥ कुलवृद्धा, विप्र-नारी । बाहून तदवसरीं । मंगल गीतीं तैं करी । कुला-चार ॥१३३॥ कपट स्त्रीवेष घेउनी । आल्या ज्या देवरमणी । स्वभावेंचि सुंदरपणीं । रमणीय ज्या ॥१३४॥ मिथिलेच्या सर्व स्त्रिया । आनंदल्या बघून तयां । वाटती प्राणाहून प्रिया । नोळ-खतांहि ॥१३५॥ उमा, रमा, सरस्वती । मानूनिया मूर्तिमती । राज्ञी सन्मानी त्यांप्रति । वारंवार ॥१३६॥ सीतेचा करून

शृंगार । तिच्या सख्या सभोंवार । घेऊन जाती सत्वर । मंडपीं मुदें ॥१३७॥ जानकीतें सखीजन । सालंकृत सजवून । थाटानें जाती घेऊन । अत्यादरें ॥१३८॥ षोडश शृंगार करुनी । मत्त-कुंजरगामिनी । अति सुंदर कामिनी । शोभती त्या ॥१३९॥ ऐकतां मधुर गायन । मुनि त्यागिती स्वध्यान । त्यापरीं लज्जाय-मान । कामकोकिल ॥१४०॥ पैंजण, नूपुर, कंकण । त्यांचा होय मधुर स्वन । करूं लागतां गमन । तालावरी ॥१४१॥ त्या स्त्रियांच्या परिवारीं । मध्यभागीं जनककुमरी । स्वभावें अति सुंदरी । शोभतसे ॥१४२॥ सुंदरतारूप युवती । त्या सर्वांच्या मध्य-वर्ती । शोभा जणुं मूर्तिमती । विराजली ॥१४३॥ सीतेची ती सुंदरता । अशक्यचि वर्णूं जातां । बुद्धि अल्प, मनोहरता । विशेषच्चि ॥१४४॥ ऐसी जनकनंदिनी । येतांदेखिली वऱ्हाडयांनीं । शुचि सर्व प्रकारांनीं । रूपराशि ॥१४५॥ मनींच्या मनीं समस्त । करिती तिज प्रणिपात । पाहून होय रघुनाथ । पूर्णकाम ॥१४६॥ पुत्रांसहवर्तमान । दशरथ होय प्रसन्न । तदानंदाचें वर्णन । न करवें ॥१४७॥ वंदूनिया सर्व देव । करिती पुष्प–वर्षाव । आशी देती मुनि सर्व । मंगलमूल ॥१४८॥ गानवादनाचा भारी । कोलाहल तदवसरीं । प्रेमानंदीं नरनारी । मग्न होती ॥१४९॥ यापरीं जनककुमारी । पातली मंडपाभीतरीं । मोहें केलें मुनीश्वरीं । स्वस्तिवाचन ॥१५०॥ दोन्हीहि कुलगुरु थोर । त्या समयीं यथाशास्त्र । कुलधर्म–कुलाचार । करिती ते ॥१५१॥ ब्राह्मण होऊन प्रसन्न । गुरु, पार्वती, गजानन । यांचें करविती पूजन । यथाविधि ॥१५२॥ प्रकट होऊन देवता । पूजा स्वीकारिती स्वतां । देती पावून प्रसन्नता । आशीर्वाद ॥१५३॥ मधुपर्क इत्यादिक । मंगल द्रव्य

अनेक । इच्छिती मुनिनायक । जेधवां मनीं-- ॥१५४॥ सुवर्ण-
कलश, परातीं । भरून घेऊन हातीं । त्या समयीं सिद्ध असती ।
परिचारक ॥१५५॥ प्रेमें प्रत्यक्ष भास्कर । सांगे येऊन कुला-
चार । केले जाती तें सादर । समस्तहि ॥१५६॥ यापरीं देवता-
पूजन । सारून, सीतेलागून । दिलें तेव्हां सिंहासन । सुंदर
अति ॥१५७॥ सीता आणि रघुवीर । विलोकिती परस्पर । न
कळे तें प्रेम थोर । कुणासहि ॥१५८॥ मनोबुद्धिवाणीप्रति ।
अगोचर ते निश्चितीं । वर्णील तें कैशा रीतीं । कविहि
तरी ॥१५९॥ होमहवन तें होतां । अग्नि प्रकटून स्वतां ।
जाहला आहूति घेता । अति प्रेमें ॥१६०॥ विप्राचा धरून वेष ।
देव प्रकटले अशेष । सांगती करावयास । विवाहविधि ॥१६१॥
जनकाची पट्टराणी । विख्यात सीता--जननी । तिचें वर्णन
कोठुनी । होय कैसें ॥१६२॥ यशःपुण्य--सौंदर्य--सुख । मिळवू-
निया सकळिक । निर्मिली जी अलौकिक । विधात्यानें--॥१६३॥
समय जाणून श्रेष्ठमुनि । बाहती तिजलागुनी । आणिती तैं
सुवासिनी । अत्यादरें ॥१६४॥ जनकाचे वामभागीं । सुनयना
शोभे अर्धांगी । शोभे हिमाचलासंगीं । मैना जणुं ॥१६५॥
रत्नांच्या पराती सुंदर । सुवर्णाचा कलश थोर । शुद्ध सुगंधित
नीर । ज्यांत असे ॥१६६॥ राज्ञीसवें तो भूपति । आणूनिया
निजहस्तीं । ठेवी राघवाच्या पुढतीं । आनंदानें ॥१६७॥ यथा-
काल मुनिजन । करिती वेदपठन । होऊं लागे नभांतून ।
पुष्पवृष्टि ॥१६८॥ विलोकून रघुपति । दांपत्य प्रसन्न चित्तीं ।
शुचि प्रभुपदांप्रति । प्रक्षाळी तैं ॥१६९॥ पदाब्ज तैं प्रक्षाळितां ।
मग्न प्रेमें उभयतां । तनु झाली रोमांचिता । तदवसरीं ॥१७०॥
नभीं आणि पुरांतुनी । गान--निशाण--जयध्वनि । उमडून बहू

दिशांनीं । व्यापलासे ॥१७१॥ भगवान् शिव मदनारि । त्याच्या हृदयसरोवरीं । पदसरोज निरंतरीं । शोभती जे ॥१७२॥ पुण्यबलें ज्या स्मरतां । मनास लाभे निर्मलता । कलिमलातें समस्तां । नाशिती जे ॥१७३॥ ज्या पदां स्पर्शतांक्षणीं । होती जी महा पापिनी । अहल्या गौतम–पत्नी । उद्धरली ॥१७४॥ ज्या पदाब्जमकरंदा । शिव शिरीं धरी सदा । पवित्रतेचीं मर्यादा । म्हणती देव ॥१७५॥ ज्या पदाब्जीं मुनिमन । लुब्ध भ्रमरासमान । ज्या सेवुनी योगीजन । मुक्त होती ॥१७६॥ सभाग्य जनक भूपति । प्रक्षाळी त्या पदांप्रति । तैं सर्व लोक करिती । जयजयकार ॥१७७॥ कुलगुरु ते उभयतां । वधुवरांच्या सव्य हस्तां । जुळवून करिती तत्वतां । शाखोच्चार ॥१७८॥ ब्रह्मादिसुर–मुनिजन । जाहलें पाणिग्रहण । मानिती ऐसें पाहून । आनंदानें ॥१७९॥ सुखकंद वराप्रति । पाहुनिया ते दंपती । मनीं सुप्रसन्न होती । रोमांचित ॥१८०॥ नृपभूषण जनकानें । लौकिक वेदविधानें । केलें यापरीं थाटानें । कन्यादान ॥१८१॥ हिमाचलानें ज्या रीतीं । अर्पिली शिवा पार्वती । कीं सागरें हरिप्रति । लक्ष्मी जेसी ॥१८२॥ तैसें जनकें सीतेस । अर्पिलें रघुनाथास । त्रिलोकीं अपूर्व यश । संपादिलें ॥१८३॥ आतां त्या रघुनंदना । कैसी करावी प्रार्थना । घनश्यामें देहभाना । नुरविलेंचि ॥१८४॥ उभयवस्त्र–गांठबांधी । लाजाहोम यथाविधि । सारून मग सप्तपदी । आरंभिली ॥१८५॥ जयजयकाराचा ध्वनि । बंदीध्वनि, वेदध्वनि, । मंगल गायनाचा ध्वनि । वाद्यगजर ॥१८६॥ ऐकूनिया आनंदानें । समयज्ञ देवगणें । कल्पवृक्षांचीं सुमनें । वर्षविलीं ॥१८७॥ वधुवरांची सप्तपदी । चालतां, जनसंमर्दीं ।

साधिली नेत्रफलसिद्धि । अत्यादरें ॥१८८॥ ऐसें मनोहर जोडपें । वर्णूं जातां नव्हें सोपें । उपमा देतांच लोपें । गौणपणें ॥१८९॥ सीता आणि रामचंद्र । यांचीं प्रतिबिंबें सुंदर । तळपूं लागतीं मनोहर । मणिस्तंभीं ॥१९०॥ जणुं रति आणि काम । रूपें धरून अनुपम । रामविवाह महत्तम । विलो-किती ॥१९१॥ दर्शनाची तरी लालसा । परि संकोच मानसा । कधीं प्रकट, सहसा । गुप्त कधीं ॥१९२॥ (पडे प्रतिबिंब स्तंभीं । तैं प्रकट राहती उभी । अन्यथा अप्रतिबिंबीं । गुप्त होती ॥१९३॥ त्या विवाहमंडुपांत । होते प्रत्यक्ष उमाकान्त । यास्तव होती ते गुप्त । संकोचुनी ॥१९४॥ ) घेतां श्रीराम-दर्शन । सर्व लोक झाले मग्न । विसरले देहभान । जनका. परी ॥१९५॥ मुनींनीं मोदें त्या कालीं । सप्तपदी ती करविली । सर्व कर्में आटोपिलीं । दक्षिणेसह ॥१९६॥ रामें सीतेच्या शिरा-वर । भांगीं भरिला सिंदूर । शोभा ती अपरंपार । न वर्णवे ॥१९७॥ अमृत–लालसा धरून । पद्मीं भरी पराग अरुण । भूषवी चंद्रालागून । सर्प जणुं ॥१९८॥ ( श्रीराम–चंद्राचा भुज । तोच येथें सर्पराज । करकमलीं पुष्पराज । सिंदूर तो ॥१९९॥ सीतेचें मुख सुंदर । तोच येथें निशाकर । तत्सौंदर्यसुधा मधुर । अंतर्गत ॥२००॥ पाहूनिया चंद्राप्रत । कमल होय संकुचित । तैसा श्रीरामाचा हस्त । संकोच पावे ॥२०१ ॥) मग वशिष्ठ महा मुनि । आज्ञा देतां तत्क्षणीं । वधुवर ते एकासनीं । बैसते झाले ॥२०२॥ राम–सीता उभ–यतां । सुन्दर आसनीं बैसतां । झाला दशरथाच्या चित्ता । अत्यानंद ॥२०३॥ निज सुकृत्–वृक्षाप्रत । पाहून नूतन फलित । वारंवार रोमांचित । देह त्याचा ॥ २०४ ॥

आनंद भुवनीं भरला । 'श्रीरामाचा विवाह झाला' । सर्व समुदाय गर्जला । ऐशापरीं ॥२०५॥ वर्णू जातां तयाप्रत । रसना केंवि होय शक्त । मुख एक, आनंद बहुत । म्हणूनिया ॥२०६॥ वसिष्ठाचें आज्ञापन । जनकरायें स्वीकारून । लग्नसामुग्रीकारण । सिद्ध केलें ॥२०७॥ मांडवी आणि श्रुतकीर्ति । उर्मिला कन्यकाहि ती । या तीन्ही कुमारींप्रति । पाचारिलें ॥२०८॥ कुशकेतूची कन्यका। प्रथम मांडवी जी का। गुण–शील–शोभा–सुखा । अधिष्ठात्री ॥२०९॥ तियेसी विधिपूर्वक । प्रेमभरें अलौकिक। अर्पण करीतसे जनक । भरताप्रति ॥२१०॥ सीतेची धाकटी भगिनी। उर्मिला नामेंकरुनी । सकलसौंदर्यशिरोमणि । जाणूनिया ॥२११॥ तियेतें विधिपूर्वक । सन्मानून आत्यंतिक । अर्पण करीतसे जनक । लक्ष्मणाप्रति ॥२१२॥ तिजी श्रुतकीर्तिनाम्नी । जी सुमुखी, सुलोचनी। सकलहि गुणांची खनि । निजकन्यका ॥२१३॥ रूपशीलें सुविख्यात । तियेतें मिथिलानाथ । प्रमोदें शत्रुघ्नाप्रत । अर्पीतसे ॥२१४॥ अनुरूप वरांप्रत । पावून वधु आपसांत । संकोचती परि मुदित । हृदयांतरीं ॥२१५॥ लोकहि मुदित होती। सौंदर्यातें प्रशंसिती । पुष्पवर्षाव करिती। देव सारे ॥२१६॥ सुंदर वरांबरोबरी। तेव्हां चारीहि सुंदरी। एकाच मंडपाभीतरीं । विराजती ॥२१७॥ जणुं जीवाच्या अंतरीं । जागृत्यादि अवस्था चारी। बिश्वादिस्वामीबरोबरी । शोभतात ॥२१८॥ आपुले चारीहि सुत । निज वधुसमवेत । विलोकून दशरथ । आनंदला ॥२१९॥ जणु का अयोध्यानाथ । भक्त्यादि क्रियांसहित। चतुर्विध पुरुषार्थ । लाभलासे ॥२२०॥ (सोपानींचा मार्ग भला । जरी दीर्घतम वाटला । तदर्थ

सतरावा योजिला । विश्राम हा ॥२२१॥ रसिक भाविक श्रोत्यांस विनवीतसे देवीदास । माझ्या बोबड्या बोलांस । मान्य करा ॥२२२॥)

---

## विश्राम १८ वा

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्योनमः
श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः

रामाचा विवाहोत्सव । जैसा वर्णिला अभिनव । झालासे पुत्रांचा सर्व । त्याच थाटें ॥१॥ आंदण दिलें अमूप । सांगतां न ये त्याचें माप । भरून गेला मंडप । सुवर्ण-रत्नें ॥२॥ भारीचे दुशाले, शाल– । रेशमी वस्त्रें विपुल । ज्याचें न करवें मोल । करूं जातां ॥३॥ तुरंगम, गज, रथ । दास-दासीहि अमित । कामधेनु सालंकृत । त्याचपरीं ॥४॥ इतर अनेक पदार्थ । त्यांचें कोण करी गणित । ज्यांनीं पाहिलें विदित । त्यांसचि ते ॥५॥ पाहून आंदण विपुल । हेवा करिती लोकपाल । स्वीकारिलें रायें सकल । आनंदानें ॥६॥ सर्व वस्तु याचकांप्रत । दिधल्या ज्या जें इच्छित । आणिल्या मग उर्वरित । जानवशीं ॥७॥ सर्व वऱ्हाडी, सज्जन । त्यांचा करून संमान । प्रेमळ शब्दें कर जोडून । विदेह वदे ॥८॥ सादर देऊन दान-मान । विनयें करून स्तवन । सकल वऱ्हाडी जन । गौरविले ॥९॥ प्रसन्न होऊन मानसीं । वंदिलें मुनि-वृंदासी । पूजूनिया आदरेंसी । अति-प्रेमें ॥१०॥ नमवूनिया निज शिर । देवांस करी नमस्कार ।

सर्वांस जोडून कर । प्रार्थीतसे ॥११॥ "देव आणि साधु-संत । भावाचे असती क्षुधित । अंजुलिजलें काय तृप्त । सिंधु होय?" ॥१२॥ निज द्वयकर जोडून । बांधवांसहवर्तमान । दशरथ नृपालागून । जनकराज— ॥१३॥ स्वाभाविक शील-प्रेम । तेणें स्निग्ध, मनोरम, । मधुर शब्दें अनुपम । बोल-तसे ॥१४॥ "अहो! घडला राजन्! । आपुला संबंध अनन्य । त्यायोगें आज मी धन्य । सर्वतोपरीं ॥१५॥ राज्यवैभव सकलिक । हें आपुलेंच निःशंक । आपुला निष्काम सेवक । माना मज ॥१६॥ या चारीहि मत्कन्यका । मानून परिचारि-का । कृपानिधाना! सकलिकां। सांभाळावें ॥१७॥ मीं करूनिया धाडस । निमंत्रिलें आपणांस । क्षमा करावी दासास । अपरा-धाची" ॥१८॥ मग भानुकुलभूषणें । महाराज दशरथानें । जनकास संमानानें । गौरविलें ॥१९॥ प्रत्येकाचें अंतःकरण । झालें विनयप्रेमपूर्ण । तें करूं जातां वर्णन । अशक्य होय ॥२०॥ महाराज दशरथ । जानवसीं असतां जात । करिती देव समस्त। पुष्पवृष्टि ॥२१॥ नभीं, नगरीं विशेष । वाद्यघोष, जयघोष । वेदांसह घोष अशेष । एक झाले ॥२२॥ तैं वसिष्ठ मुनीश्वर । यांच्या आज्ञेनुसार । करिती सख्या सुंदर । मंगल गान ॥२३॥ वधूंसहवर्तमान । चारीहि वरांलागून । गौरीहराकडें घेऊन । जात्या झाल्या ॥२४॥ सीता पाहून रामाप्रत । बाह्यतां होय संकुचित । परि अंतरीं तच्चित्त । निःसंकोच ॥२५॥ प्रेम—तृषित तन्नयन । मत्स्याचें चंचलपण । घेत होते हिरावून । दृष्टिक्षेपें ॥२६॥ प्रभूचें श्याम शरीर । स्वभावें अति सुंदर । लावण्य लाजवी थोर । कोटिकामा ॥२७॥ पदपद्मसुशोभित । वरदायक अत्यंत । मुनिमनोभृंग जेथ । रुंजी

घाली ॥२८॥ पवित्र तो पीतांबर । शोभतसे मनोहर । विद्युत् बालभास्कर-। तेजास हरी ॥२९॥ किंकिणीरव मधुर । कटिसूत्र मनोहर । अति सुंदर अलंकार । विशाल भुज ॥३०॥ पीतवर्णी यज्ञोपवीत । दिसे रमणीय अत्यंत । हरण करिती मनाप्रत । करमुद्रिका ॥३१॥ लग्नप्रसंगाचा शृंगार । दिसे अतीव सुंदर । विशाल वक्षस्थलावर । भूषणें तीं ॥३२॥ काखेंतून । गुंडाळलेला । शोभतो पिवळा शेला । दोहींकडून गुंफिला । रत्नमौक्तिकें ॥३३॥ कमलासमान नेत्र । कानीं कुंडलें मनोहर । श्रीमुख तें माहेरघर । सौंदर्याचें ॥३४॥ भृकुटी वक्ररेखा । सरल सुंदर नासिका । सौंदर्य-विधान रेखा । भालतिलक ॥ ३५ ॥ मयूरपिच्छ मस्तकीं । शोभा देतसे निकी । मंडित मणि-मौक्तिकीं । मंगलमय ॥ ३६ ॥ मयूरपिच्छीं विपुल । रत्नें जडलीं बहुमोल । चित्ताकर्षक निखिल । शरीर तें ॥३७॥ देवांगना' पुर-युवती । पाहून त्या वरांप्रति । तृण तोडूनकाढिती । दुष्ट त्यांची ॥३८॥ रत्नें, वस्त्रें, भूषणें तीं । त्यांच्या-वरून ओवाळिती । करून आरति गाती । मंगल गीतें ॥३९॥ पुष्पें वर्षिती सुरगण । सूत, मागध, बंदीजन । त्यांचें सद्यश गर्जून । ऐकविती ॥४०॥ सुवासिनी सुख पावती । त्या सर्व वधुवरांप्रति । गौरीहराकडे येती । घेऊनिया ॥४१॥ प्रेमभरें अत्यंत । मंगल गीतें गात गात । करिती लौकिकी समस्त । रीतभात ॥४२॥ घांस देणें, विडे तोडणें । श्रीरामास पार्वतीनें । शिकविलें, सरस्वतीनें । सीतेप्रति ॥४३॥ हास्यविलास-रसांत । निमग्न राज्ञी समस्त । करिती तया क्षणांत । जन्मसार्थक ॥४४॥ लावण्यनिधान रघुनाथ । तन्मूर्ति प्रतिबिंबित । स्वकरींच्या

कंकणांत । विलोकुनी– ॥४५॥ विरहभयें सभीता । जानकी स्वभुजलता । धरून ठेवी तैं स्वतां । निश्चलपणें ॥४६॥ तें कौतुक, तो विनोद । तें प्रेम, तो प्रमोद । अवर्णनीय परि विशद । सखीजनां ॥४७॥ सुंदर सखिगण मिळुनी । त्या वधुवरांलागुनी । जानवशाकडें घेउनी । जाता झाला ॥४८॥ त्या अवसरीं विशद । ऐकूं येती आशीर्वाद । नभीं, पुरीं महदानंद । जेथें तेथें ॥४९॥ "चौघां सुंदर जोडींप्रत । आयु असो अखंडित" । म्हणूं लागले समस्त । प्रसन्न मनें ॥५०॥ देव–सिद्ध–योगींद्र-मुनि । या सर्वांनींहि मिळुनी । केला प्रभूसी विलोकुनी । वाद्य-गजर ॥५१॥ होऊन हर्षभरित । पुष्पवर्षाव करीत । जाती निज लोकांप्रत । जयजयकारें ॥५२॥ वधूसहवर्तमान । सर्व कुमार मिळून । करिती तैं आगमन । पित्यापाशीं ॥५३॥ शोभा-मंगलानंदाला । तेव्हां महापूर आला । जानवसा मग्न झाला । तयांतचि ॥५४॥ भोजनाचा महोत्सव । सर्वतोपरी अभिनव । निमंत्रण करी राव । वऱ्हाड्यांसी ॥५५॥ पायघड्या त्या अमित । वस्त्रें तीं उपमारहित । जातसे पुत्रांसहित । अयोध्या-धीश ॥५६॥ आदरें जनकराय । धूतसे सर्वांचे पाय । ताटांवरी यथायोग्य । बसवी तयां ॥५७॥ मग दशरथाचे पाय । प्रक्षाळी-तसे राय । तन्मनींचा अवर्णनीय । शीलस्नेह ॥५८॥ जे शिवहृत्कमळीं । सन्निविष्ट सर्वकाळीं । ते रामपदाब्ज प्रक्षाळी । मिथिलानाथ ॥५९॥ जाणून रामासमान । तिघांहि बंधूंचे चरण । स्वकरें करी प्रक्षालन । जनकराय ॥६०॥ सर्वांसहि जनकानें । यथोचित दिलीं आसनें । सर्व वाढप्यांकारणें । पाचारिलें ॥६१॥ तत्काल वाढपी येती । रत्नांचीं पानें मांडिती । चुका ज्यां लाविल्या असती । सुवर्णाच्या ॥६२॥ गायींचें घृतमिश्रित ।

शुद्ध, सुंदर, स्वादयुक्त। शिजविला दाळभात। यापरीं जो ॥६३॥ कुशल त्या वाढप्यांनीं। अतीव विनम्रपणीं। वाढिलासे एका क्षणीं। सर्वांप्रति ॥६४॥ पंचप्राणाहूति घेती। भोजनास आरंभिती। गान ऐकून तुष्ट होती। मर्मभेदी ॥६५॥ अनेकविध पक्वान्नें। मधुर सुधेप्रमाणें। वाढिलीं सर्वांकारणें। न वर्ण-वतीं ॥६६॥ वाढपी चतुर भारी। वाढिती वरचेवरी। व्यंजनें नानापरी। कोण जाणें ॥६७॥ सूपशास्त्रीं सुप्रसिद्ध। भोजन तें चतुर्विध। एकहि यथार्थ विशद। न वर्णवे ॥६८॥ व्यंजनें तैशीं सुरस। पक्वान्नेंहि षड्रस। प्रकारहि बहुवस। एके-काचे ॥६९॥ भोजन-प्रसंगीं तया। विनोद करिती स्त्रिया। मधुरस्वरें घेऊनिया। स्त्रीपुरुषनामें ॥७०॥ थट्टा ती समयोचित। शोभा देतसे अत्यंत। ऐकून समाजासहित। हांसे राव ॥७१॥ ऐशा समारंभानें। झालीं सर्वांचीं भोजनें। मग दिलीं आपोशनें। अत्यादरीं ॥७२॥ जनकें तांबूल देऊन। पुष्पहार समर्पून। परि-वारासहवर्तमान। पूजिला राव ॥७३॥ सकलभूप-शिरोमणि। मुदित मनीं होउनी। जानवशालागुनी। जाता झाला ॥७४॥ नित्यनूतन नगरीं। आनंद होय यापरीं। लोटती दिवसरात्रि। निमिषासम ॥७५॥ पंच पंच उषःकाल। होतांच उठे भूपाल। गातीं याचक सकल। तद्‌गुणांतें ॥७६॥ स्नुषांसहवर्तमान। निज पुत्रां विलोकून। मोद अनुभवी तन्मन। वर्णू कसें ?॥७७॥ प्रातःकर्मांतें सारुनी। भेटे वसिष्टालागुनीं। प्रेमप्रमोद तन्मनीं। आत्यंतिक ॥७८॥ प्रवंदून तयांप्रत। पूजा करी यथोचित। वदे जोडूनिया हस्त। अमृतवाणी ॥७९॥ "ऐका" म्हणे "मुनिराज!। तुमच्या कृपें मी आज। जाहलों असे सहज। पूर्णकाम ॥८०॥ प्रभो! आतां पाचारुनी। सर्वहि विप्रांलागुनी। धेनु द्याव्या

शृंगारूनी । सर्वतोपरीं" ॥८१॥ ऐसें ऐकून वचन । वसिष्ठें भूपा प्रशंसुन । धाडिलें तैं पाचारण । मुनिवृंदातें ॥८२॥ वामदेव आणि देवर्षि । नारद ही संज्ञा ज्यासी । वाल्मीकि तपोराशि । जाबालि तो ॥८३॥ तपःशील कौशिकादिक । मुनीश्वर जे प्रमुख । येते झाले सकलिक । शीघ्र तेथें ॥८४॥ दंडप्रणाम सर्वांप्रति । करी दशरथ भूपति । पूजून दे अतिप्रीतीं । श्रेष्ठासनें ॥८५॥ गुणें रूपेंकरून । ज्या कामधेनुसमान । गायी घेई आणवून । चार लक्ष ॥८६॥ सर्वतोपरीं अलंकृत । करून धेनु समस्त । हर्षे अर्पी दशरथ । विप्रवृंदां ॥८७॥ होऊन नतमस्तक । बोले विनयपूर्वक । "माझ्या जन्माचें सार्थक । आज झालें" ॥८८॥ घेऊन त्यांचे आशीर्वाद । मग भूपति सानंद । घेतसे याचकवृंद । पाचारुनी ॥८९॥ सुवर्णभूषणें, रत्नें । रथ, गज, हय, वसनें । दिलीं तद्रुचिप्रमाणें । दशरथानें ॥९०॥ "दिनकरकुलनाथाचा । असो जयजयकार साचा" । याचक गर्जून वाचा । जाते झाले ॥९१॥ ऐसा रामाचा अपूर्व । जाहला विवाहोत्सव । वर्णूं न शके वास्तव । शेष स्वयें ॥९२॥ धरून कौशिकचरण । स्वमस्तक नमवून । बोलला जनकवचन । वारंवार ॥९३॥ तुमचा कृपाकटाक्ष । प्रभाव त्याचा निरपेक्ष । मज लाभे हे प्रत्यक्ष । सर्वे सुख" ॥९४॥ जनकाचें प्रेम, स्वभाव । कर्तृत्व तैसें वैभव । प्रशंसीतसे राव । सर्वतोपरीं ॥९५॥ प्रभातीं उठून भूप । मागूं इच्छितां निरोप । जनक प्रेमे ससाक्षेप । ठेवून घेई ॥९६॥ नित्यनूतन सादर । अधिकाधिक सत्कार । होतसे पाहुणचार । सहस्रावधि ॥९७॥ नगरांत नित्यनव । होतसे आनंदोत्सव । दशरथप्रयाण वास्तव । न रुचे कुणा ॥९८॥ ऐशा प्रकारेंकरून । बहुत लोटले दिन । जणुं बद्ध सर्वजन ।

प्रेमरज्जूनें ॥९९॥ शेखीं शतानंदाप्रति । विश्वामित्र भेटती । ते समजावून सांगती । विदेहातें ॥१००॥ "जावयासी दशरथा । निरोप देणें योग्य आतां । प्रेम न येचि आवरीतां यद्यपि तुज" ॥१०१॥ "बरें महाराज" म्हणून । बाहिलें सचिवालागुन । त्यानें 'जयकार' करून । नमविलें शिर ॥१०२॥ "महाराज दशरथ । जाऊं इच्छिती सांप्रत । जाऊन कळवा निश्चित । अंतर्गृहीं" ॥१०३॥ ऐकतां जनकवचन । सचिवासह ब्राह्मण । भूपासवें सर्वजण । प्रेमवश ॥१०४॥ परत जातसे वरात । ऐकतां पौर समस्त । पुसती होऊन व्यथित । एकमेकां ॥१०५॥ सत्य गमन ऐकती । लोक उदासीन होती । कमळें जणुं कोमेजतीं । सायंकाळीं ॥१०६॥ येतेसमयीं वरात । मागे थांबली जेथ । बहुत प्रकारें तेथ । सिद्धता होय ॥१०७॥ मेवे-मिठाई-इत्यादिक । तयांचे प्रकार अनेक । सामग्रीसह मुत्पाक । वर्णनातीत ॥१०८॥ सामुग्री वृषभावरी । भरून धाडिले बिगारी । अनेक धाडिले आचारी । जनकरायें ॥१०९॥ पंचवीस सहस्र रथ । लक्ष तुरंगासहित । सर्वहि नखशिखांत । शृंगारिले ॥११०॥ दशसहस्र ज्यांची मिति । दिले मदोन्मत्त हस्ति । ज्यांतें पाहून लाजती । दिक्कुंजर ॥१११॥ गाड्या भरून वसनें । दिधलीं सुवर्ण-रत्नें । महिशी, धेनु त्याप्रमाणें । नानावस्तु ॥११२॥ ज्यांचें गणित न करवें । वर्णू जातां न वर्णवे । ऐसें आंदण प्रेमभावें । जनकें दिलें ॥११३॥ पाहूनिया जयाप्रति । लोकपालांच्याहि चित्तीं । वाटली निज संपत्ति । अत्यल्पचि ॥११४॥ ऐसी देणगी बहुवस । सिद्ध करून मिथिलेश । देता झाला अयोध्येस । पाठवुनी ॥११५॥ वरात चालली परत । ऐकतां राज्ञी समस्त । व्याकुल अल्पजलांत । मीनांपरीं ॥११६॥

वारंवार सीतेप्रति । राज्ञी त्या ओसंगीं घेती । बोध करूनिया देती । आशीर्वाद ॥११७॥ "प्रिय होई पतिव्रत । त्वत्सौभाग्य अखंडित । आमुचा तुज संतत" । आशीर्वाद हा ॥११८॥ "सासु, श्वशुर, गुरुजन । यांचें करी गे ! सेवन । पति–मनोगत जाणून । तदाज्ञा पाळी" ॥११९॥ प्रेमवश होऊन अति । सुज्ञ सख्या सीतेप्रति । प्रेमशद्बें शिकविती । नारीधर्म ॥१२०॥ सर्व राज्ञी प्रेमयुक्त । मुलींची करिती समजूत । निजहृदयीं तयांप्रत । कवटाळुनी ॥१२१॥ वारंवार कन्येप्रति । माता भेटून म्हणती । कशास निर्मिली स्त्रीजाति । विधात्यानें ॥१२२॥ रविकुला भूषणभूत । त्या समयीं श्रीरघुनाथ । तिघां बांधवां समवेत । घेऊनिया– ॥१२३॥ सर्वांचा निरोप घ्याया । जनकमंदिरीं जावया । मनीं आनंद मानूनिया । निघालासे ॥१२४॥ चौघे निसर्गसुंदर । पहावया डोळांभर । धांवत सुटले नारीनर । नागरिक ॥१२५॥ कुणी म्हणती आपसांत । "जाऊं इच्छिती सांप्रत । सिद्धता करी नृपनाथ । निरोपाची ॥१२६॥ हे चारीहि राजसुत । पाहुणे प्रिय अत्यंत । पाहूं यांच्या रूपांप्रत । डोळांभरी ॥१२७॥ पूर्व पुण्याई कोणती । येथें आणवूनि यांप्रति । केले नेत्रांचे अतिथि । विधात्यानें ॥१२८॥ आसन्न-मरणाप्रत । जैसें लाभावें अमृत । जन्मक्षुधिता व्हावा प्राप्त । कल्पवृक्ष ॥१२९॥ अत्यंत पापी मानवा । हरिपदाचा लाभ व्हावा । यांचें दर्शन आम्हांस सर्वा । तैशापरीं ॥१३०॥ राम-रूप डोळेभरीं । पाहून सांठवा अंतरी । वसवा मनःसर्प–शिरीं । मूर्त मणी ॥१३१॥ ऐशापरी सर्वांप्रत । नेत्रसाफल्य वितरित । गेले राजमंदिरांत । कुमार ते ॥१३२॥ रूपसिंधु बंधु चारी । पाहूनिया हर्षभरीं । देती स्त्रिया अंतःपुरीं । उत्थापन ॥१३३॥

त्या सर्व सासवांप्रति । महदानंद होय चित्तीं । दृष्ट काढून ओवाळिती । चौघांसहि ॥१३४॥ रामरूप विलोकुनी । अति प्रेमा दाटे मनीं । प्रेमवश लागती चरणीं । पुनःपुन्हां ॥१३५॥ लज्जा पावली उपरमा । हृदयीं दाटला प्रेमा । वर्णितां त्या अकृत्रिमा । न वर्णवें ॥१३६॥ सर्वहि बंधूंकारणें । घालून अभ्यंग स्नानें । प्रेमें षड्रस-पक्वान्नें । जेवूं घालिती ॥१३७॥ जाणून योग्य समय । शील-स्नेह-संकोचमय । काय तेव्हां रघुराय । बोलतसे ॥१३८॥ "महाराज कोसलाधीश । जाऊं इच्छिती अयोध्येस । निरोप घ्याया आम्हांस । धाडिलें त्यांनीं ॥१३९॥ तरी मातुश्री ! आम्हांप्रति । आज्ञा असावी संप्रति । बालक जाणूनि प्रीति । असूं द्यावी" ॥१४०॥ वचन ऐकून ऐसें । विकल अंतःपुर होतसे । सासवांतें प्रेमवशें । बोलवेना ॥१४१॥ कन्येसी कवटाळिती । तत्पतीतें सोंपविती । त्यांची प्रार्थना करिती । नम्र भावें ॥१४२॥ स्वाधीन करून सीता । कर जोडून रघुनाथा । पुनःपुन्हां विनवी माता । सुनयना ॥१४३॥ "सुज्ञा ! काय कथूं तूतें । ही मी अलाबला घेतें । सर्वांचीहि मनोगतें । जाणसी तूं ॥१४४॥ नागरिक-परिवाराची । माझीहि, महाराजांची । सीता ही प्राणप्रिय साची । जाणूनिया- ॥१४५॥ लक्षून शील-स्नेहासी । आज-पासून तिजसी । आपुली अनन्य दासी । मानून घे ॥१४६॥ तूं तों ज्ञानशिरोमणि । परिपूर्णकाम स्वमनीं । केवळ तुज-लागुनी । भावचि प्रिय ॥१४७॥ तूं स्वजन गुणग्राहक । सकल दोषनिवारक । असती परम कारुणिक । राघवेंद्रा !" ॥१४८॥ राज्ञी बोलून यापरीं । रामपदा मिठी मारी । जणुं रुतली वैखरी । प्रेमपंकीं ॥१४९॥ सस्नेह श्लाघ्य भाषण । ऐकून

रघुनंदन । गौरवी सासूलागून । बहुप्रकारें ॥१५०॥ राघवें जोडून हस्त । आज्ञा मागितली त्वरित । करूनिया प्रणिपात । वारंवार ॥१५१॥ शेवटीं करून वंदन । तदाशीर्वाद घेऊन । बंधुसहवर्तमान । परते राम ॥१५२॥ रामाची रमणीय मूर्ति । आठवून निज चित्तीं । प्रेमानें शिथिल होती । सर्व राज्ञी ॥१५३॥ परि मनीं धैर्य धरिती । निज कन्येतें बाहती । तीतें हृदयीं आलिंगिती । वारंवार ॥१५४॥ थोडें पोंचवीतां दूर । पुन्हां भेटती परस्पर । प्रेम तेणें वरचेवर । वृद्धिंगत ॥१५५॥ पुनः–पुन्हां सख्यांप्रति । त्या राजकन्या भेटती । बाल वत्स जैशा रीतीं । धेनुप्रति ॥१५६॥ सख्यांसह राज्ञी विशेष । नागरिक स्त्री–पुरुष । होते झाले प्रेमवश । तदवसरीं ॥१५७॥ तदा मिथिला नगरांत । विरहें कारुण्यासहित । निवासस्थान निश्चित । केलें जणुं ॥१५८॥ सीतेनें ज्या पाळिल्या । परोपरीं शिकविल्या । सुवर्णपंजरीं ठेविल्या । शुक–सारिका ॥१५९॥ "कुठें सीता" विचारिती । व्याकुलतेनें आक्रोशती । ऐकतां कुणाची धृति । गळणार नाहीं ?॥१६०॥ खगमृग त्याच रीतीं । विरहें व्याकुल होती । मग मानवाची स्थिति । काय वर्णूं ?॥१६१॥ बंधूसहित नंतर । आला जनक नृपवर । प्रेम उचंबळून नेत्र । अश्रुपूर्ण ॥१६२॥ पाहूनिया सीतेप्रति । पळाली तयाची धृति । "परम विरक्त" उरती । शब्द मात्र ॥१६३॥ तेणें जानकीलागून । धरिलें पोटीं कवटाळून । संपुष्टांत आलें ज्ञान । अमर्याद ॥१६४॥ सुज्ञ–चतुरीं जनक । जाणवितां करी विवेक । शोक अप्रासंगिक । जाणूनिया ॥१६५॥ कन्येप्रति वारंवार । धरी पोटीं नृपवर । मागवी पालखी सुंदर । शृंगा-रमी ॥१६६॥ सर्व कुटुंब परिवार । प्रेमें विवश निर्भर ।

पाहून मुहूर्त सुंदर । जनकराज-- ॥१६७॥ स्मरून सिद्धि-
विनायका । लाडक्या निज कन्यका । बसवीतसे सकळिका ।
पालखींत ॥१६८॥ परोपरीं भूपति । शांतवी कन्यकांप्रति ।
नारीधर्म, कुलरीति । समजावुनी ॥१६९॥ ज्या आवडत्या
सीतेसी । विश्वासू दास--दासी । समागमें देई त्यांसी । विदेह
तो ॥१७०॥ चालली जैं सीतासती । नागरिक व्याकुल चित्तीं ।
शुभ शकुन तैं होती । मंगलप्रद ॥१७१॥ सचिव, विप्र अनेक ।
परिवार कौटुंबिक । घेऊन चालला जनक । पोंचवावया ॥१७२॥
जाणून सुअवसर । होतसे वाद्यगजर । वऱ्हाडयांनीं रथाश्व-
कुंजर । सिद्ध केले ॥१७३॥ त्या समयीं दशरथानें । सर्व
ब्राह्मणांकारणें । बाहूनिया दान--मानें । तृप्त केलें ॥१७४॥
तत्पदाब्जरजःकण । मस्तकीं केले धारण । आशीर्वादातें घेऊन ।
प्रसन्न मनें ॥१७५॥ करून गणेशस्मरण । रायें करितां प्रयाण ।
होती अनेक शकुन । मंगलप्रद ॥१७६॥ होऊन हर्षनिर्भर ।
पुष्पें वर्षिती सुरवर । गायन चालें मधुर । अप्सरांचें ॥१७७॥
दशरथ अयोध्यापति । चालला अयोध्येप्रति । नाना वाद्यें
वाजविती । आनंदानें ॥१७८॥ रायें विनयपूर्वक । परतविले
थोर लोक । बाहिले सर्व याचक । आदरानें ॥१७९॥ गजाश्व-
वस्त्रेंभूषणें । देऊन अतिप्रेमानें । त्या सर्वांहिकारणें ।
राहविलें ॥१८०॥ रघुवंशाची महति । वारंवार प्रशंसिती ।
हृदयीं धरून राममूर्ति । परतले ते ॥१८१॥ पुन्हःपुन्हां विनय-
युक्त । सांगतांहि दशरथ । जनक जाई परत । प्रेमवशें ॥१८२॥
पुन्हां म्हणे प्रेमयुक्त । "आतां जावें हो! परत । आलां आपण
दूर बहुत । महिपते! ॥१८३॥ शेखीं उतरून खालतीं ।
उभा राहिला भूपति । प्रेमाश्रुधारा वाहती । नेत्रांतुनी ॥१८४॥

तेधवां कर जोडून । विदेह बोले वचन । ज्यांत प्रेमामृत पूर्ण । भरलें जणुं ॥१८५॥ कोणा प्रकारें कळेना । करूं आपुली प्रार्थना । दिला मजला थोरपणा । महाराज !"॥१८६॥ अयोध्येच्या नृपवरें । सज्जन व्याही आदरें । तेधवां सर्व प्रकारें । सन्मानिला ॥ १८७ ॥ दोघे एकमेकांप्रत । भेटले विनयें अत्यंत । प्रेम त्यांच्या हृदयांत । मावेचि ना ॥१८८॥ जनकानें मुनिवृंद । नमस्कारिले विशुद्ध । त्या सर्वांचे आशीर्वाद । संपादिले ॥१८९॥ अति आदरेंकरून । भेटे जामातांलागून । रूप–शील–गुण–निधान । बांधव जे ॥१९०॥ सुंदर कमलहस्त । जोडून मिथिलानाथ । बोले, प्रकटलें ज्यांत । मूर्त प्रेम ॥१९१॥ "मुनि–महेशाचें मानस । तेथींचा तूं राजहंस । तुज रघुकुलावतंस ! । कैसें स्तवूं ? ॥१९२॥ प्राप्त कराया ज्यालागीं । योग करीतसे योगी । क्रोध–मोह–मद त्यागी । ममतेसह ॥१९३॥ जें व्यापक परब्रह्म । अलक्ष्य, शाश्वत परम । जें निर्गुण, गुणधाम । चिदानंद ॥१९४॥ वाणीसह जया मन । जाणायातें समर्थ न । तर्कूं न शकती पूर्ण । नैय्यायिक ॥१९५॥ वेद "नेति नेति" म्हणून । गाती ज्याचें महिमान । त्रिकालींहि जो समान । एकरस ॥१९६॥ तो सर्व सुखांचें मूल । परमात्मा दीनदयाल । झालास मज केवल । दृष्टिगोचर ॥१९७॥ ईशकृपेनें राघवा ! । संसारींच्या सर्व जीवां । सुलभ झालास बरवा । भेटाया तूं ॥१९८॥ सर्व प्रकारेंकरून । दिलें मातें मोठेंपण । मानून मजलागून । निज सेवक ॥१९९॥ दशसहस्र सरस्वती । तितुकेच शेष मिळती । कल्पकोटिवरी करिती । लेख जरी – ॥२००॥ तरी ऐकें रघुनाथा ! । माझें सद्भाग्य सर्वथा । वर्णणें तव गुणगाथा । शक्य नोहें ॥२०१॥ मी जे

का बोलतों बोल । त्या माझें एकचि बल । कीं तूं वश होसी केवल । अल्पप्रेमें" ॥२०२॥ मग तो कर जोडून । म्हणे "रामा! तुझे चरण । कदा न सोडो माझें मन । चुकूनहि" ॥२०३॥ प्रेमातें परिपोषित । ऐकून जनकभाषित । संतोषला रघुनाथ । पूर्णकाम ॥२०४॥ पिता, कौशिक, वशिष्ठ । यांसम मानून वरिष्ठ । विनयें गौरवी रघुश्रेष्ठ । श्वशुराप्रति ॥२०५॥ मग जनकें त्या काला । विनयें भरत प्रार्थिला । प्रेमें भेटून दिधला। आशीर्वाद ॥२०६॥ लक्ष्मण-शत्रुघ्नांप्रति । भेटूनिया तो भूपति। आशीर्वाद त्याच रीतीं । देता झाला ॥२०७॥ परस्पर एक-मेक । प्रेमवश आत्यंतिक । नमवूं लागले मस्तक । पुनः-पुन्हां ॥२०८॥ वारंवार विनयपूर्ण । परस्पर प्रशंसून । बंधु-सहवर्तमान । चाले राम ॥२०९॥ विश्वामित्राचे चरण । जनक धरी जाऊन । स्नापी स्वशिर–नयन । पादरजें ॥२१०॥ "तुमच्या दर्शनें मुनिवरा !। दुर्लभ कांहीं नसे नरा । अनुभव आलासे पुरा । मन्मनासी ॥२११॥ जें सुख, यश निर्मल । इच्छितात लोकपाल । मनोरथ करितां केवल । संकोचती-॥२१२॥ तें सुख, तें सद्यश मी । सहज लाभलों स्वामी !। युष्मद्दर्शना-नुगामी । सर्व सिद्धि" ॥२१३॥ पुनःपुन्हां मिथिलानाथ । करून विनयें प्रणिपात । घेऊनिया निघे परत । आशीर्वाद ॥२१४॥ असो, तें वाद्यगजरांत । चालूं लागली वरात । मुदित झाले समस्त । सानथोर ॥२१५॥ नरनारी, नागरिक । विलोकून रघुनायक । मानून नेत्र–सार्थक । हृष्ट झाले ॥२१६॥ जातां जातां मध्यें पथीं । थांबून घेत विश्रांति । तेथील जनतेप्रति । सुख देत– ॥२१७॥ एके दिनीं सुमूहूर्तीं । अयोध्येच्या निकट-वर्ती । पोंचलीसे वरात ती । येऊनिया ॥२१८॥ ( सोपानींचा

मार्ग भला । जरी दीर्घतम वाटला । तदर्थं अठरावा योजिला । विश्राम हा ॥२१९॥ रसिक भाविक श्रोत्यांस । विनवीतसे देवीदास । माझ्या बोबड्या बोलांस । मान्य करा ॥२२०॥)

---

## विश्राम १९ वा

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्योनमः
श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः

चौघडे नगारे वाजती । शंख, भेरी, निनादती । गजाश्व त्यापरीं करिती । गर्जनेस ॥१॥ झांज, डमरू, मृदंग । वाजूं लागले अव्यंग । निघतसे सुरस राग । सनईतुनी ॥२॥ आली ऐकून वरात । अयोध्येचे जन मुदित । देह झाले रोमांचित । सर्वांचेहि ॥३॥ चव्हाटे, राजमार्ग, हाट । नगर, वेशी, बाह्य वाट । आपापलीं गृहें उत्कृष्ट । शृंगारिती ॥४॥ भीतरीं चाळी-चाळींत । केली अगंजा सिंचित । ओटे बांधिले सुशोभित । ठायीं ठायीं ॥५॥ ध्वज, पताका, तोरणें । लावून केलीं वितानें । त्या हाटाप्रति वर्णणें । शक्य नोहें ॥६॥ पोफळी, कर्दळी, बकुल । आम्र, कदंब, तमाल । रोविले वृक्ष विपुल । फळां-सह ॥७॥ झाडें सुंदर लाविलीं । फलभारें लवतीं खालीं । भोंवतीं रत्नांचीं अळीं । कौशल्ययुक्त ॥८॥ प्रतिगृहीं त्याच-परीं । मंगल कलश द्वारीं । रचना केली बहुपरीं । शृंगा-रुनी ॥९॥ ऐसी ती रामनगरी । पाहूनिया डोळेभरी । वास्त-

णिती बहुपरीं । ब्रह्मादि देव ॥१०॥ राजमंदिर अत्यंत । केलें तेव्हां सुशोभित । रचना बघून काम-चित्त । मुग्ध होय ॥११॥ शकुन मंगलकारक । सौंदर्य तें अलौकिक । संपत्ति, सुभग सुख । ऋद्धि, सिद्धि ॥१२॥ ऐसा परिवार सारा । धरून सुंदर शरीरा । दशरथाच्या मंदिरा । पातला जणुं ॥१३॥ श्रीसीतारामचंद्रासी । पहावें, लालसा ऐसी । सांगा कुणाच्या मानसीं । होणार नाहीं ?॥१४॥ मदनातें लाजविती । ऐशा स्त्रिया विलासवती । तयांचे मिळून येती । थवेच्या थवे ॥१५॥ सिद्ध करून आरति । सर्व मंगलाचार गाती । जणु घेतसे सरस्वती । नाना रूपें ॥१६॥ राजमंदिरांत भली । एकच गर्दी उसळली । जें सुख होय त्या कालीं । न वर्णवें तें ॥१७॥ प्रेमें विवश होऊन । विसरल्या देहभान । कौसल्याआदिकरून । राममाता ॥१८॥ शिव-गणेशा पूजिती । विप्रांलागीं पाचारिती । त्या समयीं दानें देती । अपरिमित ॥१९॥ चतुर्विध पुरुषार्थ । जणुं काय झाले प्राप्त । तेणें होय प्रमुदित । जन्मदरिद्री ! ॥२०॥ त्या प्रेमानंदीं सकल । मग्न माता, गात्रें शिथिल । त्यायोगें न पडे पाऊल । वेगें पुढें ॥२१॥ श्रीरामदर्शना चित्तीं । अति उत्कंठित होती । सामुग्री सिद्ध करिती । आरतीची ॥२२॥ विविध वाद्यें वाजतीं । प्रसन्न होऊन चित्तीं । सुमित्रा मंगलारति । सिद्ध करी ॥२३॥ हरिद्रिका, दधि, दुग्ध । पुष्प, पल्लव नानाविध । पूगीफल मोदप्रद । नागवल्ली ॥२४॥ हरिद्राकुंकुमें मंडित । सुवर्णकलश सुशोभित । संकोचें कामें केलें त्यांत । नीड जणुं ॥२५॥ (रामरूप पहायासी । उत्सुकता मदनासी । परि लाजून कलशीं । लपून बसे ॥२६॥) शुभप्रद सुगंधित । पदार्थ वर्णनातीत । ठेविती राज्ञी समस्त । मंगल द्रव्यें ॥२७॥ नानापरीची आरति ।

सिद्ध करूनिया प्रीतीं । आनंदें सुस्वरें गाती । मधुर गीतें ॥२८॥ मंगल द्रव्यं नानापरीं । भरूनिया हेमपात्रीं । माता निज पद्मकरीं । घेऊनिया– ॥२९॥ ओवाळावया त्वरित । चालल्या होऊत मुदित । रोमांचपल्लवें मंडित । देह त्यांचा ॥३०॥ धूप-धूम्र नभांतरीं । कृष्णवर्ण मेघापरी । जणुं मेघ दाटले भारी । श्रावणींचे ॥३१॥ कल्पवृक्षसुमवर्षाव । करिती त्या समयीं देव । जणुं चित्ताकर्षक सर्व । बलाकपंक्ति ॥३२॥ सुंदर आणि मणिमय । तोरणें तीं रमणीय । इंद्रधनुष्यें जणु काय । पसरलीं तीं ॥३३॥ उपरी वरती युवती । कधीं गुप्त, कधीं प्रकटती । चंचलोज्ज्वल चमकती । चपला जणुं ॥३४॥ दुंदुभीचा नाद घोर । मेघगर्जनेपरी थोर । चातक, दर्दुर, मयूर । याचक ते ॥३५॥ शुचि, सुगंधित सम्यक् । वृष्टि करिती वृंदारक । सुखी सर्व नागरिक । पिकें तैसीं ॥३६॥ मग सुमुहूर्त पाहुनी । आज्ञा देतां वसिष्ठांनीं । पुरीं रघुकुल मणि । प्रवेश करी ॥३७॥ शिव-गौरी, गणनाथ । यांतें स्मरून हृदयांत । सपरिवार दशरथ । हृष्ट होय ॥३८॥ शुभ शकुन होती फार । पुष्पें वर्षती सुरवर । करुनी वाद्यगजर । दुंदुभीचा ॥३९॥ तैसाच अप्सरा-गण । मंगल गीतें गाऊन । करूं लागला नर्तन । आनंदानें ॥४०॥ कुशल मागध, सूत, । बंदी, नट असंख्यात । गाती त्रिलोक–विख्यात । रामयश ॥४१॥ निर्मलसा जय-घोष । वेदध्वनिहि विशेष । ऐकूं येई, दिशा दश । आनंद-युक्त ॥४२॥ अनेक वाद्यें वाजतीं । नभांतरीं सुरपंक्ति । तैसेंचि प्रसन्न होती । नागरिक ॥४३॥ वरातीचा थाट बहुत । केवल वर्णनातीत । सुख न मावे हृदयांत । अत्यानंदें ॥४४॥ मग प्रजाजन सारे । दशरथा करिती मुजरे । आनंदले हर्षभरें ।

बघून रामा ॥४५॥ रत्नें, वस्त्रें त्यावरून । टाकूं लागले ओवा-ळून । प्रेमानें सजल नयन । पुलकित देह ॥४६॥ सुंदर कुमारां-प्रति । पाहून नगरयुवती । मुदित होती, ओवाळिती । हर्ष-भरें ॥४७॥ त्या भाग्यवती कामिनी । शिबिकांचे पडदे सारुनी । सर्व वधूंतें विलोकुनी । सुखी होती ॥४८॥ असो, तेव्हां ऐशा रीतीं । सुखवीत सर्वांप्रति । सर्वंहि मिळुनी येती। राजद्वारीं ॥४९॥ हृष्ट होऊनिया चित्तीं । वधूंसह पुत्रांप्रति । सर्व माता ओवाळिती। तया क्षणीं ॥५०॥ करीं घेऊन आरति। वारंवार ओवाळिती । कोण प्रेमानंदाप्रति । वर्णूं शके ? ॥५१॥ रत्नें, वस्त्रें अलंकार । त्यांचे विविध प्रकार । टाकिती वरचेवर । ओवाळुनी ॥५२॥ वधूंसहवर्तमान । चारी पुत्रां विलोकून । परमानंदीं निमग्न । सर्व माता ॥५३॥ सीता–रामाच्या सौंदर्या । पुनःपुन्हां बघूनिया । जन्मसाफल्य मानूनिया । आनंदती ॥५४॥ सीतामुखावलोकना । सख्या इच्छिती पुनःपुन्हां । करून पुण्याच्या शंसना । गीत गाती ॥ ५५ ॥ क्षणो क्षणीं देवगण । पुष्पवर्षाव करून । करूं लागले सेवन । नृत्य-गानें ॥५६॥ रमणीय युगुल चारी । पाहूनिया वागीश्वरी । पाही उपमा परोपरी । धुंडाळुनी ॥५७॥ उपमा वाटून गौण । रूपींच गेली रंगून । अवलोकी टक लावून । एकसारखी ॥५८॥ केले शास्त्र कुलाचार । अर्घ्य दिले, मार्गावर । घातल्या अति सुंदर । पायघड्या ॥५९॥ वधूंसहवर्तमान । चारी पुत्रां ओवाळून । माता चालल्या घेऊन । अंतःपुरीं ॥६०॥ चौघां चार सिंहासनें । मांडिलीं सुंदरपणें । सिद्ध केलीं स्वहस्तानें । मदनें जणुं ॥६१॥ त्यांतें सादर आणून । सिंहासनीं बैसवून । त्यांचे पवित्र चरण । प्रक्षाळिती ॥६२॥ धूप-दीप-नैवेद्यादि ।

अनुसरून वेदविध्रं । पूजिले मंगलनिधि । वधुवरांतें ॥६३॥ वारंवार ऐशा रीतीं । त्यांची करून आरति । पंखे, चवऱ्या ढाळिती । मस्तकावरी ॥६४॥ नाना वस्तु त्यांवरून । टाकिती त्या ओवाळून । शोभती आनंदपूर्ण । सर्व माता ॥६५॥ (उत्तर-देशीं भारतीं । सामन्यतां ऐशी रीती । वरातीसवें न जाती । गृहस्त्रिया ॥६६॥ कौसल्यादि राज्ञीगण । सख्यांसहवर्तमान । गेल्या नसती मिळून । मिथिलापुरा ॥६७॥ अपूर्व लग्नसोहळा । त्यांनीं नव्हता पाहिला । म्हणून हर्ष दाटला । शतपट येथ ॥६८॥ वधूंसहवर्तमान । पुत्रां एकत्र पाहून । सांप्रत धालें तन्मन । अत्यानंदें ॥६९॥) परम तत्त्वाची प्राप्ति । झाली जणुं योग्यां-प्रति । आलें दीर्घ रोग्या-हातीं । अमृत जणुं ॥७०॥ जन्मदरि-द्र्यास भली । परिसाची प्राप्ति झाली । किंवा अंधास लाभली । दिव्यदृष्टि ॥७१॥ मूकाच्या रसनेवरी । जणुं बसे वागीश्वरी । विजय लाभे समरीं । शूरास जणुं ॥७२॥ या सर्वहि सुखांहुनी । अधिक शतकोटिगुणीं । मातांच्या अंतःकरणीं । वाटे सुख ॥७३॥ भ्रात्यांसहवर्तमान । स्वयें विवाहित होऊन । गृहीं आला परतून । रघुकुलचंद्र ॥७४॥ जेधवां लौकिकाचार । माता करिती समग्र । लाजूं लागले वधुवर । तया काळीं ॥७५॥ विनोदसुख-सोहळा । अवलोकून सगळा । हांसूं लोटे घननीळा । मनांतुनी ॥७६॥ देवपितरांचें पूजन । केलें पुण्याहवाचन । झाल्या सर्वांच्या पूर्ण । मनःकामना ॥७७॥ सर्वांसी नमस्कारून । मागती त्या वरदान । होवो रामाचें कल्याण । बांधवांसह ॥७८॥ नभांतून देववृंद । देती तेव्हां आशीर्वाद । पदर पसरून सानंद । घेती माता ॥७९॥ वऱ्हाडी जनांकारणें । पाचारून दशरथानें । वसनें, भूषणें, रत्नें । समर्पिलीं ॥८०॥ भूपाची अनुज्ञा घेती ।

चित्तीं ठेवून राममूर्ति । सर्वहि स्वगृहा जाती । आनंदानें ॥८१॥ नागरिक नारीनर । झाला सर्वांस आहेर । धन्यवाद घरोघर । गर्जती लोक ॥८२॥ जें जें वांछिती याचक । तें तें अयोध्या-नायक । पुरवीतसे सकलिक । आनंदानें ॥८३॥ जितुके होते सेवक । वाजंत्री तैसे अनेक । दानसंमानें सकलिक तृप्त करी ॥८४॥ सर्वहि मुजरे करिती । भूपा आशीर्वाद देती । नानापरीचे वर्णिती । गुणानुवाद ॥८५॥ गुरुवसिष्ठ, विप्रगण । यांच्यासह-वर्तमान । प्रवेशे अजनंदन । मंदिरांत ॥८६॥ वसिष्ठांच्या आज्ञेनुसार । वेदाचार, लोकाचार । भूपानें केले सादर । यथासांग ॥८७॥ ब्राह्मणांचा समुदाय । जमला पाहून अतिशय । उठल्या राज्ञी, भाग्योदय । मानूनिया ॥८८॥ सर्वां पाद प्रक्षाळून । घातलें अभ्यंग स्नान । रायें पूजून भोजन । दिलें तयां ॥८९॥ अत्यादरें, प्रेमें, दानें । तुष्ट केलें भूपानें । ते जाती प्रसन्न मनें । देऊन आशीर्वाद ॥९०॥ नाना प्रकारें करून विश्वामित्रातें पूजून । म्हणे, "नाथा! मज्जसमान । धन्य न कुणी" ॥९१॥ भूपति तैं परोपरी । गाधिजाची स्तुति करी । स्त्रियांसह शिरीं धरी । पादधूलि ॥९२॥ सुस्थळीं स्वमंदिरांत । वास देई मुनिप्रत । सेवा करी स्त्रियांसहित । मनःपूर्वक ॥९३॥ वसिष्ठांचें पदकमल । पूजिता झाला भूपाल । प्रार्थना करी प्रांजल । अतिप्रेमें ॥९४॥ बंधूंसहवर्तमान । सर्वहि राजनंदन । स्वयें भूपति आपण । राज्ञींसह– ॥९५॥ वसिष्ठ चरणांप्रति । वारंवार प्रवंदिती । मुनीश्वरहि देती । आशीर्वाद ॥९६॥ भूप प्रेमयुक्त चित्तीं । वसिष्ठांची करी स्तुति ठेवी सर्वस्व पुढतीं । पुत्रवित्तादि ॥९७॥ मुनिनायक त्यांतुनी । घेती दक्षिणा मागुनी । देती बहु प्रकारांनीं । आशीर्वाद ॥९८॥

सीतेसह राममूर्ति । दृढ धरूनिया चित्तीं । सद्‌गुरु स्वस्थळीं जाती । आनंदानें ॥९९॥ मग विप्रवधूंप्रत । बोलावून नृपनाथ। वस्त्रालंकारें मंडित। करीतसे ॥१००॥ मग सुवासिनींकारणें। पाचारून भूपतीनें । दिलीं वस्त्रप्रावरणें । इच्छेनुसार ॥१०१॥ मग वृत्तिवंत येती । योग्यतेनुरूप मागती । इच्छेनुसार भूपति देई तयां ॥१०२॥ पूज्य प्रिय पाहुणे सर्व । यांचा यथायोग्य गौरव । करिता झाला राव । अयोध्याधीश ॥१०३॥ रामविवाह पाहून । उत्सवातें प्रशंसून । करूं लागले देवगण । पुष्प-वृष्टि ॥१०४॥ देव निज लोकांप्रत । थाटानें वाद्य--गजरांत । जाऊं लागले हर्षित । होऊनिया ॥१०५॥ परस्पर आपसांत । गाती रामयशाप्रत । प्रेम त्यांचें हृदयांत । समावे ना ॥१०६॥ सर्वांतें सर्व प्रकारें । संमानिलें राजेश्वरें । तो आनंद पूर्ण भरे । हृदयांतरीं ॥१०७॥ मग अंतःपुरीं राय । जाऊन ठेवितां पाय । विलोकी सर्व तनय । वधूंसह ॥१०८॥ तेधवां त्या नृपनाथें । अंकीं घेतलें पुत्रांतें । त्याच्या सुखानुभवातें । कोण वर्णी? ॥१०९॥ स्नुषांतें लडिवाळपणें । ओसंगीं घेऊन भूपानें । कौतुक केलें हृष्ट मनें । वारंवार ॥११०॥ अंतःपुरीं एकंदर । स्त्रीजनांचा परिवार । हृदयीं हर्षनिर्भर । पाहूनिया ॥१११॥ भूपें विवाह वृत्तांत । निवेदिला इत्थंभूत । ऐकून हर्षभरित । सर्व होती ॥११२॥ जनकराजाचे गुण । शील तैसें मोठेपण । प्रेमरीति, शोभा पूर्ण । वैभवाची ॥११३॥ यांचें वर्णन बहुपरीं । भूप भाटापरीं करी । ऐकतां हृष्ट अंतरीं । सर्व राज्ञी ॥११४॥ पुत्रांसहवर्तमान । भूपानें करून स्नान । गुरु, ब्राह्मण, स्वजन । पाचारिले ॥११५॥ नाना पक्वान्नें करून । त्यांसह केलें भोजन । तों रात्र गेली लोटून । पांच घटिका ॥११६॥ सुंदर स्त्रिया मिळून । करिती

मंगल गायन । रात्र वाटली मनोज्ञ । सुखकारक ॥११७॥
आंचवल्यावरी पुढें । दिले सर्वांप्रति विडे । हार-तुरे यांचा उडे ।
थाट बहु ॥११८॥ घेऊन रामदर्शन । भूपाचें अनुशासन । वंदून
जाती सर्व जन । स्वगृहातें ॥११९॥ त्या समयीं लोकवृंद ।
तयांचा प्रेमप्रमोद । सौंदर्य आणि विनोद । गंभीरता- ॥१२०॥
शतावधि शारदा-शेष । वेद, विरंचि, महेश । वर्णू न शकती
लेश । गणेशासह ॥१२१॥ कैसे करूं मी वर्णन । वारुळाच्या
सर्पाकडून । मस्तकीं पृथ्वी धारण । करवेल काय ? ॥१२२॥
सर्वांतें सर्वतोपरीं । अयोध्यानाथ सत्कारी । मग राज्ञींतें
पाचारी । मृदुशब्दें ॥१२३॥ "बालिकाच असती स्नुषा । पर-
गृहीं आल्या अशेषा । नेत्रांस पापण्या तैशा । सांभाळाव्या ॥१२४॥
मुलें हीं सारीं आपुलीं । थकलीं, झोपेस आलीं । जाऊं द्यावें
त्यां या कालीं । विश्रांतीस" ॥१२५॥ ऐसें बोलून भूपति ।
रामपद धरी चित्तीं । स्वयें विश्राम-गृहाप्रति । जाता
झाला ॥१२६॥ सहज सुंदर भाषित । भूपाचें होतां श्रुत ।
टाकिले रत्नखचित । हेममंचक ॥१२७॥ धेनुदुग्धापरीं शुभ्र ।
मृदु उज्ज्वल सुंदर । गाद्यागिरद्या त्यांवर । आंथरिल्या ॥१२८॥
मृदु उशा शय्येवरी । वर्णूं न शके वैखरी । स्रग्सुगंधित मंदिरीं ।
रत्नखचित ॥ १२९॥ रत्नांचे दीप सुंदर । चांदवे ते मनोहर ।
जयांनीं पाहिले निर्धार । जाणती ते ॥१३०॥ शेज सुंदर सज-
वुनी । राघवातें उठवुनी । त्या मंचकीं प्रेमेंकरुनी । पहुड-
विले ॥१३१॥ बंधूंप्रति वारंवार । आज्ञापितां रघुवीर । जाऊन
स्वशय्येवर । पहुडले ते ॥१३२॥ कोमल श्यामसुंदर । पाहून
रामशरीर । म्हणती सप्रेमभर । सर्व माता ॥१३३॥ "मार्गीत
रघुनायका ! । अतिशय भयानका । कैसी मारिली ताटिका ।

सांग बापा ! ॥१३४॥ महायोद्धे भयंकर । ऐसे घोर निशाचर । कुणाशींहि करितां समर । जुमानती ना– ॥१३५॥ ऐसे जे का दुष्ट भारी । मारिच, सुबाहु समरीं । मारिले सांग कैसें तरी । सैन्यासह ?॥१३६॥ राघवा तुझ्यावरून । जीव टाकावा ओवाळून । केवळ कृपाच कारण । गाधिजांची ॥१३७॥ विश्वामित्रांच्या कृपेनें । मार्गीं आलीं जीं जीं विघ्नें । तीं तीं परमेश्वरानें । दूर केलीं ॥१३८॥ तुम्हीं दोघां बांधवांनीं । मुनींचा यज्ञ रक्षुनी । साधिल्या कृपेंकरूनी । सर्व विद्या ॥१३९॥ पदरज लागतांक्षणीं । उद्धरली गौतमपत्नी । कीर्ति राहिली भरुनी । ब्रह्मांडांत ॥१४०॥ कूर्मपृष्ठासम कठिण । कठोर वज्रासमान । शिवचाप केलें भग्न । नृपसभेंत ॥१४१॥ विश्वविजय मूर्तिमंत । जानकीस केलें प्राप्त । करून बंधु विवाहित । आलास गृहीं ॥१४२॥ ऐशीं कर्में सकळिक । रामा ! असती अलौकिक । केवळ कारण त्या एक । गाधिजकृपा ॥१४३॥ तुझा वदनशशांक । पाहून निश्चयात्मक । झालें जन्माचें सार्थक । आज बापा ! ॥१४४॥ तुज पाहिल्यावांचून । आमचे जे गेले दिन । ते जमेस धरावे न । विधात्यानें" ॥१४५॥ विनयें प्रेमळ वचन । बोलून रघुनंदन । सर्व मातांचें समाधान । करिता झाला ॥१४६॥ शिव, गुरु, विप्रवृंद । यांचें स्मरूनिया पद । होई राम सुखकंद । निद्रावश ॥१४७॥ श्रीराममुख निद्रेंत । शोभा देतसे अत्यंत । जणुं पद्म निमीलित । सायंकालीं ॥१४८॥ स्त्रिया जागून रात्रभरी । विनोद करिती घरोघरीं । उखाणे ते नानापरीं । घेऊनिया ॥१४९॥ राज्ञी म्हणती, "साजणी ! । किती रम्य दिसे रजनी । पहा अयोध्या तिजहुनी । विशेष रम्य ॥१५०॥ सासवा त्या स्नुषांप्रति । पोटशीं घेऊन निजती ।

शिरोरत्नांतें लपविती । नागिणी जणुं ॥१५१॥ उषःकालीं सुमुहूर्ती । जागा झाला रघुपति । कुक्कुट करूं लागती । मधुर ध्वनि ॥१५२॥ येऊन बंदी--मागध । करिती गुणानुवाद । आला नागरिकवृंद । मुजऱ्यास्तव ॥१५३॥ सुर, गुरु, माता-पितर । यांतें करून नमस्कार । सर्व बंधु हर्षनिर्भर । आशीर्वादें ॥१५४॥ जननी प्रेमेंकरून । करिती तन्मुखावलोकन । जाती भूपासह मिळून । महाद्वारीं ॥१५५॥ शुचिष्मंत सहजगति । प्रातर्विधि आटोपिती । पवित्र शरयूचें करिती । स्नान मग ॥१५६॥ प्रातःसंध्यादि--वंदन । कर्मं सारून चौघे-जण । येते झाले परतून । पित्यापाशीं ॥१५७॥ भूपें त्यांतें विलोकिलें । उचलून हृदयीं धरिलें । अनुज्ञेनें ते बैसले । आनंदले ॥१५८॥ पाहून सीतावल्लभा । प्रसन्न झाली सर्व सभा । सीमा नुरली नेत्रलोभा । वाटलें तैं ॥१५९॥ वसिष्ठ, कौशिकमुनि । मग आले तया स्थानीं । बैसविले श्रेष्ठासनीं । भूपें तयां ॥१६०॥ पुत्रांसहित भूपति । वंदी, पूजी तयांप्रति । राम पाहून गुरुमूर्ति । प्रेममग्न ॥१६१॥ वसिष्ठें त्या समयास । कथिला धर्मेतिहास । ऐके भूपति तयास । राज्ञींसह ॥१६२॥ अतर्क्य मुनिमनाप्रति । विश्वामित्रांची महति । परोपरी वसिष्ठ गाति । अनंदानें ॥१६३॥ वामदेव तैं बोलती । "सत्य वसि-ष्ठाची उक्ति । पसरली उज्ज्वल कीर्ति । त्रैलोक्यांत" ॥१६४॥ ऐकून हें सर्वांप्रति । मनीं मोद झाला अति । राम--लक्ष्मणांच्या चित्तीं । उत्साह बहु ॥१६५॥ मंगल उत्सव नित । आनंद-परिपूरित । दिवस लोटले यांत । किती तरी ॥१६६॥ यापरीं अयोध्यानगर । आनंदाचेंच माहेर । लोटला सुखाचा पूर । अधिकाधिक ॥ १६७ ॥ सुदिन पाहून पुढतीं । करकंकणें

सोडिती । तेव्हांचा विनोद अति । मंगलानंदमय ॥१६८॥ नित्य नवें सुख पाहती । देव मनीं हेवा करिती । अयोध्येंत जन्म मागती । विधात्यातें ॥१६९॥ मुनि जावया इच्छिती । परि आग्रहें राहती । राम-प्रेम विनयाप्रति । होऊन वश ॥१७०॥ शतगुणें प्रतिदिनीं । भूपाचा भाव पाहुनी । प्रशंसिती महामुनि । विश्वामित्र ॥१७१॥ शेखीं निरोप मागती । तं प्रसन्नपणें अति । उभा राहिला भूपति । पुत्रांसह ॥१७२॥ म्हणे, "संपत्ति सकळिक । तुमचीच मुनिनायक! ॥ स्त्रीपुत्रांसह सेवक । आपुला मी ॥१७३॥ पुत्रांवरी मुनिराया ! । सदा असूं द्यावी दया । मजला दर्शन द्यावया । येत जावें ।" ॥१७४॥ ऐसें बोलून सद्‌भावें । भूपति स्त्री पुत्रांसवें । पदीं लोळे, न बोलवें । मुखावाटें ॥१७५॥ बहुपरी भूपाप्रति । आशी देऊन निघती । त्या काळींची प्रेमरीति । अवर्णनीय ॥१७६॥ बंधुसह रघुनाथ । जाई पोंचवायाप्रत । आज्ञा घेऊन समस्त । परतले ते ॥१७७॥ रामरूप निरुपम। दशरथ–भक्तिप्रेम । विवाहोत्सव परम । आनंद तो ॥१७८॥ या सर्वांहिलागुनी । प्रशंसीत निजमनीं । करिती गाधिज मुनि। मार्गक्रमण ॥१७९॥ वामदेव महा ज्ञानी। कुलगुरु वसिष्ठमुनि । सांगती कथा वर्णुनी । गाधिजांची ॥१८०॥ विश्वामित्राचें सद्यश । ऐकून अयोध्याधीश । निज पुण्यप्रभावास वर्णी तदा ॥१८१॥ सभा करून विसर्जन । पुत्रांसहवर्तमान । भूपति करी गमन। निजमंदिरीं ॥१८२॥ रामविवाह सर्वत्र । लोक गाती अहोरात्र । भरलें सद्यश पवित्र। त्रैलोक्यांत॥१८३॥ होऊनिया विवाहित । स्वगृहीं राम आला परत । तेंपासून आयोध्येंत । परमानंद ॥१८४॥ रामविवाहोत्सवाप्रत । वर्णावया इत्थंभूत । शेष–शारदा समर्थ । नसती मुळीं ॥१८५॥

सीताराम-यशोगान । परम मंगलाची खाण । कविकुलाचे जीवन- । साफल्य तें ॥१८६॥ निजवाणीतें पवित्र । करावया हें चरित्र । वर्णिलें मीं अणुमात्र । या कारणें ॥१८७॥ म्हणती तुलसीदास । पावन कराया वाणीस । श्रीरामाचें सद्यश । वर्णिलें मीं ॥१८८॥ श्री रघुवीर-चरित्र । समुद्रापरी अपार । कोण कवीस तत्पार । लागलासे? ॥१८९॥ यज्ञोपवीत-संस्कार । विवाहोत्सव शुभकर । ऐकून गाती सादर । जे जे कुणी-॥१९०॥ ते ते सारे सभाग्य जन । सीतारामकृपेंकरून । सुख पावती निवार्ण । सदोदित ॥१९१॥ विवाहाचें कथानक । ऐकती भक्तिपूर्वक । गाती त्याहून अधिक । सप्रेम जे- ॥१९२॥ त्यांते आनंदनिर्भर । प्राप्त होय निरंतर । कीं मंगलाचें माहेर । श्रीरामयश ॥१९३॥ (श्रीरामचरितमानस । विहंगराज राजहंस । गोस्वामी तुलसीदास । ग्रंथकर्ते ॥१९४॥ स्वस्ति श्री मानसविहार । तुलसीरामायणाचें सार । प्रथम सोपान सुखकर । भाविकांतें ॥१९५॥ मानस उत्तुंग परम । सोपान केले सुगम । वाटती तेहि दुर्गम । भाविकांतें ॥१९६॥ माझी टीका ही मराठी । हीच टेकावया काठी । ऐशा अशक्तांसाठीं योजिली मीं ॥१९७॥ सोपानींचा मार्ग भला । जरी दीर्घतम वाटला । एकुणविसावा योजिला । विश्राम हा ॥१९८॥ रसिक भाविक श्रोत्यांस । विनवीतसे देवीदास । माझ्या बोबड्या बोलांस । मान्य करा ॥१९९॥)

इति श्रीमद्रामचरितमानसे सकलकलिकलषविध्वंसने

प्रथमः सोपानः समाप्तः

# मानस-विहार

## द्वितीय सोपान

## (अयोध्याकाण्ड)



### विश्राम १ ला

**श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः श्रीगुरुभ्यो नमः**
**श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः**

श्लोक :-

यस्यांके च विभाति भूधरसुता देवापगा मस्तके ।
भाले बालविधुर्गले च गरलं यस्योरसि व्यालराट् ॥
सोऽयं भूति विभूषणः सुरवरः सर्वाधिपः सर्वदा ।
सर्वः सर्वगतः शिवः शशिनिभः श्रीशंकरः पातु माम् ॥

ज्याच्या वामांकावरती । शोभे हिमाद्रिजा पार्वती । देवगंगा भागीरथी । मस्तकावरी ॥१॥ बाल चंद्रमा तो भालीं । हालाहल कंठस्थलीं । वक्षस्थलीं सर्पावली । शोभतसे ॥२॥ ज्याच्या सर्वांगीं विभूति । जो देवांचा अधिपति । सर्वांचा स्वामी निश्चितीं । अविनाशी जो ॥३॥ सर्वव्यापक संपूर्ण । चंद्रासम गौरवर्ण । तो माझें करो रक्षण । शिवशंकर ॥४॥

श्लोक :-

प्रसन्नतायां न गताभिषेकतस्तथा न मम्ले वनवासदुःखतः ।
मुखाम्बुजश्री रघुनंदनस्य मे सदास्तु सा मंजुलमंगलप्रदा ॥२॥

ऐकून अभिषेकवार्ता । पावे न जी प्रसन्नता । प्राप्त न जीतें मलिनता । वनदुःखानें– ॥५॥ ती श्रीराममुखकान्ति । पद्मासम सुंदर अति । श्रेष्ठ कल्याण मजप्रति । देवो सदा ॥६॥

श्लोक :-

नीलाम्बुजश्यामलकोमलांगं सीतासमारोपितवामभागम्
पाणौ महासायकचारुचापं नमामि रामं रघुवंशनाथम् ॥३॥

नीलाम्बुजसम श्यामल । अंग जयाचें कोमल । सीता शोभते वेल्हाळ । वामभागीं ॥७॥ ज्याचे हातीं बाण प्रखर । तैसें धनुष्यहि सुंदर । तो रघुकुलेश रामचंद्र । वंदितों मी ॥८॥

श्रीगुरुपद–कमल । तद्रजःकण कोमल । तेणेंकरून निर्मल । मनोदर्पण ॥९। पुरुषार्थ चतुर्विध । करून देतें जें सिद्ध । तें श्रीरामयश शुद्ध । वर्णीन मी ॥१०॥

होऊन विवाहबद्ध । गृहीं आला रघुकुलकंद । नित्यनूतन आनंद । मंगलमय ॥११॥ चतुर्दश भुवनें निश्चितीं । त्या महा पर्वतावरती । पुण्याचे मेघ वर्षती । सुखजलातें ॥१२॥ ऋद्धि, सिद्धि, संपत्ति । सरिता त्या सुंदर अति । अयोध्यासिंधूस मिळती । महापूरें ॥१३॥ नरनारी, नागरिक । शुचि, सुंदर, अमोलिक । निपजती रत्नें अनेक । सर्वतोपरी ॥१४॥ अयोध्येचें ऐश्वर्य गाढें । वर्णावें तितुकें थोडें । जणुं कर्तृत्वचि एवढें । विधात्याचें ॥१५॥ सर्वतोपरीं सकलिक । सुखी अयोध्येचे लोक । पाहून श्रीराममुख– । चंद्राप्रति ॥१६॥ सखी–सहचरी

सहित । सर्व माता आनंदित । मनोरथ–वेली फलित । पाहू-
निया ॥१७॥ श्रीरामाचें रूपगुण । सुस्वभाव सदाचरण ।
अवलोकून, ऐकून । मुदित भूप ॥१८॥ सर्व जनतेच्या चित्तीं ।
उत्कट इच्छा हीच अति । बोलती, प्रार्थना करिती ।
शंकराची ॥१९॥ "आपुल्या दृष्टींदे खत । युवराजपद निश्चित ।
द्यावें श्रीरामचंद्राप्रत । भूपतीनें" ॥२०॥ एके समयीं दशरथ ।
सर्व समाजासहित । आपुल्या राजसभेंत । बैसलासे ॥२१॥ सर्व
सुकृतांची मूर्ति । शोभे तो अयोध्यापति । ऐकून रामाची कीर्ति ।
प्रसन्न मनीं ॥२२॥ ज्याची कृपेच्छा धरून । राहे सर्व भूपगण ।
वागती प्रीति सांभाळून । लोकपति ॥२३॥ त्रिभुवनीं त्रिका-
लांत । अन्य कुणी भाग्यवंत । दशरथासम विश्वांत । नसेचि
तें ॥२४॥ ज्याचा श्रीरामासमान । आनंदकंद नंदन । त्याचें
गावें महिमान । तितुकें थोडें ॥२५॥ असो, भूप तदवसरीं ।
दर्पण घेऊन स्वकरीं । मुख विलोकून सांवरी । मुकुटा-
प्रति ॥२६॥ श्रवणासन्निध देखिले । केश कांहीं शुभ्र झाले ।
जणुं त्यांनीं सुचविलें । वार्धक्यातें ॥२७॥ "भूपा ! राघवा-
लागून । यौवराज्य समर्पून । कां न करिसी जीवन– । जन्म–
सार्थक हें" ॥२८॥ यापरीं तो दशरथ । विचारून स्वमनांत ।
सुदिन, सुमुहूर्त । पाहूनिया– ॥२९॥ मनीं अतीव मुदित । तनु
तैसी रोमांचित । सांगाया सद्गुरुप्रत । स्वयें जाई ॥३०॥ भूप
म्हणे, "मुनिसत्तम! । ऐका हो ! माझा राम । झाला
सर्वकार्यक्षम । सर्वतोपरीं ॥३१॥ सचिव जे सेवकगण ।
सारे अयोध्येचे जन । शत्रुमित्र, उदासीन । आमुचे जे- ॥३२॥
त्यां सर्वां मजसमान । प्रिय आहे रघुनंदन । जणुं तनु करी
धारण । युष्मत्कृपा ॥३३॥ विप्रांसहवर्तमान । कौटुंबिक

आप्तजन । करिती आपणांसमान । प्रेम सारे ॥३४॥ सद्गुरु-पदरजांप्रति । जे शिरीं धारण करिती । ते जणुं सर्व संपत्ति । करिती वश ॥३५॥ मजसम भाग्यवंत । स्वामिन् कुणी न जगांत । पदरज:पूजनें प्राप्त । सर्व कांहीं ॥३६॥ आतां एकचि प्रस्तुत । इच्छा आहे मन्मनांत । तीहि होईल पूरित । युष्मत्कृपें" ॥३७॥ जाणून मुनीतें प्रसन्न । स्वभावेंचि प्रेममग्न । भूप म्हणे, "अनु-मोदन । द्यावें स्वामिन् ! ॥३८॥ मुनि म्हणती, "हे नरेश!। तुझें नाम, तुझें यश । पूर्ण करिती अभिलाष । अंतरींचे ॥३९॥ अगा ! भूपशिरोमणी !। ज्या ज्या इच्छा तुझ्या मनीं । असती फलानुगामिनी । सर्वहि त्या" ॥४०॥ सर्वतोपरीं गुरुमूर्ति । जाणून प्रसन्न चित्तीं । मृदु वचें वदे भूपति । हांसूनिया ॥४१॥ "युवराज रामाप्रति । करा स्वामिन्! संप्रति । कृपें द्यावी अनुज्ञा ती । समारंभा ॥४२॥ माझ्या डोळ्यांदेखत । सोहळा व्हावा निश्चित । होय सर्व लोकांप्रत । लोचनलाभ ॥४३॥ युष्मत्प्रसादें सारें । निभावलें श्रीशंकरें । ही एक लालसा उरे । मन्मानसीं ॥४४॥ मग चिंता नसे कांहीं । राहो कीं जावो देहहि । करावा न लागे मुळींहि । पश्चात्ताप" ॥४५॥ आनंद-मंगलाचें मूल । प्रेमळ भूपाचे बोल । पटले मनास प्रांजळ । वसिष्ठांच्या ॥४६॥ "ज्या विमुख होतां भूपा ! । जीव पावे पश्चात्तापा । ज्याच्या भक्तिविण हृत्तापा । शांति नसे ॥४७॥ तोच स्वामी रघुनाथ । प्रेमानुगामी पुनीत । तुझा होऊनिया सुत । अवतरलासे ॥४८॥ तरी विलंब न करीं । भूपा ! जाऊन सत्वरीं । समारंभ सर्वतोपरीं । करीं सिद्ध ॥४९॥ श्रीराम तुझा तनुज । जेव्हां होय युवराज । सुमंगल सुदिन समज । तोचि राया !" ॥५०॥ मग भूप हर्षभरीं । पातला निज मंदिरीं ।

सुमंत सचिवा पाचारी । सेवकांसह ।।५१।। म्हणून 'जय नृप-नाथा!' । तेणें नमविला माथा । भूपानें ती शुभ वार्ता । निवेदिली ।।५२।। "सद्‌गुरुंनीं आनंदानें । आज्ञापिलें मजकारणें । राया! रामास त्वां देणें । यौवराज्य ।।५३।। पंच लोक यासी जरी । संमत असतील तरी । रामास राजतिलक करीं । प्रसन्न मनें" ।। ५४।। ऐकून ते प्रिय वचन । सचिव झाला प्रसन्न । ईप्सितांकुरीं जीवन । वर्षलें जणुं ।।५५।। सुमंत कर जोडुनी । करूं लागे विनवणी । "चिरंजीव होवो" म्हणुनी । "चक्रवर्ती! ।।५६।। ज्यांत जगाचें कल्याण । तें कार्य योजिलें आपण । आतां लावा विलंब न । त्वरा करा" ।।५७।। सचिवाच्या आनंदोद्‌गारा । ऐकून हर्ष नृपवरा । जणुं वाढत्या अंकुरा । शाखा फुटे ।।५८।। भूप म्हणे सचिवाप्रति । "वसिष्ठ मुनि संप्रति । जो जो कांहीं आज्ञापिती । कार्यभाग ।।५९।। रामराज्याभिषेकार्थ । आवश्यक जे पदार्थ । सिद्ध करावे ते त्वरित । समस्तहि ।।६०।। ते समयीं वसिष्ट मुनि । बोलले प्रेमळ वाणी । "सर्व सुतीर्थांचें पाणी । घेऊन या" ।।६१।। शुभ द्रव्यें, औषधि, मूलें । पत्रें पुष्पें आणि फलें । परिमाणहि निवेदिलें । नामांसह ।।६२।। चामरें आणि मृगाजिनें । नाना प्रकारचीं वसनें । ऊनी, रेशमी बहुमानें । नाना जाति ।।६३।। रत्नें तीं अनेकविध । वस्तु ज्या मंगलप्रद । जगीं सुयोग्य विशुद्ध । राजतिलका ।।६४।। मान्य केलीं जीं वेदानें । कथिलीं सर्व विधानें । रचाया विविध वितानें नगरांतरीं ।।६५।। फणस, आम्र, पोफळीं, केळीं । झाडें रोवा भोंवतालीं । मार्गींहि वेगवेगळीं । रोवून द्या ।।६६। अमोल रत्नखचित । रचा स्वस्तिकें सुशोभित । हाट सजवाया त्वरित आज्ञा करा ।।६७।। गणेश, गुरु, कुलदैवत । यांची पूजा करा

नित । चालवा विप्रसेवार्थ । संतर्पणें ॥६८॥ ध्वज, पताका, तोरण । सुवर्ण कलश ठेवून । करा सज्ज सजवून । गजाश्वरथ" ॥६९॥ वसिष्ठांचें अनुशासन । शिरसा मान्य करून । निज कार्यीं सर्वजण । गुंतले ते ॥७०॥ मुनीश्वरें आज्ञा जयां । दिली कार्य करावया । जणुं त्यांनीं केलें तयां । प्रथमतांचि ॥७१॥ विप्रसाधुदेव-पूजा । करी दशरथ राजा । मंगल कार्यें आत्मजा । कल्याण व्हाया ॥७२॥ राज्याभिषेक रामाप्रत । ऐकून हें मंगलवृत्त । वाद्यें वाजतीं अयोध्येंत । घरोघरीं ॥७३॥ सीताराम-देहाप्रति । शुभ शकुन जाणवती । शुभांगें स्फुरण पावतीं । मंगलमय ॥७४॥ (होती मंगल शकुन । तरी कां उद्भवलें विघ्न । ऐसें साशंकित मन । होय येथें ॥७५॥ तरी याचें समाधान । दूरदर्शित्वें होय पूर्ण । तेंहि संक्षेपें निवेदन । करीतसे ॥७६॥ राज्य व्हाया निष्कंटक । माराया रावणादिक । वनीं जाणें आवश्यक । मंगलमय ॥७७॥) प्रेमें रोमांचित होती । सीता-राघव बोलती । "भरतागमन सुचवितीं । सुचिन्हें हीं ॥७८॥ लोटले बहुत दिन । या सुचिन्हांवरून । होय प्रियकरमीलन । निश्चित गमे ॥७९॥ प्रिय भरतासमान । जगीं दुजा असे कोण ? । शकुनफल तें अन्य न । हेंचि आहे ॥८०॥ जैशी कच्छपींचे चित्तीं । अंडचिंता दिनरातीं । भरतचिंता त्याच रीतीं । राघवातें ॥८१॥ परम मंगल वार्ता । अभिषेकाची ऐकतां । तेधवां आनंद पुरता । अंतःपुरीं ॥८२॥ पूर्ण पाहून निशाकर । लहरींचा विलास थोर । वाढतो उत्तरोत्तर । सागरीं जसा ॥८३॥ प्रथमतां जाऊन ज्यानें । वार्ता कळविली मुखानें । अमित वस्त्रें भूषणें । मिळालीं त्या ॥८४॥ प्रेम दाटलेंसे चित्तीं । तेणें रोमांच देहा-

प्रति । मंगल साहित्य करिती । राज्ञी तदा ॥८५॥ विविध जातींचीं रत्नें । गोंवूनिया कौसल्यानें । स्वस्तिकें केलीं सुमित्रेनें। सुरेख अति ॥८६॥ राममाता कौसल्येनें । मग्न होऊन आनंदानें । विप्रां बहु दिलीं दानें । पाचारुनी ॥८७॥ ग्रामदेवता, सुर, नाग । यांतें पूजून यथासांग । नेमून दिले बलिभाग । तयांप्रति ॥८८॥ "जेणें रामाचें कल्याण । होय तेंचि वरदान । द्या हो! कृपा करून" । विनवूनिया ॥८९॥ बालमृगाक्षी स्त्रीजन । मुख ज्यांचें चंद्रासमान । करिती मंगल गायन । कोकिल स्वरें ॥९०॥ रामाचा राज्याभिषेक । ऐकून वार्ता अमोलिक । आनंदती सर्व लोक । हृदयांतरीं ॥९१॥ जाणून धाता अनुकूल । द्रव्यें सुंदर, मंगल । सिद्ध करिती सकल । तदवसरीं ॥९२॥ मग वसिष्ठांस भूपालें । अत्यादरें पाचारिलें । शिकवण द्याया धाडिलें । राममंदिरीं ॥९३॥ ऐकतांच गुर्वागमन । श्रीराम द्वारीं येऊन । चरणीं मस्तक ठेवून । वंदीतसे ॥९४॥ अर्घ्य देऊन अत्यादरीं । आणून निज मंदिरीं । पूजी षोडशोपचारीं । सन्मानुनी ॥९५॥ सीतेसह रघुनंदन । धरी सद्गुरूचे चरण । करकमलांतें जोडून । काय म्हणे ?॥९६॥ "सेवकगृहालागून । स्वामींचें हें आगमन । मंगलकारक पूर्ण । अशुभनाशी ॥९७॥ तरी कांहीं कार्यार्थ । प्रेमें बाहतां मजप्रत । तेंहि नीतिन्यायोचित । होतें स्वामी ! ॥९८॥ सांडून थोर महिमा । मजवरी केला प्रेमा । तेणें आली मम धामा । पवित्रता ॥९९॥ तरी जें इच्छिलें मनें । तें कार्य आज्ञापिणें । स्वामी-सेवा घडे जेणें । सेवकातें" ॥१००॥ तें स्नेहस्निग्ध भाषण । मुनि वसिष्ठें ऐकून । केलें तें अभिनंदन । राघवाचें ॥१०१॥ " केलें जें तूं भाषण । रामा! तुजयोग्य

जाण । कीं सूर्यवंशाचें भूषण । अससी तूं" ॥१०२॥ शील, स्वभाव, सद्गुण । श्रीरामाचें वर्णन । प्रेमपुलकित होऊन । वदती मुनि ॥१०३॥ "अभिषेकाची संप्रति । करी सिद्धता भूपति । देऊं इच्छितो तुज-प्रति । यौवराज्य ॥१०४॥ जरी धाता सकुशल । कार्य निभावून नेईल । तरी रामा संयमशील । आज रहा" ॥१०५॥ उपदेशून या रीतीं । मुनि भूपाकडें जाती । इकडें रामाचे चित्तीं । विस्मय गमे ॥१०६॥ "बंधु आम्ही चौघेजण । एकत्र पावलों जनन । आबाल्य भोजन-शयन-। क्रीडादिक ॥१०७॥ कर्णवेध, व्रतबंध । एकत्र विवाहबद्ध । मिळून भोगिला आनंद । सर्वांनींहि ॥१०८॥ विमल वंशीं अनुचित । वगळून कनिष्ठाप्रत । व्हावा ज्येष्ठासचि प्रस्तुत । राज्याभिषेक" ॥१०९॥ प्रेममय समयोचिता । प्रभूची विमनस्कता । भक्तमनींची कुटिलता । हरण करो ! ॥११०॥ त्याच समयीं मंदिरांत । पातला सुमित्रासुत । निमग्न प्रेमानंदांत । होऊनिया ॥ १११ ॥ त्या लक्ष्मणाकारणें । बोलून प्रिय वचनें । रविकुलकुमुदशशीनें । गौरविलें ॥११२॥ प्रकार ज्यांचे विविध । वाद्यें वाजतीं अनेकविध । नगरीं होतसे आनंद । अवर्णनीय ॥११३॥ परतून येईल भरत । वाट पाहती समस्त । सत्वर येवो, पावूत । नेत्रसाफल्य ॥११४॥ हाटीं, मार्गीं, घरोघरीं । आळींत आडमार्गावरी । स्त्री-पुरुष परस्परीं । बोलती हे ॥११५॥ "उद्यांच ठरला मुहूर्त । बहु वेळ उर्वरित । केव्हां पुरवील मनोरथ । ब्रह्मदेव ॥११६॥ सुवर्णसिंहासनावर । सीतेसह रघुवीर । आरुढेल तेव्हां स्थिर । चित्त होय ॥११७॥ केव्हां उद्यां उजाडेल" । ऐसें बोलती सकल । विघ्न चिंतिती कुटिल । देव तिकडें ॥११८॥ अयोध्येचा उत्सव मात्र । त्यां

रुचेना अणुमात्र । जैसी का चांदणी रात्र । चोरांप्रति ॥११९॥ करून शारदाऽवाहन । घेई पदीं लोटांगण । प्रार्थूं लागे सुरगण । वारंवार ॥१२०॥ "माते ! आमुची दैना । भीषण आणून ध्याना । करीं ऐसीच योजना । आज वेगें-- ॥१२१॥ टाकूनिया राज्याप्रत । राम जाईल वनांत । देवांचें कार्य समस्त । होय जेणें" ॥१२२॥ ऐकून देवांची विनंति । अनुतप्त ठाके सरस्वती । कमलवनीं हिमवर्षती । रात्र जणुं ॥१२३॥ तिज पाहून देव पुन्हां । म्हणती करून प्रार्थना । "माते ! दोष लागेल ना । अल्पहि तुज ॥१२४॥ स्वभावें श्रीरघुनाथ । हर्षविषादरहित । त्याचा स्वभाव विदित । सर्वहि तुज ॥१२५॥ जीव होऊन कर्मवश । भोगितो सुखदुःखास । देवहितार्थ अयोध्येस । जावेंच त्वां" ॥१२६॥ वारंवार धरिती चरण । तेणें निघे संकोचून । 'देवांची बुद्धि हीन" । जाणूनिया ॥१२७॥ "अधिकार मात्र उच्च । परि कृति पूर्ण नीच । पाहूं न शकती मुळींच । परैश्वर्य ॥१२८॥ भावी कार्यातें लक्षून । माझें कर्तव्य प्रशंसून । करितील मदभिनंदन । सुज्ञ कवि" ॥१२९॥ प्रसन्न अंतःकरणीं । आली अयोध्येलागुनी । दुःसह दुःखदायिनी । ग्रहदशा जणुं ॥१३०॥ कैकेयीची लाडकी अति । दासी एक मंदमति । जिच्या नामाची ख्याति । 'मंथरा' ऐसी ॥१३१॥ तिचा करून बुद्धिभ्रंश । माथीं मारून अपयश । जाती झाली स्वर्लोकास । सरस्वती ॥१३२॥ मंगल आणि सुंदर । वाद्यें वाजतीं अपार । देखिलें शृंगारित नगर । मंथरेनें ॥१३३॥ पुसे लोकांस भेटतां । 'आनंद हा कशाकरितां ?' । 'रामाभिषेक' ऐकतां । हृदय जळे ॥१३४॥ कुबुद्धि कुजातिच असे । स्वमनीं विचारीतसे । कार्य बिघडेल कैसें । रात्रींतून ॥१३५॥ पाहून मधाच्या

पोळीसी । हस्तगत होईल कैसी । कुटिल पारधीण जैसी । टपून बसे ॥१३६॥ मग दुःखाकुल होउनी । भेटे कैकेयीलागुनी । सस्मित पुसे तिज राणी । "उदास कां गे !" ॥१३७॥ परि कांहीं न दे उत्तर। स्त्रीलाघवानुसार । तैं निश्वास सोडी फार । अश्रु ढाळी ॥१३८॥ राणी म्हणे सहर्षभर । "तूं वाचाळ अससी फार । लक्ष्मणें गमे समाचार । घेतला तुझा" ॥१३९॥ दासी ती पापिणी भारी । कांहीं न बोले त्यावरी । कृष्णसर्पिणीचेपरी । श्वास सोडी ॥१४०॥ दचकून निज मानसीं । कैकेयी म्हणे मंथरेसी । "वेडे, तूं कां न बोलसी । सांग तरी ?॥१४१॥ राम, महाराज, लक्ष्मण । कुशल कीं भरत, शत्रुघ्न" । ऐकतां दाह दारुण । तिच्या मनीं ॥१४२॥ (क्षण एक धरून मौन । मंथरा करी भाषण । कैकेयीचा व्हाया पूर्ण । बुद्धिभेद ॥१४३॥) "सौभाग्याच्याच गर्वांत । झालीस तूं निद्राग्रस्त । निकट भय, परि ना खंत । वाटे तुज ॥१४४॥ हे महाराणी ! कोण । देईल मज शिकवण । कुणाच्या बळें करीन । वाचाळता ?॥१४५॥ एक सोडून रामास । कुशलत्व आज कोणास ?। यौवराज्य देती ज्यास । महाराज ॥१४६॥ कौसल्येचें दैव खचित । आज दिसे सुफलित । तेणें गर्व न समावत । तिच्या मनीं ॥१४७॥ नगरींची शोभा कैसी । जाऊन कां न पाहसी ?। जी पाहून मन्मानसीं । क्षोभ होय ॥१४८॥ परदेशीं राहिला सुत । त्याची तुज नसे खंत । जाणसी वश निश्चित । स्वपतीतें ॥१४९॥ गाद्यागिरद्यांवरी सुष्ट । झोंप घेतेस यथेष्ट । नेणसी चातुर्य, कपट । भूपतीचें" ॥१५०॥ ऐकून तें प्रिय वचन । जाणूनिया मलिन मन । राणी वदे संतापून । "आतां पुरें- ॥१५१॥ हे घरभेदे ! फिरून । ऐसें करशील भाषण । तरी जीभ उपट-

बोन । धरून तुम्ही ॥१५२॥ काने, कुबडे, पांगळे । असती लोक ते सगळे । करिती कपटी चाळे । जाणत्यें मी ॥१५३॥ विशेषें स्त्रियाच ख्यात । बटकी त्यांतल्या त्यांत" । कैकेयी ती करी स्मित । बोलून हें– ॥१५४॥ "मिष्ट भाषिणी ! म्हणून । दिली तुज ही शिकवण । तुजवरी मी रुष्टलें न । स्वप्नांतहि ॥१५५॥ तोचि सुदिन शुभप्रद । तूं जे बोललीस शब्द । खरे होतील निर्वेध । जया दिनीं–॥१५६॥ ज्येष्ठ बंधु स्वामी खरा। धाकटा तो सेवक पुरा । सूर्यवंश–परंपरा। उत्कृष्ट ही ॥१५७॥ उद्यांच रामाभिषेक । होईल निश्चयात्मक । सखे ! देईन ही भाक । इच्छिसी तें ॥१५८॥ माता तितुक्या सकलिक । निश्चयें रघुनायक । कौसल्येसम स्वाभाविक । प्रिय मानी ॥१५९॥ त्यांतल्या त्यांत मजवरी । प्रेम त्याचें असे भारी । कसून पाहिली खरी । परीक्षा मीं ॥१६०॥ जरी धात्याची मनीषा । पुन्हांहि मी व्हावें योषा । रामसीता पुत्र-स्नुषा । तत्कृपें व्हावी ॥१६१॥ प्राणाहूनिया अधिक । प्रिय मातें रघुनायक। त्यास होतां राजतिलक । क्षोभसी कां? ॥१६२॥ तुज भरताचीच शपथ । कपट, छल सोड त्वरित । खरें काय तें मजप्रत। कथन करीं ॥१६३॥ या आनंदाचे प्रसंगीं । दुःखी होसी अंतरंगीं । याचें कारण मजलागीं । निवेदीं तूं" ॥१६४॥ ऐकतां राणीचें वचन । मंथरा क्रोधायमान । छल–कपटें परिपूर्ण । बोलतसे ॥१६५॥ "एकदां बोललें वचना । पुरल्या माझ्या वासना । आणिली पाहिजे पुन्हां । दुसरी जीभ ॥१६६॥ अभागी माझें कपाल । फोडण्या योग्य केवल । हिताचे खुपती बोल । स्वामिनी ! तुज ॥१६७॥ खोटेंचि खरें म्हणून । बोलती जे सजवून । तेचि प्रिय तुजलागून । मी मात्र कटु ॥१६८॥

मीहि आतां आजपासून । 'जी हुजूर' ऐसें म्हणेन । न तरी धरीन मौन । रात्रंदिन ॥१६९॥ धात्यानें कुरूप केलें । पर-वशतेंत लोटिलें । कापावें जें पेरिलें । दिलें, घ्यावें ॥१७०॥ होईना का राजा कोणी । त्यांत माझी काय हानि । दासीची का मी राणी । होईन आतां? ॥१७१॥ जळला माझा स्वभाव । ऐसा आला अनुभव । मुळींच तुझी उणीव । पाहवेना ॥१७२॥ म्हणून बोलतां बोलतां । बोलल्यें मीं तुझ्या हिता । देवी! मदपराध आतां । क्षमा करीं" ॥१७३॥ राणी केवळ स्त्रीजाति । आधींच क्षणिकमति । प्रिय, गूढ कपटोक्ति । ऐकूनिया-॥१७४॥ होऊन देवमायावश । सुहृद् मानी वैरिणीस । तिजविषयींचा विश्वास । धरीतसे ॥१७५॥ आदरें तिज पुनः-पुन्हां । करीतसे विचारणा । हरिणी शबरीगाना । भुलली जणुं ॥१७६॥ भवितव्यतेनुसार । बुद्धींत पडलें अंतर । घाव घालाया अवसर । दासीस मिळे ॥१७७॥ "पुनःपुन्हां पुसतेस । परि भीतें मन्मानस । घरभेदी त्वां ठेविलेंस । नांव माझें" ॥१७८॥ नाना योजून युक्ति । विश्वास उद्भबून चित्तीं । अयोध्येची साडेसाती । बोलूं लागे ॥१७९॥ "सीताराम प्रिय असती । स्वयें तूं प्रिय रामाप्रति । राणी! ही तुझी उक्ति । सत्यचि असे ॥१८०॥ बोलणें तें जुनें झालें । ते दिन आतां पालटले । काळ फिरतां प्रेमांतले । शत्रु होती ॥१८१॥ कमलकुलाचा पोषक । जरी सूर्य निश्चयात्मक । जल आटतां करी राख । जाळून तो ॥१८२॥ तुझीं पाळें-मुळें सवती । खणून काढूं इच्छिती । उपायजलें त्यांप्रति । सुदृढ करीं ॥१८३॥ सौभाग्याच्या बळें तुज । चिंता न वाटे सहज । वश आपणां महाराज । मानिसी तूं ॥१८४॥ वरून बोलणें प्रेमळ । परि मनीं भूप

कुटिल । तूं मात्र असती सरळ । स्वभावाची ॥१८५॥ त्यांतून रामाची जननी । महा-चतुर, कारस्थानी । तिनें संधि ही साधुनी। साधिला डाव ॥१८६॥ भूपें भरतालागून । दिलें आजोळीं धाडून । यांतहि निश्चयें जाण । तिचेंच अंग ॥ १८७ ॥ साऱ्या सवती मजप्रत । सेविती होऊन अंकित । पतिबळें भारी गर्वित । भरत-माता ॥१८८॥ हेंचि शल्य तुजविषयीं । असे कौसल्येच्या हृदयीं । कपटचातुर्य तिचें कांहीं । नुमगे परि ॥१८९॥ भूप-तीची प्रीति भारी । विशेष असे तुजवरी । सवतीमत्सरें तिज परि । न साहवें तें ॥१९०॥ वश करून भूपाप्रत । रामाच्या अभिषेकार्थ । घाट घालून, मुहूर्त । साधिला तिनें ॥१९१॥ राज्य मिळावें रामाप्रत । कुलपरंपरेस उचित । मान्य सर्वांस, संमत । मजलाहि तें ॥१९२॥ परि परिणाम पुढतीं । विचा-रितां वाटे भीति । भोगावें लगेल निश्चितीं । दैव दे जें" ॥१९३॥ कोटयावधि कपटभाव । रचून कल्पना वांव । केली कपटाची जाणीव । मंथरेनें ॥१९४॥ त्या समयीं विशेषतां । वाढावया विरुद्धता । सवतीच्या शेंकडों कथा । निवेदिल्या ॥१९५॥ भविष्यास झाली वश । कैकेयी ठेवून विश्वास । शपथ घालून मंथरेस । पुसे, तदा- ॥१९६॥ म्हणे, "कां पुसतेस मज । अजूनहि न कळे तुज । पशुहि जाणती निज । हितानहित ॥१९७॥ पंचदश दिन लोटले । नगरीं सिद्धता चाले । तुज मात्र आतां कळलें । मजकडून ॥१९८॥ आज घे खाऊन, लेऊन । राज्य आहे तुझें जाण । सत्य तें करित्यें कथन । दोष न मज ॥१९९॥ जरी रचून तुझ्या साठीं । सांगेन मी कांहीं गोष्टी । शिक्षा करील शेवटीं । धाता मज ॥२००॥ रामास अभिषेक जरी ।

उद्यां होय, समज तरी । तुजसाठीं धाता पेरी । विपत्ति-बीज ॥२०१॥ रेखा ओढून प्रतिज्ञेनें । सांगत्यें तुजकारणें । दुग्धमक्षिकेप्रमाणें होशील तूं ॥२०२॥ सपुत्र सेवा करशील । तरीच घरीं नांदशील । याविण अन्य नुरेल । उपाय कांहीं ॥२०३॥ कद्रुनें विनतेप्रत । छळून केलें दुःखित । करील तुझी तीच गत । कौसल्याहि ॥२०४॥ भरत पडेल कारागारीं। लक्ष्मण मात्र तदवसरीं । रामाचा मुख्य अधिकारी । होईल गे !" ॥२०५॥ कठोर वाणी ऐकून । कैकेयी गेली सुकून । तिच्यानें कांहीं वचन । बोलवेना ॥२०६॥ तनु घामाघूम झाली । कांपू लागे जैसी कदली । तैं दांतें जीभ चाविली । मंथरेनें ॥२०७॥ खोटया गोष्टी कितीतरी । सांगून ती बोध करी । 'राणी ! मनीं धीर धरीं' । म्हणूनिया ॥२०८॥ मंत्र पढवून उलट । केलें तिज निगरगट्ट । जैसें का तें शुष्क काष्ठ । न लवे पुन्हां ॥२०९॥ तिचें ओढवलें कर्म । मंथरा ती कुटिला-धम । परि वाटे प्रियतम । कैकेयीसी ॥२१०॥ स्वत्व हंसीनें विसरावें । बकीलागीं प्रशंसावें । तेविं गातसे गोडवे । मंथरेचे ॥२११॥ "मंथरे ! कथिसी जेवढें । तेंचि खरें दिसतें गडे ! । माझा सारखा फडफडे । सव्य नेत्र ॥२१२॥ प्रतिदिनीं रात्रीं मज । दुःस्वप्नें पडतीं सहज । वेडेपणामुळें तुज । कथिलीं न तीं ॥२१३॥ सखे ! मीं काय करावें । साधी भोळीच स्वभावें । नकळे डावें-उजवें । कांहीं मज ॥२१४॥ मी तरी आजपर्यंत । आपुल्या राजवटींत । कोणाचेंहि अनहित । केलें नाहीं ॥२१५॥ परि मज कळेना कीं । कोणें पापें एकाएकीं । दैवानें दुःसह दुःखी । केलें तरी ? ॥२१६॥ मी माहेरींच जाऊन । जन्म सारा घालवीन । सवतीची सेवा न करीन ।

जिवंतपणीं ॥२१७॥ शत्रुवश होऊन जाणें । दैवें जया प्राप्त, तेणें । जीविताशा सोडून मरणें । हेंचि बरें" ॥२१८॥ नानापरीं दीनवाणें । ऐकून कैकेयीचें बोलणें । स्त्रीजातीच्या लाघवीपणें । मंथरा वदे ॥२१९॥ "कोतें करून निज मन । ऐसें कां करिसी भाषण । तुझें सुख–सौभाग्य जाण । दुणावें कीं ॥२२०॥ तुझें कराया अनहित । झाला असे जो उद्युक्त । तोचि परिणामीं निश्चित । पावेल फल ॥२२१॥ कपट ऐकिल्यापासुनी । काय सांगूं मी स्वामिनी ! । दिवसां भूक न शयनीं । झोंप रात्रीं ॥२२२॥ पुसतां ज्योतिष्यांप्रति । प्रतिज्ञेनें ते सांगती । 'भरत होईल निश्चितीं । भूप खरा' ॥२२३॥ करशील ती करीं एक । युक्ति मी सांगत्यें चोख । त्वत्सेवा–वश निःशंक । महाराज" ॥२२४॥ (मंथरेच्या या वचनें । वश होऊन कैकेयीनें । निज विश्वास पूर्णपणें । दाखवाया ॥२२५॥ होऊन अत्यंत आतुर । जाऊन ती निकटतर । सख्यत्वें सप्रेमभर । काय म्हणे ? ॥२२६॥) "तुझ्या शद्वास्तव सवेग । कूपीं लोटीन निजांग । पति–पुत्रांचाहि त्याग । करीन मी ॥२२७॥ माझ्या दुःखें कळवळून । सांगसी जरी हितवचन । तरी कैसी न मी वागेन । तयापरीं" ॥२२८॥ कैकेयीस द्याया बलि । हृदयसहाणीं घासिली । मंथरेनें परजिली । कपट–सुरी ॥२२९॥ राणी न बघे संकट । ठेविलें आपुल्या निकट । खातसेहि तृण हरित । बलि-पशु जसा ॥२३०॥ ऐकतसे मृदु गोष्टी । परि त्या दुःखद शेवटीं । विषयुक्त मधाची वाटी । देई जणुं ॥२३१॥ मंथरा म्हणे, "स्वामिनी ! । आठव आहे का मनीं । तूंच कथिली मजलागुनी । गोष्ट जी का ॥२३२॥ भूपतीनें तुजलागून । दिले होते वर दोन । ते आजचि घे मागून । तृप्त होई ॥२३३॥ राज्य द्यावें भर-

तास । आणि रामास वनवास । सर्व सवतींचा उल्हास । हरून घे ॥२३४॥ जैं महाराज दशरथ । घेतील राम-शपथ । मग तेव्हांच भाकित । टाळूं न शके ॥२३५॥ रात्र जातांच उलटुनी । कार्य जाईल नाशुनी । जीवापेक्षां प्रिय मानी । शद्व माझे" ॥२३६॥ मंथरा पापिणी भारी । घात करी ऐशा परीं । म्हणे, 'कोप-गृहांतरीं । गमन करीं ॥२३७॥ स्वपतीच्या विश्वासांत । जाऊं नकोस किंचित् । साधून घे हेतुप्रत । सावधपणें" ॥२३८॥ त्या मंथरेप्रति राणी । प्राणासम प्रिय मानी । करी बुद्धीची वाखा-णणी । वारंवार ॥२३९॥ म्हणे, "माझी तुजसारखी । हित-कर्त्री न कुणी सखी । वाहवतां दिला शेखीं । आधार तूं ॥२४०॥ उद्यां माझ्या मनांतली । इच्छा जरी पूर्ण झाली । तुज करीन मी बाहुली । डोळ्यांतलीं ॥२४१॥ नाना प्रकारेंकरून । बट-कीस सन्मानून । कैकेयी शिरे तेथून । कोपगृहीं ॥२४२॥ विपत्तिरूप बीजासी । वर्षतु मंथरा दासी । कैकेयीची कुमति त्यासी । भूमीपरी ॥२४३॥ अंकुरलें कपटजलीं । वर दोन दोन दळें फुटलीं । शेखीं दुःखफळें आलीं । परिणामीं ॥२४४॥ करून रागाची सिद्धता । निजलीसे भरतमाता । राज्य भोगितां पदच्युता । कुबुद्धीनें ॥२४५॥ (श्रीरामचरित-मानस । विहंग-राज राजहंस । गोस्वामी तुलसीदास । ग्रंथकर्ते ॥२४६॥ स्वस्ति श्रीमानसविहार । तुलसीरामायणाचें सार । द्वितीय सोपान सुखकर । भाविकांतें ॥२४७॥ मानस उत्तुंग परम । सोपान केले सुगम । वाटती तेहि दुर्गम । भाविकांतें ॥२४८॥ माझी टीका ही मराठी । हीच टेकावया काठी । ऐशा अशक्तां-साठीं । योजिली मीं ॥२४९॥ सोपानींचा मार्ग भला । जरी दीर्घतम वाटला । तदर्थ योजिला पहिला । विश्राम हा ॥२५०॥

रसिक भाविक श्रोत्यांस । विनवीतसे देवीदास । माझ्या बोबड्या बोलांस । मान्य करा ॥२५१॥)

---

# विश्राम २ रा

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्योनमः
श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः

तिकडें अयोध्या नगरी । गजबजून गेली सारी । कपट-नाटकाची परि । शुद्धि न कुणा ॥१॥ नगरींचे नारीनर । होऊन हर्षनिर्भर । करिती मंगलाचार । शृंगारुनी ॥२॥ कुणी भीतरीं प्रवेशती । कुणी बाहेर निघती । राजदरबारीं या रीतीं । भीड झाली ॥३॥ अभिषेक–वार्ता ऐकुनी । बाळमित्र हर्षती मनीं । जाती दहा-पांच मिळुनी । रामाकडें ॥४॥ त्यांचें ओळखून प्रेम । सन्मानीतसे श्रीराम । विचारी कुशलक्षेम । मृदुवचनें ॥५॥ प्रभूचा निरोप घेउनी । परत जाती स्वसदनीं । करीत रामाची वाखाणणी । आपसांत ॥६॥ "शील–स्नेहालागून । प्रसंगीं ने निभावून । श्रीरामासारखा कोण । आहे जगीं ?॥७॥ निज संचिताप्रमाणें । ज्या योनींत पडे भ्रमणें । तेथें आम्हां ईश्वरानें । हेंचि द्यावें ॥८॥ श्रीराम आमुचा स्वामी । त्याचे सेवक सर्व आम्ही । या नात्यानें दिनयामीं । निर्वाह व्हावा" ॥९॥ यापरी अयोध्या नगरीं । इच्छा सर्वांच्या अंतरीं । कैकेयीच्या मनीं परि । दाह अति ॥१०॥ दुःसमागमें

करून । नष्ट झाला नाहीं कोण ?। नीचमतीनें चतुरपण । नष्ट होय ॥११॥ असो, होतां अस्तमान । दशरथहि सुप्रसन्न । करिता झाला गमन । कैकेयी–गृहीं ॥१२॥ नव्हे नव्हे हो ! तो भूप । प्रेमचि धरून तद्रूप । निष्ठुरतेच्या समीप । जाय जणुं ॥१३॥ (परंतु शयन–गृहीं । कैकेयी दिसली नाहीं । साशंक भूपति पाही । दासीस पुसे ॥१४॥ "कोठें माझी प्राणप्रिया । गेली असे या समया" । दासी म्हणे "पडतें पायां । क्षमा करा ॥१५॥ न बोलतां शब्दहि । बाई गेल्या कोपगृहीं । कारण न कळे कांहीं । कोणतें तें" ॥१६॥) 'कोपगृह' हें ऐकुनी । दचके भूपति स्वमनीं । न पडे भीतिवशेंकरुनी । पाऊल पुढें ॥१७॥ यद्भुज-बलें स्वर्गांत । देवेंद्र नांदे निर्धास्त । वागती जाणून मनोगत । सर्व राजे ॥१८॥ ऐसा तो घाबरे राव । 'स्त्रीरोष' ऐकतां नांव । कामप्रताप–प्रभाव । पहा कसा ! ॥१९॥ खड्ग, शूल, वज्र तीन्ही । ज्यांच्या पडले अंगवळणीं । तेहि कामपुष्पशरांनीं । मृतप्राय ! ॥२०॥ तेव्हां भीत भीत भूप । जाई कामिनीसमीप । दशा पाहून विद्रूप । दुःख वाटे ॥२१॥ नेसून जीर्ण वसन । भूमीवरी केलें शयन । अलंकार सारे फेंकून । लोळतसे ॥२२॥ दुष्टबुद्धि कैकेयीचा । अमंगल तो वेष साचा । जणुं भावी वैध-व्याचा । सूचक दिसे ॥२३॥ भूपति समीप जाऊन । मृदु वचनें करी प्रश्न "रुसण्याचें काय कारण । प्राणप्रिये !" ॥२४॥ 'प्रिये ! कां रागावलीस ?'। कुरवाळून पुसे तीस । तोंचि कैकेयीनें त्यास । झिडकारिलें । ॥२५॥ जणुं संक्रुद्ध नागिणी । विलोकी टंवका-रुनी । त्यापरीं भूपालागुनी । पाहातसे ॥२६॥ द्विवासना जिभा दोन । दोन वर दोन दशन । दशरथाचें मर्मस्थान । लक्षीतसे ॥२७॥ निज भवितव्यतेस । भूपति होऊन वश ।

तिच्या काम-कौतुकास । पाहातसे ॥२८॥ वारंवार दीनवाणीं । भूप म्हणे तिजलागुनी । "हे सुमुखी! सुलोचनी!। पिक-भाषणी! ॥२९॥ हे प्रिये गजगामिनी!। सांग त्वरेंकरुनी । या समयीं काय म्हणुनी । रागावलीस ? ॥३०॥ तुझें अनहित केलें । कोणीं तें सांग वहिलें । यमानें ज्यास इच्छिलें । द्विमस्तकी ?॥३१॥ सांग कोणत्या रंकास । करून सोडूं नरेश । लावूं कोणत्या भूपास । देशोधडी ? ॥३२॥ अमर जरी तुझा वैरी । मारूं शकेन त्यास परि । मग बापुडे नरनारी। कीट जैसे! ॥३३॥ माझा स्वभाव तुजप्रत । हे वरोरु! असे विदित । तव मुखचंद्राकित । मनश्चकोर ॥३४॥ प्रिये! माझे प्राण, सुत, । प्रजा, परिवार समस्त । सर्वस्व तुझ्याच अंकित । असे माझें ॥३५॥ विलासिनी! कपटयुक्त । जरी बोलेन तुज प्रत । तरी रामाची शपथ । शतवार ॥३६॥ एकदां करून स्मित । घे मागून जे वांछित। सजवी सुंदर देहाप्रत। भूषणांनीं ॥३७॥ ब-या वाईट वेळेचा । मनीं विचार करीं साचा । प्रिये! वेगें कुवेषाचा । त्याग करीं' ॥३८॥ ऐकून ते भूपोद्गार । शपथेचा करून विचार । हंसतचि उठली सत्वर। मंदमति ॥३९॥ फांसे टाकीत भिल्लिणी । जैसी पाहे मृगा-लागुनी । स्वयें सजवीत भूषणीं । पाहे नृपा ॥४०॥ तीतें प्रिय-तमा जाणुनी । प्रेमें पुलकित होउनी । मृदु, मंजुळ बोले वाणी । भूप पुन्हां ॥४१॥ "भामिनी! तुझे मनोगत । आज झाले ना पूरित? । घरोघरीं नगरांत । आनंद होय ॥४२॥ यौवराज्य रामाप्रत । उद्यां द्यावयाचें निश्चित । सुंदरी! सजवीं त्वरित । मंगलद्रव्यें" ॥४३॥ कठोर वचन ऐकुनी । उठली दचकून राणी । पिकल्या गळूंस कोणीं । डंवचिलें जणुं ॥४४॥ तिडीक उठे, परि

मनीं । झांकी वरून हांसुनी । जैसी चोराची कामिनी । प्रकट न रडे ॥४५॥ कोटिकपटशिरोमणि । त्या गुरूची शिष्या राणी । तत्कापटच न ये ध्यानीं । भूपतीच्या ॥४६॥ जरी राजा दशरथ । अत्यंत नीतिनिष्णात । परि अगाध स्त्रीचरित । सागरापरीं ॥४७॥ लटकेंच प्रेम दावून । डोळे, मुख मुरडून । हांसत हांसत वचन । काय वदे– ॥४८॥ "गडे ! माग माग म्हणून । नुसतेंच देतां वचन । देण्या–घेण्याचें पण । नांव नको! ॥४९॥ मागें दिधले दोन वर । ते तसेच आजवर । पुढेंहि पण मारामार । द्यावयाची" ॥५०॥ खूण पटली भूपाप्रत । मग वदे हांसत हांसत । "स्त्रियांना रुसण्याफुगण्यांत । मौज वाटे ॥५१॥ तूंच ठेविली ती ठेव । पुन्हां न केला आठव । विसराळू मत्स्वभाव । मूळचाच ॥ ५२ ॥ ऐसा असून प्रकार । वृथाच दोष मजवर । दोनचि का चार वर । कां न घेसी ? ॥ ५३ ॥ रघुकुलाची रीत जाण । चालत आली सनातन । प्राण गेले तरी वचन । अन्यथा नव्हें ॥५४॥ पातकांचा समुदाय । असत्यासम न होय । कोटि गुंजांचा ढीग काय । पर्वतासम? ॥५५॥ वेद-पुराण-ऋषिमत ऐसेंचि असे निर्णित । सत्येंचि शोभा समस्त । सुकृतांची ॥५६॥ मत्पुण्य–प्रेमाची सीमा । मी मानितों माझ्या रामा । त्याचीच शपथ निस्सीमा । घेतली मीं" ॥५७॥ ऐकून नृपाचें उत्तर । वचनीं गोंवून दृढतर । कैकेयी सहर्षभर । बोलली [illegible] ॥५८॥ तिच्या मनींचें कुमत । तोचि श्येन पक्षी येथ । उघडिला तन्नेत्रपट । तेणें जणुं ॥५९॥ भूपतीचे मनोरथ । तोचि रम्य वनप्रांत । जेथें सुखविहंग समस्त । संचरती ॥६०॥ तेथें कैकेयी भिल्लीण । निजवचनरूप श्येन । सोडूं इच्छिते दारुण । त्याच्यावरी ॥६१॥ "ऐका प्राणप्रिया नाथा !। माझ्या जीवींच्या मनोरथा । यौव-

राज्य द्यावें भरता । एका वरें ॥६२॥ आतां जोडून मी हस्त । मागतें दुज्या वराप्रत । नाथ! माझें मनोगत । पूर्ण करा ॥६३॥ तपस्व्याच्या वेषानें । पूर्ण उदासीनतेनें । वनवास करावा रामानें । चवदा वर्षें" ॥६४॥ ऐकतां मृदु वचनास । दुःख भूप-हृदयास । जैसा शशिकरस्पर्श । चक्रवाका ॥६५॥ अवर्णनीय झाला ताप । तेणें सुकलासे भूप । जणुं श्येनाची झडप । लाव्या-वरी ॥६६॥ दशरथ एका क्षणांत । निस्तेज दिसे अत्यंत । जणुं झाला विद्युत्पात । तालवृक्षीं ॥६७॥ डोक्यावरी टेकी हात । दोन्ही नेत्र निमीलित । शोकाकुल मूर्तिमंत । शोकचि जणुं ॥६८॥ म्हणे, "माझा मनोरथ । कल्पवृक्षचि साक्षात् । फुलून होय सुफलित । आतां कुठें ॥६९॥ तोंच हत्तिणीनें तडक । येऊन मारिली धडक । उपटून टाकिला निःशंक । मूळासह ॥७०॥ कैकेयीनें अयोध्येतें । विध्वंसिलें निजहस्तें । चिरंतन विपत्तीतें । आमंत्रिलें ॥७१॥ कैसा आनंदाचा समय । त्यांत हें घडलें काय । स्त्रीविश्वासांत हाय । घात झाला! ॥७२॥ योगसिद्धीचा उत्कृष्ट । फलकाल येतां निकट । जैसा यतीचा नायनाट । अविद्या करी" ॥७३॥ मनींच्या मनींच भूप । ऐसा करितां विलाप । कुमति ती पाहे सकोप । काय वदेः— ॥७४॥ "तुमच्या पोटचा भरत । नाहीं का सांगा मजप्रत । कीं मज आणिलें विकत । देऊन मोल ? ॥७५॥ नुसतें ऐकतांच जरी । तुम्हां झोंबलें बाणापरीं । आधीं कां न बोललां तरी । जपून नीट ? ॥७६॥ उत्तर कांहीं तरी द्याना । नसतां नाहीं तरी म्हणा । सत्यप्रतिज्ञ तुम्हीच ना । रघुवंशीय? ॥७७॥ देतों म्हणून दिलें वचन । आतां जरी देववें न । घ्या हो! सत्यास त्यागून । अपयश जगीं ॥७८॥ आधीं सत्य प्रशंसिलें । वर देतों ऐसें

म्हटलें । मागेन का ऐसें वाटलें । कांहीं तरी? ॥७९॥ शिबि, दधीचि, बलि ह्यांनीं । धन–प्राणातें वेंचुनी । रक्षिलें आपुल्या। वचनीं । सत्यत्व तें" ॥८०॥ राणी कैकेयी यापरीं । बोलली कटुवचन भारी । जणुं भर्जित व्रणावरी । क्षार घाली ॥८१॥ धैर्य–धुरंधर दशरथ । धीर धरून मनांत । उघडी निज नेत्रा-प्रत । तदवसरीं ॥८२॥ करें बडवी कपाळास । दीर्घ सोडून निश्वास । म्हणे, "कां वर्मीं घालितेस । घाव अशी ?" ॥८३॥ क्रोधें अतिशय तापली । कैकेयी सन्मुख देखिली । जणुं कोपेंच उपसिली । असिलता तैं ॥८४॥ कुबुद्धि ही मूळ भारी । निष्ठुर-ता–धार विषारी । मंथरेच्या सहाणेवरी । परजिली ॥८५॥ ऐसी कराल असिलता । भूपास वाटलें पाहतां । 'घेणार मत्प्राण आतां । निश्चयानें' ॥८६॥ घट्ट करूनिया मन । तिज रिझवाया आपण । भूप बोले तैं वचन । काकुळतीं ॥८७॥ "रीति, विश्वास, प्रेम । करून यांचा उपशम । ऐसें कां बोलसी विषम । सांग प्रिये ! ॥८८॥ ( रघुवंशीं सार्वत्रिक । ज्येष्ठ पुत्रा राज-तिलक । चालत आली निःशंक । हीच रीति ॥८९॥ स्त्रीच्या आधारें पुरुष । निर्धास्त होऊन वश । या परीचा पुरुषास । विश्वास हा ॥९०॥ सर्वांपेक्षांहि प्रियतम । तुज होता माझा राम । ऐशापरीचें निस्सीम । प्रेम जें का ॥९१॥ ) भरत-राम दोघेजण । माझे असती नेत्र दोन । सत्य सांगतों, ठेवून । साक्षी शिवा ॥९२॥ उद्यां सकाळीं निश्चित । पाठवून देतों दूत । येतील बंधु त्वरित । उभयतांहि ॥९३॥ पाहून पुन्हां सुदिन । समारंभ भरवून । देतों भरतालागून । प्रकट राज्य ॥९४॥ राज्यास्तव लोभाविष्ट । राम नाहीं हें तो स्पष्ट । भरतावरी उत्कृष्ट । प्रेम त्याचें ॥९५॥ वडील–धाकटेंपण ।

मीच मनीं विचारून । राजनीतीतें धरून । नेम केला ॥९६॥ शतराम–शपथेनें । सांगतों प्रांजलपणें । कथिलें न राममातेनें । कांहींच कधीं ॥९७॥ केलें तें सर्व मींच केलें । मात्र तुज ना विचारिलें । तेणें ढासळून पडले । मनोरथ ॥९८॥ तरी कोप टाकून आतां । करी लाडके! सिद्धता । अल्पावधींतचि भरता । यौवराज्य ॥९९॥ एकाच गोष्टीनें मात्र । दुःख झालें मज फार । मागितला जो दुजा वर । अविचारें ॥१००॥ त्या दुःखाग्नीच्यासरिसें । अद्यापि हृदय जळतसे । हा कोप कीं थट्टा असे । खरेंच ही? ॥१०१॥ तरी टाकूनिया क्रोध । सांग रामाचा अपराध । वाखाणिती साधु, शुद्ध । म्हणून त्या ॥१०२॥ तूंहि त्यासी प्रशंसून । केलेंस प्रेम पूर्ण । ऐकून हें त्वद्‌वचन । नवल वाटे! ॥१०३॥ ज्या रामाचें स्वभाव–शील । वैऱ्यांसहि अनुकूल । तो मातेसी प्रतिकूल । वागेल कसा? ॥१०४॥ प्रिये! विनोद कीं राग । यांचा करूनिया त्याग । विचारपूर्वक माग । दुजा वर ॥१०५॥ ज्यायोगानें आवश्यक । भरता राज्यभिषेक । डोळे भरून निःशंक । पाहीन मी ॥१०६॥ जलाविरहित मीन । कंठू शकेल जीवन । मण्या-विण दुःखी, दीन । जगेल सर्प ॥१०७॥ परि मी प्रांजलपणें । सांगतों निष्कपट मनें । राहतील ना रामाविणें । प्राण माझे ॥१०८॥ प्रिये! तूं सुज्ञ म्हणून । पहा विचार करून । असे रामदर्शनाधीन । मज्जीवित" ॥१०९॥ ऐकून ती कोम-लोक्ति । जळफळाट करी कुमति । अग्निमाजीं घृताहूति । पडली जणुं ॥११०॥ म्हणे, "सांगा गोष्टी नाना । कोटि उपाय का कराना । मजपुढें हा लाघवीपणा । चालणार नाहीं ॥१११॥ द्या हो! दोन्ही वरांस । ना तरी घ्या अपयश । बाष्कळपणा

हा निःशेष । न रुचे मज ॥११२॥ राम आणि तुम्ही स्वतां । साधु, सुज्ञच राममाता । ओळखून चुकलें आतां । सर्व कांहीं ॥११३॥ कौसल्येनें जसें योजून । केलें माझें हितचिंतन । त्याचें फळ तिज लावीन । चाखावया ॥११४॥ प्रातःकाळ होतां-क्षणीं । मुनीचा वेष घेउनी । जरी राम न गेला वनीं । निश्चयानें ॥ ११५ ॥ तरी राया ! आवश्यक । माझें मरण निःशंक । तुमच्या यशास कलंक । ध्यानीं धरा" ॥११६॥ ऐसें बोलून दुष्टबुद्धि । उभी राहिली संनिधीं । जणुं क्रोधाचीच नदी । फोंफावली ॥११७॥ निघे पापपर्वतांतून । चाले क्रोध-जलें भरून । पाहूं जातां पाहवें न । तिच्याकडे ॥११८॥ तिच्या दुथडी दोन वर । दुराग्रह ही मुख्य धार । कुब्जेचो शिकवण अपार । भोंवरे तिचे ॥११९॥ समूळ भूपवृक्षास । उलथूं पाहे ससाहस । चालली विपत्तिसिंधूस । मिळावया ॥१२०॥ भूपें जाणिलें निश्चित । 'विनोद न, हा सत्य हेत । मच्छिरीं नाचे कृतांत । स्त्रीमिषानें' ॥१२१॥ बसवी धरून करास । वदे सविनय तीस । "कुठारी होऊं नकोस । रविवंशासी ॥१२२॥ माग माझ्या मस्तकातें । करीन तुझ्या स्वाधीन तें । परि मारूं नकोस मातें । रामविरहें ॥१२३॥ कांहीं करून उपाय । ठेवून घे रामतनय । नातरी जळेल हृदय । जन्मभरी" ॥१२४॥ व्याधि असाध्यचि भारी । जाणूनिया निजांतरीं । भाळ पिटीत भूवरी । लोळे भूप ॥१२५॥ थकला करून काकळूत । करी आक्रोश आर्तभूत । "हा राम! राम! रघुनाथ" । म्हणूनिया ॥१२६॥ व्या-कुलतेनें त्या कालां । सर्वांगीं तो शिथिल झाला । जणुं हत्तिणीनें उलथिला । कल्पवृक्ष ॥१२७॥ कंठ गेलासे सुकून । शब्द न निघे मुखांतून । जीवनावांचून दीन । मीन जैसा ॥१२८॥ पुन्हां

वचन निर्दयी । कांहीं बोलली कैकेयी । जेंसें का व्रणाठायीं । भरावें विष ॥१२९॥ "माझ्या मागणीचा जरी । शेवट होता ऐशापरीं । म्हटलें कशाच्या बळावरी । माग माग ॥१३०॥ राया! हंसतां खद-खदा । गालहि फुगवितां वदा । दोन्ही गोष्टी एकदां । होतील कैशा ?॥१३१॥ दाता म्हणवूं इच्छितां । आणि करितां कृपणता । शूर म्हणवून वांछितां । क्षेम–कुशल ! ॥१३२॥ लावा वचना हरताळ । किंवा धरा धैर्यबळ । करूं नका शोक केवळ । नारीपरी ॥१३३॥ देह, गेह, राज्य, सुत । कलत्र, वित्त समस्त । सत्यप्रतिज्ञ नराप्रत । तृणासम" ॥१३४॥ ती मर्मभेदक उक्ति । ऐकून वदे भूपति । "बोल गे! यांत तुजप्रति । दोष नाहीं ॥१३५॥ मोहपिशाच संप्रति । लागलें वाटे तुजप्रति । त्वन्मुखें बोलवी उक्ति । काळ माझा ॥१३६॥ राज्यपदाची ही हौस । मुळींच नाहीं भरतास । दैववशें दुष्ट आस । तुझ्याच मनीं ॥१३७॥ माझ्या पापाचें केवळ । हें अवघें आहे फळ । प्रतिकूल होतां काळ । विपरीत विधि ॥१३८॥ पुन्हां अयोध्या नगरी । सुखें नांदेल निर्धारीं । प्रभुत्व करील तिजवरी । गुणधाम राम ॥१३९॥ तिघे बंधु रामाप्रति । सेवितील ही निश्चिती । रामाचीच गाजेल कीर्ति । तीन्हीं लोकीं ॥१४०॥ तुला लागली काजळी । तैसा मदनुताप मुळीं । मेलों तरी कधीं काळीं । जातील ना ॥१४१॥ योग्य वाटेल त्वन्मनास । करीं गे! या समयास । तोंड लपवून जा बैस । दृष्टि-आड ॥१४२॥ प्रार्थितों जोडून कर । कीं मी जिवंत जोंवर । काढूं नकोस अवाक्षर । तोंवरीं तूं ॥१४३॥ अभागिनी ! तुज शेवटीं । पश्चात्ताप होईल पोटीं । नुसत्याच वादीसाठीं । कापिसी गाय ॥१४४॥ कोटिप्रकारें परोपरीं । कां मदंत बघसी

तरी" । ऐसें बोलून धरेवरी । लोळे भूप ॥१४५॥ परि कावेबाज कैकेयी । कांहीं न वदे त्या समयीं । जागत राही त्या ठायीं । स्मशान जणुं ! ॥१४६॥ 'राम राम' ऐसें म्हणत । व्याकुल होतसे दशरथ । व्यथित पंखरहित । पक्षी जणुं ॥१४७॥ "उजाडूंच नये आतां" । ऐसें गमे भूपचित्ता । "कळवावें ना रघु-नाथा । कुणींहि हें ॥१४८॥ रघुकुलाचा मूळपुरुष । तो उगवूं नये दिनेश । दुःख होईल अयोध्येस । पाहून त्या" ॥१४९॥ भूपाची प्रेममयता । कैकेयीची निष्ठुरता । उभयसीमा विधाता । रचिता झाला ॥१५०॥ विलाप करी सम्राट । तोंच जाहली पहांट । होय वाद्यांचा घडघडाट । राजद्वारीं ॥१५१॥ भाट वर्णिती गुण । गायक करिती गायन । लागती भूपास ऐकून । बाण जैसे ॥१५२॥ होतसे मंगल गजर । परि रुचेना तिळभर । जैसा पतिव्रतेस शृंगार । सती जातां ॥१५३॥ त्या रात्रीं कोणासहि । निद्रा ती लागली नाहीं । रामदर्शनाची हृदयीं लालसा बहु ॥१५४॥ राजद्वारीं भीड फार । सचिव सेवक परस्पर । उदित पाहून भास्कर । काय म्हणती– ॥१५५॥ "अयोध्याधीश अजून । जागले न झोंपेंतून । विशेष काय कारण । घडलें तरी ? ॥१५६॥ चतुर्थ प्रहरीं नित । महाराज होती जागृत । आजचें नवल खचित । आम्हां गमे ! ॥१५७॥ जा हो सुमंता ! त्वरित । भूपास करा जागृत । कार्य करणें हें प्राप्त । आज्ञेनुसार" ॥१५८॥ जाय भूपा-कडे प्रधान । परि सर्वत्र भयाण । पाहून वातावरण । दचकला तो ॥१५९॥ जणुं खावया ये धांवून । दृश्य दृष्टीं पाहवें न । विपत्ति-विषादें ठाण । मांडिलें जणुं ॥१६०॥ पुसतां कुणी न बोलती । जेथें कैकेयी–भूपति । सचिव त्या मंदिराप्रति । जाता

झाला ॥१६१॥ करून जयजयकार । बैसे नमवून शिर । भूपदशा पाहून फार । खिन्न होय ॥१६२॥ मूर्छित शोक-व्याकुल । पडे भूवरी भूपाल । जणुं उपटिलें कमल । मूळासह ॥१६३॥ सचिव झाला भयभीत । पुसूं न शके किंचित् । अशुभपूर्ण मंगलरहित । राणीच वदे– ॥१६४॥ "रात्रभरी भूपाप्रत । झोंप न लागली किंचित् । काय झालें तें निमित्त । देव जाणें ! ॥१६५॥ 'राम राम' ऐसें म्हणत । होत आलासे प्रभात । परि न कथिती हृद्गत । महाराज ॥१६६॥ सुमंता ! आतां त्वरित । आण बाहून रामाप्रत । मग विचारीं वृत्तान्त । येऊनिया" ॥१६७॥ भूपाचें तें मनोगत । जाणून निघाला सुमंत । खिन्न पाहून तयाप्रत । पुसती जन ॥१६८॥ सर्वांचेंहि प्रासंगिक । समाधान करून सम्यक् । जेथें रविकुल-तिलक । तेथ जाय ॥१६९॥ येतां सुमंत प्रधान । देखून रघु-नंदन । पित्यासम त्या लेखून । सन्मान करी ॥१७०॥ मुखचंद्र विलोकून । राजाज्ञा करी कथन । रघुकुल–दीपास घेऊन । निघाला तो ॥१७१॥ सचिवासह रघुनाथ । वेगें जातसे सचिंत । पाहून जन समस्त । खिन्न होती ॥१७२॥ रघुवंशमणि जाऊन । विलोकी पित्यालागून । दिसे अवकळा पूर्ण । भूपतीची ॥१७३॥ वृद्ध गजराज ज्या रीतीं । पाहून सिंहिणीप्रति । विकल होऊन भूवरती । पडलासे ॥१७४॥ ओष्ठ सुकले दोन्हीहि । सर्वां-गाची झाली लाही । मणि-विहीन महा अहि । दीन जणुं ॥१७५॥ क्रोधें संतप्त जाहली । कैकेयी समीप दिसली । घटिका मोजत बैसली । काळासम ॥१७६॥ स्वभावेंचि रघुनायक । अति कोमल कारुणिक । प्रथमचि देखे दुःख । ऐकिलें न जें ॥१७७॥ तथापि धीर धरून । प्रसंग तो ओळ-

खून । पुसे माउलीलागून । मधुर वचें ॥१७८॥ "पितृदुःखाचें कारण । सांग माते ! मजलागून । तन्निवारणार्थ यत्न । अवश्य करीन" ॥१७९॥ तैं म्हणे, "राघवा ! ऐक । सर्वांसी कारण एक । तुजवरील आत्यंतिक । भूपप्रेम ॥१८०॥ देऊं केलें मजलागून । यापूर्वींच वर दोन । ते घेतले मी मागून । इच्छेपरीं ॥१८१॥ ते ऐकतां तत्क्षणीं । दुःख झालें भूपमनीं । केवळ त्वत्प्रेमेंकरुनी । टाळूं न शकती॥१८२॥ पुत्रप्रेम एकीकडें । वरदान दुसरीकडें । ऐशा संकटीं सांपडे । अयोध्याधीश ॥१८३॥ शक्य असेल तुज जरी । पित्राज्ञा ती शिरीं धरीं । दुःसह क्लेश दूर करीं । राजयाचे" ॥१८४॥ बसल्या बसल्याच राणी । निर्भय बोले कटुवाणी । ऐकतां जाय वितळुनी । कठिण-ताहि ॥१८५॥ तिची जिव्हा चापासमान । तीक्ष्ण बाण तैसें वचन । भूपाचें कोमल मन । हेंचि लक्ष्य ॥१८६॥ जणुं काठिण्य मूर्तिमंत । श्रेष्ठ वीर व्हायाप्रत । अभ्यास करूं पाहत । धनुर्विद्येचा ॥१८७॥ यापरीं श्रीरामाप्रत । सांगून सर्व वृत्तांत । बैसली जणुं मूर्तिमंत । निष्ठुरताच ॥१८८॥ यापरी तें मातृ-वचन । भानुकुलरवि ऐकून । सहजानंदनिधान । हांसे मनीं ॥१८९॥ सकल दोष विवर्जून । मृदु, मंजुल वदे वचन । जणुं काय आभरण । शारदेचें ॥१९०॥ "ऐक माते ! तोचि सुत । असे थोर भाग्यवंत । मातापितरांच्या आज्ञेंत । अनुरक्त जो ॥१९१॥ मातापितरांलागुनी । ठेवी संतुष्ट जो जननी ! । ऐसा पुत्र या भुवनीं । दुर्लभ असे ॥१९२॥ मुनिजनांचें दर्शन विशेषें सेवितां मीलन । तेणें माझेंचि कल्याण । सर्वतो-परी ॥१९३॥ ऐशा या लाभाप्रत । पित्याची अनुज्ञा त्यांत । आणि असती संमत । माते ! तूंहि ॥१९४॥ प्राणप्रिय माझा

भरत । त्यास होय राज्य प्राप्त । दैव अनुकूल मजप्रत । सर्वतोपरीं ॥१९५॥ ऐशा कार्यास्तव वनीं । गेलों नाहीं तरी जननी! । मूर्खाचांच अग्रणी । म्हणवीन मी ॥१९६॥ कल्पवृक्ष झुगारून। सेविती एरंडालागून । मागती विष, टाकून । अमृतास जे ॥१९७॥ सुसंधि लाधतां या रीतीं । तेहि वायां न दवडिती । याचा विचार निज चित्तीं । करी माते ! ॥१९८॥ मातें एकचि संप्रति । दुःख होतसे मजप्रति । व्याकुल पाहून नृपति । आत्यंतिक ॥१९९॥ गोष्ट पाहतां क्षुल्लक । पित्यास वाटे महा दुःख। याचेंच मजला अधिक । नवल माते! ॥२००॥ अगाध गुणसागर असतां भूप महा धीर । मजकडून झाला घोर । अपराध का ? ॥२०१॥ त्यामुळेंच महाराज । कांहीं न बोलती मज । माझीच शपथ तुज । खरें सांग" ॥२०२॥ स्वभावेंचि सरळ पूर्ण । राघवाचें हें भाषण । दुर्बुद्धि कैकेयीलागून । कुटिल वाटे ॥२०३॥ पाहतां वाटतें जीवन । स्वभावेंचि तें समान । जळू जैसें करी गमन । वक्रगति ॥२०४॥ रामाचा कल जाणुनी। तेव्हां बोलतसे राणी । वरून प्रेम दाखवुनी । कपटपूर्ण ॥२०५॥ "तुझी–भरताचीच शपथ । घेऊन सांगतें यथार्थ । दुजें कारण मजप्रत । कळलेंचि ना ॥२०६॥ जननी–जनक–बांधवां । सुखदाता त्यांच्या जीवां । कधींहि नससी राघवा! । अपराधार्ह ॥२०७॥ रामा! तूं जें बोलसी । तें तें सत्यचि निश्चयेंसी । मातृ–वचनीं अससी । अनुरक्त तूं ॥२०८॥ मी अलाबला घेतें । तूंच समजावीं पित्यातें । कलंक न लागेल त्यातें । वार्धक्यीं जेणें ॥२०९॥ ज्या पूर्वसुकृतेंकरून । पुत्र लाभे तुजसमान । त्याचा करणें अपमान । उचित नव्हे" ॥२१०॥ कुश्चल मुखांतून ऐशीं । शुभवाक्ये निघतीं कैशीं । गयादिक

तीर्थें जैशीं । मगधदेशीं ॥२११॥ मातेचें वचन केवळ । रामास वाटलें प्रेमळ । गंगेसी मिळतां ओहळ । गंगाच जेंवि ॥२१२॥ मूर्छा जातांच दशरथ । 'राम–राम' ऐसें म्हणत । वळवून निजांगाप्रत । फिरवी मुख ॥२१३॥ तोंचि सुमंत प्रधान । श्रीरामाचें आगमन । विनयें समय साधून । सुचवीतसे ॥२१४॥ मग श्रीरघुनंदन । ठाकला निकट जाऊन । धैर्ये उघडिले नयन । भूपें तदा ॥२१५॥ दशरथास सांवरून । बैसवी सुमंत प्रधान । राव पाही रामालागून । पद वंदितां ॥२१६॥ प्रेमें व्याकुळ होउनी । हृदयीं धरी आलिंगुनी । जणुं सर्पास लाधे मणि । हरपलेला ॥२१७॥ एकटक रामालागुनी । जैं न्याहाळी नरमणि । अश्रुप्रवाह नेत्रांतुनी । वाहतसे ॥२१८॥ शोकवशें कासावीस । न बोलवें भूपतीस । हृदयीं धरी रामास । वारंवार ॥२१९॥ त्या समयीं दशरथ । मनीं प्रार्थी धात्याप्रत । जेणें न जाईल वनांत । रामचंद्र ॥२२०॥ शंकरातें आठवुनी । करूं लागे विनवणी । "मत्प्रार्थना घे ऐकुनी । सदाशिवा ! ॥२२१॥ संतुष्ट होसी तत्काल । दाता असती तूं सढळ । दीन जाणून दुःख सकळ । हरण करीं ॥२२२॥ प्रेरक सर्वांच्या हृदयीं । तूंच एक असती पाहीं । यास्तव राघवा देईं । ऐसी मति-॥२२३॥ शील-स्नेहातें त्यागुनी । माझी आज्ञा उल्लंघुनी । जेणें राहील सदनीं । राम माझा ॥२२४॥ नष्ट होऊन सत्कीर्ति । दुर्लौकिक होवो जगतीं । स्वर्गा मी मुकून अंतीं । नरकीं पचो ! ॥२२५॥ दुःसह दुःखसमुच्चया । लावीं मजला भोगावया । परि होऊं न दे रामराया । दृष्टिआड" ॥२२६॥ ऐसा मनीं विचार करी । न बोलवें कांहीं परि । पिंपळाच्या पानापरीं । डळमळे मन ॥२२७॥ प्रेमाकुल जाणून पिता । कांहीं बोलेल पुन्हां

माता । ऐसें विचारून चित्तां । रामराय ॥२२८॥ देश, काल, वर्तमान । या सर्वां अनुसरून । विचारें विनयें वचन । बोल-तसे ॥२२९॥ "धाडस करून हे तात ! । कांहीं बोलतों सांप्रत। लेकरूं जाणून अनुचित । क्षमा करा ॥२३०॥ या क्षुल्लक गोष्टीस्तव । दुःख भोगितां अतीव । न कळविला मनोभाव । आधींच कां? ॥२३१॥ आपणांतें विलोकिलें । मीं मातेस विचारिलें । वृत्त ऐकतां निवालें । सर्वांग माझें ॥२३२॥ या मंगल प्रसंगांत । शोक आहे मायाजनित । ताता ! सत्वरीं याप्रत । दूर करा ॥२३३॥ प्रसन्न करून चित्त । आज्ञा द्या हो! मजप्रत" । प्रभु-देह रोमांचित । बोलतां हें ॥२३४॥ राम म्हणे, "या अवनीं । धन्य तयाचाच जनि । ज्याचें चरित्र परि-सुनी । हर्षे पिता ॥२३५॥ चतुर्विध पुरुषार्थ । त्यासच होती हस्तगत । प्राणासम प्रिय ज्याप्रत । मातापिता ॥२३६॥ करून आज्ञेचें पालन । जन्म-सार्थक संपादून । त्वरें येतों मी परतून । आज्ञा करा ॥२३७॥ निरोप मातेचा घेऊन । पुन्हां हे पद वंदून । वनीं मी करितों गमन । आज्ञेपरीं" ॥२३८॥ राम यापरीं बोलून । करिता जाहला गमन । भूप न वदे वचन । शोक-वशें ॥२३९॥ (सोपानींचा मार्ग भला । जरी दीर्घतम वाटला। तदर्थ दुसरा योजिला । विश्राम हा ॥२४०॥ रसिक भाविक श्रोत्यांस । विनवीतसे देवीदास । माझ्या बोबड्या बोलांस । मान्य करा ॥२४१॥)

—o—

# विश्राम ३ रा

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः श्रीगुरुभ्यो नमः
श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः

ही दुःखद वार्ता क्षणीं । नगरीं गेली पसरुनी । जणुं वेदना सर्वांगांनीं । वृश्चिक-दंशें ॥१॥ नरनारीप्रति सर्वां । ऐकतां व्याकुलता जीवां । वृक्षलतादिकां वणवा । लागला जणुं ॥२॥ वार्ता ऐकावी जेथें ज्यानें । भाळ पिटावें तेथें त्यानें । तयाचा अति दुःखानें । धीर खचे ॥३॥ तोंडचें पळालें पाणी । अश्रु वाहती लोचनीं । न मावे हृदय-भुवनीं । शोक तदा ॥४॥ करुण रसाची सेना । करीत वाद्यगर्जना । जणुं उतरली जाणा । अयोध्येंत ॥५॥ जुळवून योग आणिला । धात्यानेंचि तो नाशिला । जेथें तेथें कैकेयीला । शिव्या देती ।६॥ "या पापिणीतें कसले । न कळे डोहाळे सुचले । शाकारिल्या गृहीं ठेविले । निखारे तिनें ॥७॥ स्वकरें काढून नयन । करूं इच्छिते विलोकन । करिते विषप्राशन । टाकून सुधा ॥८॥ कपटी, निष्ठुर, दुर्मति । अभागिनी ही संप्रति । रघुकुलवेणुवनाप्रति । वन्हिच होय ॥९॥ बसून शाखेवरी हातें । वृक्षमूळातें कापिते । सुखांत दुःख कालविते । हटकून ही ॥१०॥ सदैव रघुनंदन । हिजला प्राणासमान । रचाया काय कारण । कौटिल्य हें ॥११॥ स्त्रीस्वभावाचें वर्णन । सत्य करिती कविजन । कीं अगम्य, दुर्धर, गहन । सर्वतोपरीं ॥१२॥ आपुली आपण छाया । शक्य होय धरावया । परि स्त्रियांची माया । नुमगे मुळीं ॥१३॥

निज दाहकत्वें अनल । काय एक न जाळील । काय एक न समावेल । सागरांत ? ॥१४॥ काळाच्या मुखाभीतरीं । काय न पडे, त्यापरीं । प्रबल अबला न करी । काय एक ?॥१५॥ काय ऐकवून धाता । काय ऐकवी आतां । दाखवूं इच्छीत होता । काय दावी ?" ॥१६॥ कुणी म्हणती, "भूपालें । हें न केलें चांगलें । विचारें वचन ना दिलें । दुर्मतीतें ॥१७॥ जेणें स्वतांस हटबलें । सर्व दुःखा पात्र केलें । ज्ञानगुणांतें घालविलें । नारीवशें" ॥१८॥ जे का सुज्ञ होते कुणी । धर्मव्याप्तीस जाणुनी । ते मात्र भूपालागुनी । दोष न देती ॥१९॥ शिबि, हरिश्चंद्र, दधीचि । कथा सत्यप्रतिज्ञांची । वर्णून सांगती साची । एकमेकां ॥२०॥ त्यांतून कोणी म्हणती । "असेल भरताची संमति"। कोणी उदास राहती । ऐकून हें ॥२१॥ बोटें घालून कर्णीं । जीभ चावून कोणी । म्हणती, "असत्य निर्वाणीं । आरोप हा ॥२२॥ (श्रीराम राहून येथ । भरतास करील त्रस्त । ही शंका निवारणार्थ । म्हणती पुढें ॥२३॥) ऐशा भाषणें निश्चित। तुमचें नासेल सुकृत । राम हा भरताप्रत । प्राणप्रिय ॥२४॥ चंद्रमा तो कदाचित् । वर्षेल अग्निकणांप्रत । विषतुल्य होईल अमृत । एकपरीं ॥२५॥ परि स्वप्नींहि केवळ । श्रीरामाच्या प्रतिकूल । भरत कांहीं न करील । निश्चयानें" ॥२६॥ कुणी विधात्याकारणें । देऊं लागले दूषणें । अमृत दाखवून जेणें । दिधलें विष ॥२७॥ कोलाहल नगरांतरीं । सर्वां झालें दुःख भारी । उत्साह जाऊन अंतरीं । असह्य ताप ॥२८॥ वयोवृद्ध आयाबाया । कुलीन ब्राह्मणस्त्रिया । होत्या ज्या का अतिप्रिया । कैकेयीस- ॥२९॥ तिचें शील प्रशंसिती । जाऊन तिजला बोधिती । परि त्यांचे शब्द लागती । बाणासम ॥३०॥ "रामा-

समान भरत । प्रिय नाहीं मजप्रत" । म्हणत होतीस तूं नित । ठावें सर्वां ।।३१।। "कैकेयी! राघवावरती । तुझी होती सहज-प्रीति । कोणत्या अपराधें त्याप्रति । धाडिसी वनीं? ।।३२।। सवतीमत्सराचा स्पर्श । त्वन्मनीं नव्हता लेश । प्रेम-विश्वासाची देश । देईल ग्वाही ।।३३।। कौसल्येनें काय परि । घोडें मारिलें तुझें तरी । जेणें केलास अयोध्येवरी । वज्राघात? ।।३४।। पतिसंगति सोडून । सीता राहील कोठून । रामाविण गृहीं लक्ष्मण । राहील काय? ।।३५।। अयोध्येच्या राज्याप्रत । काय भोगील भरत? । भूप राहील का जिवंत । रामाविण? ।।३६।। ऐसा करून विचार । करीं क्रोधाचा परिहार । शोक-कलंकाचें कोठार । होऊं नकोस ।।३७।। भरतास राजतिलक । होऊं दे तूं आवश्यक । किमर्थ रघुनायक । धाडिसी वनीं? ।।३८।। लाभा-वया राज्य-सुख । भुकेला न रघुनायक । विषयरसा पराङ्मुख । धर्मधुरीण ।।३९।। राम त्यजून गृहास । गुरुगृहीं करो वास । मागून घे हा भूपास । दुसरा वर ।।४०।। आमुचे बोल यापरीं । मान्य न होतील जरी । कांहीं न पडेल पदरीं । तुझ्याहि पण ।।४१।। जरी विनोद हा केवळ । केला तुवां अल्पकाळ । तरी तो आतां प्रांजळ । सांग आम्हां ।।४२।। रामासारिखा तनय । काय असे वनायोग्य । ऐकून म्हणतील काय । लोक तुज? ।।४३।। ऊठ वेगें, तात्कालिक । उपाय करीं तो एक । ज्यायोगें शोक-कलंक । नष्ट होय ।।४४।। ज्यायोगें कलंक-शोक । नष्ट होईल निःशंक । करी उपाय आवश्यक । रक्षीं कुल ।।४५।। वना निघतां रघुनंदन । आग्रहें आण परतून । करूं नकोस तूं आन । गोष्ट कांहीं ।।४६।। सूर्याविण जैसे दिन । कीं तनु प्राणावांचून । किंवा जैसी चंद्राविण । यामिनी ती ।।४७।।

तुलसीदासः– प्रभुविण । तैसी अयोध्यापुरी दीन । हे भामिनी ! मनीं जाण । पुरतेंपणीं" ॥४८॥ कैकेयीचा सखिवृंद । ऐसा करीतसे बोध । श्रवण–मधुर, हितप्रद । परिणामीं जो ॥४९॥ तथापि त्याकडें आपुलें । लक्ष्य तिनें नाहीं दिलें । कुटिल कुब्जेनें बोधिलें । आधींच तिज ॥५०॥ उत्तर न देई परि । पाहे अति-क्रोधभरीं । जणुं का क्षुधित व्याघ्री । हरिणींप्रति ॥५१॥ व्याधि असाध्य जाणुनी । मंत्रिणी नाद सोडुनी । म्हणत निघाल्या "अभागिनी । मतिमंद ही ॥५२॥ राज्य भोगीत असतां । दैवें केलें हिच्या घाता । कुणीहि न करी, त्या दुष्कृता । केलें हिनें" ॥५३॥ अयोध्येच्या नरनारी । विलाप करिती यापरीं । देती शिव्या–शाप भारी । कैकेयीतें ॥५४॥ तीव्र संतापें जळती । निःश्वास टाकून बोलती । "रामावांचून कोणती । जीवनाशा ? " ॥५५॥ दुःसह वियोगें व्याकुळ । प्रजा तेव्हां होय सकळ । जणुं का आटतां जळ । जलचर-गण ॥५६॥ स्त्रीपुरुष–समुदाय । ऐसा दुःखें विकल होय । इकडें मातेपाशीं जाय । रामप्रभु ॥५७॥ मुखीं स्पष्ट प्रसन्नता । उत्कट उत्साह चित्ता । भूप राहवील ही चिंता । नष्ट झाली ॥५८॥ बालमृगेंद्रासमान । श्रीरामचंद्राचें मन । राज्य हें केवळ बंधन । शृंखलेपरी ॥५९॥ 'वनगमन' ऐकतां । झाली जाणून मुक्तता । आनंद होतसे चित्ता । अधिकाधिक ॥६०॥ असो, रघुकुलतिलक । जोडून दोन्ही हस्तक । मोदें नमवी मस्तक । मातृपदीं ॥६१॥ तिनें आशीर्वाद देउनी । हृदयाशीं कवटाळुनी । वस्त्रभूषणें त्यावरूनी । ओवाळिलीं ॥६२॥ माता ती सप्रेमभर । मुख चुंबी वारंवार । नेत्रीं प्रेमाश्रु, शरीर । रोमांचित ॥६३॥ त्यातें ओसंगीं घेऊन । देई पुन्हां आलिंगन ।

प्रेमें होय स्तनांतून । दुग्धस्राव ॥६४॥ तिचा तो प्रेम-प्रमोद । वर्णाया असमर्थ शब्द । जणुं लाभे कुबेरपद । रंकाप्रति ॥६५॥ तयाचें सुंदर वदन । आदरें करीत विलोकन । कौसल्या मधुर वचन । बोलतसे ॥६६॥ "हा जीव तुजवरून । टाकितें बाळा! ओवाळून । मुदमंगलप्रद लग्न[1] । सांग केव्हां ? ॥६७॥ पुण्यशील सुख-सीमा । सर्वतोपरीं महत्तमा । जन्मलाभाची अंतिमा । मर्यादाच ॥६८॥ नरनारी, सानश्रेष्ठ । अत्युत्सुक सोत्कंठ । ज्याची पाहती वाट । आतुरतेनें ॥६९॥ शरदृतूंतील निकी । स्वाति-वृष्टीची नेमकी । तृषार्त चातक-चातकी । इच्छा करिती ॥७०॥ बाळा! अलाबला घेतें । करीं मंगल स्नानातें । जा, खा तुज रुचेल तें । कांहीं तरी ॥७१॥ आधींच झाला उशीर । पित्यासमीप जा सत्वर । जीव ओवाळितें निर्भर । तुजवरून" ॥७२॥ मातेचे शद्व ते भले । अति अनुकूल ऐकिले । प्रेम-कल्पतरूचीं फुलें । झडतीं जणुं ॥७३॥ श्रीमूलक त्या-भीतरीं । भरे सुख-पराग जरी । राम-मनोभृंग परि । भुलला न त्या ॥७४॥ श्रीराम धर्मधुरीण । धर्मगतीतें जाणून । बोले अति मृदु वचन । मातेप्रति ॥७५॥ "पित्यानें दिधलें मातें । अरण्याचें राज्य, जेथें । महत्कार्य माझ्या हातें । सांग घडे ॥७६॥ माते! तूंहि मजकारणें । आज्ञा करीं प्रसन्न मनें । मुदमंगल-मय जेणें । होय वन ॥७७॥ पुत्रप्रेमाच्या अंकित । होऊं नकोस भयभीत । माते! राहीन आनंदांत । तवानुग्रहें ॥७८॥ चौदा-वर्षेंपर्यंत । राहून मी अरण्यांत । पित्याच्या प्रतिज्ञेप्रत । करीन सत्य ॥७९॥ पुन्हां घेईन परतून । तुझ्या पायांचें दर्शन । करूं नकोस मात्र मन । उदास तूं" ॥८०॥ श्रीरामाचे बोल जरी ।

१.- मुहूर्त

अति मधुर, विनीत, परि । रुतले मातृहृदयांतरीं । बाणा-सम ॥८१॥ ऐकून शीतल वाणी । सुकून गेली जननी । पडतां पर्जन्याचें पाणी । जवस जसें ॥८२॥ तिच्या मनींचा विषाद । वर्णूं न शकती शब्द । जणुं ऐकिला सिंहनाद । हरिणीनें ॥८३॥ अश्रूंनीं भरले नयन । तनु कांपे थरथरून । जणुं अडकला मीन । फेसामाजीं ॥८४॥ बळेंचि धीर धरून । पुत्रमुखा विलोकून । सद्‌गदित वदे वचन । राममाता ॥८५॥ "बाळा ! तूं तरी पित्यास । प्राणासम प्रिय होतास । त्वच्चरित्र पाहून त्यास । हर्ष सदा ॥८६॥ तुझ्या राज्याभिषेकाप्रत । साधिला होता सुमुहूर्त । कोणत्या अपराधें वनांत । धाडीतसे ॥८७॥ काय यांतलें इंगित । कळूं दे बाळा ! सांप्रत । कोण रविकुळाप्रत । अग्नि झाला ?" ॥८८॥ जाणून राममनोगत । घडलें तें सर्वहि वृत्त । सुमंत सचिवाचा सुत । सांगता झाला ॥८९॥ वृत्तान्त सारा ऐकतां । मूकवत् स्तब्ध माता । ते समयींची तदवस्था । अवर्णनीय ॥९०॥ ठेवून घ्याया धजेना । 'जा ऐसेंहि' म्हणवेना । दारुण होती वेदना । उभयपक्षीं ॥९१॥ चंद्र काढितां ललाटीं । राहूच रेखिला शेवटीं । सर्वांस धात्याची धाटी । नडते सदा ॥९२॥ स्त्रीधर्म आणि वत्सलता । तेणें तन्मति कुंठिता । साप-चुचुंद्रीची अवस्था । प्राप्त झाली ॥९३॥ ( चुचुंद्रीस गिळी सर्प । कुष्टी होय आपोआप । वमितां त्या तिचा दर्प । अंध करी ॥९४॥ ) जरी विरोध करून । घ्यावें पुत्रास ठेवून । वाढेल- धर्म जाऊन- । बंधुविरोध ॥९५॥ जाऊं द्यावें जरी वनीं । तरी होय थोर हानि । संकट-शोकानें राणी । व्याकुल होय ॥९६॥ सुज्ञ कौसल्या ती शेखीं । स्त्री-धर्मातें ओळखी । दृष्टि ठेवून सारखी । राम-भरतीं ॥९७॥ प्रांजळ

जिचा स्वभाव । राममाता ती अतीव । धैर्य धरून प्रस्ताव । करीतसे ॥९८॥ "बाळा! अलाबला घेतें । योग्य जें तूं केलेंस तें । आज्ञापालन पुत्रातें । श्रेष्ठ धर्म ॥९९॥ देऊन राज्याची भाक । वनवास दिला निःशंक । याचें लेश न वाटे दुःख । मजला परि ॥१००॥ तुझ्यावांचून भरता । महाराजांप्रति स्वतां । होतील प्रजेच्याहि चित्ता । क्लेश भारी ॥१०१॥ केवल जनकानुशासन । तरी न जाई येथून । मातेचा अधिक मान । जाणूनिया ॥१०२॥ माता-पिता उभयतांनीं । जरी कथिलें जाया वनीं । शत अयोध्येपरी मानी । कानन तें ॥१०३॥ वनदेव-देवी निःशंक । हेचि जननी-जनक । पदकमलाचे सेवक । खगमृगादि ॥१०४॥ भूपास योग्य वनवास । परि उचित शेवटास । पाहून वय, जीवास । हुरहुर गमे ॥१०५॥ वनाचेंचि भाग्य अधिक । अयोध्या दुर्दैवी निःशंक । तूं रघुवंशतिलक । त्यागिसी जोस ॥१०६॥ बाळा! ने मज बरोबरी । ऐसें म्हणेन तुज जरी । संदेह वाटेल तरी । त्वन्मनांत ॥१०७॥ तूं तो सर्वांहिकारण । प्रियतम अससी जाण । बाळा! प्राणांचाहि प्राण । जीवांचा जीव ॥१०८॥ तो तूं पुससी मजलागुनी । 'माते! जाऊं काय वनीं' । करीत बसल्यें ऐकुनी । पश्चात्ताप । ॥१०९॥ हेंचि विचारून मनीं । खोटी प्रीति वाढवुनी । करितें ना तुजलागुनी । आग्रह मी ॥११०॥ मी अलाबला घेतें । मातेचें जाणून नातें । विसरूं नकोस मातें । कदापि हि ॥१११॥ नेत्रास पापणी जैशी । संरक्षिते अहर्निशीं । तैसें राखोत तुजसी । देव-पितर ॥११२॥ अवधि जलासमान । प्रिय परिजन हे मीन । तूं तरी धर्मधुरीण । करुणाधाम ॥११३॥ (चौदा वर्षें झाल्यावरी । आम्ही जगूं न क्षणभरी । जलाविण

मीनापरीं । त्यागूं प्राण ॥११४॥ यास्तव दया करून । अवश्य यावें परतून । म्हणून करुणानिधान । अभिधान हें ॥११५॥ धर्मधुरीण संज्ञा तरी । पित्याच्या अनुज्ञेपरीं । जाणें भाग वनांतरीं । राघवातें ॥११६॥) हें विचारून राघवा । तोचि उपाय करावा । जेणें भेटशील सर्वां । जिवंतपणीं ॥११७॥ जीव ओवाळून टाकितें । तूं सुखें जा वनातें । प्रजाजन-अयोध्येतें । अनाथ करुनी ॥११८॥ सर्वांचीच ती पुण्याई । खरोखर संपली पाहीं । क्रूर काळ स्वयें होई । विपरीत" ॥११९॥ चरणास मिठी मारुनी । विलाप करी राम–जननी । स्वयें परम अभागिनी । मानूनिया ॥१२०॥ दारुण दुःसह ताप । हृदयीं व्यापला अमूप । तिचा उदंड विलाप । अवर्णनीय ॥१२१॥ तेधवां राम मातेसी । उठवून धरी हृदयासी । बोलून मृदु वचनासी । सांत्वन करी ॥१२२॥ तोंच ऐकून वर्तमान । सीता उठली घाबरून । परम व्याकुल होऊन । हृदयांतरीं ॥१२३॥ सासूच्या पदाब्जद्वयां । येऊन वंदी रामजाया । खालीं मान घालूनिया । बसती झाली ॥१२४॥ सासू मृदु वचेंकरून । देती झाली आशीर्वचन । अति सुकुमारी पाहून । कळवळे ती ॥१२५॥ बसलेली अधोमुखी । विचार करी जानकी । पतिव्रता जी का निकी । रूपराशि ॥१२६॥ "जीवननाथ संप्रति । वनीं जावया इच्छिती । कोण पुण्यें मजप्रति । घडेल संग ? ॥१२७॥ प्राणासह या देहास । कीं प्रांणासचि सहवास । नेणवे विधिलीलेस । कांहीं केल्या" ॥१२८॥ सुंदर चरण-नखांनीं । सीता रेखीतसे धरणी । तन्नूपुर–मधुरध्वनि । वर्णिती कवि ॥१२९॥ जणुं काय नूपुरें तीं । प्रेमवशें विनविती । टाकूं नये आम्हांप्रति । सीतापदें ॥१३०॥ निज रम्य

नेत्रांतून । करी ती अश्रुमोचन । बोले तिज विलोकून । राम-माता ॥१३१॥ "ऐक रामा ! ही जानकी । अति सुकुमारी निकी । सासूश्वशुरांची लाडकी । परिजनांसह ॥१३२॥ शिरोमणि जो भूपांत । जनक हिचा तात । सूर्यवंशीं सूर्य मूर्त । श्वशुर हिचा ॥१३३॥ रविकुल जें कुमुदवन । तया जो चंद्रासमान । ऐसा गुणरूपनिधान । कांत हिचा ॥१३४॥ माझी स्नुषा ही मजप्रत । लाभली प्रिय अत्यंत । सद्गुणशीलसंयुक्त । रूपराशि ॥१३५॥ नेत्रींच्या बाहुलीपरी । प्रेम केलें मीं हिजवरी । प्राणहि तिच्याच भीतरीं । ठेवू-निया ॥१३६॥ हिचें कल्पलतेपरीं । लालन केलें परोपरीं । प्रेमजल सिंचून वरी । सांभाळिलें ॥१३७॥ पुष्प–फलांचा अव-सर । तोंच दैवें साधिलें वैर । काय परिणाम होणर । कळेंचि ना ॥१३८॥ त्यजून सिंहासन, मंचक । हिंदोल अथवा अंक । भूवरी जिनें अचुक । ठेविला न पाय ॥१३९॥ संजीवनीपरी जपत । आलें मी आजपर्यंत । साराया दिव्याची वात । लाविलें ना ॥१४०॥ तुझ्यासवें तीच सीता । येऊं इच्छी वनीं आतां । काय आज्ञा रघुनाथा ! । सांग तरी ? ॥१४१॥ चंद्रकिरण-सुधारसीं । रमली चकोरी ऐसी । पाहूं शकेल ती कैसी । सूर्या-कडे ? ॥१४२॥ गज, सिंह, निशाचर । दुष्ट जंतु, प्राणी क्रूर । यांचा सुळसुळाट फार । वनामाजीं ॥१४३॥ बाळा ! कोमल, सुंदर । संजीवनीचा अंकुर । शोभे का लाविल्यावर । विषोप-वनीं? ॥१४४॥ नेणती ज्या विषयसुखा । कोळ्यापारध्याच्या कन्यका । धात्यानें निर्मिल्या देखा । वनासाठीं ॥१४५॥ पाषाण–कीटकासमान । स्वभाव ज्यांचा कठिण । क्लेश न होती त्यां-लागून । वनांतरीं ॥१४६॥तपस्व्यांच्या स्त्रिया मात्र । वनवासा-

असती पात्र । त्यजिले भोग सर्वत्र । तपार्थ जिहीं ॥१४७॥
रामा ! सीता कैशापरी । वास करील वनांतरीं । चित्रींच्या
वानरा भिणारी । पाहून जी ॥१४८॥ जी मानस–सरोवरीं ।
पद्मवनीं विहार करी । शोभेल हंसकुमारी । थिल्लरीं
का ? ॥१४९॥ हें विचारून मानसीं । आज्ञा करिशील जैसी ।
शिकवीन जानकीसी । तैसेंच मी ॥१५०॥ ताता !" म्हणे,
"रघुनाथा ! । गृहीं राहील जरी सीता । माझ्या प्राणासी
तत्वतां । आधार तो" ॥१५१॥ राघवें ऐकिलीं कानीं । मातेची
ती प्रिय वाणी । शीलस्नेहामृतेंकरुनी । ओथंबली जी ॥१५२॥
सविवेक प्रिय वचन । बोलून रघुनंदन । निजमातेचें समाधान ।
करिता झाला ॥१५३॥ अरण्याचे गुण–दोष । स्पष्ट करून
विशेष । त्या समयीं जानकीस । बोध करी ॥ १५४ ॥
मातेसमक्ष बोलावया । संकोच वाटे रामराया । परि
प्रसंग जाणूनिया । बोलतसे ॥१५५॥ "हे राजकन्ये !
सांप्रत । ऐक माझ्या बोधाप्रत । आणूं नकोस मनांत । भलतें
कांहीं ॥१५६॥ तुझें आणि माझें हित । जरी इच्छिसी चित्तांत
मानून मच्छद्वांप्रत । गृहींच रहा ॥१५७॥ माझी अनुज्ञा
यापरी । तूं सासूची सेवा करीं । भामिनी ! सर्वतोपरीं । गृहींच
बरें ॥१५८॥ सासूश्वसूरांचे चरण । सादर करावे सेवन। श्रेष्ठ
धर्म तो याहून । नाहींच दुजा ॥१५९॥ जेव्हां जेव्हां माता जाण।
करील माझी आठवण । प्रेमें व्याकुल होऊन । भोळ्या
भावें ॥१६०॥ तेधवां तिजलागून । सांगून कथा पुरातन ।
करीं सुंदरी ! समाधान । मृदु वाणीनें ॥१६१॥ कथितों मना-
पासून । शतदां शपथ घेऊन । ठेविसों तुजलागून । मातृ-
हिता ॥१६२॥ गुरुश्रुतीशीं संमत । धर्मसाधनाचें उचित ।

सुफल तें होय प्राप्त । अनायासें ॥१६३॥ हट्ट धरितां नेटें । गालव, नहुष सम्राटें । ओढवून घेतलीं संकटें । स्वतांवरीं ॥१६४॥ पाळून पित्राज्ञेप्रत । सुज्ञे ! सुमुखी ! त्वरित । येईन मी पुन्हां परत । निश्चयानें ॥१६५॥ दिवस जावया लोटून । लागे विलंब कांहींच न । सुंदरी ! ही शिकवण । ऐक माझी ॥१६६॥ जरी प्रेमवश होशील । भलता हट्ट धरशील । तरी तूं दुःख पावशील । परिणामीं ॥१६७॥ अतीव कठिण कांतार । जाण भारी भयंकर । शीत, उष्ण, वायु, घोर । पर्जन्यहि ॥१६८॥ तृण, कंटक, पाषाण । असंख्यचि मार्गांतून । पायीं चालणें त्यांतून । अनवाणी ॥१६९॥ मृदु सुंदर पद्मासम । तुझे असती पदयुग्म । मार्गीं पर्वत दुर्गम । उल्लंघाया ॥१७०॥ दऱ्या-खोऱ्या, नदीनद । ओढे तैसे नानाविध । दृष्टि न ठरेसे अगाध । दुस्तर ते ॥१७१॥ रीस, व्याघ्र, सिंह वृक । हस्ती भेटती भयानक । गर्जना ऐकून निःशंक । धैर्य खचे ॥१७२॥ भूवरीच घडे शयन । वल्कलांचें परिधान । कंदमूल, फलें भक्षण । करावया ॥१७३॥ तींहि प्रतिदिनीं मिळतीं । याची नाहींच निश्चिती । प्रसंगानेंच लाभतीं । कधीं कधीं ॥१७४॥ मनुष्यांचाच आहार । करिती जे निशाचर । त्यांचा असंख्य संचार । कपटवेषें ॥१७५॥ पर्वतीं जलसंचय । बाधक तो अतिशय । संकटें ही अवर्णनीय । अरण्याचीं ॥१७६॥ घोर अरण्याभीतरीं । सर्प, पक्षी, भयद भारी । चोरून नेती नरनारी । राक्षसगण ॥१७७॥ नुसती आठवण होतां । धडकी भरे धैर्यवंता । भीरु असशी स्वभावतां । मृगाक्षी ! तूं ॥१७८॥ हंसगमनी ! तूं वनासी । जावया योग्य नससी । लोक दूषितील मजसी । ऐकतां हें ॥१७९॥ हंसी मानस सरोवरीं । वाढली

पिऊन सुधावारी। ती क्षार समुद्रावरी । जगेल काय ?॥१८०॥ नूतन आम्रवनीं जिला । मिळे विहार करायाला । कंटकवनीं ती कोकिला। शोभेल काय ?॥१८१॥ हें विचारून मनांत । गृहींच राहावें निश्चित । दुःख भारी काननांत । चंद्राननें ! ॥१८२॥ गुरु, स्वामी, सहजसुहृद् । असून निज हितप्रद। जो न करी यांचा बोध। शिरसा मान्य —॥१८३॥ तो शेवटीं निज मनीं। पश्चात्तापातें पावुनी। त्याच्या हिताची हानि । अवश्य होय" ॥१८४॥ मृदु, मनोहर भाषण । पतीचें करून श्रवण। अश्रूंनीं भरलें नयन । जानकीचे ॥१८५॥ बोध असून शीतलसा । दाहक परि तिज कैसा । रात्रींचा शरच्चंद्र जैसा । चक्रवाकीस ॥१८६॥ पवित्र प्रेमळ स्वामी । नेऊं न इच्छी समागमीं । सीता विकल अंतर्यामीं । बोलूं न शके ॥१८७॥ तथापि यत्नेंकरुनी। दुःखाश्रूंतें आवरुनी। धैर्य धरूनिया मनीं। जानकी ती– ॥१८८॥ वंदी सासूच्या पदपद्मा । जोडून म्हणे करयुग्मा । "देवि ! असूं द्यावी क्षमा । धाडसाची ॥१८९॥ प्राणनाथें मजप्रत । बोध केलासे उचित। जेणें माझें परमहित। सर्वतोपरीं ॥१९०॥ तथापि मी निजमनीं। पाहिलें तेंहि विचारुनी। पतिवियोगासम अवनीं। दुःख नाहीं" ॥१९१॥ "अहो कारुण्यमंदिरा ! । मत्प्राणनाथा ! सुंदरा ! । परम सुज्ञा! सुखकरा ! पतिदेवा ! ॥१९२॥ रघुकुलकुमुदचंद्रा ! । तुम्हां वांचून प्राणेश्वरा !। स्वर्गलाभहि वाटे खरा । नरकासम ॥१९३॥ जन्मदाते मातामाता। प्रिय भगिनी आणि भ्राता। परिवारहि आवडता। सुहृदांचा ॥१९४॥ सासूसासरे, सज्जन । पाठीराखे गुरुजन। सुंदर, सुशील नंदन । सुखदायक ॥१९५॥ जेथवरी प्राणपते ! । यांचें प्रेममय नातें । पतिविण तापद

स्त्रीतें । सूर्याहुनी ॥१९६॥ पतिविण देह, सदन । धरा, ग्राम राज्य, धन । सारे शोकास कारण । कामिनीतें ॥१९७॥ रोगा-सम भोग सकल । भारचि भूषणें विपुल । संसार म्हणजे केवल । यम-यातना ॥१९८॥ या विश्वांत प्राणपते! । कोठेंहि आपणांपरतें । सुख देईलसें मातें । कांहींच नसे ॥१९९॥ प्राणाविना जैशी काया । जलाविना सरिता वांया । नाथा ! त्याचपरीं स्त्रिया । पुरुषाविण ॥२००॥ तुमच्या संगतीं निःशंक । नाथा! मजला सर्व सुख । विमल शरच्चंद्रमुख । अवलोकितां ॥२०१॥ खगमृगादि परिजन । अयोध्येपरी होय वन । अमोलवस्त्रांसमान । वल्कलें तीं ॥२०२॥ नाथा! तुमच्या निकटीं । स्वर्गतुल्य पर्णकुटी । सकल सुखाची राहाटी । तेथें मज ॥२०३॥ वनदेवी-वनदेव । स्वभावें उदार अतीव । करि-तील प्रेमभाव । सासू-श्वशुरापरी ॥२०४॥ कोमल कुशाग्र
शे शेज । प्रभुसहवासीं सहज । कामशय्येपरी मज । वाटेल मृदु ॥२०५॥ कंदमूलफलाहार । अमृतासारिखा मधुर । शत सौधापरी गिरिवर । अयोध्येच्या ॥२०६॥ प्रभुपदाब्ज क्षणोक्षणीं । राहीन मी विलोकुनी । जैसी मुदित राहे दिनीं । चक्र-वाकी ॥२०७॥ वनदुःखें नानाविध । त्रास, भीति नि विषाद । प्रभूंनीं केले विशद । वर्णूनिया ॥२०८॥ परि ते सर्वहि मिळून । वियोगलवलेशासमान । न होती कृपानिधान! । खरो-खर ॥२०९॥ हे सर्वज्ञ-शिरोमणि! । ऐसें जाणूनिया मनीं । न विसंबता न्यावें वनीं । समागमें ॥२१०॥ यापरतें विशेष मी । काय तरी विनवूं स्वामी! । जाणतसां अंतर्यामीं । करुणानिधे! ॥२११॥ वनवासाच्या अवधीवरी । माझे प्राण राहती जरी । ठेवावें मजला तरी । अयोध्येंत ॥२१२॥

हेंचि सांगणें सुंदरा ! । शेवटचें सुखकरा ! । रघुकुलाब्ज दिनकरा ! । दीनबंधो ! ॥२१३॥ करितां मार्गक्रमण। कांहीं न होईल शीण। पदकमलें विलोकून। क्षणोक्षणीं ॥२१४॥ जे जे होतील या जीवा । त्या पथींच्या श्रमां सर्वां । करूनिया पतिसेवा । परिहरीन ॥२१५॥ तरु-तलीं मी बैसून । तुमचे पद क्षालीन । मुदित मनें करीन । विञ्जणाहि ॥२१६॥ तनु होतां घामाघूम । अवलोकीन घन-श्याम । प्राणनाथा पाहतां श्रम । कोठून मग ? ॥२१७॥ तृण-पल्लव आंथरून । भूमि सारखी करीन । दासी मी पाय चुरीन । रात्रभरी ॥२१८॥ प्रेमभरें वारंवार । मूर्ति पाहतां सुकुमार । मज मुळीं न बाधणार । ऊन–वारा ॥२१९॥ असतां प्रभूच्या निकट । पाहूं शके कोण दुष्ट । शशक, गृध्र निपट । सिंहीस जसें ॥२२०॥ म्हणतां, 'सुकुमारी मी । काय वना योग्य' तुम्ही। तप उचित तुम्हां, कां मी । भोगूं भोग ?॥२२१॥ यापरी शब्द कठोर । कानीं पडतांहि जर । दुभंगेना मदंतर । अद्या-पिहि– ॥२२२॥ तरी माझे नीच प्राण । निश्चयें करितील सहन । प्रभुवियोगाचें दारुण । दुःख महा" ॥२२३॥ सीता इतुकें बोलली । अति कासावीस झाली । वियोग शब्दहि त्या कालीं । साहूं न शके ॥२२४॥ तिची अवस्था पाहुनी । श्रीरामें जाणिलें मनीं । प्राण न ठेवील सदनीं । ठेवितां बळें ॥२२५॥ कृपाळू रविकुलनाथ । म्हणे तेव्हां सीतेप्रत । "शोक टाकून वनांत । चाल सवें ॥२२६॥ सीते ! ही वेळ आजची । नव्हें शोक करायाची । त्वरें वनीं जावयाची । सिद्धता करीं" ॥२२७॥ बोलून प्रिय वचन । केलें कान्तेचें समाधान । घेई मातृपद वंदून । आशीर्वाद ॥२२८॥ (तेधवां कौसल्या माता । कवटाळून

रघुनाथा । अवघ्राणून तन्माथा । काय म्हणे-- ॥२२९॥)
"परत येऊन झडकरी । प्रजा-दुःखें दूर करीं । निष्ठुर मातेसी परि । विसरूं नको ॥२३०॥ काय माझी या पुढतीं । पालटेल दैवगति ?। दृष्टीनें मोहक मूर्ति । पाहीन मी-॥२३१॥ तो सुदिन, ती घटिका । केव्हां येईल बालका ! । पाहीन मी मुखशशांका। जिवंतपणीं ॥२३२॥ 'हे वत्सा ! हे पाडसा ! । लाडक्या माझ्या राजसा । हे रघुकुलावतंसा ! । रामराया !' ॥२३३॥ ऐशीं नांवें घेऊन । पुन्हां केव्हां पाचारून । हृदयीं धरून पाहीन । प्रसन्न मनें ?" ॥२३४॥ वात्सल्यप्रेमेंकरुनी । व्याकुळ झाली जननी । शब्द न निघे मुखांतुनी । पाहून हें ॥२३५॥ परोपरीनें रघुनंदन । करी मातेचें समाधान । तेथीचें प्रेमलक्षण । अवर्ण-नीय ॥२३६॥ तदनंतर सीतासती । धरी सासूच्या पदांप्रति । म्हणे, "मातुश्री ! मी अति । भाग्यहीना ॥२३७॥ सेवाकालीं मजलागून । दैवानें दिधलें वन । टाकिले निष्फळ करून । मन्मनोरथ ॥२३८॥ शोक टाकून पूर्वीपरी । प्रेम असूं द्या मज-वरी । कठिण कर्मगति भारी । दोष न मम" ॥२३९॥ ऐकून सीतेचें वचन । कौसल्या जाय गहिंवरून । तिच्या अवस्थेचें वर्णन । कैसें करूं ?॥२४०॥ वारंवार हृदयासी । कवटाळून जानकीसी । धैर्य तिजला उपदेशी । आशीर्वचें ॥२४१॥ "गंगा-यमुना जोंवरी । वाहतील पृथ्वीवरी । तुझें सौभाग्य तोंवरी । अखंड असो !" ॥२४२॥ नाना प्रकारेंकरून । सासूनें सीतेलागून । दिधलें आशीर्वचन । उपदेशुनी ॥२४३॥ अति प्रेमें वारंवार । पदाब्जीं नमवून शिर । जानकी तदनंतर । निघती झाली ॥२४४॥ जेधवां ऐसें वर्तमान । कळलें लक्ष्मणालागून । व्याकुलतेनें खिन्नवदन । उठून धांवे ॥२४५॥ कंप, रोमांच शरीरीं । अश्रु

वाहती नेत्रीं । प्रेमें रामपद धरी । अधीरपणें ॥२४६॥ बोलवें न त्यालागून । तटस्थ करी विलोकन । जलांतून काढिला मीन । दीन जणुं ॥२४७॥ चिंता हीच वाटे चित्तीं । "काय कैसी दैवगति । सुख–सुकृताची समाप्ति । सर्व झाली ॥२४८॥ मज-लागीं रघुनाथ । काय आज्ञापील सांप्रत । गृहीं ठेवी कीं वनांत । नेईल सवें ?"॥२४९॥ देह–गेह सर्वांवरी । पाणी सोडून बद्ध-करीं । त्यां लक्ष्मणातें सामोरीं । राम पाहे ॥२५०॥ श्रीराम नीतिनिपुण । सरल, शील–स्नेहपूर्ण । सुखसागर रघुनंदन । काय म्हणे–॥२५१॥ "बाळा लक्ष्मणा ! प्रेमवशें । घाबरू नकोस ऐसें। परिणामीं सुख होतसे । ध्यानीं धरीं ॥२५२॥ गुरु, स्वामी, जनक, जननी । यांच्या आज्ञेतें मानुनी। आणिती जे आचरणीं । मनोभावें ॥२५३॥ तेचि जन्माचें सार्थक । करितील निश्च-यात्मक । न तरी जगीं निरर्थक । जन्म त्यांचा ॥२५४॥ हें जाणूनिया अंतरीं । माझे म्हणणें मान्य करीं । मातापित्यांची सेवा घरीं । करीत रहा ॥२५५॥ भरत, शत्रुघ्न दोघेही । आधींच नाहींत गृहीं । वृद्ध तात दुःखी हृदयीं । मजकारणें॥२५६॥ संगें घेऊन तुजप्रत । जरी जाईन वनांत । अयोध्या होय अनाथ । सर्वतोपरीं ॥२५७॥ गुरुसहित मातापितर । प्रजाजन, परिवार पडे दुःसह दुःखभार । सर्वांवरी ॥२५८॥ गृहींच करून वास । करीं सर्वांचा परितोष । नाहीं तरी महादोष । घडेल कीं ॥२५९॥ ज्याची प्रिय प्रजा सारी । दुःख भोगीतसे भारी । तो नृप नरकाधिकारी । अवश्य होय ॥२६०॥ ऐसी विचारून नीत । बाळा ! रहा तूं घरांत" । ऐकतां व्याकुल अत्यंत । लक्ष्मण तो ॥२६१॥ बोल पाहतां शीतल । सुकला लक्ष्मण तत्काल । जैसें कोमेजें कमल । हिमवर्षें ॥२६२॥ प्रेमवशें मुखांतुनी ।

उत्तर न निघे त्या क्षणीं । मिठी मारी रामचरणीं । काकुळतीनें ॥२६३॥ म्हणे, "दास तुमचा मी । तुम्ही आहां माझे स्वामी । मज दूर लोटितां तुम्ही । राहूं कुठें? ॥२६४॥ स्वामींनीं जो मजप्रत । बोध केलासे उचित । परि तो अगम्य खचित । भीरुतेस्तव ॥२६५॥ धर्मधुरंधर धीर । असती जे नृपवर । वेदनीतीचा अधिकार । तयांसचि ॥२६६॥ मी तो बालक निश्चित । प्रभुप्रेमें प्रतिपालित । उचलेल का हंसाप्रत । मंदराचल ? ॥२६७॥ गुरु किंवा मातापिता । मी न जाणे कुणा तत्वतां । स्वभावें सांगतों नाथा ! । सत्य माना ॥२६८॥ स्नेहनातें जेथवरी । असतें जगाभीतरीं । प्रेमविश्वासादि सारीं । कथिलीं वेदें- ॥२६९॥ तीं सर्वहि नातीं स्वामी ! आहां मज एक तुम्ही । निश्चयें सर्वांतर्यामीं । दीनबंधो ! ॥२७०॥ धर्मनीतीचा उपदेश । अवश्य करावा त्यास । यशोवैभव-सद्गतीस । प्रिय मानी जो ॥ २७१ ॥ काया-वाचा-मनें निश्चित । तुमच्या चरणीं अनुरक्त । कृपासिंधो ! त्या मजप्रत । विसंबतां कां" ? ॥२७२॥ यापरीं कोमल विनीत । प्रिय बंधूचें भाषित । श्रवण करून रघुनाथ । कृपासिंधु ॥२७३॥ स्नेहकातर जाणून । करून तत्समाधान । हृदयाशीं कवटाळून । धरी तया ॥२७४॥ मग म्हणे, "जा, बंधुराया ! । मातराज्ञा घेऊनिया । ये सत्वरीं, मिळूनिया । वनीं जाऊं" ॥२७५॥ ऐकून ती राम-वाणी । मुदित लक्ष्मण, मानुनी । झाला आघात टळुनी । थोर लाभ ॥२७६॥ हृष्ट होऊन मानसीं । आला निज मातेपाशीं । जणुं झाला जन्मांधासी । दृष्टिलाभ ॥२७७॥ जाऊनिया जननीसी । नमस्कारी आदरेंसी । परि सीता-रामापाशीं । गुंतलें मन ॥२७८॥ त्यातें उदास पाहून । माता विचारी

कारण । लक्ष्मणें केलें कथन । वृत्त सारें ॥२७९॥ ऐकतां कठोर वचनास । माता झाली कासावीस । भोंवतीं बघून वणव्यास । हरिणी जणुं ॥२८०॥ तैं लक्ष्मणातें वाटलें । हें अरिष्टचि उद्‌भवलें । जरी मातेनें आडविलें । प्रेमवशें ॥२८१॥ संकोचे निरोप घ्याया । भय वाटे पुसावया । सांगेल कीं सवें जाया । देव जाणें ॥२८२॥ सीतारामाची सुंदरता । तेंवि सौजन्य–सुशीलता । आणून सुमित्रा माता । निज मानसीं ॥२८३॥ भूपाचें प्रेम लक्षुनी । घेतसे भाल पिटुनी । म्हणे 'दावा चांडाळिणी !। साधिलास' ॥२८४॥ प्रसंग जाणून बिकट । धैर्य धरून बळकट । बोले हितकर्त्री उत्कट । मृदु वाणी ॥२८५॥ "बाळा ! तुझी तात–माता । असती कीं राम–सीता । प्रेम करिती सर्वथा । तुझ्यावरी ॥२८६॥ जेथें वसे रघुराज । तीच अयोघ्या असे तुज । जेथें प्रकाशें दिनराज । दिवस तेथें ॥२८७॥ सीता–रामचंद्र मिळून । जरी करिती वनीं गमन । तुझें न कांहीं प्रयोजन । अयोध्येंत ॥२८८॥ गुरु, बंधु, माता–पिता । देव, स्वामी, हे सर्वथा । सेव्य असती तत्त्वतां । प्राणापरी ॥२८९॥ राम प्राणाचाहि प्राण । राम जीवाचें जीवन । निरपेक्ष मित्र जाण । सर्वांचाहि ॥२९०॥ श्रेष्ठ किंवा पूजनीय । जे जे असती तुला प्रिय । रामामुळेंच ते स्वकीय । असती सर्व ॥२९१॥ ऐसें जाणून अंतरीं । सवें जा तूं वनांतरीं । बाळा ! करून घे संसारीं । जन्मसार्थक ॥२९२॥ माझ्यासहवर्तमान । झालास तूं भाग्यवान् । स्वयें जातें ओवाळून । तुजवरुनी ॥२९३॥ कां कीं, बाळा ! तुझें मन । छल–कपट त्यागून । झालें आहे खरें लीन । रामपदीं ॥२९४॥ संसारीं तीच युवती । खरी म्हणूं ये पुत्रवती । जिच्या पोटीं पुत्र होती । राम-

भक्त ॥२९५॥ न तरी वंध्या पुरवली। व्यर्थचि जरी प्रसवली। रामविन्मुख मुलें कुलीं । हित-हानिच ॥२९६॥ केवळ तुझ्याच भाग्यास्तव । वनीं जातसे राघव । अन्य कारणाचा संभव । नाहींच मुळीं ॥२९७॥ सकल सुकृतांचें केवल । हेंचि एक महा फल । सीताराम-पदीं निश्चल । सहज प्रेम ॥२९८॥ क्रोध, ईर्ष्या, राग, द्वेष । अज्ञान, गर्व विशेष । यांसी होऊं नको वश । स्वप्नांतहि ॥२९९॥ हे सर्व दुष्ट विकार । यांचा करून परि-हार । तनुवाङ्मनें निरंतर । सेवा करी ॥३००॥ अरण्यहि तुज-लागीं । असे सुखावह सर्वांगीं । मातापिता असतां संगीं । सीता-राम ॥३०१॥ ज्यायोगें राघवास । वनीं न होतील क्लेश । तेंचि करावें, उपदेश । हाचि माझा ॥३०२॥ इतुकेंच माझें सांगणें । बाळा ! वनीं तुझ्या गमनें । श्रीसीतारामाकारणें । सौख्य व्हावें ॥३०३॥ जन्मदाते मातापितर । अयोध्या, प्रिय परिवार । यांच्या सुखाचा विसर । पडावा वनीं" ॥३०४॥ यापरीं सुमित्रा माता । उपदेशून निजसुता । देई पुन्हां आज्ञा-पितां । आशीर्वाद ॥३०५॥ "सीतारामाच्या चरणीं । अखंड नव प्रतिक्षणीं । उपजो तुझ्या अंतःकरणीं । शुद्ध भक्ति" ॥३०६॥ मातेच्या चरणीं शिर । ठेवून सुमित्राकुमर । निघता झालासे सत्वर । शंकित मनें ॥३०७॥ (शंका एक वाटे मनीं । राम गेला काय वनीं । दुजी मोहवशें जननी । थांबवील ॥३०८॥) दैववशें जातां तुटून । ऐशा कठिण पाशांतून । उडच्या मारीत हरिण । पळे जणुं ॥३०९॥ जेथें होता सीतारमण । तेथे जातसे लक्ष्मण । प्रिय-सहवासें तन्मन । प्रसन्न होय ॥३१०॥ सीता-रामपदांप्रत । वंदून, दोघांसहित । मग भूपमंदिरांत । येता झाला ॥३११॥ अयोध्येचे नारीनर । बोलूं लागले परस्पर ।

"योग जुळतां दैवें थोर। घात केला" ॥३१२॥ देह कृश, दुःखी मन। विकलतेनें सुकलें वदन। उडविली मधावरून। मक्षिका जणुं ॥३१३॥ कर चोळून पिटिती भाळ। पश्चात्ताप करिती सकळ। पंखरहित व्याकुळ। पक्षी जणुं ॥३१४॥ राजसभेच्या भीतरीं। गर्दी उसळली भारी। तयांच्या दुःखाची परी। अवर्णनीय ॥३१५॥ सुमंतें भूपालागून। बैसविलें तैं उठवून। 'राम आले' प्रिय वचन। बोलून हें ॥३१६॥ सीतेसहवर्तमान। दोघा पुत्रां अवलोकून। भूपति गेला होऊन। व्याकुळ अति ॥३१७॥ त्या सुंदर पुत्रद्वयां। सवें तैशी जनकतनया। भूप तेव्हां निरखूनिया। विकल होय ॥३१८॥ पुत्रस्नेहेंकरून। त्या त्रिवर्गालागून। घेई हृदिं कवटाळून। वारंवार ॥३१९॥ भूप दुःखें झाला व्यथित। त्या न बोलवें किंचित्। दारुण दाह हृदयांत। शोकजन्य ॥३२०॥ अति प्रेमें रघुवीर। करी पित्यास नमस्कार। आज्ञा मागतसे सत्वर। उठून स्वयें ॥३२१॥ "आज्ञा करा हो मज ताता!। अशीर्वाद द्यावा आतां। हर्षसमयीं कां करितां। दुःख ऐसें ॥३२२॥ धरितां प्रिय–जनीं प्रीति। होईल तो प्रमाद अति। यश जाऊन अपकीर्ति। होईल जगीं ॥३२३॥ ऐकतां हें, प्रेमविकल। होऊन उठला भूपाल। बैसवी रामास तत्काल। धरून हात ॥३२४॥ भूप म्हणे, "ऐक ताता !। मुनि सांगती तुझी कथा। 'चराचराचा नियंता। राम होय' ॥३२५॥ चित्तीं करून विचार। शुभाशुभ कर्मानुसार। फल देतसे ईश्वर। सर्वांसहि ॥३२६॥ जो जो जें जें कर्म करील। तत्फल तोचि भोगील। वेद, नीति, लोक सकल। सांगती हें ॥३२७॥ मूळ अपराधाचा कर्ता। कुणी एकादा असतां। त्या कर्मांचा फलभोक्ता। दुजाच होय ॥३२८॥ ऐसा भगवं-

ताचा न्याय । अति विचित्र निःसंशय । तो हा जाणावया होय । समर्थ कोण ?" ॥३२९॥ रामास घ्यावें ठेवून । ऐसा हेतु मनीं धरून । भूपें केले बहु यत्न । मनःपूर्वक ॥३३०॥ राम धैर्यधुरंधर । सर्वज्ञ, धीर, गंभीर । 'न राहे' हें तदंतर । जाणिलें भूपें ॥३३१॥ तंव सीतेस धरून पोटीं । केवळ तिच्या हितासाठीं । परोपरीं सांगून गोष्टी । समजावी तिज ॥३३२॥ वनींचें दुःसह दुःख । कथिलें वर्णून सम्यक् । सासर-माहेरचें सुख । निवेदून ॥३३३॥ परि जानकीचें चित्त । रामचरणीं अनुरक्त । विषम न गमे वनप्रांत । सुगम न गृह ॥३३४॥ आणिकहि इतरेजन । समजाविती तिजलागून । वनक्लेश असाधारण । वर्णूनिया ॥३३५॥ सुमंत सचिवाची पत्नी, । अरुंधती ती शाहणी । सप्रेम मृदुवचनीं । सांगती तिज ॥३३६॥ "ऐक तरी सीते! तुजला । वनवास नाहीं दिधला । सासू-श्वशुर-गुर्वाज्ञेला । मानून वाग" ॥३३७॥ शांत, शीतल, हितप्रद । मृदु, मधुर जरी बोध । ऐकतां न रुचले शब्द । जानकीतें ॥३३८॥ शारदीय चंद्रिका जैसी । पाहून चक्रवाकीसी । व्याकुलता तन्मानसीं । होय तैसी ॥३३९॥ संकोच वाटला हृदयीं । उत्तरचि न दे कांहीं । ऐकतां उठली कैकेयी । ताडकन् ॥३४०॥ मुनीचीं वस्त्रें भूषणें । आणून ठेवी आभरणें । मग ती मृदु वचनें । बोलती झाली ॥३४१॥ (वल्कलें हें मुनिवसन । भस्म-माला आभारण । कमंडलू तें भाजन । तपस्व्याचें ॥३४२॥) "रामा! तूं प्राणाहून । प्रिय असती भूपालागून । शील, स्नेह, भीड म्हणून । सोडवेना ॥३४३॥ सुकृत, सुयश, परलोक । नष्ट झाले सकळिक । तरी 'वनीं जा' निःशंक । म्हणवें न त्या ॥३४४॥ हें विचारून मनांत । करावें

त्वां जें उचित" । मातराज्ञा होतां श्रुत । राम तुष्टे ॥३४५॥ परि भूपास तें वचन । लागलें बाणासमान । वाटे, 'हे अभागी प्राण । कां न जाती ?' ॥३४६॥ लोक व्याकुल अत्यंत । राव पडला मूर्छित । काय करावें कुणाप्रत । सुचेचि ना ॥३४७॥ तत्क्षणींच रघुनंदन । करी मुनिवेष धारण । मातापित्यांस वंदून । निघता झाला ॥३४८॥ सीतालक्ष्मणासमवेत । त्या समयीं रघुनाथ । मुनीच्या दीक्षेप्रत । धारण करी ॥३४९॥ देव-ब्राह्मण सकळिक । वंदून रघुनायक । सर्वां करून विमनस्क । चाललासे ॥३५०॥ (सोपानींचा मार्ग भला । जरी दीर्घतम वाटला । तदर्थ तिसरा योजिला । विश्राम हा ॥३५१॥ रसिक भाविक श्रोत्यांस । विनवीतसे देवीदास । माझ्या बोबड्या बोलांस । मान्य करा ॥३५२॥)

---

## विश्राम ४ था

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्योनमः
श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः

त्रिवर्ग तेथून निघाले । वसिष्ठद्वारीं उभे ठेले । बघून विरहदावानलें । दग्ध लोक ॥१॥ बोलून प्रिय वचन । करून तत्समाधान । पाचारी रघुनंदन । विप्रवृंदा ॥ २ ॥ प्रार्थून सद्गुरुकारणें । त्यांतें दिलीं वर्षासनें । दानें देऊन नम्रपणें । सन्मानिलें ॥३॥ रामें दान–मानेंकरून । तोषविला याचकगण ।

पवित्र प्रेमें सुहृज्जन । तुष्ट केले ॥४॥ दास–दासी पाचारून । सद्‌गुरूंतें सोंपवून । म्हणे तैं कर जोडून । रामराय ॥५॥ “या सर्व जनांचा भार । आहे स्वामी ! तुम्हांवर । मातापित्यापरीं निर्भर । सांभाळा हे” ॥६॥ जोडून निज द्वयकर । मृदु वचनें रघुवीर । सांगतसे वारंवार । सर्वांसहि ॥७॥ “महाराज दशरथ । जेणें राहती सुखांत । तोचि सर्वथा निश्चित । मद्धितकर्ता ॥८॥ माझ्या माउली सकल । मद्विरहानें व्याकुल । दुःखी दीन न होतील । ज्या योगानें ॥९॥ अहो नागरिक जन! तुम्ही परम प्रवीण । करा सर्वहि मिळून । उपाय तो” ॥१०॥ यापरीं रघुनंदन । करी सर्वांचें सांत्वन । आनंदें करी वंदन । गुरुपदाब्ज ॥११॥ गणेश, शिव, पार्वती । यांतें चिंतून चित्तीं । निघे घेऊन रघुपति । आशीर्वाद ॥ १२ ॥ जात असतां घननीळ । दुःखें उडाला कल्लोळ । नगरींचा कोलाहल । ऐकवेना ॥१३॥ लंकेंत होती अपशकुन । अयोध्येंत शोक दारुण । हर्ष–विषादीं झाला मग्न । सुरलोक ॥१४॥ इकडें मूर्छा सांवरून । शुद्धीवरी ये नरभूषण । सुमंतासी पाचारून । सांगे ऐसें– ॥१५॥ “वनीं गेला रघुनंदन । अद्यापि न जाती प्राण । कोणत्या सुखार्थ कळे न । राहती देहीं ॥१६॥ सुतवियोगाहून बलवती । व्यथा असे ती कोणती । जी प्राप्त होतां सोडिती । देहास प्राण?” ॥१७॥ पुन्हां धरून धैर्यास । भूप म्हणे सुमंतास । “मित्रा! घेऊन जा रथास । समागमें ॥१८॥ माझे बालक सुंदर । असती दोघे सुकुमार । जनकसुता ती अतितर । सुकुमारीच ॥१९॥ रथीं बसवून त्यांस । दावी वन चार दिवस । पुन्हां परतून अयोध्येस । घेऊन ये ॥२०॥ जरी धैर्यवंत अतीव । परतती न दोघे बांधव । सत्यसिंधु राघव । दृढव्रती– ॥२१॥

तरी तूं जोडून हात । विनंति करी त्याप्रत । कीं, 'जानकीस तरी परत । पाठवा प्रभो !' ॥२२॥ पाहूनिया वनप्रांत । सीता होतांच भयभीत । त्या संधींत तीप्रत । निरोप सांग ॥२३॥ 'सासू–सासऱ्यांचा तूतें । निरोप ऐसा असे सीते ! । वनीं दुःखें अपरिमितें । परत बाळे ! ॥२४॥ कधीं रहावें सासरीं । अथवा कधीं माहेरीं । रुचेल जेथें अंतरीं । तेथें रहा' ॥२५॥ ऐशा-परीं तूं सचिवा ! । उपाय अवश्य करावा । होय मत्प्राणा विसांवा । परततां ती ॥२६॥ न तरी माझें मरण । निश्चयें ठरलें जाण । दैव उलटतां स्वाधीन । कांहीं न राहे ॥२७॥ सीता–राम–लक्ष्मण । दावीं मजला आणून" । पडे निश्चेष्ट, बोलून । धरणीवरी ॥२८॥ आज्ञा होतांचि सुमंत । वंदूनिया भूपाप्रत । सज्ज करीतसे रथ । अति त्वरें ॥२९॥ नगराबाहेर जेथ । दोघे बंधु सीतेसहित । होते, तेथें तो सुमंत । जाता झाला ॥३०॥ तेथें जातांचि सुमंत । सांगून राजाज्ञेप्रत । विनयें बैसवी रथांत । राघवातें ॥३१॥ बंधु उभयतां रथांत । बैसले सीतेसहित । वंदून अयोध्येप्रत । निघाले तैं ॥३२॥ निघाला पाहून रघुनाथ । अयोध्या झाली अनाथ । व्याकुल लोक समस्त । चालती सवें ॥३३॥ कृपासिंधु तयांप्रति । समजावितां नानारीतीं । परतती, फिरून येती । प्रेमवशें ॥३४॥ अयोध्यापुरी त्या कालीं । भयाण दिसूं लागली । जैसी तमानें भरली । काल-रात्रि ॥३५॥ नगरींचे नारीनर । जंतुसम भयंकर । पाहून भीती परस्पर । एकमेकां ॥३६॥ घर वाटे स्मशानवत् । परि-जन ते जणुं भूत । यमदूत वाटती सुत– । इष्टमित्र ॥३७॥ उपवनें, वृक्षवेली । दिसतीं सारीं कोमेजलीं । सरिता, सरोवरें मुळीं । बघवतीं ना ॥३८॥ नगरींचे पशु अनेक । हयगजक्रीडा-

मृगादिक । तैसे मयूर-चातक । विहंगहि ॥३९॥ चक्रवाकी, चक्रवाक । सारस, सारिका, शुक । हंसचकोरपिकादिक । पक्षी सर्व ॥४०॥ रामवियोगें व्याकुल । जेथल्या तेथें निश्चल । जणुं दिसती चित्रांतील । रेखलेले ॥४१॥ एवंच सकल नगर । वाटे अरण्य भयंकर । भासती ते नारीनर । खगमृगापरी ॥४२॥ विधात्यानें किरातिनी । केलें कैकेयीलागुनी । जिनें लाविला दावाग्नि । दाही दिशां ॥४३॥ रामाचा वियोगानल । साहूं न शकती पल । लोक पळती व्याकुल । होऊनिया ॥४४॥ नागरिक सर्वजण । निर्धारित मनांतून । 'सीतारामलक्ष्मणाविण । सौख्य नाहीं ॥४५॥ जेथें राहे रघुनंदन । तेथेंच जाऊं सर्वजण । प्रयोजन ना रामाविण । अयोध्येंत' ॥४६॥ ऐशा निश्चयें-करून । सवें चालले सर्व जन । देव-दुर्लभ सुख-सदन । त्या-गूनिया ॥४७॥ रामपदाब्जीं निश्चित्तीं । जडली जयांची प्रीति । त्यां वश करूं न शकती । विषयभोग ॥४८॥ वृद्ध-बालकांलागून । गृहांत मागें ठेवून । जाते झाले सर्व जन । समागमें ॥४९॥ यापरीं प्रथम दिवस । जातां दिनमणि अस्तास । राम करीतसे निवास । तमसा-तटीं ॥५०॥ प्रेमाकुल प्रजेप्रति । अवलोकून रघुपति । सदय हृदयीं अति । दुःखी होय ॥५१॥ श्रीसमर्थ रघुपति । करुणेची केवळ मूर्ति । तत्काल परदुःखाप्रति । जाणतसे ॥५२॥ सप्रेम मृदु वचन । बोलून रघुनंदन । समजावी लोकांलागून । परोपरीं ॥५३॥ जरी धर्मोपदेश अति । केला नागरिकांप्रति । परतवितां न परतती । प्रेमवशें ॥५४॥ शील न येचि सोडितां । प्रेम न येचि तोडितां । पेंचप्रसंग रघुनाथा । पडे ऐसा ॥५५॥ शोक-श्रमांनीं समस्त । रात्रीं लोक निद्राग्रस्त । देवमायेनें मोहित । केलें तयां ॥५६॥ जेधवां प्रहर दोन ।

रात्र गेलीसे लोटून । सुमंतास रघुनंदन । प्रेमें म्हणे– ॥५७॥ “शोध न लागे कुणाप्रत । ऐसा सुमंता ! हांक रथ । हाचि उपाय उर्वरित । अन्य नाहीं” ॥५८॥ सीतालक्ष्मणांसमवेत । राम बैसला रथांत । चित्तीं शिवपदांप्रत । वंदूनिया ॥५९॥ त्वरेनें आडवाटेस । सुमंत हांकी रथास । जेणें न कळे मागमूस । कुणासहि ॥६०॥ लोक उठून प्रभातीं । ‘राम गेला’ हें पाहती । त्या समयीं ते करिती । आकांत बहु ॥६१॥ रथाचें शोधिती चिन्ह । परि सांपडे कुठेंहि न । धांवती ‘राम राम’ म्हणून । चोहींकडे ॥६२॥ जहाज बुडतां सागरीं । वणिकसमाज ज्या परीं । व्याकुल झाले त्यापरीं । सर्व लोक ॥६३॥ तेधवां एक-मेकांस । करिती ऐसा उपदेश । आमुचे पाहून क्लेश । त्यजिलें रामें ॥६४॥ आपुलीच निर्भर्त्सना । करून प्रशंसिती मीना । ‘रामविहीन या जीवना । धिक्कार असो!’ ॥६५॥ (धन्य मीनाचें जीवन । काढितांचि जलांतून । वियोगें सोडिती प्राण । तत्काल ते ॥६६॥) “प्रियवियोग हा असला । धात्यानें जरी केला । तरी कां न मृत्यु दिला । मागतांहि ?” ॥६७॥ ऐसा विलाप बहुत । करीत जन समस्त । परतले शोकयुक्त । अयोध्येस ॥६८॥ वियोग–दुःखाचें वर्णन । शब्दमात्रें करवें न । अवधिच्या आशेनें प्राण । ठेविती ते ॥६९॥ रामदर्शनाची आस । तदर्थ स्त्रिया–पुरुष । व्रतनियमादि विशेष । आचरिती ॥७०॥ चक्र-वाकाचें जोडपें । त्यापरी कमलपुष्पें । सूर्यविरहाच्या तापें । दीन जणुं ॥७१॥ (पक्ष्याची उत्प्रेक्षा चांग । सुचवी काम-भोग-त्याग । पालटला रूपरंग । पुष्पोत्प्रेक्षा ॥७२॥) तिकडे लक्ष्मण–रघुनाथ । सीता–सचिवां सहित । शृंगवेर पुराप्रत । पोंचले ते ॥७३॥ जान्हवी ती विलोकिली । राम उतरे रथा-

खालीं । । आनंदातिशयें घाली । दंडवत ।।७४।। सीता, लक्ष्मण, सुमंत । यांनीं केला प्रणिपात । श्रीराम सर्वांसहित । सुख पावे ।।७५।। आनंद-मंगलाची कर्त्री । अखिल सुखाची दात्री । निखिल दुःखाची हंत्री । जान्हवी ती ।।७६।। अनेक कथा-प्रसंग । राम गंगेचे वर्णूनिया यथासांग । रामुगंगेचे तरंग । अवलोकी ।।७७।। सुमंत, लक्ष्मण, सीता । त्रिवर्गासी राम स्वतां । गंगेची महत्तमता । ऐकवीतसे ।।७८।। गंगेचें करितां स्नान । वाटेचा हरला शीण । शुचि जल प्राशितां मन । आनंदलें ।।७९।। (ज्यातें स्मरतां अपार । नासतो संसारभार । त्यासी श्रम हा व्यवहार । लौकिकाचा ।।८०।। श्रीराचंद्र विशुद्ध । स्वयें सच्चिदानंद । रविवंशाचा प्रसिद्ध । ध्वजरूप ।।८१।। तो नरापरी चरित । करीतसे रघुनाथ । संसार-सागराप्रत । सेतुरूप ।।८२।। ) हें गुह निषादाप्रत । वर्तमान होतां श्रुत । बोलावून घे मुदित । प्रिय बांधवां ।।८३।। घेऊन मूल-फल-भार । स्वागतार्थ सपरिवार । चालला, हर्ष अपार । हृदयांतरीं ।।८४।। करी साष्टांग दंडवत । पुढें ठेवी भेटीप्रत । प्रभुलागीं प्रेमयुक्त । अवलोकी ।।८५।। सहजप्रीति पाहून । वश होय रघुनंदन । पुसे कुशल बैसवून । निज संनिध ।।८६।। "पाहतांच पदकमल । हे नाथ ! झालों कुशल । त्यापरी मी भाग्यशील । लोकदृष्टचा ।।८७।। धरणी, गृह, धनादिक । देवा ! तुमचेंच निःशंक । मी तो विनम्र सेवक । सपरिवार ।।८८।। कृपाकरून पुराप्रत । चरणीं होऊं द्या पुनीत । दास आपुला करा ख्यात । सर्व जनीं ।।८९।। प्रभु म्हणे, "अगा मित्रा !। तुझा हेतु आहे खरा । परि पित्राज्ञा चतुरा ! । वेगळीच ।।९०।। धरून मुनीचा वेष । व्रत, आहार विशेष । चवदा वर्षें करी वास । वनांतरीं ।।९१।। म्हणून

वास ग्रामांत । मज मुळीं नाहीं उचित" । ऐकतां गुह तो व्यथित । दुःखभारें ॥९२॥ रामलक्ष्मण सीतासती । पाहून तत्स्वरूमांप्रति । प्रेमें नरनारी बोलती । गांवांतील ॥९३॥ "सखि! बालक असले । ज्यांनीं वनीं पाठविले । ते तरी म्हणावे कसले । मायबाप?" ॥९४॥ कुणी म्हणे "भूपतीनें । योग्य केलें, पहा जेणें । आम्हां दिला विधात्यानें । नेत्र-लाभ" ॥९५॥ गुह तो तदनंतर । करीं मनांत विचार । कीं शिंशुपा मनोहर । वृक्ष असे ॥९६॥ मग रामातें नेऊन । तेणें दाविलें तें स्थान । 'योग्य' म्हणे रघुनंदन । 'सर्वतोपरी' ॥९७॥ पुरजन करून जोहार । जाते झाले घरोघर । संध्यावंदना रघुवीर । निघालासे ॥९८॥ कुशपत्रें लुसलुशीत । आंथरून व्यवस्थित । करीतसे निषादनाथ । शेज सिद्ध ॥९९॥ स्वच्छ मधुर कोमल । पाहूनिया फलमूल । द्रोण भरून तत्काल । आणून ठेवी ॥१००॥ सीता-लक्ष्मण-सुमंत । ऐशा त्रिवर्गा-सहित । कंदमूलफलांप्रत । भक्षूनिया ॥१०१॥ रघुवंशमणि करी । निद्रा मृदु शय्येवरी । तेव्हां लक्ष्मण तो चुरी । प्रभु-पदांतें ॥१०२॥ प्रभु झोंपला पाहून । उठता झाला लक्ष्मण । 'झोंप' ऐसें सचिवालागून । मृदुवचें म्हणे ॥१०३॥ मग कांहीं अंतरावर । धनुष्यास लावून शर । वीरासनीं लक्ष्मण वीर । जागत बसे ॥१०४॥ गुह तो प्रेमभरित । पहारेकरी विश्वस्त । बाहून नेमी त्यांप्रत । जागोजागीं ॥१०५॥ जेथें बैसला लक्ष्मण । तेथें बैसला आपण । धनुष्यास लावून बाण । कसून भाता ॥१०६॥ निद्रिस्त रघुनाथातें । विलोकुनी, निषादातें । आलें प्रेमाचें भरतें । खेदयुक्त ॥१०७॥ शरीरीं रोमांच उठती । नेत्रीं प्रेमाश्रु वाहती । प्रेमें तैं लक्ष्मणाप्रति । बोलतसे ॥१०८॥

"स्वभावें राजमंदिर । प्रेक्षणीय अति सुंदर । पावेना तयासी सर । इंद्रभुवन ॥१०९॥ रत्नखचित बारादरी । रचिली अति साजिरी । जणुं मदनेंचि स्वकरीं । उभारिली ॥११०॥ उंची अत्तरें, चंदनें । सुगंधित नाना सुमनें । विविध भोग-साधनें । सुपवित्र ॥१११॥ रत्नदीप मनोहर । मंचक तो अति सुंदर । जेथ समृद्धि अपार । सर्वतोपरीं ॥११२॥ विविध वसनें उत्तम । गाद्या-गिरद्या मनोरम । शुभ्र पयःफेनासम । सुशोभित ॥११३॥ सीतेसह ज्या शय्येवरी । राम रात्रीं निद्रा करी । रतिमदनाचा गर्व हरी । स्वसौंदर्यें ॥११४॥ तेचि सीता-रघुनाथ । शय्येवांचून श्रमित । कुशशय्येवरी निद्रिस्त । पाहवेना ॥११५॥ माता-पिता, परिजन । नगरवासी थोर-सान । सुखदायी मित्रगण । दास दासी- ॥११६॥ ऐसे मिळून सकळिक । ज्याची करिती जपणूक । तोचि निजे रघुनायक । भूमीवरी ॥११७॥ जिचा पिता मिथिलानाथ । यत्प्रभाव जगीं ख्यात । जिचा सासरा दशरथ । इंद्रसखा ॥११८॥ रामचंद्र जिचा पति । भूवरी निजे सीता ती । ऐसी विचित्र दैवगति । नसेल कुठें! ॥११९॥ रामसीता वनाप्रति । काय हो! योग्य असती ? । कर्म प्रधान जन म्हणती । तेंचि खरें ॥१२०॥ केकय भूपाची नंदिनी । कपट धरून निज मनीं । मंदमति करी करणी । विपरीत हो ॥१२१॥ जिनें सीतारामाप्रत । ऐन सुखाच्या समयांत । दिलें दुःखप्रसंगांत । लोटूनिया ॥१२२॥ सूर्यवंश-वृक्षाप्रति । कुठारी ती दुष्टमति । तिनें केलें दुःखी अति । सर्व जगा" ॥१२३॥ ऐसे निषादाचें मन । दुःखभरें झालें खिन्न । सीतारामाचें भू-शयन । पाहूनिया ॥१२४॥ तेव्हां मृदु, मधुर वचन । बोलता झाला लक्ष्मण । भक्ति-ज्ञान-वैराग्यपूर्ण । रसभरित ॥१२५॥

"सुखदुःखाचा दायक । कुणी न कोणा निःशंक । बंधो! हा सर्व परिपाक । कृतकर्मांचा ॥१२६॥ योग अथवा वियोग । इष्टानिष्ट तैसे भोग । अरिमित्र, उदास प्रसंग । भ्रम मात्र हे ॥१२७॥ जगत् हें जाल निश्चितीं । त्या भीतरीं जोंवरती । जन्म मृत्यु, संपद्विपत्ति । कालकर्म- ॥१२८॥ धरा, धाम, वैभव, पुर । आसमंत, परिवार । जोंवरी हा व्यवहार । स्वर्ग नरक ॥१२९॥ पाहिल्या–ऐकिल्यानंतर । मनीं करावा विचार। मूळ अज्ञान हें सार । परमार्थ नव्हे ॥१३०॥ जैसा स्वप्ना-भीतरीं । भूप होतसे भिकारी । आणि रंक तो सुरपुरीं । इंद्र होय ॥१३१॥ जागृत होतांचि पाही । लाभहानि मुळीं नाहीं । त्यापरी प्रपंच हाहि । जाण मनीं ॥१३२॥ ऐसा करून विचार। रुष्ट न व्हावें कुणावर । दोष न द्यावा तिळमात्र । व्यर्थ कुणा ॥१३३॥ अज्ञानरूप निशेंत । केवळ योगी ते जागृत । विरक्त जे प्रपंचांत । परमार्थी जे ॥१३४॥ जीव जाहला जागृत । तैंचि जाणावा निश्चित । विषयविलास–विरक्त । होय जेव्हां ॥१३५॥ निरसून मोहभ्रांति । ज्ञान होय जीवा-प्रति । तेव्हांच उपजे प्रीति । रामपायीं ॥१३६॥ मित्रा! परमार्थ परम । हाचि जाणावा निस्सीम । रामपदीं उपजे प्रेम। तनुवाङमनें ॥१३७॥ श्रीराम हा परब्रह्म । मोक्षस्वरूप परम। अगम्य, अलक्ष्य, निरुपम । अनादि जो ॥१३८॥ विकाररहित शुद्ध । ज्यासी न स्पर्शला भेद । 'नेतिनेति' म्हणून वेद । निरू-पिती ॥१३९॥ सद्‌भक्त, पृथ्वी, ब्राह्मण । त्यापरी देवतागण । यांचें कराया कल्याण । कृपाळू जो ॥१४०॥ धरून मनुष्य-शरीर । लीला करीतसे अपार। ज्यांच्या श्रवणें संसार– । बंधन तुटे ॥१४१॥ मित्रा! ऐसें जाणुनी । मोह अवघा त्यागुनी ।

श्रीसीता–राम–चरणीं । रत होई" ॥१४२॥ राम–गुणानुवाद करितां । उदय झाला प्रभाता । जगाचा मंगलदाता । जागृत होय ॥१४३॥ श्रीराम शुद्ध चतुर । शौच–स्नानानंतर । मागवून वटक्षीर । घेता झाला ॥१४४॥ लक्ष्मणासह रघुवीर । जटा बांधी शिरावर । पाहतां अश्रुपूर्ण नेत्र । सुमंताचे ॥१४५॥ हृदयीं दाह दारुण । मुख जाहले मलिन । बद्धांजलि दीनवचन । बोलतसे– ॥१४६॥ "प्रभो ! कोसलाधीशानें । आज्ञापिलें मजकारणें । 'त्वां रथ घेऊन जाणें । रामासह ॥१४७॥ त्यातें दाखवून वन । करवून गंगास्नान । दोघां बंधूंस ये घेऊन । परत वेगें ॥१४८॥ (मूर्छावस्थेंत भूपति । सीतेची झाली विस्मृति । यास्तव पुन्हां सांगती । महाराज ॥१४९॥ ) सीता–लक्ष्मणासहित । परत आणी रघुनाथ । सर्व संकोच–भ्रमाप्रत । त्यागूनिया" ॥१५०॥ आज्ञापिलें नृपें ऐसें । मी अलाबला घेतसे । तुम्ही सांगाल तैसें । करीन मी" ॥१५१॥ विनंति करून यापरी लोळतसे चरणांवरी । दीनबाळापरी करी । आक्रंदन ॥१५२॥ "कृपा करूनिया तात ! ऐसेंच करा निश्चित । जेणें न होय अनाथ । अयोध्यापुरी" ॥१५३॥ सुमंतातें उठवून । राम करी तत्सांत्वन । "बा ! धर्ममार्ग शोधून । पाहिला तुंवां ॥१५४॥ शिबि, दधीचि, हरिश्चंद्र । झाले जे का नरेश्वर । भोगिती क्लेश अपार । धर्मास्तव ॥१५५॥ रंतिदेव, बलि, ज्ञानी । भूप झाले जे तयांनीं । नाना संकटें साहुनी । रक्षिला धर्म ॥१५६॥ मंत्रिवरा ! सत्यासम । दुसरा नाहींच धर्म । पुराण–निगमागम । वर्णिती हें ॥१५७॥ तोचि सत्यधर्म मज । प्राप्त झालासे सहज । त्यागितां अपयश आज । तीन्ही लोकीं ॥१५८॥ संभावितास दुष्कीर्ति । जरी प्राप्त होय जगतीं ।

कोटिमरणासम दे ती। दारुण दुःख ॥१५९॥ प्रिय सुमंता! तुजप्रत। काय सांगूं मी बहुत। उत्तर देतां दुरित। प्राप्त होय ॥१६०॥ धरून पित्याचे चरण। कोटिप्रकारेंकरून। करद्वयातें जोडून। विनंति करीं॥१६१॥ 'हे परमपूज्य ताता!। मजविषयींची आतां। अल्पमात्रहि चिंता। करूं नका' ॥१६२॥ त्यांतून सुमंता! तूं तरी। हितचिंतक पित्यापरीं। तुजहि मी विनंति करी। जोडून कर ॥१६३॥ सर्वतोपरीं आतां। तुझें कर्तव्य सुमंता!। जेणें दुःख न पावे पिता। मद्वियोगें" ॥१६४॥ राम-सुमंताचा संवाद। श्रवण करून सखेद। दुःखी जाहला निषाद। सपरिवार ॥१६५॥ मध्यंतरीच लक्ष्मण। कांही वदे कटुवचन। अयोग्य जाणून निवारण। राम करी ॥१६६॥ संकोचून रघुनाथ। घालून निज शपथ। "सुमंता!" म्हणे, "लक्ष्मणोक्त। सांगूं नको" ॥१६७॥ पुन्हां भूपाचा संदेश। सुमंत सांगे राघवास। "सीता वनांतील क्लेश। साहूं न शके ॥१६८॥ जानकी जेणेंकरून। अयोध्येस ये परतून। तेंचि आणावें घडवून। रामचंद्रा! ॥१६९॥ मी निराधार न तरी। केवळ होऊन निर्धारी। जलहीन मत्स्यापरी। जगणार नाहीं ॥१७०॥ माहेरीं किंवा सासरीं। अनुकूल सुखें सारीं। जेव्हां जेथें तदंतरीं। इष्ट वाटे- ॥१७१॥ तेधवां आनंदें तेथें। वास्तव्य घडेल तीतें। विपत्काल आपणातें। जोंवरीं असे' ॥१७२॥ राघवा! ऐसी तिनंति। भूपें केली जेणें रीतीं। ती आर्तता, ती प्रीति। सांगवेना" ॥१७३॥ पितृसंदेश ऐकून। सीतेस कृपानिधान। नानापरीं समजावून। सांगतसे ॥१७४॥ "सासू, श्वशुर, गुरुमंडळ। तुझा परिवार प्रेमळ त्या सर्वांची नुरे तळमळ। परततां तूं" ॥१७५॥ ऐकून पतीची गिरा। सीता

म्हणे, "श्रवण करा । परमप्रिय प्राणेश्वरा ! । विनंति ही ॥१७६॥ विवेकाचि परमावधी । तुम्ही प्रभो ! दयानिधि । देह सोडून छाया कधीं । राहील का ? ॥१७७॥ किंवा सूर्यास सोडून । प्रभा कोठें करी गमन । टाकून चंद्रालागून । चंद्रिका ती ?" ॥१७८॥ प्रेमभरें पतिलागून । विनंति ही ऐकवून । बोलली सुंदर वचन । सुमंतासी ॥१७९॥ "तुम्ही पितृ-श्वशुरां-परी । आहां माझे हितकारी । होईल अनुचित भारी । बोलतां कांहीं ॥१८०॥ विपत्तिवशें मी ताता ! । सम्मुख होतसे आतां । वाटूं न द्यावा चित्ता । विषाद मुळीं ॥१८१॥ आर्य-पुत्र-पदाब्जांतें । सोडून जें असे नातें । तें सर्वहि मी मानितें । वृथा मनीं ॥१८२॥ पित्याचे वैभव-विलास । पाहिले मीं रात्रंदिवस । मुकुट नमविती राजेश । ज्याच्या पदीं ॥१८३॥ यापरी सुखनिधान । माझ्या पित्याचें सदन । परि तें पतिविहीन । न रुचे मना ॥१८४॥ चक्रवर्ती सम्राट । कोसलराज वरिष्ठ । चतुर्दशभुवनीं प्रकट । प्रभाव ज्यांचा ॥१८५॥ पुढें होऊन सुर-नाथ । ज्याचें करून स्वागत । अर्धसिंहासनीं घेत । बसवूनिया ॥१८६॥ श्वशुर माझे ऐशापरी । नांदती अयोध्या नगरीं । सासू ती माताच दुसरी । प्रिय परिवार ॥१८७॥ परि श्रीराम-चरण- । कमलपरागांवांचून । सुखदाते कुणीहि न । वाटे मज ॥१८८॥ मार्गहि दुर्गम फार । वनभूमि, गिरि-कंदर । सरित्सरोवर अपार । गज, केसरी- ॥१८९॥ कोल, किरात, कुरंग । नाना परीचे विहंग । असतां प्राणपतिसंग । सुखद सारे ॥१९०॥ सासू-श्वशुरांलागून । सुमंता ! माझ्या-कडून । करा हो पाया पडून । विनंति ही ॥१९१॥ कीं, मज विषयीं मनांत । चिंता न करावी किंचित् । सुखी आहे

मी वनांत । तेंचि रुचे ॥१९२॥ प्रभु माझे प्राणपति । प्रिय भावोजी संगतीं । वीर धुरंधर धरिती । धनुर्बाण ॥१९३॥ मग मार्गीं श्रम न होती । दुःख, संदेह ना चित्तीं । मदर्थ न करा खंति । चुकूनहि" ॥१९४॥ सीतेचे बोल शीतल । ऐकतां सुमंत व्याकुल । मणि हारवतां विव्हल । सर्प जैसा ॥१९५॥ अंधारी आली नेत्रांस । कांहीं न ये ऐकायास । होऊनिया कासावीस । बोलवेना ॥१९६॥ श्रीरामचंद्रें तयास । केला बहुत उपदेश । परि शांति हृदयास । लाभेचिना ॥१९७॥ समागमें यावें म्हणून । सुमंतें केले बहू यत्न । उचित उत्तरें रघुनंदन । देता झाला ॥१९८॥ रामाज्ञा जी का होय । ती तों अनुल्लंघनीय । कठिण कर्मगति, उपाय । न चले तिथें ॥१९९॥ राम–जानकी–लक्ष्मण । यांतें सुमंत वंदून । परते गमावतां धन । वणिक् जैसा ॥२००॥ सुमंतें हांकितां रथ । न्याहळून रामाप्रत । पाहून अश्व समस्त । खिकाळती ॥२०१॥ तें दृश्य अवलोकून । दुःखी होय निषादगण । करिती भाल पिटून । शोक तदा ॥२०२॥ म्हणती "ज्याच्या वियोगानें । पशूंचीहि व्याकुळ मनें । माता–पिता–प्रजाजनें । जगावें कसें ?" ॥२०३॥ सुमंतातें रघुनाथ । बळें पाठवून परत । स्वयें गंगातटाप्रत । येतसे तैं ॥२०४॥ (सोपानींचा मार्ग भला । जरी दीर्घतम वाटला । तदर्थ चवथा योजिला । विश्राम हा ॥२०५॥ रसिक भाविक श्रोत्यांस । विनवीतसे देवीदास । माझ्या बोबड्या बोलांस । मान्य करा ॥२०६॥ )

---

# विश्राम ५ वा

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्योनमः
श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः

नाव मागवितां राम । निषाद न आणी प्रथम । म्हणे कीं, "तुमचें मर्म । जाणतों मी ॥१॥ लोक सांगती समस्त । 'तुमच्या पदाब्जरजांत । मनुष्य करावयाचें गुप्त– । सामर्थ्य आहे' ॥२॥ स्पर्शतांच शिलेंतुनी । प्रकटे सुंदर कामिनी । काष्ठ कांहीं शिलेहुनी । कठिण नाहीं ॥३॥ नावेस स्पर्शतां पाऊल । मुनिपत्नी ती होईल । नौका जाऊन खुंटेल । मदुपजीविका ॥४॥ मी हिच्याच बळावर । पोषितों स्वपरिवार । नेणें व्यवसाय इतर । कोणताहि ॥५॥ जरी जाया पैलतटीं । मनीषा असेल पोटीं । पदाब्जक्षालनासाठीं । आज्ञा करा ॥६॥ पदाब्ज आधीं प्रक्षाळीन । मग नावेंत बैसवीन । उतराईची मजलागून । चाड नाहीं ॥७॥ तुमची आणि दशरथाची । शपथ घेऊन साची । इच्छा माझ्या अंतरींची । कथितों खरी ॥८॥ धनुष्या चढवून बाण । खुशाल मारो लक्ष्मण । जोंवरी न प्रक्षाळीन । तुमचे पद– ॥९॥ कृपालो रघुनायका ! । यांत न धरावी शंका । तोंवरी पैलतटाका । नेणार नाहीं" ॥१०॥ रघुनाथानें ऐकिली । जणुं प्रेमपुटें दिलीं । ऐसी ती लडिवाळ बोली । निषादाची ॥११॥ सीतालक्ष्मणालागून । एकवार अवलोकून । श्रीराम करुणानिधान । हंसता झाला ॥१२॥ कृपासागर हांसुनी । म्हणे निषादालागुनी । "नौकेची होय न हानि । तेंचि

करीं ॥१३॥ त्वरें आणून जलास । प्रक्षाळीं तूं मत्पदास । पैल-
तीरा जावयास । विलंब होय" ॥१४॥ ज्याच्या नामाचें एक-
वार । स्मरण करितांच नर । उतरून जाई अपार । संसार-
सिंधु ॥१५॥ ज्याच्या एका पाउलापुढें । त्रैलोक्य झालें तोकडें ।
तो कृपाळू पुरवी कोडें । निषादाचें ॥१६॥ पाहतां पदनखां-
प्रति । जान्हवी हर्षली चित्तीं । शब्द ऐकतांचि तन्मति । मुग्ध
झाली ॥१७॥ रामाच्या आज्ञेनुसार । गुह जाऊन सत्वर ।
काष्ठपात्रीं भरून नीर । आणिता झाला ॥१८॥ अति आनंदें-
करून । प्रेम आलें उचंबळून । पदपद्म–प्रक्षालन । करूं
लागे ॥१९॥ पुष्पवर्षाव करुनी । देव करिती वाखाणणी ।
'यासारिखा नाहीं कुणी । पुण्यपुंज' ॥२०॥ करून पादप्रक्षालन ।
सपरिवार आपण । गुह तें जलप्राशन । करीतसे ॥२१॥ करून
पितरोद्धार । गुह तो तदनंतर । प्रभूलागीं पैलपार । घेऊन
जाय ॥२२॥ उतरून सीतारघुनाथ । गुह–लक्ष्मणांसहित ।
गंगेच्या वाळवंटांत । राहिले उभे ॥२३॥ उतरतांचि निषाद-
भक्त । करिता झाला दंडवत । प्रभु संकोचे 'याप्रत । कांहीं न
दिलें' ॥२४॥ पतिमनोगता जाणे । सीता ती सानंद मनें ।
काढून देई त्वरेनें । रत्नमुद्रिका ॥२५॥ 'घे उतराई म्हणून' ।
म्हणतांच दयाघन । गुह म्हणे पद धरून । काकुळतीनें– ॥२६॥
"प्रभो ! मी पावलों अशेष । मद्दुःख–दारिद्र्य–दोष– । दावा-
नलाचा निःशेष । नाश झाला ॥२७॥ बहुत लोटला समय ।
करीत आलों व्यवसाय । आज दिलें पूर्ण श्रेय । विधात्यानें ॥२८॥
हे स्वामिन् ! दीनदयाला ! । तुमच्या अनुग्रहें मला । अभिलाष
न राहिला । दुजा कांहीं ॥२९॥ तुम्ही परत आल्यावरी । मज
द्याल कांहीं जरी । धारण करीन शिरीं । प्रसाद तो" ॥३०॥

जरी रामलक्ष्मणें । सांगितलें आग्रहानें । परि कांहींहि निषादानें । घेतलें नाहीं ॥३१॥ तेव्हां करुणानिधान । निरोप दे त्यालागून । विमलभक्तीचें वरदान । देऊनिया ॥३२॥ रघुकुलनाथ तेधवां । स्नान करून पार्थिवा । पूजूनिया, महादेवा । नमस्कारी ॥३३॥ कर जोडून सीतेनें । प्रार्थिलें गंगेकारणें । "माते ! तुंवां पूर्ण करणें । इच्छा माझी ॥३४॥ पतिदीरां समवेत । कुशल येतां परत । तुझी पूजा माते ! निश्चित । करीन मी" ॥३५॥ प्रेम-रसें परिपूर्ण । सीतेचें ऐकून वचन । झाली निर्मल जलांतून । सुंदर वाणी ॥३६॥ "रघुवीर-प्रिये ! सीते !। ऐक माझ्या वचनातें । जगीं ज्ञात न कोणातें । त्वत्प्रभाव ! ॥३७॥ "कृपें पाहसी जयांतें । लोकपाल होतात ते । बद्धकरें सेविती तूंतें । सर्व सिद्धि ॥३८॥ त्वां करून माझी स्तुति । विनयें केलीसे विनंति । कृपनें तें मजप्रति । महत्त्व दिलें ॥३९॥ तथापि देवी ! मी तूंतें । देतसे आशीर्वादातें । सफलत्व स्ववाणीतें । द्यावयासी ॥४०॥ रामचंद्र प्राणनाथ । लक्ष्मण दीरासहित । कुशल येशील परत । अयोध्येसी ॥४१॥ तुझें सर्व मनोगत । पूर्ण होतील निश्चित । सद्यश तें ब्रह्मांडांत । पसरेल गे !" ॥४२॥ मंगलदायक वचन । जान्हवीचें परिसून । तिज अनुकूल जाणून । प्रसन्न सीता ॥४३॥ तैं प्रभु निषादाप्रति । गृहीं जावया सांगती । ऐकतां दुःखी होय चित्तीं । सुकून मुख ॥४४॥ तैं गुह कर जोडून । बोलला दीन वचन । "मद्विनति घ्या ऐकून । रघुकुलमणे ! ॥४५॥ प्रभो ! राहून समवेत । दावीन तुम्हांस पथ । सेवीन मी चरणांप्रत । चार दिवस ॥४६॥ रघुनाथा ! ज्या वनांत । जाल तुम्ही फिरत फिरत । मी करीन सुंदर तेथ । पर्णकुटी ॥४७॥ तेव्हां आज्ञा

मजप्रत । द्याल ती पाळीन सांप्रत । तुमचीच घेऊन शपथ । सांगतों मी " ॥४८॥ पाहून सहजप्रीति । श्रीराम निषादाप्रति । प्रसन्न होऊन चित्तीं । संगें घेई ॥४९॥ स्वज्ञातीचे सर्वजन । गुहें तेव्हां पाचारून । करून त्यांचें समाधान । निरोप दिला ॥५०॥ मग गणपति–शंकर । यांसी स्मरून रघुवीर । जान्हवीतें नमस्कार । करीतसे ॥५१॥ सीता–लक्ष्मण–गुहभक्त । या त्रिवर्गासमवेत । जाता झाला रघुनाथ । वनाप्रति ॥५२॥ त्या दिवशीं रघुनाथास । वृक्षतळीं घडे वास । सुख-सोय केली विशेष । गुहलक्ष्मणें ॥५३॥ प्रभातीं रघुनंदन । प्रातर्विधीतें सारून । घ्याया तीर्थराज-दर्शन । गमन करी ॥५४॥ सत्य तयाचा सुमंत्र । श्रद्धा हें प्रिय कलत्र । माधवासारिखा मित्र । हितकर्ता ॥५५॥ चतुर्विध पुरुषार्थ । भरले ज्याच्या भांडारांत । ज्याचें राज्य पुण्यप्रांत । सुंदर अति ॥५६॥ अजिंक्य, सुंदर सुदृढ । क्षेत्र हाचि ज्याचा गड । प्रतिपक्षासी अवघड । प्रवेशाया ॥५७॥ तीर्थें जी असती नाना । तीच ज्याची वीर सेना । पापरूप सैन्य-दलना । रणधीर जी ॥५८॥ संगम सुंदर सिंहासन अक्षय–वट छत्र छान । जो मुनीश्वरांचें मन । मोहित करी ॥५९॥ गंगा–यमुनांचे तरंग । तेचि चामर अति सुभग । दुःखदारिद्र्याचा भंग । दर्शनें होय ॥६०॥ पवित्र साधु, सुकृती । तीर्थराजातें सेविती । मनोवांछित पावती । सर्व फलें ॥६१॥ वेद, पुराण, बंदीजन । प्रयागाचे निर्मल गुण । आनंदें करिती गान । सदोदित ॥६२॥ प्रयागाचें महिमान । वर्णूं शके ऐसा कोण ? । जो का केसरीसमान । पापगजा ॥६३॥ ऐसा तीर्थराज सुंदर । त्याच्या दर्शनें रघुवीर । जो स्वयें सुखसागर । सौख्य पावे ॥६४॥ प्रयागाचें महिमान । श्रीमुखें करी कथन । निषाद-

सीता-लक्ष्मण । त्रिवर्गातें ॥६५॥ तेथील वनोपवन । पाहून करी वंदन । वर्णी अति प्रेमेंकरून । तन्महात्म्य ॥६६॥ येऊनिया ऐशा रीतीं । त्रिवेणीतें विलोकिती । जी सकल मंगलाप्रति । स्मरणेंचि दे ॥६७॥ आनंदें करून स्नान । केलें शिवाचें आराधन । पूजिला देवतागण । प्रयागींचा ॥६८॥ तेथून मग चापपाणि । भरद्वाजापाशीं येउनी । वंदितां हृदयीं मुनि । कवटाळिती ॥६९॥ मुनि-मनींचा आनंद । वर्णू न शकती शब्द । जणुं निखिल ब्रह्मानंद । प्राप्त झाला ॥७०॥ मुनीश्वरें राघवाला । तेव्हां आशीर्वाद दिला । मनीं अत्यानंद झाला । जाणून हें– ॥७१॥ 'माझा जो सुकृतिपुंज । त्या सर्वांचें फल आज । दृष्टिगोचर केलें मज । विधात्यानें' ॥७२॥ करूनिया कुशल प्रश्न । दिलें बैसाया आसन । प्रेमें तोषविलें पूजून । सर्वतोपरीं ॥७३॥ अमृतासमान मधुर । कंदमूलफल सुंदर । आणून दिधले अंकुर । मुनीश्वरें ॥७४॥ सीता-लक्ष्मण-निषाद । यांच्यासवें सप्रमोद । आवडीनें फलमूलकंद । राम खाई ॥७५॥ मार्गींचा जाऊन शीण । सुखावतां रघुनंदन । बोलती कोमल वचन । भरद्वाज ॥७६॥ "तपश्चर्या, तीर्थ, याग । पुरश्चरणें, योग, विराग । जे घडले ते आज सांग । सफल झाले ॥७७॥ राघवा तुझ्या दर्शनें । माझीं जी शुभ साधनें । तीं आजचि पूर्णपणें । सफल झालीं ॥७८॥ लाभ-सुखाची परिसीमा । दुजी नाहीं पुरुषोत्तमा ! । आकांक्षा पुरल्या रामा ! । त्वद्दर्शनें ॥७९॥ कृपा करून रघुराज ! । आतां वर द्यावा मज । उपजो प्रीति सहज । तव पदाब्जीं ॥८०॥ तनुवाङ्मनें सकल । सांडूनिया कपट छल । जीव जोंवरी न होईल । तुझा दास– ॥८१॥ तोंवरी जरी कोट्यावधि । उपाय

केले त्रिशुद्धि । सुख न त्या लाभे कधीं । स्वप्नांतहि" ॥८२॥ भाव-भक्ति-आनंदयुक्त । ऐसें मुनीचें भाषित । ऐकून राम मनांत । संकोचला ॥८३॥ तैं रघुकुलावतंस । वर्णून मुनीचें सद्यश । कोटिप्रकारें सर्वांस । ऐकवीतसे ॥८४॥ राम म्हणे, "हे मुनीश्वर! । तोचि महान् गुणागार । ज्याचा कराल आदर । तुम्ही स्वयें" ॥८५॥ ऐसें राम-मुनीश्वर । आदरून परस्पर । अनिर्वाच्य सुख थोर । अनुभविती ॥८६॥ प्रयागीं जे करिती वास । सिद्ध, मुनि, बटु, उदास । कळला त्या तापसांस । समाचार ॥८७॥ भरद्वाजाश्रमाप्रत । येते झाले ते समस्त । सुंदर दशरथाचा सुत । विलोकाया ॥८८॥ राम तयां सर्वांप्रत । करीतसे प्रणिपात । नेत्रलाभें ते समस्त । आनंदले ॥८९॥ परमानंद पावून । देऊन आशीर्वचन । करीत सौंदर्यवर्णन । परतले ते ॥९०॥ निशासमयीं रघुनाथ । विश्रांति घेतसे तेथ । स्नान करी प्रयागांत । प्रातःकालीं ॥९१॥ रघुनाथ सप्रमोद । वंदून मुनीचे पद । सीता–लक्ष्मण–निषाद– । संगे निघे ॥९२॥ सप्रेम रघुनंदन । मुनीस करी प्रश्न । "कोणत्या मार्गें गमन । करावें स्वामिन् ? ॥९३॥ यापरी ऐकून प्रश्न । मुनि म्हणती हांसून । "सर्व मार्ग तुजलागून । सुगम रामा !" ॥९४॥ सवें द्याया शिष्याप्रति । मुनीश्वर पाचारिती । ऐकतां पन्नास येती । मुदित मनें ॥९५॥ सर्वांचीच रामावरतीं । जडलीसे अति प्रीति । 'आम्हां परिचित' म्हणती । 'सर्व मार्ग' ॥९६॥ त्या समयीं मुनीश्वर । सवें देती शिष्य चार । ज्यांनीं पुण्य केलें अपार । जन्मांतरीं ॥९७॥ मुनीश्वरांतें वंदून । घेऊन अनुशासन । प्रसन्न मनें रघुनंदन । चाललासे ॥९८॥ गांवाजवळून जातां । प्रभूच्या दर्शना करितां । धांवून येई जनता । नारीनर– ॥९९॥

जन्मसाफल्य पावती । स्वयें सनाथ होती । सवें मना पाठविती । परतती दुःखें ॥१००॥ विनयें त्या शिष्यांप्रति । निरोप देई रघुपति । पूर्णकाम होऊन जाती । परतून ते ॥१०१॥ मग येऊन यमुनातीरीं । रामचंद्र स्नान करी । जी प्रभूच्या देहा-परी । श्याम वर्ण ॥१०२॥ तटाकींचे नारीनर । ऐकतांच समाचार । सोडूनिया कार्यभार । धांव घेती ॥१०३॥ सीता-राघव-लक्ष्मण । यांचें सौंदर्य पाहून । आपुल्या भाग्यातें जन । प्रशंसिती ॥१०४॥ सर्वांच्या अंतरीं भाव । जाणावया नांव, गांव । परि संकोचती अतीव । पुसावया ॥१०५॥ वयोवृद्ध चतुर जन । होते जे कोणी त्यांतून । ते पर्यायें रामालागून । ओळखिती ॥१०६॥ ते इतर जनांप्रति । सर्व कथा निवेदिती । 'पित्राज्ञेवरून जाती । वनांत हे' ॥१०७॥ कथा ऐकून समस्त । दुःख करिती अतोनात । "भूप-राज्ञीनें उचित । केलें न हें ॥१०८॥ सखि! हें आश्चर्य एक । कसले ते जननी-जनक । ज्यांनीं धाडिले बालक । वनांतरीं" ॥१०९॥ तेधवां रघुनंदन । बहुप्रकारेंकरून । सांगतसे समजावून । निषा-दातें ॥११०॥ रामाचें अनुशासन । शिरसा मान्य करून । गृहीं करीतसे गमन । निषादपति ॥१११॥ श्रीराम-सीता-लक्ष्मण । करद्वयांतें जोडून । करिती यमुनेलागून । प्रणिपात ॥११२॥ दोघे बंधु प्रमुदित । चालले सीतेसहित । स्वमुखें प्रशंसा करीत । कालिंदीची ॥११३॥ क्रमीत असतां मार्गासी । भेटती अनेक प्रवासी । पाहून उभय बंधूंसी । वदती प्रेमें ॥११४॥ "राजलक्षणें सारीं । दिसतीं तुमच्या देहावरी । पाहतां आमुच्या अंतरीं । दुःख होय ॥११५॥ तुम्ही पायींच अनवाणी । चाललांत मार्गांतुनी । खोटें वाटे आम्हांस मनीं ।

ज्योतिषहि ॥११६॥ निबिडशा अरण्यांत । पर्वत्तांचा दुर्गम पंथ । समागमें स्त्रीहि त्यांत । सुकुमारी ॥११७॥ वनांत केसरी, हस्ति । जें दृष्टीं न पाहवती । आज्ञा द्याल तरी संगतीं । येतों आम्ही ॥११८॥ जाल तुम्ही जेथवरी । पोंचवूं आम्ही तेथवरी । वंदून तुम्हां माघारीं । परत येवूं" ॥११९॥ प्रेमानें वश होऊन । यापरीं पुसती जन । देह ते पुलकायमान । अश्रु नेत्रीं ॥१२०॥ कृपासिंधु रघुनाथ । परतवी तयांप्रत । बोलून विनययुक्त । मृदु वचनें ॥१२१॥ जातां जातां जीं जीं पथीं । नगरें, गांवें लागतीं । नाग–सुरलोक करिती । हेवा त्यांचा ॥१२२॥ कोण्या पुण्यात्म्यानें त्यांप्रति । वसविलें शुभ मुहूर्ती । धन्य तीं सुंदर असतीं । पुण्यमय ॥१२३॥ जेथें जेथें रामचरण । वनांत करिती गमन । नसे त्या स्थलासमान । अमरावती ॥१२४॥ मार्गानिकट जे राहती । ते मानव पुण्यमूर्ति । देवहि त्या प्रशंसिती । स्वर्गामाजीं ॥१२५॥ सीता–लक्ष्मणासहित । घनश्याम रामाप्रत । डोळे भरून नखशिखांत । पाहती जे ॥१२६॥ ज्या ज्या सरित्सरोवरांत । स्नान करी रघुनाथ । देव त्या सर्वांप्रत । प्रशंसिती ॥१२७॥ ज्या वृक्षातळीं राम । बसून घेई विश्राम । तत्प्रशंसा कल्पद्रुम । करीतसे ॥१२८॥ प्रभु–पदाब्ज-परागांसी । स्पर्शतां पृथ्वी मानसीं । आपुल्या थोर भाग्यासी । प्रशंसीतसे ॥१२९॥ छाया करी नभीं घन । पुष्पवर्षाव करून । श्रीरामातें देवगण । स्तवीतसे ॥१३०॥ अवलोकीत विहंग । वन, पर्वत, नानामृग । चाललासे क्रमीत मार्ग । रामराय ॥१३१॥ सीता-लक्ष्मणाचे संगतीं । गांवाच्या निकटवर्ती । जेधवां जातसे रघुपति । निघूनिया ॥१३२॥ बालवृध्द, नर–नारी । ऐकतां

जनता सारी। गृहकार्य टाकून करी। गमन त्वरें ॥१३३॥ राम–जानकी–लक्ष्मण । यांचें सौंदर्य विलोकून। नेत्रसाफल्य पावून। सुखी होती ॥१३४॥ अश्रूंनीं भरले नयन। देह ते पुलकायमान । दोघां वीरां विलोकून। मग्न सारे ॥१३५॥ त्यांच्या तन्मयावस्थेस। न येचि वर्णावयास । कुबेरभांडार रंकास। लाभलें जणुं ॥१३६॥ एकमेकांते सांगती । योग्य शिकवण देती । 'नेत्रलाभ घ्या हो! संप्रति । साधूनिया' ॥१३७॥ विलोकून रामाप्रति । कोणी प्रेमवश होती। न्याहाळीतचि चालती । समागमें ॥१३८॥ कोणी सौंदर्य नेत्रांसून। ठेवून हृदयीं सांठवून । कायावाचामनेंकरून। शिथिल होती ॥१३९॥ गर्द वडाची साउली। शोधून कोण्या वृक्षातलीं। तृण–पल्लवांचें घाली। मृदु आसन ॥१४०॥ म्हणती, 'थांबून क्षणभर। करून श्रमपरिहार। मग जावें अथवा स्थिर। प्रातःकाळीं' ॥१४१॥कलश भरून पाणी। आणूनिया, मृदु वाणीं। 'आचमन करा' कोणी । म्हणती 'नाथ!' ॥१४२॥ ऐकून लडिवाळ बोल। प्रेम पाहून निश्चल। कृपाळू राम सच्छील। विशेषेंचि– ॥१४३॥ सीता श्रमित जाहली। मनीं जाणून त्या कालीं। विसांवा घेई वृक्षातलीं। क्षणमात्र ।१४४॥ आनंदानें सारे जन। करिती शोभा विलोकन। सुंदर रूपीं नेत्र, मन। लुब्ध झालें ॥१४५॥ राममुखचंद्राप्रति। टक लावून पाहती। नारीनर शोभती। चकोर जणुं ॥१४६॥ तमालवृक्षासमान। राममूर्ति श्यामवर्ण । पाहतां कोटिकाम–मन । मुग्ध होय ॥१४७॥ जैसा का विद्युद्वर्ण। तैसा सुंदर लक्ष्मण। नखशिखांत विलोकून । जीव निवे ॥१४८॥ परिधानिलीं वल्कलें। कटीस भाते कसिले । करकमलीं शोभले । धनु-

र्वाण ॥१४९॥ जटामुकुट सुंदर । विराजे मस्तकावर । हृदय, दोन्ही भुज–नेत्र । विशाल अति ॥१५०॥ घर्मबिंदूंचें पटल । झळके ज्यावरी विलोल । शरच्चंद्रासम तेजाळ । शोभे मुख ॥१५१॥ दोघे बंधु मनोहर । त्यांचें लावण्य अपार । माझ्या अल्पमतीस मात्र । अवर्णनीय ॥१५२॥ त्रिवर्गाची सुंद-रता । पाहे तदा सर्व जनता । मन, बुध्दि आणि चित्ता । एक-वटून ॥१५३॥ प्रेमपिपासू समस्त । शेखीं जाहले थकित । पाहतां दीपा तटस्थ । मृगी–मृग जणुं ॥१५४॥ सीतेपाशीं ग्रामस्त्रिया । औत्सुक्यानें जाऊनिया । अतिप्रेमें पुसावया । संकोचती ॥१५५॥ वारंवार सर्वंजणी । लागती तिच्या चरणीं । सहज सरल मृदुवचनीं । म्हणती तिज ॥१५६॥' 'राजकुमारी! संप्रति । आम्ही करितों विनंति । पुसावया वाटे भीति । स्त्रीस्वभावें ॥१५७॥ आमुचें धाडस पाहुनी । क्षमा करावी स्वामिनी !। अडाणी जाणून न मानी । अयोग्य हें ॥१५८॥ हे जे सहज सुंदर । उभयतां राजकुमार । विराजे हेमरत्नावर । तेज ज्यांचें ॥१५९॥ श्यामवर्ण, गौरवर्ण । शोभा–लावण्याची खाण । शोभती किशोर दोन । राजबिंडे ॥१६०॥ शारदीय निशापति । तैसी ज्यांची मुखकांति । शरत्पद्मापरी शोभती । नेत्र ज्यांचे ॥१६१॥ कोटिमदनालागून । सोडिती जे लाजवून । सुमुखी ! ते तुझे कोण ?। सांग आम्हां" ॥१६२॥ प्रेमळ, मधुर वचन । त्यांचें तेव्हां परिसून । जानकी ती संकोचून । हांसे मनीं ॥१६३॥ स्त्रियांतें पाहून घाली । लाजेनें ती मान खालीं। उभयपक्षीं संकोचली । वरवर्णिनी ॥१६४॥ ( सांगावें तरी पतीची । अमर्यादा व्हावयाची । न सांगतां त्या स्त्रियांची । निराशा होय ॥१६५॥) बाल मृगाक्षी संकोचुनी । सप्रेम ती

पिकस्वनी । तेधवां मधुरवचनीं । बोलतसे ॥१६६॥ "सहज-स्वभावें सुंदर । अंगकांति ज्यांची गौर । ते लक्ष्मण धाकटे दीर । असती माझे" ॥१६७॥ तदनंतर चंद्रमुखी । आडवा पदर झांकी । भृकुटी वळवून निरखी । पतीकडें ॥१६८॥ खंजनपक्षासमान । तिरपे करून नयन । संकेतें स्वपति म्हणून । सांगे तयां ॥१६९॥ सर्वहि ग्रामस्त्रियांसी । आनंद झाला मानसीं । रंकांनीं लुटिली जैशी । रत्नराशि ॥१७०॥ अतिप्रेमेंकरून । सीतेचे धरून चरण । देती तें आशीर्वचन । बहुतापरीं ॥१७१॥ "शेष–मस्तकीं जोंवरी । पृथ्वी राहील सुंदरी !। तुझें सौभाग्य तोंवरी । अखंड असो ! ॥१७२॥ जैसी हिमाचलतनया । तैसी तूं हो पतिप्रिया । आमुच्याविषयीं दया । सोडूं नको" ॥१७३॥ जोडूनिया करांप्रति । पुनःपुन्हां विनविती । "परत पुन्हां याच पथीं । याल जरी– ॥१७४॥ मानूनिया निजदासी । दर्शन द्यावें आम्हांसी" । प्रेमतृषित त्या सर्वांसी । सीता बघे ॥१७५॥ बोलून मधुरवचनीं । संतुष्ट करी त्यांलागुनी । जणुं चंद्रिका कुमुदिनी । पोषीतसे ॥१७६॥ त्या समयासी लक्ष्मण । राम-मनोगत जाणून । मृदु वचें जनांलागून । मार्ग पुसे ॥१७७॥ तें ऐकतां नरनारी । दुःखी जाहल्या अंतरीं । रोमांच उठले शरीरीं । नेत्रीं अश्रु ॥१७८॥ आनंद गेला मावळून । उदास झालें तन्मन । दिला निधि घे हिरावून । दैव जणुं ॥१७९॥ जाणूनिया कर्मगति । धैर्य धरूनिया चित्तीं । सुगम मार्ग दाविती । शोधूनिया ॥१८०॥ सीतालक्ष्मणांसहित । त्यासमयीं रघुनाथ । पुढतीं गमन वनांत । करीतसे ॥१८१॥ बोलून प्रिय वचनें । परतवी जनांकारणें । सवें त्यांचीं अंतःकरणें । घेऊनिया ॥१८२॥ परततां स्त्रीपुरुष । खेद करिती विशेष ।

विधात्यास देती दोष। निजांतरीं ॥१८३॥ होऊन विषाद-युक्त। बोलती ते आपसांत। "उलटी करणी समस्त। विधात्याची ॥१८४॥ तो निरंकुश अत्यंत। निष्ठुर, निःशंक निश्चित। केला रोगी, कलंकित। चंद्र ज्यानें ॥१८५॥ कल्प-तरु रुक्ष फार। समुद्रास केलें क्षार। तेणेंचि राजकुमार। धाडिले वनीं ॥१८६॥ विधात्यानें जरी यांस। दिला ऐसा वनवास। तरी केले भोगविलास। व्यर्थचि ते ॥ १८७ ॥ हे हिंडती रानें-वनें। पायीं पादत्राणाविणें। नाना वाहनें विधीनें। रचिलीं व्यर्थ ॥१८८॥ तृणपल्लव आंथरून। भूवरी करिती हे शयन। कशास केली निर्माण। सुंदर शय्या? ॥१८९॥ वृक्षा-तलीं राहायास। जरी नित्य लाविलें यांस। रचून राजमंदिरास। शीण वृथा! ॥१९०॥ सुंदर सुकुमार अति। जटा मस्तकीं बांधिती। मुनि-वल्कलें करिती। परिधान जरी- ॥१९१॥ तरी विविध भूषणें। अमोल, भरजरी वसनें। व्यर्थचि तीं विधात्यानें। निर्माण केलीं ॥१९२॥ कंदमूलफलें यांनीं। भक्षण करावीं वनीं। सुधेसम पक्वान्नें अवनीं। वृथाच तीं" ॥१९३॥ कुणी म्हणती "जात्या सुंदर। स्वयें घेती अवतार। घडविले नसती मात्र। विधात्यानें ॥१९४॥ जेथवरी विधिकरणी। वर्णिली असे वेदांनीं। इंद्रियगोचर म्हणुनी। निर्मिलीसे ॥१९५॥ ऐकण्यांत येई कानीं। दृष्टीस पडे नयनीं। विचार करितां मनीं। कळून ये ॥१९६॥ चतुर्दश भुवनांतरीं। शोधून पहा कुठेंतरी। ऐसे पुरुष, ऐसी नारी। आहे काय? ॥१९७॥ धात्यानें पाहून यांना। धरिली असेल वासना। यांच्या सारखीच रचना। करावया ॥१९८॥ बहु परिश्रम केले। परि मुळीं न जुळले। त्या ईर्ष्येनें लपविलें। आणून वनीं" ॥१९९॥ कुणी

म्हणती, " आम्ही तों । विशेष कांहीं न जाणतों । परम धन्य मानितों । स्वतांस; परि– ॥२००॥ पुण्यात्मे मानितों त्यांप्रति । ज्यांनीं पाहिल्या या मूर्ति । जे पाहती किंवा पुढतीं । पाहतील" ॥२०१॥ ऐशापरीं प्रेमयुक्त । बोलतां ते आपसांत । प्रेमाश्रु त्यांच्या नेत्रांत । भरून येती ॥२०२॥ म्हणती, "अति सुकुमार । या त्रिवर्गाचें शरीर । कैसा मार्ग कठिणतर । चालतील ? ॥२०३॥ प्रेमवशें सकल स्त्रिया । जाती व्याकुल होऊनिया । जैशा का संध्यासमया । चक्रवाकी ॥२०४॥ कमलासम कोमल पद । मार्ग जाणून दु:खद । हृदयीं होऊन गद्‌गद । बोलती त्या– ॥२०५॥ "आरक्त मृदुल चरण । स्पर्शतांच धरा पूर्ण । आमुच्या हृदयासमान । संकोचेल ॥२०६॥ हे जगदीशा! यांप्रत । जरी धाडिलेंस वनांत । तरी कां न केला पथ । पुष्पमय ? ॥२०७॥ सखे ! मागतां धात्यातें । तें जरी प्राप्त होतें । तरी ठेवावें नित यांते । नेत्रांतरीं" ॥२०८॥ जे स्त्रीपुरुष तेथें । आले न त्या समयातें । ते सीतारामचंद्रातें । पाहूं न शकले ॥२०९॥ स्वरूपवर्णन ऐकुनी । पुसती आतुर होउनी । "गेले असतील अजुनी । कोठवरी ?" ॥२१०॥ समर्थ होते, ते धांवती । जाऊनिया विलोकिती । पावूनियां आनंदती । नेत्रफल ॥२११॥ लहान बाळें, स्त्रीगण । तैसे जे का वृद्धजन । बापडे हात चोळून । पस्तावती ॥२१२॥ यापरीं लोक समस्त । प्रेमवश होती त्वरित । जात असे रघुनाथ । जेथें जेथें ॥२१३॥ गांवोगांव ऐशा रीतीं । आनंद होतसे अति । भानुकुलकुमुदेंदुप्रति । पाहूनिया ॥२१४॥ ज्या कुणास हा वृत्तांत । ऐकूनिया होय ज्ञात । ते भूपकैकेयीप्रत । दोष देती ॥२१५॥ कोणी म्हणती, " भूपति । आहे उत्कृष्टचि अति । जेणें दिला आम्हांप्रति । नयन-

लाभ" ॥२१६॥ स्त्रीपुरुष आपसांत । सरल सुंदर प्रेमयुक्त । त्रिवर्गाच्या संबंधांत । बोलती हें– ॥२१७॥ "धन्य मातापितर ते । ज्यांनीं जन्म दिला यांतें । जेथून हे पातले तें । धन्य नगर! ॥२१८॥ धन्य ग्राम, वनप्रांत । धन्य तें स्थल जेथ जेथ । जातील हे ॥२१९॥ निर्मून त्या जनांप्रति । विधात्यासी सुखप्राप्ति । ज्यांचे हे प्रेमी असती । सर्वतोपरीं" ॥२२०॥ सीता–लक्ष्मण–रघुवीर । त्रिवर्गाची कथा सुंदर । वनमार्गांत चौफेर । पसरलीसे ॥२२१॥ ( सोपानींचा मार्ग भला । जरी दीर्घतम वाटला । तदर्थ पांचवा योजिला । विश्राम हा ॥२२२॥ रसिक भाविक श्रोत्यांस । विनवीतसे देवीदास । माझ्या बोबड्या बोलांस । मान्य करा ॥२२३॥)

---

## विश्राम ६ वा

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्योनमः
श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः

रघुकुलाब्जगभस्ति । श्रीराम तो ऐशा रीतीं । मार्गांतील लोकांप्रति । सुख देतसे ॥१॥ सीतालक्ष्मणासहित । विलोकीत वनप्रांत । चाललासे मार्ग क्रमित । हळू हळू ॥२॥ पुढें श्रीरघुनंदन । लक्ष्मण शोभे मागून । तापस वेषांतें धरून । चालले ते ॥३॥ उभयतांच्या मध्यंतरीं । सीता शोभे कैशापरी । जीव–ब्रह्माच्या भीतरीं । माया जैसी ॥४॥ पुन्हां वर्णितों

शोभेप्रत । जैसी ठसली मन्मनांत । जैसी वसंत-मदनांत । शोभे रति ॥५। पुन्हां मनीं विचारुनी । वर्णितों उपमा देउनी । चंद्रबुधांत रोहिणी । शोभे जैसी ॥६॥ प्रभुपदचिन्हांभीतरीं । पाय ठेवी सीता सुंदरी । मर्यादा राखून अंतरीं । मार्ग क्रमी ॥७॥ सीताराम-पदचिन्हें । वगळून लक्ष्मणानें । उजव्या-डाव्या बाजूनें । क्रमावा पथ ॥८॥ सीता-राम-लक्ष्मणाचें । प्रेम शब्दातीत साचें । मग कैसें तरी वाचें । वर्णवेल? ॥९॥ रामशोभा विलोकिती । खगमृग ते मग्न होती । चोरी मार्गस्थ रघुपति । चित्त त्यांचें ॥१०॥ सीतेसहवर्तमान । प्रिय पथिक दोघे जण । जयांनीं डोळे भरून । अवलोकिले ॥११॥ दुर्गम संसारपथ । आक्रमून आनंदांत । पार गेले ते समस्त । अनायासें ॥१२॥ आजहि ज्याच्या हृदयांत । वास्तव्य करिती स्वप्नांत । राम-लक्ष्मण मार्गस्थ । सीतेसह– ॥१३॥ त्यांतें सायुज्याचा पथ । प्राप्त होईल निश्चित । कधीं कुणा मुनिप्रत । लाभे जो का ॥१४॥ सीतेसह जाणून श्रमित । त्या समयीं रघुनाथ । समीप पाहे जल शीत । वटवृक्षहि ॥१५॥ तेथें वास्तव्य करून । कंदमूलफल भक्षून । प्रभातीं करून स्नान । चाले पुढें ॥१६॥ विलोकीत वन सुंदर । पर्वत आणि सरोवर । आला आश्रमा रघुवीर । वाल्मीकीच्या ॥१७॥ मुनीचें सुंदर स्थान । विलोकी रघुनंदन । वन, पर्वत, जल पावन । वाहे जेथें ॥१८॥ कमलें विकसित कासारीं । वृक्ष फुलले वनांतरीं । मधुर गुंजती ज्यांवरी । रसिक भृंग ॥१९॥ खग-मृग ते भोंवतीं । विपुल कोलाहल करिती । निर्भयपणें संचरती । मुदित मनें ॥२०॥ ऐसा तो पवित्रतम । मुनीचा सुंदर आश्रम । पाहून हर्षला राम राजीवनेत्र ॥२१॥ आला असे रघुपति । ऐकतांचि त्वरितगति ।

वाल्मीकि सामोरे येती । स्वागतार्थ ।।२२।। श्रीराम तैं मुनिप्रति । करी साष्टांग प्रणति । विप्रवर तयां देती । आशीर्बाद ।।२३।। रामरूपास पाहून । मुनींचे निवाले नयन । आणिती सन्मान करून । आश्रमांत ।।२४।। तेव्हां उचित आसन । मुनि देती त्यालागून । त्या अतिथीतें जाणून । प्राणप्रिय ।।२५।। कंद-मूल-फलें मधुर । आणविती मुनीश्वर । सीता, राघव, सौमित्र । भक्षितीं तैं ।।२६।। वाल्मीकीच्या हृदंतरीं । आनंद लोटला भारी । दृष्टीं पाहून साजिरी । मंगलमूर्ति ।।२७।। तेव्हां निज कमलकर । जोडूनिया रघुवीर । वचन श्रवण-सुखकर । बोलतसे— ।।२८।। "मुनिनाथा! तुम्हांलागून । त्रिकालींचें असे ज्ञान । बदरीफलासमान । विश्व हातीं" ।।२९।। इतुकें बोलून प्रभूनें । निवेदिलें मुनिकारणें । ज्या ज्या प्रकारें कैकेयीनें । वनवास दिला ।।३०।। "अनुज्ञा करिती तात । मातेची संमति त्यांत । भरतासम बंधुप्रत । राज्याभिषेक ।।३१।। तुमचें दर्शन अपूर्व । घडला हा योग सर्व । मत्पूर्वपुण्य-प्रभाव । मानितों मी ।।३२।। पाहून तुमच्या पायांतें । मुनिवर्या! या समयातें । आमुचीं सर्व सुकृतें । फळा आलीं ।।३३।। आतां जेथें आम्हां-प्रति । आज्ञा हो तुमची संप्रति । कोणी मुनि न पावती । त्रास जेथें— ।।३४।। कारण कीं, ज्यापासुनी । दुःख पावती तपोमुनि । ते राजे अग्निवांचुनी । दग्ध होती ।।३५।। ब्राम्हणांचा परितोष । मंगलमूल विशेष । परि जाळी त्यांचा रोष । कोटि कुलां ।।३६।। ऐसें जाणून मनांत । स्थल सांगावें मजप्रत । सीता-लक्ष्मणांसहित । जाईन तिथें ।।३७।। तेथें तृण-पर्णकुटी । उभारूनिया गोमटी । कांहीं काळ करूं राहाटी । दया-निधे!" ।।३८।। सहज सरळ ती वाणी । राघवाची परिसुनी ।

देती त्यातें ज्ञानी मुनि । धन्यवाद ॥३९॥ "अगा हे रघुकुल-केतू ! । कां न असे वदशील तूं । तूंचि रक्षिता श्रुतिसेतु । निरंतर ॥४०॥ श्रुतिसेतूचा पालक । तूंच हे रघुनायक ! । ईश-माया ती निःशंक । जानकी ही ॥४१॥ दयानिधीच्या मनोगतें । ही सृष्टीप्रति निर्मिते, । पाळिते, अंतीं करिते । संहारहि ॥४२॥ जो सहस्रमुखी शेष । धारण करी महीस । तो चराचराचा ईश । लक्ष्मण हा ॥४३॥ देवकार्यास्तव जाण । केला नृपदेह-धारण । चालला कराया दलन । राक्षस-सेना ॥४४॥ तुझें स्वरूप खरोखर । राघवा ! बुद्धीहून पर । त्याचपरी अगोचर। वाणीसहि- ॥४५॥ कळावया कठिणतर । अकथनीय अपार । 'नेति नेति' निरंतर । वेद म्हणे ॥४६॥ संसार हा एक खेळ । त्यांत द्रष्टा तूं प्रांजळ। विधि-हरि-हरां केवळ । नाचविसी ॥४७॥ तेहि तुझ्या तत्त्वाप्रति । स्वयें जाणूं न शकती । मग इतरांची गति । काय तिथें ? ॥४८॥ ज्यांतें देशील जाणीव । तेचि जाणतील तत्त्व । जाणतांच मग स्वयमेव । तेंचि होती ॥४९॥ भक्तमानस-चंदना ! । निजकृपें रघुनंदना ! । तूं आपुल्या भक्तजनां । कळों येसी ॥५०॥ तुझा देह विकाररहित । असे चिदानंदयुक्त । तेचि जाणती त्याप्रत । अधिकारी जे ॥५१॥ देवसंतांच्या कार्यार्थ । धरिसी नरदेहाप्रत । बोलसी, वागसी प्राकृत । भूपापरीं ॥५२॥ रामा ! तुझ्या चरित्रास । ऐकून, पाहून विशेष । जड होती मोहवश । सुज्ञ सुखी ॥५३॥ तूं जें बोलसीं अगत्य । तें तें करितोस सत्य । भूमिकेसारिखें नित्य । ठाकणें भाग ॥५४॥ कोठे राहावें म्हणून । त्वां पुसिलें मज-लागून । मी मात्र कराया प्रश्न । संकोचतों ॥५५॥ रामा ! तूं नससी जेथें । ऐसें स्थल तें कोणतें । सांगून दाखीव मातें ।

तूंच स्वयें" ॥५६॥ प्रेमरसें परिपूर्ण । ऐकून मुनीचें वचन । संकोचुनी रघुनंदन । हांसे मनीं ॥५७॥ वाल्मीकींनींहि आपुलें । मधुर भाषण चालविलें । जें का ओथंबलेलें । अमृतरसें ॥५८॥ "जानकी–लक्ष्मणांसवें । तुवां वास्तव्य करावें । स्थलनिर्देश ते ऐकावे । राघवा रे ! ॥५९॥ अगाध सिंधुसमान । असती जयाचें श्रवण । नाना सुंदर सरिद्गण । तुझ्या लीला– ॥६०॥ सांठविती रात्रंदिन । परि न होती संपूर्ण । तद्हृदयें तुज-लागून । योग्य गृह ॥६१॥ दर्शन-मेघाचसाठीं । चातकासमान दृष्टि । तृषित होऊन पोटीं । ठेविली ज्यांनीं ॥६२॥ सरोवर, सरिता, सागर । यांचा करून अनादर । रूपबिंदूनें निरंतर । संतुष्ट जे ॥६३॥ तद्हृदय–गृहनिःशंक । त्रिवर्गास सुखदायक । तेथें हे रघुनायक ! । रहा तुम्ही ॥६४॥ तुझ्या यशाच्या निर्धारीं । निर्मल मानससरोवरीं । ज्यांची जिव्हा हंसिनीपरी । राहूनिया ॥६५॥ गुणगणाच्या मौक्तिकांस । वेंचिते रात्रंदिवस । तेथें त्वां करावा वास । रामराया ! ॥६६॥ तुझा प्रसाद पवित्र । त्याचा सुगंध सुंदर । ज्यांचें घ्राणेंद्रिय सादर । सेवीतसे– ॥६७॥ आधीं नैवेद्य दावून । मग जें करिती भोजन । प्रसादचि वस्त्र-भूषण । मानिती जे ॥६८॥ देव–द्विज–गुरु–दर्शन । घडतां जे करिती नमन । वागती प्रेमेंकरून । नम्रपणें ॥६९॥ नित्य जयांचे हस्त । पूजिती त्वत्पादांप्रत । अनन्य विश्वास हृदयांत । तुजवरी ॥७०॥ तुझ्याच तीर्थालागून । चालती ज्यांचे चरण । तन्मनीं हे रघुनंदन ! । वास करीं ॥७१॥ तुझ्याचि मंत्र-राजाप्रति । जपती जे दिनरातीं । परिवारासहित पूजिती । तुलाचि जे ॥७२॥ नानाप्रकारेंकरून । तर्पण, होम, हवन । देती भोजन बहु दान । ब्राह्मणांतें ॥७३॥ तुझ्याहून गुरुप्रति ।

मानूनिया श्रेष्ठ अति । तयासी जे पूजिती । अत्यादरें ॥७४॥ सर्वहि साधनें करिती । फळ एकच मागती । जडो तव पदीं भक्ति । म्हणूनिया ॥७५॥ त्यांच्या मनोमंदिरांत । सती जानकी सहित । वास करावा सतत । रघुनायका! ॥७६॥ ज्यांच्या मनीं मद, मान । काम, क्रोध, अज्ञान । लोभ, क्षोभ नसे जाण। राग, द्वेष ॥७७॥ कपट, दंभ आणि माया । स्वप्नांत न ठावी जयां । त्यांच्या हृदयीं रघुराया! । वास करीं ॥७८॥ सर्वांसी प्रिय निःशंक । सर्वांचे हितकारक । स्तुति-निंदा, सुख-दुःख सारखे जयां ॥७९॥ आधीं विचार करून । बोलती सत्य, प्रिय वचन । जागृत्स्वप्नींहि शरण । तुलाच जे ॥८०॥ तुजवांचून ज्यांप्रति । नाहींच दुसरी गति । तद्हृदयीं करीं वसती । रामराया! ॥८१॥ जे परनारीलागून । मानिती मातेसमान । विषासम परधन । मानिती जे ॥८२॥ पाहून पर-संपत्ति । आनंदित होती चित्तीं । परविपत्तीनें ज्यांप्रति । विशेष दु.ख ॥८३॥ जे तुजला प्राणासम । मानिती रामा! प्रियतम । तद्हृदय सुंदर धाम । रहावया ॥८४॥ गुरु, माता, आणि पिता । स्वामी, सखा, रघुनाथा! । तूंच असती सर्वथा । जयां-प्रति ॥८५॥ त्यांच्या मनोमंदिरांत । सीता-लक्ष्मणासहित । वास करावा संतत । रामराया! ॥८६॥ टाकूनिया अवगुण । सर्वांचे घेती सद्गुण । संकटें करितीं सहन । गोविप्रार्थ ॥८७॥ संसारीं नीतिनिपुणांत । ज्यांची गणना निश्चित । सुंदर तद्-हृदयांत । स्थान तुझें ॥८८॥ गुण तुझेचि विशेष । जे जाणती निज दोष । ज्यांसी तुझाच विश्वास । सर्वतोपरीं ॥८९॥ ज्यांसी रामा! तुझे भक्त । वाटती प्रिय अत्यंत । तद्हृदयीं सीतेसहित । वास करीं ॥९०॥ स्वर्गापवर्गनरका- । विषयीं

ज्या भाव सारिखा । सर्वत्र जे धनुर्धारका । पाहती तुज ॥९१॥ कायावाचामनेंकरून । जे तुझेचि दास जाण । त्यांच्या हृदयीं रात्रंदिन । वास करीं ॥९२॥ ज्यांलागुनी केव्हांहि । कशाचीच इच्छा नाहीं । ज्यांची प्रीति तुझ्या ठायीं । स्वाभाविक ॥९३॥ तयांच्या हृदयांतरीं । निरंतर वास करीं । तुझें मंदिर निर्धारीं । तेंचि असे" ॥९४॥ ऐशा रीतीं मुनीश्वरें । रामास दाविलीं मंदिरें । रुचलीं प्रेमळ उत्तरें । राघवातें ॥९५॥ मुनि म्हणती "स्थान एक । हे भानुकुलनायक ! । सांगतों सुखदायक । समयानुसार ॥९६॥ चित्रकूटगिरिवरी । जाऊनिया वास करीं । तुमची सर्वतोपरीं । सोय तेथें ॥९७॥ रमणीय असे गिरि । त्या सुंदर वनांतरीं । विहरती गज, केसरी । विहंग मृग ॥९८॥ तेथें नदी पवित्र अति । जिची पुराणांतून ख्याति । तपोबलें आणिली ती । अनसूयेनें ॥९९॥ ( अत्रि ऋषि तिचा पति । वयोमानें वृद्ध अति । असमर्थ स्नानाप्रति । दूर जाया ॥१००॥ यास्तव ती अनसूया । घोर तप करूनिया गंगेसी वळवूनिया । आणीतसे ॥१०१॥ भागीरथी ती तेथुनी । नाम पावली मंदाकिनी । पाप-बालका डाकिनी- । सारखी जी ॥१०२॥ अत्रि-आदि मुनीश्वर । तेथें वसती निरंतर । योगजपतपें शरीर । कष्टविती ॥१०३॥ जाऊन सर्वांच्या श्रमा । सफल करावें रामा ! । त्यापरीं पर्वतोत्तमा । गौरवावें" ॥१०४॥ मुनीश्वरें ऐशा रीतीं । चित्रकूटाची महती । वर्णूनिया रामाप्रति । निवेदिली ॥१०५॥ जानकीसहवर्तमान । उभय बंधु मिळून । करिते जाहले स्नान । नदीमाजीं ॥१०६॥ लक्ष्मणास म्हणे राम । "घाट हा अति उत्तम । तेथें रहावयाची ठाम । सोय करीं" ॥१०७॥ लक्ष्मणासी उत्तरदिशे । पर्वताचा कडा

दिसे । तेथें पाणी वाहतसे । धनुष्याकार ॥१०८॥ नदी प्रत्यंचे-
समान । शमदमदान-बाण । कलीचीं पापें संपूर्ण । लक्ष्यां-
परी ॥१०९॥ चित्रकूट हा पारधी । न चुके ज्याचा नेम कधीं।
मूठ घेऊन निरवधि । मारा करी ॥११०॥ लक्ष्मण ऐसें बोलून ।
दाविता झाला तें स्थान । पाहूनिया रघुनंदन । आनंदला ॥१११॥
रमला तेथें रघुनाथ । जाणून देव समस्त । पुढें करून इंद्राप्रत ।
निघते झाले ॥११२॥ कोळी-पारध्यांचा वेष । घेऊन आले
दिवौकस । तृणपर्णशाला विशेष । उभारिती ॥११३॥ पर्णकुटी
सुंदर दोन । करवें न त्यांचें वर्णन । एक विस्तीर्ण, दुजी सान ।
मनोहर ॥११४॥ त्या सुंदर पर्णशालेंत । सीता-लक्ष्मणांसहित ।
वास करितां रघुनाथ । शोभे कसा- ॥११५॥ घेऊन मुनिवेषा-
प्रत । समागमें रति-वसंत । जणुं मदन आश्रमांत । शोभ-
तसे ॥११६॥ अमर, नाग, किन्नर । अष्ट दिक्पाल समग्र ।
तेव्हां त्या चित्रकूटावर । येते झाले ॥११७॥ त्या सर्वां-
प्रति श्रीराम । करिता झाला प्रणाम । नेत्रसाफल्यें देव परम ।
आनंदले ॥११८॥ करून पुष्पवर्षाव । म्हणती तेधवां देव ।
"प्रभो ! आज आम्ही सर्व । कृतार्थ झालों" ॥११९॥ आपुलें
दुःसह दुःख । सांगून नम्रतापूर्वक । निजलोकीं सकलिक । परत
गेले ॥१२०॥ चित्रकूट पर्वतावरी । श्रीराम वास्तव्य करी ।
ऐकतां पातली सारी । मुनिमंडळी ॥१२१॥ येतांचि मुनिवृंदा-
प्रत । पाहूनिया रघुनाथ । आनंदानें दंडवत । घालीतसे ॥१२२॥
रामचंद्राप्रति मुनि । हृदयाशीं आलिंगुनी । सफल व्हाया निज
वाणी । आशीस देती ॥१२३॥ श्रीराम-लक्ष्मण-सीता । यांची
शोभा विलोकितां । सर्व साधन-सफलता । मानिती ते ॥१२४॥
त्या सर्वंहि मुनींप्रत । संमानून यथोचित । निरोप देई रघुनाथ।

अत्यादरें ॥१२५॥ निजाश्रमीं जाऊन मग । जप-तप-योग-याग । करिती ते सानुराग । स्वच्छंदानें ॥१२६॥ वनींचे कोळी पारधी । ऐकतां मग्न आनंदीं । जणुं चालून नवनिधि । घरीं आले ॥१२७॥ कंदमूलफलादिक । भरून द्रोण अनेक । जाती लुटाया जणुं रंक । सुवर्णातें ॥१२८॥ त्यांतून उभय भ्राते । ज्यांनीं पाहिले होते । जातां पथीं, इतर त्यांतें । विचारिती ॥१२९॥ रामचंद्राचें सौंदर्य । वर्णीत, ऐकत समुदाय । येऊनिया बंधुद्वय । विलोकिती ॥१३०॥ सर्वहि दंडवत करिती । ठेवून भेट पुढती । अतिप्रेमें विलोकिती । प्रभुलागीं ॥१३१॥ जणुं रेखिलें चित्रांत । जेथल्या तेथें तटस्थ । शरीर तें रोमांचित । अश्रु नेत्रीं ॥१३२॥ प्रेममग्न सर्वांप्रति । जाणूनिया रघुपति । गौरवी बोलून उक्ति । प्रेमळपणें ॥१३३॥ श्रीरामातें पुनःपुन्हां । करूनिया अभिवंदना । कर जोडून नम्र वचना । बोलती ते– ॥१३४॥ "आतां आम्ही सर्वजण । सनाथ जाहलों पूर्ण । प्रभो! आपुले चरण । अवलोकितां ॥१३५॥ महाराज कोसलेश्वर ! । आमुचें भाग्यचि थोर । झालें आपुलें येथवर । आगमन ॥१३६॥ धन्य भूमि, धन्य पथ । धन्य वन, धन्य पर्वत । हे नाथ! लागले जेथ । पद आपुले ॥१३७॥ पशु-पक्षी या वनींचे । खरेच म्हणावें भाग्याचे । तुमच्या दर्शनें त्यांचे । जन्म सफल ॥१३८॥ आम्ही परिवारांसहित । जाहलों धन्य समस्त । डोळे भरून तुम्हांप्रत । अवलोकिलें ॥१३९॥ निवडूनिया योग्य स्थला । तुम्ही येथें वास केला । जो सर्व ऋतूंतहि भला । होय येथें ॥१४०॥ आम्ही सर्वतोपरीं । करूं आपुली चाकरी । सर्प, व्याघ्र, करि, केसरी । वगळूनिया ॥१४१॥ फिरं झाडी कितीतरी । पर्वत आणि

दरीखोरीं । हीं तों पायाखालची सारी । भूमि येथ ॥१४२॥ जेथें तेथें आपणांस । घेऊन जाऊं मृगयेस । दावूं सुंदर स्थलांस । सर–निर्झरहि ॥१४३॥ आम्ही परिवारांसहित । सेवक आहों समस्त । संकोच न धरा किंचित् । आज्ञापितां" ॥१४४॥ वेद जयाचें भाषित । अगम्य मुनिमनाप्रत । दयेचा भांडार मूर्त । रघुनाथ जो– ॥१४५॥ तो तीं किरातवचनें । ऐकून घेई प्रेमानें । जशी बालोक्ति कौतुकानें । ऐके पिता ॥१४६॥ श्रीरामातें भाबडें । केवळ प्रेमचि आवडे । तत्त्व जाणावें हें उघडें । जाणत्यानें ॥१४७॥ ते समयीं रघुनंदनें । प्रेमळ मधुर भाषणें । त्या वन्य जनांकारणें । तोषविलें ॥१४८॥ निरोप देतां त्यांप्रत । निघाले करून दंडवत । गुण वर्णीत, ऐकत । पातले गृहीं ॥१४९॥ यापरीं सीतेसहित । लक्ष्मण आणि रघुनाथ । सुखद देव-मुनिप्रत । वसती वनीं ॥१५०॥ रघुनायक त्या वनीं । वास करी जैं येउनी । मंगलप्रद तैंपासुनी । झालें वन ॥१५१॥ नानाविध वृक्ष-लता । पुष्प–फलें सुमंडिता । सुंदर वेली सभोंवतां । मंडपाकार ॥१५२॥ कल्पवृक्षांच्या समान । सहज सुंदर तरुगण । सोडूनिया । नंदनवन । पातले जणुं ॥१५३॥ भ्रमरांचे नाना थवे । गुंजती अति मंजुरवें । सुखद वाहे त्यासवें । त्रिविध वायु ॥१५४॥ नीलकंठ आणि शुक । कोकिल आणि चातक । तेंवि चकोर, चक्रवाक । अनेकविध– ॥१५५॥ पक्षीगण नानापरीं । मनोहर शब्द करी । पडतांचि कर्णरंध्रीं । सुखदायक ॥१५६॥ कपि, केसरी, वारण । वराह आणि हरिण । एकत्र निर्वैर होऊन । संचरती ॥१५७॥ मृगयार्थ संचरतां । रामरूप विलोकितां । मृगसमूह विशेषतां । मुदित होय ॥१५८॥ जितुकीं पृथ्वीवरतीं । पवित्र अरण्यें असतीं । तीं पाहून प्रशं-

सिती । रामघना ॥१५९॥ गंगा, यमुना सरस्वती । गोदा, नर्मदा प्रभृति । पवित्र नद्या ज्या असती । भूमीवरी ॥१६०॥ त्याचपरी सरोवरें । सागर, नद्या, नद सारे । प्रसंशिती अत्यादरें । मंदाकिनीतें ॥१६१॥ लोकालोक पर्वत थोर । कैलास, मेरु, मंदार । जेथें सर्वहि सुरवर । वास करिती ॥१६२॥ हिमाचल सुविख्यात । आदिकरून पर्वत । चित्रकूटाचें समस्त । वर्णिती यश ॥१६३॥ विंध्याचलाच्या मनांत । सुख न मावें अत्यंत । थोर महत्त्व त्याप्रत । अनायासें ॥१६४॥ चित्रकूटाच्या परि-सरीं । पशुपक्षी नानापरी । वृक्ष, लता, तृणें सारीं । असतीं जीं– ॥१६५॥ धन्य धन्य तीं समस्त । असतीं बहु भाग्यवंत । म्हणती देव स्वर्गस्थ । रात्रंदिन ॥१६६॥ जे जे डोळस असती । पाहून रघुवीराप्रति । जन्मसाफल्यें होती । शोकरहित ॥१६७॥ स्थावर जे का भूलोकीं । पदरजस्पर्शें सुखी । परमपदाचे शेखीं । अधिकारी ते ॥१६८॥ तो चित्रकूट पर्वत । सहजरम्य वनप्रांत । पवित्राहून पुनीत । मंगलमय ॥१६९॥ तयाचा महिमा तरी । वर्णावा कोणत्या प्रकारीं । ज्या स्थलीं निवास करी । सुख-सागर ॥१७०॥ सोडून क्षीरसागर । टाकून अयोध्या नगर । सीता–लक्ष्मण–रघुवीर । राहिले जेथ ॥१७१॥ ती वनशोभा विशेष । न वर्णवेंचि निःशेष । जरी वर्णितील शेष । शत-सहस्र ॥१७२॥ ती मी वर्णू कैसी । पल्वलींच्या कच्छपसी । काय मंदरपर्वतासी । उचलवेल ? ॥१७३॥ कायावाचामनें-करून । सेवा करीतसे लक्ष्मण । त्याचें शील–प्रेम–वर्णन । न करवेंचि ॥१७४॥ सीतारामाचे चरण । विलोकून क्षणोक्षण । त्यांची ममता जाणून । आपणांवरी– ॥१७५॥ मातापिता, बंधु सर्वन । यांची अल्पहि आठवण । करीत नसे तो लक्ष्मण ।

स्वप्नांतहि ॥१७६॥ श्रीरामाच्या संगतीं। सुखें राहे सीतासती। पुर-परिजन-गृहस्मृति । विसरूनिया ॥१७७॥ प्रियतमाचा क्षणोक्षणीं। मुखमृगांक विलोकुनी । चकोरकुमारीच मनीं। मुदित जणुं ॥१७८॥ पतिप्रीति वाढती अशी। पाहूनिया प्रति-दिवशीं। दिवसां चक्रवाकी, तशी। नांदे सुखें ॥१७९॥ सीतेचें अंतःकरण। रामचरणीं संलग्न। सहस्र अयोध्येसमान । वनचि प्रिय ॥१८०॥ प्रियतमाच्या संगतीं। पर्णकुटि प्रिय अति। खग, मृग, प्रिय वाटती। परिवारासम ॥१८१॥ मुनिपत्नी, मुनीश्वर। वाटती हे सासू-श्वशुर । कंदमूलफलें मधुर । अमृता-परीं ॥१८२॥ पतिसहवासेंकरून । तृणशय्या तिजलागून । शतकामशय्येसमान। सुखद, मृदु ॥१८३॥ कृपाकटाक्षें केवल। जी निर्मिते लोकपाल । का तिज मोहूं शकतील। विषय-विलास ? ॥१८४॥ केवळ स्मरतांचि राम । विषयविलास-संभ्रम। टाकून देतो तृणासम । मनुष्यमात्र ॥१८५॥ त्या रामाची प्रिय कांता। विश्वाची जननी सीता । तिजविषयीं हें सर्वथा। आश्चर्य नव्हें ॥१८६॥ सीता-लक्ष्मणांप्रत । जेणें होय सुख प्राप्त। करावें, बोलावें निश्चित। तेंचि रामें॥१८७॥ नाना कथा पुरातन। रामें कराव्या कथन। ऐकून सीता-लक्ष्मण। मानिती सुख ॥१८८॥ जेव्हां राघवालागून । व्हावें अयोध्येचें स्मरण। नेत्र अश्रूंनीं भरून। यावे तदा ॥१८९॥ माता-पिता आणि बांधवां। तेंवि परिजनां सर्वां । भरत-प्रेमशीलसेवा। आठवुनी— ॥१९०॥ कृपासिंधु प्रभु जरी । दुःखी होय मनीं परि। कुसमय जाणून धरी। धैर्य तदा ॥१९१॥ पाहून सीता-लक्ष्मण। जाती व्याकुल होऊन। अनुसरे पुरुषालागून । छाया जशी॥१९२॥ त्या उभयतांची स्थिति । अवलोकून रघुपति।

धैर्यवंत कृपामूर्ति । भक्तहृच्चंदन– ॥१९३॥ त्या समयीं अति पावना । कथन करी कथा नाना । ऐकतां सीतालक्ष्मणा । सौख्य लाभे ॥१९४॥ सीता–लक्ष्मणांसमवेत । तया पर्णकुटिकेंत । शोभे तैं अयोध्यानाथ । रामचंद्र ॥१९५॥ सहस्रनयन ज्यापरीं । शची जयंताबरोबरी । आपुल्या अमरपुरीं । शोभतसे ॥१९६॥ सीतालक्ष्मणांलागुनी । जपतसे चापपाणि । नेत्रगोलका पापणी । जैशापरीं ॥१९७॥ रामाची शुश्रूशा निकी । करिती लक्ष्मण–जानकी । जैसा पुरुष अविवेकी[1] । शरीराची ॥१९८॥ श्रीरघुनायक ऐसा । सुखें वनीं करी निवासा । खग–मृग–सुर–तापसां । हितकारक ॥१९९॥ ( सोपानींचा मार्ग भला । जरी दीर्घतम वाटला । तदर्थ सहावा योजिला । विश्राम हा ॥२००॥ रसिक भाविक श्रोत्यांस । विनवीतसे देवीदास । माझ्या बोबड्या बोलांस । मान्य करा ॥२०१॥)

---

१. विषयासक्त

# विश्राम ७ वा

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्योनमः
श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः

श्रीराम–वनगमन । केलें सविस्तर कथन । सुमंत–अयोध्याऽगमन । ऐका आतां ॥१॥ पोंचवून रामाप्रत । निषाद पातला परत । येऊन सचिवासहित । शोधी रथा ॥२॥ व्याकुल झालासे सुमंत । विलोकी निषादनाथ । दुःख तयाचें अत्यंत । न वर्णवे ॥३॥ 'हे राम, सीते, लक्ष्मण' । आक्रोशें करी आक्रंदन । लोळे व्याकुळ होऊन । धरणीतलीं ॥४॥ आणि दक्षिण दिशेप्रति । बघून अश्व खिंकाळती । पंख तुटतां आरबळती । पक्षी जसे ॥५॥ मुळीं तृण न भक्षिती । जलपानहि न करिती । सारखे अश्रु ढाळिती । नेत्रांवाटें ॥६॥ तें ते निषाद समस्त । व्याकुळ झाले अत्यंत । श्रीरामाच्या अश्वांप्रत । विलोकून ॥७॥ तें धरून धैर्य स्वतां । निषाद म्हणे, "सुमंता ! । आवरला पाहिजे आतां । विषाद हा ॥८॥ तुम्ही तों स्वयें पंडित । जाणतसां परमार्थ । जाणून दैव विपरीत । धैर्य धरा ॥९॥ अतीव कळकळ पोटांत । सांगून गोष्टी अमित । बळेंचि आणून रथांत । बसवी तया ॥१०॥ शोकें गात्रें शिथिल झालीं । रथ हांकूं शके न मुळीं । रामविरहाची हृत्कमळीं । डाची व्यथा ॥११॥ अश्वहि करिती तडफड । वाटे न लागती धड । जणुं रानहरिण द्वाड । जोडिले रथा ॥१२॥ चालतांना अडखळती । मागें वळून पाहती । रामविरहदुःखें होती । व्यथित भारी ॥१३॥ "राम–

लक्ष्मण–जानकी' । शब्द उच्चारी जो मुखीं । प्राणत्याग करी निरखी । अश्वगण त्या ॥१४॥ तयांची विरहगति । वर्णवेना कवि-प्रति । मणिविरहें ज्या रीतीं । व्याकुळ अहि ॥१५॥ ते समयीं निषादपति । जाहला दुःखित अति । सुमंताच्या अश्वांप्रति । पाहूनिया ॥१६॥ वाहून चार सेवक । चतुर सारथी एक । देतसे तो आवश्यक । सचिवासवें ॥१७॥ सारथ्यातें पोंचवून । गुह आलासे परतून । तद्विरह दुःख-वर्णन । न करवेंचि ॥१८॥ निषाद-सेवक, सारथी । रथ अयोध्येस नेती । परि क्षणोक्षणीं । होती । दुःखमग्न ॥१९॥ सुमंत शोकेंकरून । जाहलासे दुःखी दीन । म्हणे, "हे धिक् धिक् जीवन । रामाविणें ॥२०॥ अधम शरीरा! भूवरी । टिकसी न शेवटवरी । यश न मिळविसी परि । राम-विरहें ॥२१॥ माझे प्राण हो! होउनी । पापापयशाचे धनी । किमर्थ या देहांतुनी । गेलां नाहीं? ॥२२॥ हाय हाय मना! मूर्खा! । समय घालविला फुका । हृदया! अजुनी न कां । दुभंगसी?" ॥२३॥ सुमंत तो चोळी हात । भाळ पिटी पश्चात्तप्त । मुकला धनराशीप्रत । कृपण जणुं ॥२४॥ ओठें बांधून अचाट । म्हणवून महाभट । काढी जणुं पळवाट । समरांतुनी ॥२५॥ वेदवेत्ता ब्राह्मण । विवेकी आणि कुलीन । सच्छील साधु सज्जन । प्रतिष्ठित– ॥२६॥ चुकून तयालागून । घडतां जसें मद्यपान । तैसा सुमंत प्रधान । शोक करी ॥२७॥ जेंवि कुलीन पतिव्रता । मानी पतीस देवता । सेवा करीत असतां । तनुवाङ्मनें– ॥२८॥ प्रारब्धाची फिरतां गति । राहतां त्यागून स्वपति । दारुण वाहे तैसी स्थिति । सुमंत-मनीं ॥२९॥ नेत्रांतून अश्रुसेक । दृष्टि जाहली अंधुक । कर्ण न ऐकती, निःशंक । भ्रंशली मति ॥३०॥ वाळून गेले अधर ।

जीभ ओढ घे भीतर । जीव न जाई बाहेर । देहांतुनी ॥३१॥ ववदा वर्षांचा अवसर । तेंचि कपाट दृढतर । तेणें रुद्ध हृदय-द्वार । म्हणूनिया ॥३२॥ कळाहीनता ये वदना । त्याजकडे पाहवेना । जणुं मातृ-पितृहनना । केलें तयें ॥३३॥ हानि, ग्लानि अतिशय । तेणें व्यापिलेंसे हृदय । नरकपंथीं दुःखी होय । पापी जसा ॥३४॥ शब्द न निघे मुखांतून । पश्चात्ताप करी मन । "काय पाहूं मी जाऊन । अयोध्येंत? ॥३५॥ राम-विरहित हा रथ । येईल ज्याच्या पाहण्यांत । तो तो होऊन साशंकित । बघेल मज ॥३६॥ व्याकुल होऊन अंतरीं । नगरींचे नर, नारी । करितील ज्या अवसरीं । प्रश्न मज– ॥३७॥ तेव्हां सर्वां खरोखर । द्यावें लागेल उत्तर । हृदय करून कठोर । वज्रापरी ॥३८॥ दुःखें पावून दीनता । पुसतील सर्व माता । काय सांगूं त्यांस आतां । विधात्या रे! ॥३९॥ सुमित्रा लक्ष्मण-माता । येऊन मज विचारितां । तैं काय आनंद-वार्ता । सांगूं तिज? ॥४०॥ कौसल्या रामजननी । जेव्हां येईल धांवुनी । व्याली धेनु आठवुनी । वत्सा जशी– ॥४१॥ तैं तिनें करितां प्रश्न । हेंचि मीं करावें कथन । कीं, 'राम–सीता–लक्ष्मण । गेले वनीं' ॥४२॥ जो जो विचारील प्रश्न । हेंचि त्या करावें कथन । हेंचि सुख आतां, जाऊन । अयोध्येंत! ॥४३॥ दुःखें दीन महाराज । जेधवां पुसतील मज । जीवन ज्यांचें सहज । राघवाधीन ॥४४॥ तोंड घेऊन कोणतें । द्यावें मीं उत्तर त्यांतें । कीं, 'पोंचवून कुमारांतें । आलों कुशल' ॥४५॥ सीता–राम–लक्ष्मण । यांचा संदेश ऐकून । भूपति तृणासमान । त्यजील देह ॥४६॥ पंकापरी माझें हृदय । विदीर्ण हें कां न होय?। शुष्क होतां प्रेमपय । तैशापरीं ॥४७॥ तरी कळली ही योजना ।

भोगावया या यातना । दैवें दिलें गमे मना । शरीर हें" ॥४८॥ सुमंत तो ऐशापरीं । पथीं चालतां दुःख करी । त्वरें तमसातीरावरी । आला रथ ॥४९॥ तेणें निषाद सकळिक । बोलून नम्रतापूर्वक । पाठवितां करीत दुःख । परतले ते ॥५०॥ नगरीं कराया प्रवेश । संकोच वाटे तयास । जणुं गोविप्रगुरूस । वधिलें तयें ॥५१॥ तरुतळवटीं बैसून । तेणें काढिला तो दिन । संध्यासमयीं त्यालागून । संधि लाभे ॥५२॥ रात्र होतां अंधारांत प्रवेशला अयोध्येंत । रथ सोडून दारांत । मंदिरीं शिरे ॥५३॥ हें वर्तमान जयांप्रत । त्या समयीं झालें श्रुत । आले ते पहावया रथ । महाद्वारीं ॥५४॥ रथ ओळखिला तत्काल । पाहिले घोडे व्याकुल । आह्यांनीं गात्रें शिथिल । जैशापरीं ॥५५॥ नर-नारी नागरिक । झाले व्याकुल सकलिक । जेविं जल होतां शुष्क । मीनगण ॥५६॥ सुमंत आलासे परत । ही वार्ता होतां श्रुत । व्याकुल होतसे समस्त । अंतःपुर ॥५७॥ तेणें ते राजमंदिर स्त्रीपरिवार समग्र । वाटूं लागे भयंकर । स्मशान जणुं ॥५८॥ राज्ञी सुमंताकारणें । पुसती काकुळतीनें । मुखें परि व्याकुलतेनें । शब्द न निघे ॥५९॥ कानीं ऐकूं न येतसे । डोळ्यांस कांहीं न दिसे । जो भेटे त्यास पुसे । 'महाराज कुठें' ॥६०॥ सचिवाच्या व्याकुलतेसी । अवलोकून तें दासी । कौसल्येच्या मंदिरासी । घेऊन जाती ॥६१॥ सुमंतें पाहतां जाऊन । कैसा दिसे अजनंदन । चंद्र जैसा कलाहीन । तयापरी ॥६२॥ आसन, शयन, अलंकार । अवघे सारूनिया दूर । पडून काळा ठिक्कर । भूतळीं लोळे ॥६३॥ दीर्घ निःश्वास टाकून । जाहलासे शोकमग्न । पतन पावे स्वर्गांतून । ययातीच जणुं ॥६४॥ दुःखभरें क्षणोक्षणीं । छाती येतसे भरूनी । पडलासे पंख गळुनी । संपाती

जणुं ॥६५॥ "हे रामा! अरे रामा!" । माझ्या जिवलग रामा! । हे सीते! लक्ष्मणा! रामा!" । पुन्हां म्हणे ॥६६॥ अवलोकून सुमंत । 'जय जीव' ऐसें म्हणत । त्या साष्टांग दंडवत । करीतसे ॥६७॥ तें ऐकतांच नृपति । म्हणे अति काकुळतीं । "रे सुमंता! रघुपति। सांग कोठें?" ॥६८॥ भूप हृदयीं तया कालां । कवटाळी सुमंताला । बुडत्यास सांपडला । आधार जणुं ॥६९॥ अति प्रेमेंकरुनी । संनिध त्या बैसवुनी । डोळे भरून अश्रूंनीं । पुसे तया— ॥७०॥ "प्रिय मित्रा! मज-लागून । रामकुशल करीं कथन । जानकी, राम, लक्ष्मण । आहेत कुठें? ॥७१॥ आणिलेंस का त्यां परत । कीं ते गेलेच वनांत" । सुमंतनेत्र अश्रुयुक्त । ऐकतां हें ॥७२॥ शोकें होय कासाविस । पुसे पुनरपि नरेश । 'त्या तिघांचा संदेश । सांग तरी' ॥७३॥ श्रीरामाचे रूपगुण । शील-स्वभाव आठवून । पोटांत येई भडभडून । दशरथाच्या ॥७४॥ "राज्य देतों म्हटलें त्यास । आणि दिधला वनवास । ऐकून न गमे मनास । हर्ष-विषाद ॥७५॥ ऐशा पुत्रवियोगेंकरून । प्राण ना गेले निघून । तरी कोण मजसमान । महापापी? ॥७६॥ अरे हे मित्रा! सुमंता! जेथें राम, लक्ष्मण, सीता । तेथें मज नेऊन आतां । पोंचवी गा! ॥७७॥ न तरी हे माझे प्राण । जाऊं पाहती निघून । सत्यचि तुजलागून । सांगतों मी" ॥७८॥ पुनःपुन्हां सुमंतास । विचारीतसे नरेश । प्रियतम पुत्र—संदेश । कळवी मज ॥७९॥ अगा मित्रा! सुमंता! । तोचि उपाय करीं आतां । जेणें राम, लक्ष्मण, सीता । पडतील दृष्टीं" ॥८०॥ सुमंत धीर धरुनी । बोलतसे मृदुवाणीं । "तुम्ही तों पंडित, ज्ञानी । महाराज! ॥८१॥ जन्ममरण—प्रसंग । सर्व सुखदुःख—भोग ।

प्रियमीलन–वियोग । लाभहानि ॥८२॥ हें तों कालकर्माधीन । स्वामिन्! नसती स्वाधीन । दिवसरात्रिसमान । अखंड हे ॥८३॥ सुख होतां आनंदती । दुःखें वाटे अति खंति । ही तों भूपा! असे रीति । अज्ञानाची ॥८४॥ परि जे का धैर्यवंत । ते या सुखदुःखाप्रत । मानिती निज मनांत । सारखेंचि ॥८५॥ योग्य विचारें धरा धीर । आवरा हा शोकभर । सर्वांचें हित तुम्हांवर । अवलंबून" ॥८६॥ (इतुकें बोलून सुमंत । सांगूं लागला वृत्तान्त । कैसे राघवें वनांत । गमन केलें ॥८७) "प्रथम दिनामाझारीं । वास केला तमसातीरीं । भागीरथीच्या तटावरी । दुसरे दिनीं ॥८८॥ गंगेचें करून स्नान । केलें केवळ जलपान । सीतेसहवर्तमान । वीरद्वयें ॥८९॥ निषादपतीनें चांगलें । त्यांचें आतिथ्य केलें । त्या रात्रीं ते राहिले । शृंगवेर पुरीं ॥९०॥ प्रभात होतां सत्वर । मागवून वटक्षीर । बांधिती स्वशिरावर । जटामुकुट ॥९१॥ निषादपतीनें तंव । मागविली एक नाव । सीतेस बसवून राघव । बसे मग ॥९२॥ सज्ज करून धनुर्बाण । घेता झाला लक्ष्मण । प्रभूची आज्ञा घेऊन । बसे स्वयें ॥९३॥ मजसी व्याकुल पाहून । तेधवां रघुनंदन । धैर्यें मधुर बचन । बोलतसे ॥९४॥ "मत्पित्यासी तुम्ही ताता! । सांगा साष्टांग प्रणिपाता । धरून पदपंकजा स्वतां । वारं-वार ॥९५॥ त्यांच्या पडूनिया पायां । वित्तयें कळवा तयां । 'चिंता करूं नका वांया । मदर्थ ताता! ॥९६॥ वनमार्गक्रमण हें। क्षेम, हितप्रद आहे । कृपें, पुण्यें अनुग्रहें । तुमच्याच ॥९७॥ तुमच्या प्रसादें ताता! । वनांतहि संचरतां । प्राप्त होतील तत्त्वतां । सर्व सुखें ॥९८॥ करून आज्ञेचें पालन । घ्यावया पदवर्शन । क्षेमरूप सर्वजण । परत येऊं' ॥९९॥ सर्व मातांचें

समाधान । करून, पायां पडून । करा माझी निवेदन । विनंति ही– ॥१००॥ 'कीं जेणें अयोध्यापति । क्षेम राहील निश्चितीं । यत्न करावा या रीतीं । सर्वांनींहि' ॥१०१॥ सद्‌गुरुपदांलागून वारंवार प्रवंदून । करा माझा निवेदन । संदेश हा– ॥१०२॥ 'कीं ऐसाचि उपदेश । करीत जावा अहर्निश । मदर्थ अयोध्याधीश । शोक न करी' ॥१०३॥ ताता ! पुरजन, परिजन । या सर्वांहि लागून । मद्विनति कृपा करून । कळवा ही– ॥१०४॥ 'तोचि माझा हितकर्ता । सर्वतोपरीं तत्त्वतां । सुख होय अयोध्यानाथा ज्याच्यामुळें' ॥१०५॥ भरत येतांचि त्यास । माझा कळवा संदेश । 'राज्यपदलाभें नीतीस । सोडूं नको ॥१०६॥ काया-वाचा–मनानें । पाळीं गा प्रजेकारणें । सेवी समभावनेनें । सर्व माता ॥१०७॥ पीठिका बंधुप्रेमाची । निभावून नेई साची । माता–पिता–सज्जनांची । सेवा करीं ॥१०८॥ बाळा ! भूपती-कारणें । वागवीं प्रकारें एणें । शोक न करील जेणें । मदर्थ कधीं' ॥१०९॥ कांहींसें कठोर वचन । मध्येंच बोलला लक्ष्मण । राम वदे निषेधून । विनयें मज ॥११०॥ शपथ घालून पुनःपुन्हां म्हणे, 'याचा बालिशपणा । ताता ! मुळीं निवेदी ना । पित्या-पाशीं' ॥१११॥ प्रणाम सांगून सीता । कांहीं बोलूं पाहे स्वतां । प्रेमें आली शिथिलता । सर्वांगासी ॥११२॥ शब्द न ये मुखांतून अश्रूंनीं भरले नयन । देह जाहला संपूर्ण । रोमांचित ॥११३॥ तितुक्याच अवधींत । जाणून राम–हृद्‌गत । गुहानें नौका त्वरित । चालविली ॥११४॥ रघुकुलतिलक यापरीं । जाऊं लागे, मी परि । वज्र ठेवून छातीवरी । पाहत उभा ॥११५॥ दुःख झालें जें स्वतांस । कैसे सांगूं मी तुम्हांस । घेऊन राम–संदेश । जिवंत आलों" ॥११६॥ इतुकें बोलला सुमंत । शब्द

न उमटे किंचित् । हानि-ग्लानि-शोकयुक्त । जाहलासे ॥११७॥ सुमंताचें तें भाषण । रायें करितां श्रवण । हृदयीं दुःख दारुण । भूवरी पडे ॥११८॥ मन झालें मोहग्रस्त । तडफडूं लागे अत्यंत । सांपडे पयःफेनांत । मीन जणुं ॥११९॥ सर्व राज्ञींनीं मिळून । आकांत मांडिला रडून । त्या महद्दुःखाचें वर्णन । करवेल कसें? ॥१२०॥ श्रवण करून तो शोक । दुःखासहि झालें दुःख । धैर्याचें धैर्य निःशंक । पळून गेलें ॥१२१॥ त्या समयीं अयोध्येंत । हाहाःकारचि अत्यंत । राजमंदिरींचा आकांत । ऐकूनिया ॥१२२॥ असंख्य पक्ष्यांच्या वनांत । ऐन रात्रीच्या समयांत । झाला जणूं वज्रपात । भयंकर ॥१२३॥ दशरथाचे पंचप्राण । कंठाशीं तेव्हां येऊन । व्याकुळ तो मणिहीन । सर्प जैसा ॥१२४॥ तयाचा इंद्रियगण । अतिशय झाला क्षीण । जणुं का कमलवन । शुष्क सरीं ॥१२५॥ म्लान भूपालागुनी । कौसल्या जाणे मनीं । रविकुल-वासरमणि । अस्ता जाय ॥१२६॥ तैं श्रीरामाची जननी । हृदयीं धैर्य धरोनी । समयास अनुसरुनी बोलतसे– ॥१२७॥ "प्राणनाथ! प्रियकर! । करा निज मनीं विचार । रामवियोग हा अपार । समुद्रचि ॥१२८॥ तुम्ही कर्णधार असून । त्यांत अयोध्या–जलयान । पथिक प्रिय वणिक्‌गण । बसले त्यांत ॥१२९॥ जरी तुम्ही धराल धीर । तरीच जाईल हें पार । ना तरी सर्व परिवार । बुडणा-रचि ॥१३०॥ प्राणनाथा! मद्विनंति । जरी तुम्ही धराल चित्तीं । राम–लक्ष्मण–सीता भेटती । तरीच पुन्हां" ॥१३१॥ प्रियेचें मृदु भाषण । भूपतीनें करितां श्रवण । उघडून दोन्ही नयन । अवलोकिलें ॥१३२॥ जणुं का मरणद्वारीं तडफडत्या मीनावरी । सिंचिलें शीतल वारि । कौसल्येनें ॥१३३॥ धीर

धरून नृपाल । उठून बसला तत्काल । म्हणे, "सुमंता ! राम कृपाल । कोठें आहे ?॥१३४॥ लक्ष्मण तो आहे कोठें ? । जिवलग राम तो कोठें ?। प्रिय पुत्र-वधु कोठें । जानकी ती ?" ॥१३५॥ व्याकुलतेनें नानापरीं । भूप तैं विलाप करी । युगासारखी ती रात्रि । सरतां न सरे ॥१३६॥ अंध तापस-शापोक्ति । तिची झाली तया स्मृति । ती सर्व कथा कौसल्येप्रति । निवेदिली ॥१३७॥ (चुकून मारितां बाण । तेणें मृत झाला श्रवण । तैं तत्पित्यानें दारुण । शाप दिला– ॥१३८॥ "हा पुत्र ! हा पुत्र ! म्हणून । पुत्रवियोगेंकरून । दशरथा ! मजसमान । मरशील तूं" ॥१३९॥) तो इतिहास वर्णितां । भूपास ये निस्तेजता । म्हणे, "रामरहित जीविता । धिक्कार असो ! ॥१४०॥ हा देह तरी ठेवून । काय कर्तव्य मजलागून । जेणें माझा प्रेम-पण । निभावला ना ॥१४१। हे प्राणप्रिय रघुनंदन ! । जगूनहि तुझ्याविण । लोटले कीं बहुत दिन । आजवरी ॥१४२॥ हे सीते ! हे लक्ष्मणा ! । पितृहितकर्त्या रघुनंदना ! । हे चित्र-चातक-घना ! । रामचंद्रा" ॥ १४३ ॥ यापरीं 'हे राम ! राम ! । हे राम ! हे राम ! राम !' । म्हणून पुन्हां 'राम.... राम ! । राम...राम !' ॥१४४॥ श्रीरामाच्या विरहांत । टाकून देहाप्रत । स्वर्गलोका दशरथ । जाता झाला ॥१४५॥ (सोपानींचा मार्ग भला । जरी दीर्घतम वाटला । तदर्थ सातवा योजिला । विश्राम हा ॥१४६॥ रसिक भाविक श्रोत्यांस । विनवीतसे देवीदास । माझ्या बोबड्या बोलांस । मान्य करा ॥१४७॥)

---

## विश्राम ८ वा

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्योनमः
श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः

जनन–मरणाचें फळ । दशरथा लाभे केवळ । अनेक ब्रह्मांडीं उज्ज्वल । भरलें यश ॥१॥ राममुखचंद्रालागुनी । पाहिलें जिवंतपणीं । मरण घेतलें साधुनी । तद्वियोगें ॥२॥ शोकें होऊन व्याकुल । आक्रोशती राज्ञी सकल । रूप–गुण–शील–बल । वाखाणुनी ॥३॥ नानाप्रकारेंकरून । करूं लागतां क्रंदन । भूतलीं घेती लोळण । वारंवार ॥४॥ दासदासीहि मिळती । विकल होऊन रडती । नागरिक आक्रंदती । घरोघरीं ॥५॥ सूर्यकुलाचा गभस्ति । आज पावे अस्ताप्रति । धर्मसीमा, जो वसती । रूप–गुणांची ॥६॥ सर्वहि कैकेयीप्रति । नरनारी शिव्या देती । जिनें केले विश्वाप्रति । नेत्रहीन ॥७॥ ऐसा विलाप करितां । रात्र लोटून उजाडतां । ज्ञानी, महामुनि स्वतां । सर्व आले ॥८॥ तेव्हां वसिष्ठ मुनींनीं । समयास अनुसरुनी । अनेक इतिहासालागुनी । कथन केलें ॥९॥ स्वानुभवाचें जें ज्ञान । त्याच्या प्रकाशेंकरून । केलें शोकनिवारण । सर्वांचेंहि ॥१०॥ तैल भरून नौकेंत । ठेविलें भूपाचें प्रेत । मग बाहून दूतांप्रत । सांगती ते– ॥११॥ "भरताकडे लवलाहीं । धांवत जा, कुणासहि । भूपाविषयीं काहीं । कळवूं नका ॥१२॥ भरताप्रति जाऊन । एवढेंच करा कथन । 'गुरूंनीं उभयतांलागून । बोलविलें'" ॥१३॥ ऐकून मुनींचें उक्त । धांवतचि

निघाले दूत । लाजवी चपलाश्वांप्रत । गति त्यांची ॥१४॥
जैंपासून अयोध्येंत । आरंभलासे अनर्थ । अपशकुन भरताप्रत ।
तैंपासुनी ॥१५॥ रात्रीं स्वप्नें भयंकर । पडूं लागलीं वरचेवर ।
येती वाईट विचार । जागे होतां ॥१६॥ तन्निमित्त भरतानें ।
घालावीं विप्रभोजनें। शिवाभिषेकीं द्यावीं दानें। नानापरीं ॥१७॥
निजमनीं महेशातें । हेंचि मागावें निरुतें । 'बंधुपितरपरिवारातें।
क्षेम असो' ॥१८॥ यापरीं चिंताग्रस्त । असतां भरताचें चित्त ।
येऊन पोंचले दूत । धांवतचि ॥१९॥ गुरूचें अनुशासन । तन्मुखें
करितां श्रवण । सिद्धिविनायका स्मरून । भरत निघे ॥२०॥
वायुवेगें भरधांव । हांकीत रथाचे अश्व । सरिता, शैल, वन-
सर्व । लंघिले बिकट ॥२१॥ तळमळ लागली हृदयीं । तयास
सुचेना कांहीं । त्वरें जावें उडूनीहि । ऐसें वाटे ॥२२॥ एकेक
लोटतां निमिष । वाटे तें लोटलें वर्ष । यापरीं नगरवेस । भरत
गांठी ॥२३॥ पुरीं प्रवेशतां त्याप्रति । नाना अपशकुन होती ।
अमंगल शब्द करिती । कृष्ण काक ॥२४॥ ओरडती शृगाल,
खर । प्रतिकूल वरचेवर । ऐकतां भरताचें अंतर । भीति-
ग्रस्त ॥२५॥ वनोपवनें सरित्सर । निस्तेज दृष्टिगोचर । भयाण
अयोध्या तर । विशेषचि ॥२६॥ अश्व, गज, हरिण, हस्ति । हे
दृष्टीं न पाहवती । रामवियोग-रोगें दिसती । मृतप्राय ॥२७॥
नगर-नरनारी सर्व । उदास दिसती अतीव । जणुं सर्वांनीं
सर्वस्व । गमाविलें ॥२८॥ नगरलोक त्या भेटती । परि शब्द न
बोलती । मुजरे करून जाती । तसेंच पुढें ॥२९॥ कुशलतेच्या
वृत्तान्त । पुसूं न शके भरत । भय-विषादें तच्चित्त । व्याप्त
झालें ॥३०॥ राजमार्ग, हाट, कांहीं । दृष्टीं न पाहवतीं हीं ।
पेटली दिशांनीं दाहीं । अयोध्या जणुं ॥३१॥ पुन्न पातला

लाडका । ऐकतां कैकय–कन्यका । रविकुलकमलचंद्रिका । हृष्ट झाली ॥३२॥ आरतीची सिद्धता करी । उठून धांवेमोदभरीं । द्वारींच भेटून, मंदिरीं । घेऊन आली ॥३३॥ पाहून परिवार स्वकीय । दुःखित भरत–हृदय । जणुं पद्मवन मृतप्राय । हिमाघातें ॥३४॥ परि कैकय–नंदिनी । अति आनंदित स्वमनीं । वणवा पेटतां भिल्लिणी । मुदित जणुं ॥३५॥ विमनस्क आणि दुःखित । विलोकून भरताप्रत । पुशिलें तिनें कुशल वृत्त । माहेरचें ॥३६॥ तिकडील कुशल वृत्त । निवेदून तदा भरत । क्षेम समाचार पुसत । निज कुलाचा ॥३७॥ म्हणे, "कोठें सांग पिता । कोठें असती सर्व माता । राम, लक्ष्मण प्रिय भ्राता । सीता कुठें?" ॥३८॥ पुत्राचें प्रेमळ भाषण । यापरीं करून श्रवण । आणी ती डोळे भरून । आसवांनीं ॥३९॥ भरताच्या श्रवणमना । शूलतुल्य दे ती वेदना । बोलूं लागली वचना । पापिणी ती– ॥४०॥ "बाळा! योजना मनांतली । सर्व होती मी जुळविली । बिचारी मंथरा झाली । साह्यभूत ॥४१॥ नशिबानें मध्यंतरीं । कांहीं घात केला परि । गमन केलें स्वर्गपुरीं । महाराजांनीं" ॥४२॥ तें ऐकतांचि भरत । झाला भयविषादयुक्त । जणुं हस्ति गर्भगळित । सिंहनादें ॥४३॥ 'हे तात! हे तात' या परीं । सारखा आक्रोश करी । अतिव्याकुलतेनें भूवरी । लोळतसे ॥४४॥ "एक वार जातां जातां । दर्शन न घडलें ताता!। निरवून रामाच्या हाता । गेलां न मज" ॥४५॥ पुन्हां तो धीर धरून। उठे, म्हणे सांवरून। "पितृमरणाचें कारण। सांग माते!" ॥४६॥ ऐकून पुत्राचा प्रश्न । कैकेयी वदे वचन । जणुं व्रणातें धुऊन । भरी विष ॥४७॥ क्रूर, कुटिल ती जननी । सर्वंहि आरंभापासुनी । आनंदें आपुली करणी । वर्णीतसे ॥४८॥

तेधवां भरत आपण । विसरे पित्याचें मरण । श्रीरामाचें वन-प्रयाण । ऐकतांचि ।।४९।। स्वयेंचि केवळ कारण । ऐसें अंतरीं जाणून । स्तब्ध उभा धरून मौन । आश्चर्यानें ।।५०।। व्याकुल पाहून पुत्राप्रति । कैकेयी समजावी ती । जणुं दग्ध व्रणावरती । मीठ घाली ।।५१।। "बाळा! तुज भूपाकारणें । उचित ना शोक करणें । भोगासह मिळविलें तेणें । यशःसुकृत ।।५२।। जगून जन्माचें सार्थक । मिळविलें निश्चयात्मक । साध्य केला स्वर्गलोक । अंतकाळीं ।।५३।। ऐसा करून विचार । करीं शोक-परिहार । चालवीं राज्य सपरिवार । अयोध्येचें" ।।५४।। हें ऐकतांच भरत । तळमळूं लागे अत्यंत । पिकल्या गळवास कोलीत । लागलें जणुं ।।५५।। धैर्य धरून मनांत । म्हणे, टाकून निश्वासाप्रत । "केला सर्वस्वीं कुलघात । पापिणीं त्वां!" ।।५६।। दुष्ट वासना ऐसी । जरी होती त्वन्मानसीं । तरी जन्मतांच कां मजसी । मारिलें ना ।।५७।। घाव घालून मूळावर । प्राक्लबी सिंचिली वर । मत्स्य जगवाया नीर । उपसिलें तूं ।।५८।। सूर्याचा सोज्ज्वल वंश । पिता दशरथापरिस । रामलक्ष्मणासम निर्दोष । लाभले भ्राते ।।५९।। परि जन्मदात्री आई । तुज-समान मिळे पाहीं । तोड नसेचि कांहीं । नशीबास ।।६०।। अगे कुमति! असलें । कपट तुझ्या मनीं आलें । तेव्हांचि कां न भंगलें । हृदय तुझें! ।।६१।। वर मागतां मनांत । कैसी न वाटली खंत । किडे न पडले मुखांत । झडून जीभ! ।।६२।। कैशापरीं महिपति । विश्वासला तुजवरती । मृत्यु समीप म्हणून मति । हरिली दैवें ।।६३।। प्रत्यक्ष धात्यालागुनी । स्त्री-हृदय न यें कळुनी । कपट-पाप-दुर्गुण-खनि । असती पूर्ण ।।६४।। धर्मपरायण प्रांजल । भूपति केवळ सुशील । नारीस्वभाव

जाणील । कैशापरीं ? ॥६५॥ जीवजंतु असा कोण । जगीं जाहला निर्माण । ज्या रघुनाथ प्राण– । प्रिय नाहीं ? ॥६६॥ तो श्रीराम रघुनंदन । गमलासे रिपुसमान । तरी तूंच आहेस कोण । सांग खरें ? ॥६७॥ तूं असशील ती ऐस । माझ्या दृष्टि-आड बैस । तोंड काळें करीं, नकोस । माझ्यापुढें ! ॥६८॥ रामाची दावेदारीण । अशा तुझ्या कुशींतून । केलेंसे मज निर्माण । विधात्यानें ॥६९॥ पातकी मजसमान । दुजा तरी असे कोण ? । व्यर्थंचि केलें भाषण । तुजसी मीं" ॥७०॥ मातृकौटिल्य पाहून । संतप्त झाला शत्रुघ्न । क्रोधें गात्रें दग्धमान् । उपाय नसे ॥७१॥ मंथराहि त्या अवसरीं । येती जाहली समोरीं । वस्त्रभूषणें नानापरीं । नटूनिया ॥७२॥ पाहतां, लक्ष्मणानुज । संतप्त जाहला सहज । वाढत्या अग्नींत आज्य । पडे जणुं ॥७३॥ तैं शत्रुघ्नें क्रोधयुक्त । कुबडावरी मारितां लाथ । तोंडघशी ती आक्रंदत । भूवरी पडे ॥७४॥ तिचें कुबड तें तुटलें । कपाळहि भग्न झालें । दांत पडले, रक्त आलें । तोंडांतुनी ॥७५॥ म्हणे, "दैवा ! काय झालें ?। काय मीं घोडें मारिलें ? । बरें करितां मिळालें । फळ ऐसें" ॥७६॥ शत्रुघ्न तदुक्ति ऐकून । पूर्ण कपटी जाणून । फरफरां झिंज्या धरून । ओढी तिज ॥७७॥ दयाळु भरतें तंव । सोडविलें सकणव । गेले उभयतां बांधव । कौसल्येकडें ॥७८॥ नेसली मलिन वस्त्र । निस्तेज, अति जर्जर । कृश जाहलें शरीर । दुःखभरें ॥७९॥ सुवर्णाची कल्पलता । तुहिनाघातें अवचिता । पावलीसे दुरवस्था । जणुं काय ? ॥८०॥ अवलोकितांच भरता । उठून धांवली माता । घेरी येऊन मूर्छिता । भूवरी पडे ॥८१॥ भरत तें अवलोकून । अतिशय घाबरून । देहभान विसरून । पायीं

पडे ॥८२॥ म्हणे, "कोठें असे तात ! । दाखीव सीता मजप्रत । कोठें लक्ष्मण-रघुनाथ । बंधु दोघे ? ॥८३॥ कैकेयी या भूतलीं । कशास्तव जन्मा आली । जन्मूनिया कां न झाली । वांझ तरी ? ॥८४॥ मजसम कुलकलंकास । जिनें घातलें जन्मास । अपेशी प्रिय जनांस । द्वेषावया ॥८५॥ मजसमान दैवहत । कोण माते ! त्रिभुवनांत । ज्याकारणें तुझी गत । झाली अशी ? ॥८६॥ स्वर्गलोकीं गेला पिता । वनवास रघुनाथा । मीच कारण सर्वथा । अनर्थासी ॥८७॥ वेणुवना जो कृशान । दुःसह दुःखदाह दूषण- । पात्र जो, त्या मजलागून । धिःकार असो !" ॥८८॥ भरताचें दीन वचन । यापरीं श्रवण करून । कौसल्या ती सांवरून । उठती झाली ॥८९॥ उचलून घेई तयातें । कवटाळी हृदयातें । दुःखाश्रुधार वाहते । लोचनां-तुनी ॥९०॥ सरळ स्वभावें जननी । आलिंगितां त्यालागुनी । मुदित जणुं परतुनी । राम आला ! ॥९१॥ मग कौसल्येलागून । भेटतसे तो शत्रुघ्न । दुःख, प्रेम, समावें न । हृदयांतरीं ॥९२॥ तिचा स्वभाव पाहून । म्हणती तैं सर्वजण । "कां अशी अस-णार न । राम-माता" ? ॥९३॥ माता भरतालागून । निज ओसंगीं घेऊन । अश्रु पुसून मृदुवचन । बोलतसे- ॥९४॥ "आज बाळा ! तुजप्रति । धरिली पाहिजे धृति । प्रसंग हा कठिण अति । आवरी शोक ॥९५॥ हुरहूर अथवा हानि । मानूं नकोस तूं मनीं । काल-कर्मगति जाणुनी । अघटित ही ॥९६॥ आतां कुणासहि दोष । बाळा ! तूं देऊं नकोस । मजवरी कोपला ईश । सर्वतोपरीं ॥९७॥ इतुकें दुःख ओढवलें । तरीहि मजला जीव-विलें । अजून काय योजिलें । कोण जाणे ? ॥९८॥ पित्याच्या आज्ञेनुसार । बाळा ! भरता ! रघुवीर । सकल वस्त्रालंकार ।

त्यजितां झाला ॥९९॥ हर्षविषाद तो कांहीं । न मानितां स्वहृदयीं । परिधान करी त्या समयीं । वल्कलांबर ॥१००॥ प्रसन्नता मुखावरी । राग–द्वेष न अंतरीं सर्वांचें समाधान करी। सर्वतोपरीं ॥१०१॥ वनगमन ऐकतां । श्रीरामपदानुरक्ता । सवेंचि निघाली सीता । राहे न ती ॥१०२॥ तें ऐकतांचि लक्ष्मण । सवें निघाला उठून । राघवें करितांहि यत्न । राहीच ना ॥१०३॥ तेधवां तो रघुपति । करून सर्वांसी प्रणति । सीता–लक्ष्मणा संगतीं । घेऊन निघे ॥१०४॥ सीता–लक्ष्मण–रघुनाथ । गेले असतां वनांत । मी न गेलें, त्यांसहित । धाडिले न प्राण ।१०५॥ माझ्याच डोळ्यांदेखत । घडत होतें हें समस्त । सोडिलें न प्राणाप्रत । अभागी जीवें ॥१०६॥ माझी प्रीति पाहुनी । लाज न वाटे मज मनीं । रामासम पुत्र, जननी । मज-सारखी ॥१०७॥ जगणें आणि मरणें । उत्कृष्ट जाणिलें भूपानें। परि शतवज्रांप्रमाणें । हृदय माझें" ॥१०८॥ यापरी कौसल्या-वचन । तेधवां करून श्रवण । भरतासहित स्त्रीगण । अंतः-पुरीं– ॥१०९॥ व्याकुल होऊन मनांत । विलाप करी अत्यंत । शोकगृह मूर्तिमंत । राजमंदिर ॥११०॥ भरत-शत्रुघ्न उभयतां। दुःखानें शोक करितां । हृदयीं कौसल्या माता । धरी तयां ॥१११॥ नानाप्रकारेंकरून । समजावी भरतालागून । परोपरीं गोष्टी सांगून । विवेकाच्या ॥११२॥ तेव्हां सकलहि माता । समजा-विती त्या भरता । सुंदर पुराणवेद–कथा । सांगूनिया ॥११३॥ सरल कापटचरहित । शुद्ध प्रांजल अत्यंत । कर जोडून तैं भरत। बोलतसे ॥११४॥ "जें पाप माता–पिता– । गुरूची हत्या करितां । गोष्ठ, गांवें जाळितां । ब्राह्मणांचीं; ॥११५॥ जें पाप कलत्र–सुता । मृत्यूच्या मुखीं लोटितां । राजा, मित्र यांतें

करितां । विषप्रयोग; ॥११६॥ ऐशीं जीं पापें असतीं । उपपातकें असंख्य तीं । कायावाचामनें घडतीं । वर्णिती कवि; ॥११७॥ धात्या! तीं पातकें सारीं । पडोत माझ्या शिरावरी । संमत मी असेन जरी । कृत्यांस या ॥११८॥ हरिहरांच्या चरणां । सोडून उलट नाना । साध्य कराया भूतगणा । सेविती जे, ११९॥ त्यांची जी का दुर्गति । तीच प्राप्त हो मजप्रति । जरी माझी संमति । मातृमता! ॥१२०॥ वेदविक्रय नित करिती । धर्ममिषें स्वार्थ साधिती । परांचें पाप प्रगटिती । दुष्ट जे का; ॥१२१॥ कपटी, कुटिल अत्यंत । कलहप्रिय, क्रोधवंत । वेदनिंदक, विश्वाप्रत । द्वेषिती जे; ॥१२२॥ लोभ जयाचे अंतरीं । लंपट, स्वार्थांध भारी । परधन–परस्त्रीवरी । दृष्टि ज्यांची; ॥१२३॥ तयांची दुर्धर गति । प्राप्त होवो मजप्रति । मातृमता माझी संमति । असेल जरी! ॥१२४॥ साधुसंतांच्या संगीं । प्रेम न ज्या अंतरंगीं । परमार्थासी अभागी । विन्मुख जे; ॥१२५॥ नरदेहास येऊन । भजती न हरिलागून । हरिहरांचा गुणगण । ज्यां न रुचे; ॥१२६॥ सोडून वेदमार्गाप्रति । आडमार्गें जे चालती । वेषें जगा वंचिती । दांभिक जे; ॥१२७॥ त्यांची जी का दुर्गति । शिव देवो मजहि ती । जाणत असेन मातृ–कृति । अल्पहि जरी!" ॥१२८॥ भरताचें तें भाषण । यापरीं करून श्रवण । सरळ आणि सत्यपूर्ण । स्वाभाविक– ॥१२९॥ कौसल्या म्हणे, "ताता! । कायावाचामनें तत्त्वतां । प्रिय अससी रघुनाथा! । सदाहि तूं ॥१३०॥ प्राणांचाहि असे प्राण । राम वाटे तुजलागून । तूंहि प्रिय प्राणाहून । राघवाप्रति ॥१३१॥ चंद्र वर्षेल विखार । हिमांतून ये वैश्वानर । जलचर करितील वैर । पाण्याशींहि; ॥१३२॥ ज्ञान

होऊन निश्चल । संशय भ्रम उरेल । राघवासी प्रतिकूल । तूं न होसी ॥१३३॥ तुझी यांत असे फूस । जगीं वाटेल हें ज्यास । सुख, सद्‌गति न त्यास । स्वप्नांतहि" ॥१३४॥ इतुकें बोलून माता । हृदयीं कवटाळी भरता । स्तनीं दुग्ध-धारा स्रवतां । अश्रु नेत्रीं ॥१३५॥ ऐशा प्रकारें अत्यंत । असतां ते शोक करीत । बसल्या बसल्या सारी रात । लोटलीसे ॥१३६॥ वसिष्ठ, वामदेव मुनि । आले मग तया स्थानीं । सचिव-महाजनां त्यांनीं । पाचारिलें ॥१३७॥ मुनिवर्यांनीं भरतास । बहुपरीं केला उपदेश । अनुसरून परमार्थास । समयोचित ॥१३८॥ म्हणती, "हे तात भरत! । धीर धरून मनांत । आजच्या प्रसंगीं उचित । तेंचि करीं" ॥१३९॥ ऐकतां गुर्वाज्ञेप्रत । भरत उठलासे त्वरित । सर्व कार्यास्तव उद्यत । जाहलासे ॥१४०॥ भूपाच्या देहालागून । विध्युक्त घातलें स्नान । सिद्ध केलें तैं विमान । अति सुंदर ॥१४१॥ सादर धरून चरणां । भरतें करून प्रार्थना । आपल्या सर्व मातांना । राहविलें ॥१४२॥ ( दशरथाचे संगतीं । जाऊं लागतां त्या सती । जाऊं न दिलें त्यांप्रति । भरतानें ॥१४३॥ राखाया भरत-मानसा । सती न गेल्या सहसा । राम-दर्शन-लालसा । धरूनिया ॥१४४॥) चंदनागरु इत्यादिक । नानापरी सौगंधिक । आणविलासे अनेक । द्रव्यभार ॥१४५॥ शरयुनदी-तटाकीं । चिता रचिलीसे निकी । जणुं जावया स्वर्गलोकीं । शिडीच ती ॥१४६॥ ऐशाप्रकारें त्या कालीं । दहनक्रिया आटोपिली । दिल्या स्नापून तिलांजलि । विधियुक्त ॥१४७॥ वेद-स्मृतिपुराणें । यांच्या संमतिप्रमाणें । आटोपिला भरतानें । दशगात्रविधि ॥१४८॥ जैशी जैशी जया स्थानीं । आज्ञा केली मुनींद्रांनीं । तैसें तेथें सहस्रपटींनीं । भरतें

केलें ॥१४९॥ भरत जाहलासे शुद्ध । दानें देऊन नानाविध । अश्व, गज, धेनु, विविध । वाहनादिक ॥१५०॥ अति सुंदर सिंहासन । तैसेंचि वस्त्रभूषण । गृह, भूमी आणि धन । अन्ना-सह ॥१५१॥ भरतें केलें समर्पण । तें घेऊन ब्राह्मण । तृप्त झाले परिपूर्ण । निजांतरीं ॥१५२॥ पित्याच्या सद्गतिकारणें । जें जें केलें भरतानें । तें तें लक्षमुखीं वर्णणें । शक्य नाहीं ॥१५३॥ (सोपानींचा मार्ग भला । जरी दीर्घतम वाटला । तदर्थ आठवा योजिला । विश्राम हा ॥१५४॥ रसिक भाविक श्रोत्यांस । विनवीतसे देवीदास । माझ्या बोबड्या बोलांस । मान्य करा ॥१५५॥)

---

## विश्राम ९ वा

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्योनमः
श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः

मग सुमुहूर्त पाहुनी । पातले वसिष्ठ मुनि । सचिव-महाजनां त्यांनीं । पाचारिलें ॥१॥ राजसभेंत सर्वजण । बसते झाले जाऊन । भरत-शत्रुघ्नां पाचारण । धाडिलें मग ॥२॥ वसिष्ठें भरताप्रति । बसवुनी निकटवर्ती । नीति–धर्मयुक्त बोलती । तेधवां ते ॥३॥ प्रथमतां मुनिवर्यांनीं । कथा कथिली वर्णुनी । केली जी कुटिल करणी । कैकेयीनें ॥४॥ भूप-धर्म-

बुद्धि भली । सत्यनिष्ठाहि प्रशंसिली । जेणें प्रेमसिद्धि केली । देहत्यागें ॥५॥ रामस्वभावगुणशील । वर्णीत असतां तत्काल । तनु पुलकित, नेत्र सजल । मुनिवर्यांचे ॥६॥ सीता-लक्ष्मणांची प्रीति । वर्णितां सहजगति । दुःखप्रेमीं मग्न होती । ज्ञानी मुनि ॥७॥ "ऐक ऐक बाळा भरता ! । बलिष्ठ भवितव्यता" । सांगती वसिष्ठ स्वतां । कळवळून ॥८॥ "लाभ-हानि, जीवन-मरण । यश-अपयश जें म्हणून । एका प्राक्तनाच्या आधीन । सर्व कांहीं ॥९॥ हें विचारितां विशेष । कोणास मग द्यावा दोष । सांग करावा तरी रोष । कोणावरी ? ॥१०॥ बाळा ! तूं निज अंतरीं । अवश्यमेव विचार करीं । राजा दशरथ नसेचि परि । शोचनीय ॥११॥ शोचनीय तो ब्राह्मण । जो का वेदविहिन । विषयलंपट टाकून । स्वधर्मातें ॥१२॥ शोचनीय तो भूपति । जो का न जाणे नीति । प्रिय न प्रजा ज्याप्रति । प्राणापरी ॥१३॥ शोचनीय तो वैश्य जाण । जो श्रीमंत परि कृपण । जो अतिथि शिवभजन । नेणतसे ॥१४॥ शोचनीय शूद्रजन । जो करी विप्रापमान । वाचाळ, ज्ञानगर्वी, मान । प्रिय ज्यातें ॥१५॥ शोचनीय तशी नारी । जी पतिवंचना करी । कुटिल आणि स्वैराचारी । कलहप्रिय ॥१६॥ शोचनीय ब्रह्मचारी । जो निजव्रत-त्याग करी । जो न गुर्वाज्ञेपरी । वागतसे ॥१७॥ शोचनीय तो गृहस्थ । जो होऊन मोहित । निजकर्ममार्गाप्रत । त्यागीतसे ॥१८॥ शोचनीय तो संन्यासी । जो रत होय प्रपंचासी । निज विवेक-वैराग्यासी । टाकूनिया ॥१९॥ शोचनीय वानप्रस्थ । ज्या टाकून तपाप्रत । भोगविलास अत्यंत । प्रिय वाटती ॥२०॥ शोचनीय तो दुष्ट-बुद्धि । जो का अकारण क्रोधी । गुरुबंधूचा विरोधी । पितरां-

चाहिं ॥२१॥ शोचनीय सर्वतोपरीं । जो दुजास अपकारी । स्वदेहातें पोषी परि । दयाहीन ॥२२॥ सर्वतोपरीं शोचनीय । भरता! तोचि नि.संशय । हरिभक्ति ज्या न प्रिय । कपट-हीन ॥२३॥ परि कोसलाधीश कांहीं । मुळीं शोचनीय नाहीं । यत्प्रभाव प्रकट पाहीं । विश्वांतरीं ॥२४॥ भरता! न झाला पूर्वीं । विद्यमान नसे उर्वीं । त्वत्पित्या–ऐसा भावी । न होय नृप ॥२५॥ ब्रह्मा, विष्णु, पंचानन । देवेंद्र, लोकपाल मिळून । दशरथाचे गुणगण । वर्णिती सर्व ॥२६॥ सांग बाळा! मज-प्रति । त्या दशरथाची महति । वर्णूं शकेल कैशा रीतीं । कोण बरें ?॥२७॥ राम, लक्ष्मण, शत्रुघ्न । त्यापरी तुजसमान । असती ज्याचे नंदन । पवित्र अति ॥२८॥ सर्वतोपरीं दशरथ । असे महा भाग्यवंत । दुःख करणें असे व्यर्थ । तयास्तव ॥२९॥ ऐसा करून विचार । करीं शोकपरिहार । वाग राजाज्ञेनुसार । वंदून शिरीं ॥३०॥ राज्यपद भूपतीनें । अर्पिलें तुजकारणें । पित्राज्ञा सत्य करणें । प्राप्त तुज ॥३१॥ ज्यानें केवळ वचनार्थ दवडिलासे रघुनाथ । देह तद्विरहाग्नींत । लोटिलासे ॥३२॥ भूपातें प्रियकर वचन । तितुके प्रिय ना प्राण । त्वां मानावें प्रमाण । तद्वचनातें ॥३३॥ भूपाज्ञा धरून शिरीं । वागावें त्वां त्यापरीं । यांतचि सर्वतोपरीं । त्वत्कल्याण ॥३४॥ पितृ-वचना राहून दक्ष । परशुरामें प्रत्यक्ष । मातेस मारिलें, साक्ष । विश्व सारें ॥३५॥ पुत्रें राजा ययातीस । अर्पिलें निजयौव-नास । न लागे त्या पापापयश । यत्किंचित् ॥३६॥ योग्यायोग्याचा विचार । सहसा टाकून दूर । पित्याच्या आज्ञेनुसार । वागती जे– ॥३७॥ सुख-यशाचें भाजन । तेचि होती नंदन । स्वर्लोकीं पावती स्थान । निश्चयानें ॥३८॥ म्हणून रायाचें वचन । सत्य

करावें वागून । पाळावें प्रजेलागून । टाकून शोक ।।३९।। स्वर्लो-
कामाजीं भूपति । होईल संतुष्ट चित्तीं । पुण्य-सुयश तुजप्रति ।
दोष न कांहीं ।।४०।। हें तों असे वेदविहित । तैसें सर्वांसी संमत ।
पिता राज्य दे ज्याप्रत । अधिकारी तो ।।४१।। टाकून उदा-
सीनता । तूं राज्य करीं आतां । मदाज्ञा मानून चित्ता ।
हितप्रद ।।४२।। राज्य करिसी हें ऐकतां । आनंदतील राम-
सीता । दोष न देईल ज्ञाता । कुणीहि तुज ।।४३।। कौसल्यादिक
माता । त्या सर्वांच्याहि चित्ता । प्रजा सुखी हें पाहतां । होईल
सुख ।।४४।। त्वदंतरींची प्रीति । जाणतसे रघुपति । प्रशंसील
तुजप्रति । सर्वतोपरीं ।।४५।। परत येतां राघवा । राज्य सोंप-
वावें तुवां । करुनी तयाची सेवा । प्रेमभावें " ।।४६।। 'गुर्वाज्ञेचें
परिपालन । अवश्य करावें आपण' । सुमंत कर जोडून ।
विनवीतसे ।।४७।। "रघुपति येतांचि परत । जैसें दिसेल उचित
तैसें करावें निश्चित । भरतराज!" ।।४८।। कौसल्या धैर्य
धरून । तेव्हां बोलली वचन । "बाळा! गुर्वानुशासन ।
पथ्यकर ।।४९।। त्यांतचि आपुलें बरें । वागावें मानून आदरें ।
वेळ-प्रसंगानुसारें । शोक टाकीं ।।५०।। राम गेलासे वनासी ।
महाराज स्वर्गवासी । बाळा! तूं तरी घाबरसी । ऐशा-
परीं ।।५१।। प्रजा, परिजन, सचिव । तैशाच माताहि सर्व ।
यांसी तुझाच एकमेव । आधार असे ।।५२।। दैवरेषा प्रतिकूला ।
काळहि कठिण आला । घेतसे मी अलाबला । धीर धरीं ।।५३।।
तरी गुर्वानुशासन । शिरसा वंद्य मानून । करी प्रजेचें पालन ।
हरून दुःख " ।।५४।। यापरीं गुर्वानुशासन । सचिवाचें अनुमोदन
जणुं चंदनलेपन । हृदयासी ।।५५।। त्यांत मातेची मृदुवाणी ।
पुनरपि पडली श्रवणीं । शील–प्रेम–सरलपणीं । ओथंबली

जी ।।५६।। कौसल्येचें तें भाषण । जें का सरलतापूर्ण । भरत झालासे ऐकून । सद्‌गदित ।।५७।। नेत्रकमलीं अश्रुधारा । स्रवूं लागल्या एकसरां । हृदयीं नव विरहांकुरा । सिंचिती तैं ।।५८।। त्याच्या अवस्थेलागून । त्या समयीं विलोकून । विसरले देहभान । सर्वहि जण ।।५९।। त्या भक्त भरताप्रति । अत्यादरें प्रशंसिती । 'सहज प्रेमाचा' म्हणती । 'कळस झाला' ।।६०।। धर्मधुरंधर भरत । धीर धरून मनांत । आपुले कमलहस्त । जोडूनिया ।।६१।। वंदून वचनें विनीत । अमृतें जें संपुटित । देतसे उत्तर उचित । सर्वांप्रति ।।६२।। "सद्‌गुरूंनीं मजप्रत केला उपदेश उचित । प्रजा-सचिवां संमत । असे सर्वां ।।६३।। योग्य मानून आज्ञा ती । माताहि झाली आज्ञापिती । पाळिली पाहिजे निश्चितीं । शिरीं धरून ।।६४।। गुरु, माता, पिता, धनी । यांची हितप्रद वाणी । मोदें पाळावी ऐकुनी । जाणून योग्य ।।६५।। योग्य कीं अयोग्य जरी । हें विचारितां अंतरीं । धर्म जाऊन पडे शिरीं । पापभार ।।६६।। त्यांत तुम्ही मज-लागून । दिली सरळ शिकवण । तैसें वागल्या कल्याण । होय माझें ।।६७।। जरी हें सर्वहि मातें । उत्तम प्रकारें कळतें । तरी जीवा न वाटतें । समाधान ।।६८।। तरी तुम्हीच संप्रति । ऐकावी माझी विनंति । मज पाहून योग्य ती । शिकवण ।।६९।। आजी प्रत्युत्तर देतों तुम्हांस । क्षमावें या अपराधास । दुःखिताचे गुणदोष । गणिती न साधु ।।७०।। महाराज ते स्वर्गस्थ । सीताराम गेले वनांत । राज्य करावया मजप्रत । सांगतां तुम्ही ।।७१।। माझें स्वतांचेंच हित । मानितसां का यांत । कीं महत्‌कार्य सांप्रत । साधितां निज? ।।७२।। सीतापतीचें सेवन । यांतचि माझें कल्याण । तें तर गेलें मुकून । मातृ-कौटिल्यें ।।७३।। मी

स्वयें निज मनांत । विचार केलासे बहुत । अन्योपायें माझें हित । होणार नाहीं ॥७४॥ दुःखरूप राज्यसंपदा । तिची क्षिति नसे कदा । सीताराम-लक्ष्मणपदां । पाहिल्याविण ॥७५॥ अंगावरी नसतां वस्त्र । भाररूप अलंकार । नसतां ब्रह्मविचार । वैराग्य वृथा ॥७६॥ रोग असतां शरीरास । व्यर्थ नाना भोग-विलास । जप, योग ते सायास । हरिभक्तिविण ॥७७॥ नांदत नसतां जीव । सुंदर देह तो वाव । तैसें व्यर्थ मज सर्वस्व । राघवाविण ॥७८॥ जाईन राघवानिकट । आज्ञा द्या हो! तुम्ही स्पष्ट । माझ्या हिताची गोष्ट । हीच एक ॥७९॥ राजा करून मजप्रत । साधूं इच्छितां स्वहित । प्रेम दावितां सांप्रत । अज्ञानवशें ॥८०॥ कैकेयीचा मी सुत । रामविन्मुख कपटयुत । लज्जाविहिन निश्चित । असायाचा ॥८१॥ मज अधमाच्या राज्यांत । आपणां सुख व्हावें प्राप्त । तुम्ही इच्छितां मनांत । मोहवशें ॥८२॥ मी करितों जें कथन । ऐकावें तें विश्वासून । राजा असावा कीं पूर्ण । धर्मशील ॥८३॥ राज्य हें मजलागुनी। तुम्हीं बळेंचि देतांक्षणीं । जाईल कीं ही धरणी । रसा-तलां ॥८४॥ सांगा कोण मजसम । असे दुजा पापधाम । वन-वासी सीताराम । ज्याच्यामुळें? ॥८५॥ रायें राघवालागून । जरी दिधलें कानन । परि केलें स्वर्गगमन । तद्वियोगें ॥८६॥ या सर्वहि अनर्था । मी शठ कारण सर्वथा । जिवंतपणीं सर्व कथा । ऐकत बसे ॥८७॥ रामशून्य हें सदन । निजदृष्टीं विलोकून । राहिले प्राण साहून । जगदुपहास ॥८८॥ रामविषय-रस पुनीत । होऊन पारखे त्याप्रत । इहसुखार्थ बुभुक्षित । लोलुप जे ॥८९॥ काठिन्य जें का मन्मनीं । कोठवरी सांगूं वर्णुनी । वज्रास मागें सारुनी । महत्त्व पावें ॥९०॥ कारणा-

पेक्षां कार्यांत । काठिन्य असतें बहुत । कांहींहि नसें यांत । दोष माझा ॥९१॥ दधीचीच्या अस्थींहुनी । वज्र अधिक कठिणपणीं । कीं कठोर पाषाणीं । लोह जैसें ॥९२॥ कैकेयीच्या गर्भांतून । उद्भवलेले मत्प्राण । दुर्दैवी, पापी म्हणून । मानिती तृप्ति ॥९३॥ (प्राण आणि शरीर । उभयतांहि सहोदर । तेणेंचि ते त्यावर । लुब्ध झाले ॥९४॥) प्रियविरह त्यां लागे प्रिय । तद्विषयीं काय काय । ऐकाल, पहाल अतिशय । आतां पुढें ॥९५॥ सीतारामलक्ष्मणास । जिनें दिधला वनवास । केलें पतिहित, त्यास । धाडून स्वर्गी ॥९६॥ वैधव्य आणि अपयश । जिनें घेतलें स्वतांस । शोक, संताप प्रजेस । दिधला जिनें ॥९७॥ सुख, सुराज्य, सत्कीर्ति । अर्पिलीसे मजप्रति । केली सर्वांची कार्यपूर्ति । कैकेयीनें ॥९८॥ याहून माझें चांगलें । काय व्हायाचें राहिलें ?। राज्य द्यायाचें ठरविलें । त्यावरी तुम्हीं ! ॥९९॥ कैकेयीच्या कुशींतून । जगीं झालें माझें जनन । कांहीं अयोग्य ना म्हणून । मजविषयीं ॥१००॥ स्वयें विधाता प्रत्यक्ष । मजविषयीं असतां दक्ष । कां न धरितील मत्पक्ष । पंच सांगा ? ॥१०१॥ आधींच ग्रहांनीं घेरिला । तशांत वात तया झाला । माजीं डंखहि मारिला । वृश्चिकानें ॥१०२॥ यापरीं दुर्दशा झाली । त्यांतहि वारुणी पाजिली । उपाययोजना उरली । कोणती सांगा ?॥१०३॥ कैकेयीच्या पुत्राप्रति । शोभा देईल जी गति । चतुर धात्यानें योजना ती । केली माझी ॥१०४॥ पुत्र मी दशरथाचा । लघु भ्राता राघवाचा । वृथा मान हा साचा । दिला त्यानें ॥१०५॥ राजतिलकाकरितां । सर्वहि आग्रह करितां । राजा, राज्य, तुम्हां समस्तां । रुचलें दिसे ॥१०६॥ मी तरी कुणा कुणास । कैसा देऊं उत्तरास ।

सांगा जें जें रुचेल ज्यास । खुशाल तें ॥१०७॥ मी आणि कुटिल जननी । या उभयतांवांचुनी । सत्कृत्य करणार जनीं । कोण दुजा ?॥१०८॥ चराचर विश्वांत या । कोण मजवांचूनिया । सीताराम नसती जया । प्राणप्रिय ?॥१०९॥ परम हानि जी साक्षात् । महल्लाभ सर्वातीत । काल प्रतिकूल मजप्रत । दोषी न कुणी ॥११०॥ अयोध्या जाहली ओस । तयाचा संशय मनास । तुम्ही झाला आहां वश । शील-प्रेमा ॥१११॥ त्याकारणें या कालां । जे जें तुम्ही बोललां । तें तें तुम्हां सकलांला । योग्यचि असे ॥११२॥ राममाता भोळी अति । सरळ जी का निजचित्तीं । प्रेम जिचे मजवरती । विशेषेंचि ॥११३॥ होऊनिया प्रेमवश । बोललीसे तुम्हांपरिस । या माझ्या दीनतेस । विलोकुनी ॥११४॥ सद्‌गुरु वसिष्ठ तर । विश्वख्यात विवेकसागर । ज्यांतें विश्व जंसें बदर । तळहातींचें ॥११५॥ तेहि राजतिलक मज । करावया झाले सज्ज । दैवप्रतिकूल्यें सहज । प्रतिकूल सर्व ॥११६॥ सीतारामाविरहित कुणी न म्हणे जगांत । कीं माझें नाहीं मत । कपटांत या ॥११७॥ ते शब्द ऐकेन निःशंक । राहीन मानून सुख । शेवटीं जल तेथेंचि पंक । निश्चयें होय ॥११८॥ जग म्हणेल जरी पतित । भय न त्याचें मजप्रत । चिंता नाहीं यत्किंचित् । परलोकाची ॥११९॥ एकचि माझ्या अंतरंगीं । दुःसह जाळीतसे आगी । सीता-राम दुःखभागी । मजकारणें ॥१२०॥ जीवितसाफल्य भलें । लक्ष्मणानें प्राप्त केलें । रामपदीं मन अर्पिलें । सर्व-त्यागें ॥१२१॥ रामवनवासाकारणें । केवळ माझें झालें जिणें । अभाग्याचें दुःख करणें । लटिकेंच हें ॥१२२॥ माझ्या अंतःकरणांत । दुःख जें कठिण अत्यंत । शिर नमवून सर्वांप्रत ।

सांगतों मी ॥१२३॥ श्रीरघुनाथाचे चरण । दृष्टीनें पाहिल्याविण । न शमे दुःख दारुण । अंतरींचें ॥१२४॥ यासी उपाय तो आन । न सुचे मजलागून । हृदयींचें जाणील कोण । राघवाविण ?॥१२५॥ आतां एकचि मनोरथ । योजिला मीं मनांत । निघावें प्रभुदर्शनार्थ । प्रातःकालीं ॥१२६॥ जरी मी स्वयें पुष्ट । अपराधी खटनट । माझ्यामुळेंच सारें संकट । उद्भलें हें ॥१२७॥ तरीहि मज संमुख । शरण पाहून रघुनायक । करीलचि कृपा अधिक । क्षमूनि मंतु[1] ॥१२८॥ सुशील आणि भिडस्त । स्वभावें सरळ अत्यंत । प्रेम-कृपेचें रघुनाथ । मंदिरचि ॥१२९॥ वैऱ्याचेंहि अनहित । रामें न केलें किंचित् । मी शिशु सेवक साक्षात् । प्रतिकूल जरी ॥१३०॥ तुम्हीहि प्रतिनिधींनीं । माझें हितचि जाणुनी । प्रेमें आशीस देउनी । आज्ञापावें ॥१३१॥ जेणें ऐकून मद्विनति । दास जाणून मजप्रति । परत येईल रघुपति । अयोध्येस ॥१३२॥ जरी माझें जनन । झालें कुमातेपासून । जरी मी दोषी अज्ञान । सदोदित ॥१३३॥ तरी आपुला मानून । मजलागीं रघुनंदन । त्यजणार नाहीं पूर्ण । विश्वास हा" ॥१३४॥ भरताचें वचन भलें । सर्वांसहि प्रिय वाटलें । रामप्रेमामृतें भरलें । परिपूर्ण जें ॥१३५॥ वियोगविषें दारुण । दग्ध होते सर्वजण । सबीज मंत्र परिसून । जागले जणुं ॥१३६॥ मातागुरुसचिवादिक । अयोध्येचे नागरिक । व्याकुल झाले सकलिक । प्रेमें बहु ॥१३७॥ प्रशंसून भरताप्रति । सर्वहि तेधवां म्हणती । "रामभक्तीची मूर्ति । प्रत्यक्ष ही ॥१३८॥ बाळा! भरता! तूं यापरीं । कां न वदशील वैखरी । प्रिय असती प्राणापरी । राघवातें ॥१३९॥ निज मूर्खत्वें पामर ।

---

१. अपराध

मातेचा कपटप्रकार । करील जो का तुजवर । आरो-
पित– ॥१४०॥ कोटि पूर्वजांसहित । राहील जो मूर्ख पचत । तो
शतावधि–कल्पपर्यंत । नरकवासीं ॥१४१॥ सर्पाचे पाप–दुर्गुण।
मणि न करितां ग्रहण । दुःख–दारिद्र्यहरण । विषासह
करी ॥१४२॥ (कैकेयीच्या गर्भांतून । जरी म्हणसी झालें जनन ।
तरी तत्पापापासून । अलिप्त तूं ॥१४३॥ रामदर्शन हेंचि धन ।
देऊन आम्हांलागून । वियोगदैन्याचें हरण । करिशील
तूं ॥१४४॥)अवश्य चलावें वनांत । जेथें वसे रघुनाथ । उपाय
सुचविला युक्त । भरता ! तुवां ॥१४५॥ अगाध शोकसागरांत।
बुडत असतां सर्वांप्रत । तूंच दिधला सांप्रत । आधार
हा" ॥१४६॥ सर्वांच्याहि अंतराला । आनंद अतिशय झाला ।
मयूर–चातकें ऐकिला । घनगर्ज जणुं ॥१४७॥ 'प्रातःकाळींच
प्रयाण । निश्चयें' करून श्रवण । भरत प्राणासमान । सर्वां
प्रिय ॥१४८॥ वसिष्ठातें प्रवंदून । भरता शिर नमवून । जाते
झाले सर्व जन । घरोघरीं ॥१४९॥ "खरोखर या जगतांत ।
धन्य भरताचें जीवित" । तत्प्रेम–शील प्रशंसीत । चालले
ते ॥१५०॥ जन आपसांत म्हणती । 'मोठें कार्य झालें संप्रति' ।
सर्वहि सिद्धता करिती । प्रयाणाची ॥१५१॥ कराया गृहरक्षणा ।
ठेवूं लागती ज्या कोणा । मान कापलीसे त्यांना । गमे
जणुं ॥१५२॥ "रहा ऐसें कुणाप्रति । म्हणूं नका" कोणी
म्हणती । "जगीं कोण न वांछिती । जीवित–लाभ? ॥१५३॥
जळो ती सुंदर संपत्ति । मंदिर, सुख, मित्रजाति । मातापिता,
नातीं–गोतीं । बांधवांसह- ॥१५४॥ श्रीरामपदाचें दर्शन । होतां
निश्चयें करून । जे प्रसन्नमनेंकरून । साह्य न होती" ॥१५५॥
घरोघरीं तया रातीं । नाना वाहनें सिद्ध होतीं । कां कीं प्रयाण-

प्रभातीं । आनंद मनीं ॥१५६॥ गृहीं जाऊनिया रातीं । भरत विचार करी चित्तीं । "नगर, धाम, अश्व, हस्ति । महा-कोष– ॥१५७॥ ही तों संपत्ति समस्त । श्रीरामाचीच निश्चित । जाईन मी अव्यवस्थित । टाकूनिया– ॥१५८॥ तरी तत्परिणाम कांहीं । नीटसा होणार नाहीं । पापाग्रणी, स्वामीद्रोही । ठरेन मी ॥१५९॥ करी स्वामीच्या हिता । खरा सेवक तो तत्त्वतां । कोटि दोष कुणी माथां । देईना का" ॥१६०॥ हें विचारून निःशंक । बाहिले शुद्ध सेवक । जे न कर्तव्यपराङ्मुख । स्वप्नां-तहि ॥१६१॥ भेद सांगून त्यांप्रत । समजाविले धर्म समस्त । जो योग्य जेंथें, तेथ । ठेविलें त्या ॥१६२॥ करून यत्न समस्त । चौक्या पहारे व्यवस्थित । कौसल्येकडें भरत । जाता झाला ॥१६३॥ तेव्हां सर्व मातांप्रति । दुःखी जाणूनिया चित्तीं । प्रेमचतुर निश्चितीं । भरतराज ॥१६४॥ आज्ञा करीतसे नेटकी । सज्ज करावया पालखी । सुखें बैसावया निकी । योग्य ऐशी ॥१६५॥ चक्रवाक्–मिथुनापरी । अयोध्येच्या नरनारी । जावया प्रभातीं अंतरीं । अत्युत्कंठित ॥१६६॥ जागून काढिती रात । शेखीं होतांच प्रभात । बाहिलें सुज्ञ सचिवाप्रत । भरत-रायें ॥१६७॥ "अभिषेकाची सामुग्री । संगें असूं द्या सारी । मुनि रामास कांतारीं । देतील राज्य ॥१६८॥ "चला, त्वरा करा" म्हणतां । सचिवें करून दंडवता । त्वरें अश्व-गज-रथां । सज्ज केलें ॥१६९॥ अग्निहोत्रपात्रयुत । सती अरुंधतीसहित । रथीं बसून मुनिनाथ । चालले आधीं ॥१७०॥ त्याचपरी विप्र-गण । जो तपस्तेजाची खाण । नाना वाहनीं आरोढून । चाल-लासे ॥१७१॥ समस्त नागरिक जन । निज वाहनें सजवून । चित्रकूटाकडें प्रयाण । करिते झाले ॥१७२॥ सुंदर ऐशा

शिबिका । अवर्णनीय त्या देखा । त्यांत बैसून सकळिका । चालल्या राज्ञी ॥१७३॥ विश्वासू सेवकांवरी । सोंपवूनिया नगरी । चालविलें अत्यादरीं । सर्वांसहि ॥१७४॥ सीतारामाचे चरण । अनन्य भावें स्मरून । तेव्हां भरत–शत्रुघ्न । निघाले ते ॥१७५॥ रामदर्शनोत्सुक मनीं । चालले पुरुष, कामिनी । जणुं हस्ति–हस्तिनी । पाहून जला ॥१७६॥ वनीं सीता–रघु- पति । जाणूनिया निजचित्तीं । भरत–शत्रुघ्न चालती । पायींच तैं ॥१७७॥ तें प्रेम अवलोकून । जन होती प्रेममग्न । तेही चालती त्यांलागून । गजाश्वरथां ॥१७८॥ समीप जाती झाली । निज पालखी थांबविली । मृदु वाणीनें बोलली । राम- माता ॥१७९॥ "बाळा! बैस रथावरी । जीव ओंवाळितें तुज- वरी । कष्टी होतसे भारी । प्रिय परिवार ॥१८०॥ तूंच पायीं चालतां । चालेल सर्वहि जनता । शोकें शैथिल्य समस्तां । चालवें न पायीं" ॥१८१॥ आज्ञा शिरीं धरोनी । मस्तक नम- वून चरणीं । निघती रथांत बसुनी । उभयतांहि ॥१८२॥ (सोपानीचा मार्ग भला । जरी दीर्घतम वाटला । तदर्थ नववा योजिला । विश्राम हा ॥१८३॥ रसिक, भाविक श्रोत्यांस । विनवीतसे देवीदास । माझ्या बोबड्या बोलांस । मान्य करा ॥१८४॥ )

# विश्राम १० वा

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्योनमः
श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः

निवास प्रथम दिवशीं । केला तमसा-तीरासी । झाले गोमती–तटवासी । दुसरे दिनीं ॥१॥ दुग्धपान, फलाहार । कोणी करिती नारीनर । कोणी नक्तव्रतधर । एकभुक्त ॥२॥ यापरीं रामाप्रीत्यर्थ । कोणी करिती नेमव्रत । सर्व भोग-भूषणांप्रत । टाकूनिया ॥३॥ शरयुतटीं देऊन तळ । चालले होतां सकाळ । शृंगवेरपुराजवळ । सर्व आले ॥४॥ तें सर्व वृत्त ऐकुनी । निषाद तो तया क्षणीं । सचिंत होऊन मनीं । विचार करी ॥५॥ "वनीं जातसे भरत । कोणत्याकारणें निश्चित । कांहीं तरी तन्मनांत । कपटभाव ॥६॥ त्याचे अंतःकरणीं जरी । कौटिल्य नसतें तरी । कासया घेतां बरोबरी । सेना-भार ॥७॥ वाटत असेल त्यास । मारून निज बंधूंस । भोगावें राज्य-सुखास । निष्कंटक ॥८॥ परि भरतें राजनीति । विचारिली नसे चित्तीं । प्राणनाश संप्रति । कलंक पुढें ॥९॥ सर्व सुरासुर जरी । एकत्र मिळाले तरी । जिंकूं न शकती समरीं । राघ-वातें ॥१०॥ भरत ऐसेंहि करील । तरी त्यांत काय नवल । विषवल्लीस अमृतफल । येईल काय?" ॥११॥ गुहें ऐसें विचारून । आज्ञापिले ज्ञातिजन । "असा सज्ज, सावधान । सर्वजण ॥१२॥ वल्हयांसहवर्तमान । नावा टाका रे! बुडवून । त्यापरीं घाटालागून । रोखून धरा ॥१३॥ राहूनिया सावधान ।

घाट सारे रोधून । प्रसंगीं येतांहि मरण । सिद्ध असा ॥१४॥ या भरताचे समोर । सशस्त्र रहा तत्पर । होऊं न द्या गंगा-पार । जिवंतपणीं ॥१५॥ मरण येईल समरीं । त्यांतून गंगेच्या तीरीं । राम कार्य हें, देह तरी- । क्षणभंगुर ॥१६॥ कोठें राम-बंधु भरत । कोठें मी नीच अत्यंत । ऐसें मरण ये मजप्रत । महद्भाग्यें ॥१७॥ स्वामीस्तव प्राणपणीं । युद्ध करीन निर्वाणीं । घेईन चतुर्दश भुवनीं । उज्ज्वळ यश ॥१८॥ रामाप्रीत्यर्थ निःशंक । प्राण त्यागीन आवश्यक । माझ्या दोन्ही हातीं मोदक । आनंदाचे" ॥१९॥ (जरी राहिलों जिवंत । तरी होईन यशवंत । सद्गति लाभेल निश्चित । मेलों तरी ॥२०॥) "ज्याची साधु-समाजांत । गणती ना यत्किंचित् । जो न रामाच्या भक्तांत । अंतर्भूत– ॥२१॥ तया नराचें जीवित । पृथ्वीस केवळ भारभूत । मातृयौवन-वृक्षाप्रत । कुठार तो! ॥२२॥ यापरीं तो निषाद-पति । मोडून उद्विग्नतेप्रति । उत्साह वाढवी चित्तीं । सर्वांच्याहि ॥२३॥ रामातें स्मरून अंतरीं । मागवितां झाला सत्वरीं । कवच, भाते त्यापरीं । स्वधनुष्य ॥२४॥ म्हणे, "मित्रहो! त्वरित । तत्पर असा सांप्रत । ऐकून मदाज्ञेप्रत । भ्यावें न कुणी" ॥२५॥ 'फार बरें' या रीतीं । सर्वहि आनंदें म्हणती । उत्साहातें वाढविती । परस्पर ॥२६॥ निषादातें वारंवार । नमून चालले सर्व । रणीं ज्या उत्साह थोर । लढायाचा ॥२७॥ रामपदाब्जपादुकांसी । स्मरून निज मानसीं भाते कसून धनुष्यासी । चढविते झाले ॥२८॥ ल्याले चिलखतें निकीं । पोलादी टोप मस्तकीं । परशु, भाले, खड्गादिकीं । सिद्ध होती ॥२९॥ कुणी वीर त्यांतून । खड्ग फेंकीत निपुण । धरा सोडून उड्डाण । नभीं घेई ॥३०॥ आपआपले पथक ।

बनवूनिया पृथक् । जाती सामंत गुहक– । प्रणामातें ॥३१॥ देखून ते सकल योद्धे । योग्य जाणून निषादें । नांवें घेऊन प्रमोदें । संमानिले ॥३२॥ म्हणे, "मित्र हो ऐका । देऊं नका मुळीं धोका । माझा कार्यभाग देखा । महत्त्वाचा" ॥३३॥ ऐसे ते शब्द ऐकुनी । वीरहि वदले वाणी । "मुळीं तुम्ही अधीर मनीं । होऊं नका ॥३४॥ रामप्रतापें स्वामी ! । तुमच्या बलानें आम्ही । करूं रिपुसेना रिकामी । वीराश्वहीन ॥३५॥ जिवंत असूं तोंवरी । पाय न घेऊं माघारीं । रुंड-मुंडमय धरित्री । करून टाकूं" ॥३६॥ तेधवां निषादनाथें । सज्ज पाहून सेनेतें कथिलें रणवाद्यांतें । वाजवाया ॥३७॥ इतुकें बोलतां अचानक । वामभागीं आली शिंक । 'शेवट गोड' म्हणती लोक । शकुनज्ञ जे ॥३८॥ म्हणे शकुनज्ञ वृद्ध । "भविष्य निश्चयें सिद्ध । भरत भेटेल, युद्ध । होणार नाहीं ॥३९॥ रामाची कराया समजूत । चाललासे हा भरत । युद्ध न होय हें निश्चित । शकुनफल" ॥४०॥ ऐकून म्हणे निषाद । "योग्य सांगतसे वृद्ध । साहस करून अबुद्ध । पस्तावती ॥४१॥ भरताचें स्वभाव-शील । न जाणतांचि केवल । हिताची हानि होईल । करितां रण ॥४२॥ तुम्ही एकत्र सर्व भट । बसा रोधूनिया घाट । भरताची घेऊन भेट । काढितों भेद ॥४३॥ शत्रु, मित्र, उदासीन । नातें जें येईल कळून । करूं मग अवलंबन । उपायाचें ॥४४॥ त्याचा स्नेह–स्वभाव । दृष्टीं पडेल स्वयमेव । प्रेम किंवा वैरभाव । लपवितां न लपे" ॥४५॥ इतुकें बोलून तत्काल । राजभेट न्याया विपुल । मागवी खग, मृग, फल, । कंदमूल ॥४६॥ नाना मत्स्य मोठमोठे । मुरलेले तैसे पाठे । कावडी भरून गोमटे । आणविले ॥४७॥ सामुग्री जुळतां

सम्यक् । भेटाया निघे गुहक । होती तैं मंगलकारक । शुभ शकुन ।।४८।। दुरून पाहतां ससंभ्रम । निवेदून निज नाम । करी तैं दंडप्रणाम । वसिष्ठांतें ।।४९।। रामप्रिय तो निषाद । जाणून देती आशीर्वाद । भरतासहि करिती विशद । वसिष्ठ मुनि ।।५०।। 'रामसखा' हें ऐकतां । भरत त्यागूनिया रथा । चाले प्रेम उचंबळतां । पायींच तो ।।५१।। जाति–नाम–ग्रामादिक । गुहें सांगून सकळिक । भूमीं टेकून मस्तक । प्रवंदिलें ।।५२।। करीत असतां दंडवत । अवलोकून भरत । उचलून धरी त्याप्रत । निजहृदयीं ।।५३।। जणुं लक्ष्मण बांधवा । भेटलों वाटे जीवा । प्रेम न मावें तेधवां । हृदयांतरीं ।।५४।। भरत त्या गुहाप्रति । भेटतां तैं अतिप्रीतीं । लोक ती प्रेमपद्धति । वाखाणिती ।।५५।। देव 'धन्य धन्य' म्हणुनी । करून मंगल ध्वनि । वर्षिती त्या प्रशंसुनी । पुष्पभार ।।५६।। "वेदांतून, लौकिकांतून । सर्वप्रकारें नीच जन । यच्छायास्पर्शें स्नान । आवश्यक– ।।५७।। कडकडून तयाप्रत । रामानुज तो भरत । होऊनिया रोमांचित । भेटतसे ।।५८।। सहज जे जांभई देती । मुखें 'राम राम' म्हणती । पापसमूह त्यां पुढतीं । राहती ना ।।५९।। याशीं प्रत्यक्ष वहिलें । रामें हृदयीं कवटाळिलें । विश्वीं त्या पावन केलें । कुळासह ।।६०।। कर्मनाशा–नदी–जल । गंगेंत मिळतां तत्काल । सांगा कोण न वंदील । धरून शिरीं ? ।।६१।। विश्वविदित हें असे कीं । उलटें नाम जपून मुखीं । जाहले मुनि वाल्मीकि । ब्रह्मरूप ।।६२।। चांडाळ, शबर, यवन । दुष्ट, दुरात्मे जे जन । कोळी, भिल्ल, अज्ञान । तरीहि ते– ।।६३।। रामनामोच्चारेंकरून । जाहले परम पावन । गेले विख्यात होऊन । भुवनांतरीं ।।६४।। नव्हे हें नवल वर्तलें ।

युगोयुगीं चालत आलें। कवणा न महत्त्व दिलें। राघवानें?"॥६५॥ रामनामाचें महिमान। देवहि करिती वर्णन। ऐकून अयोध्येचे जन। आनंदती ॥ ६६ ॥ रामसखा हा मानून। भरतें प्रेमें भेटून। क्षेमकुशल–वर्तमान। विचारिलें ॥६७॥ भरताच्या प्रेमशीला। पाहून त्या समयाला। निषाद तो विसरला। देह-भान ॥६८॥ संकोच–प्रेमाऽनंद तीन्ही। वृद्धिगत अंतःकरणीं। पहात भरतालागुनी। सारखा उभा ॥६९॥ ( विकल्प भरता-विषयीं। धरिला मीं अनाठायीं। म्हणून संकोच हृदयीं। वाटलासे ॥७०॥ रामाचा बंधु निःशंक। भेटला सुखपूर्वक। वाटलें प्रेम आत्यंतिक। म्हणूनिया ॥७१॥ युद्धाची चिंता मोठी। तीहि निरसली शेवटीं। म्हणून आनंद पोटीं। समावेना ॥७२॥) मग तो धीर धरून। पुन्हां वंदी तच्चरण। प्रेमें, विनयें कर जोडून। काय म्हणे– ॥७३॥ "क्षेमाचें जें का मूल। तें पाहून पदकमल। वाटे जाहलों मी कुशल। त्रिकालींहि ॥७४॥ प्रभो! यापुढतीं ठाम। तुमच्या कृपेनें परम। कोटि कुळांसहित मम। मंगलचि ॥७५॥ मद्व्यवसाय, मत्कुल। जाणूनिया प्रतिकूल। प्रभूचा महिमा केवल। आणून मनीं ॥७६॥ रामपदाची भक्ति जो न धरील चित्तीं। निश्चित तो या जगतीं। दैवहीन ॥७७॥ कपटी, भ्याड, अत्यंत। कुमति, कुलहीन साक्षात्। लोक-वेद-बहिष्कृत। सर्वतोपरीं॥७८॥ रामें ऐसा मजप्रति। आपुलें मानिलें जैं चित्तीं। तैं पासून मी जगतीं। भूषणभूत" ॥७९॥ पाहून निषाद-प्रीति। ऐकून सुंदर विनंति। मग भेटलासे त्याप्रति। शत्रुघ्नहि ॥८०॥ मधुर वचें आपुलें। निषादें निजनाम कथिलें। सकल राज्ञींस वंदिलें। अत्यादरें ॥८१॥ जाणून त्या लक्ष्मणापरी। आशीष देती राज–नारी। 'शतलक्षवर्षवरी। सुखी रहा' ॥८२॥ अयो-

ध्येचे सकल जन । देखून निषादालागून । जणुं लक्ष्मणातें पाहून । आनंदले ॥८३॥ म्हणती, "जन्माचे सार्थक । यानेंच मिळविलें एक । ज्या आलिंगी रघुनायक । बाहुपाशीं ॥८४॥ निज भाग्याची महति । ऐकून तो निषादपति । घेऊन जाय सर्वां-प्रति । मुदित मनें ॥८५॥ सुचवितां सेवकांप्रत । चालते झाले समस्त । निज स्वामींचें मनोगत । जाणूनिया ॥८६॥ गृहीं, वृक्षाचे तळवटीं । वनोपवनीं, सरस्तटीं । योजिलीं त्यांनीं निकटीं । निवासस्थलें ॥८७॥ जेधवां शृंगवेरपुर । देखिलें दृष्टिसमोर । भरताचे शिथिल गात्र । प्रेमवशें ॥८८॥ भार टाकून गुहावरी । चालतां शोभले कैशापरीं । विनय, प्रेम देहधारी । जणुं काय? ॥८९॥ यापरीं तो भरत । सकल सैन्यासहित । गंगेच्या दर्शनाप्रत । जाता झाला ॥९०॥ पाहून रामघाटाला । भरतें प्रणिपात केला । मन तल्लीन, भेटला । रामचि जणुं ॥९१॥ अयोध्येच्या नरनारी । प्रणाम करिती तदवसरीं । पाहून ब्रह्म-मय वारि । आनंदती ॥९२॥ स्नानें करून गंगेप्रति । कर जोडून मागती । रामचंद्रपद–प्रीति । अनुपमेय ॥९३॥ भरत म्हणे, "हे सुरसरिते!। तुझे रेणु सुखदाते । विशेषें रामभक्तांतें । सुरभीपरी ॥९४॥ कर जोडून संप्रति । मागतों याच वराप्रति । सीताराम–पदीं प्रीति । निष्काम जडो!" ॥९५॥ ऐशा प्रकारें करून । भरत करीतसे स्नान । गुरूचें अनुशासन । पावू-निया ॥९६॥ सर्व मातांचीं स्नानें । झालीं जाणूनिया तेणें । तेथून तळ तांतडीनें । हालविला ॥९७॥ जिकडें तिकडें नारी-नर । निवास करिती सुस्थिर । भरतें घेतला समाचार । सर्वां-चाहि ॥९८॥ सद्गुरु–सेवा करून । घेऊन तदनुशासन । जाती भरत–शत्रुघ्न । कौसल्येकडें ॥९९॥ पाय दाबून स्वहस्तें ।

बोलून मधुर वचातें । सर्व मातांप्रति भरतें । सन्मानिलें ॥१००॥ मग मातांचें सेवन । शत्रुघ्नातें सोंपवून । स्वयें घेतलें बाहून । निषादातें ॥१०१॥ हातीं धरूनिया हाता । चालूं लागले उभयतां । शरीरातें शिथिलता । प्रेमातिशयें ॥१०२॥ मित्रास पुसे तत्काळ । "दावीं मातें तें स्थळ । नेत्रमनाची तळमळ । निवर्वीन मी ॥१०३॥ सीतारामलक्ष्मणांनीं । विश्रांति घेतली ज्या स्थानीं" । बोलतां आले भरुनी । नेत्र दोन्ही ॥१०४॥ ऐकून भरताचें वचन । मनीं होऊन उद्विग्न । निषाद गेला त्या घेऊन । त्वरें तेथ ॥१०५॥ जो अतिशय पुनीत । शिंशुपा वृक्ष विख्यात । विश्रांति घेतली तेथ । राघवानें ॥१०६॥ अत्यादरें, अतिप्रीतीं । भरतें त्या स्थलाप्रति । केलीसे साष्टांग प्रणति । तदवसरीं ॥१०७॥ अति मृदु कुश-शय्या । निजदृष्टीं पाहूनिया । प्रदक्षिणा करूनिया । वंदिलीसे ॥१०८॥ चरणींचे रजःकण । नेत्रीं घेतले लावून । त्या प्रेमाधिक्यालागून । सांगवेना ॥१०९॥ दोन-चार सुवर्णकण । दिसतां घेतले उचलून । मानून सीतेसमान । ठेविले शिरीं ॥११०॥ नेत्र झाले अश्रुयुक्त । भरत अंतरीं दुःखित । गहिंवरोनि गुहाप्रत । काय म्हणे- ॥१११॥ "सीताविरहें सुवर्णकण । हे दिसती कांतिहीन । मलिन अयोध्येचे जन । जैशापरीं ॥११२॥ पिता तो जनक भूपति । उपमा देऊं त्या कोणती ? । भोगयोग दोन्ही ज्याप्रति । करतलस्थ ॥११३॥ सूर्यवंशीं प्रति भास्कर । दशरथ जिचा श्वशुर । जया प्रशंसी वारंवार । देवेंद्रहि ॥११४॥ स्वयें स्वामी रघुनाथ । असे जिचा प्राणनाथ । जो चढला महत्त्वाप्रत । यत्कृपेंचि तो ॥११५॥ शिरोमणि जी सतींची । महा पतिव्रता साची । शय्या ही त्या जानकीची । पाहूनहि ॥११६॥ मद्-

हृदया! हुरहुरून । जरी न होसी विदीर्ण । तरी मग तूं वज्राहून । कठोर अति ॥११७॥ लालनायोग्य परिकर । धाकुटा लक्ष्मण सुंदर । झाला नाहीं, न होणार । बंधु ऐसा ॥११८॥ नागरिकांचा लाडका । प्रियतम जननीजनकां । जो सीतारघु-नायका । जीव कीं प्राण ॥११९॥ गोजिरवाणा नाजुक । इतुका कीं स्वाभाविक । ऊन-वाऱ्याची झुळुक । लागली न ज्या ॥१२०॥ तो या वनाभीतरीं । विपत्ति साहे नानापरीं । कोटि वज्रांस मागें सारी । हृदय माझें! ॥१२१॥ जन्म घेऊन रघुनाथ । करी विश्वा प्रकाशित । रूप-शील-सुख-समस्त- । गुणाब्धि जो ॥१२२॥ नागरिक जनां, आप्तां । गुरु, माता आणि पिता । स्वभावें जो सुखदाता । सर्वां सहि ॥१२३॥ जयाची प्रशंसा स्वयें । वैऱ्याच्याहि मुखांत ये । मीलनें, भाषणें, विनयें । मनोहर जो ॥१२४॥ कोटघवधि सरस्वती । शतकोटि शेषांप्रति । करवें न मुळीं गणती । यद्-गुणांची ॥१२५॥ सुखाची मूर्ति केवल । रघुवंशशोभाशील । असे आनंद-मंगल- । निधान जो ॥१२६॥ तो उघडचा भूमी-वरतीं । कुशावरी घे विश्रांति । तेव्हां खरीच कर्मगति । अति बलिष्ट ॥१२७॥ रामें दुःख हा शब्दहि । श्रवणीं ऐकिला नाहीं । जीववृक्षापरी पाही । भूप जया ॥१२८॥ पापण्या नयनांप्रति । सर्प मणीस, त्या रीतीं । दिनरात्र ज्या सांभाळिती । सकल माता ॥१२९॥ तो आज पायीं केवल । वनांतरी गमन-शील । कंदमूल-फलफूल । भक्षूनिया ॥१३०॥ अमंगलास जी कारण । धिक् त्या कैकेयीलागून । झाली प्रतिकूल प्राण- । प्रियतमास जो ॥१३१॥ मी पापसमुद्र अभागी । धिक्कार असो त्या मजलागीं । सकल अनर्थां विभागी । जो मी असे ॥१३२॥

कुलकलंक मजकारणें– । करून सृजिलें धात्यानें । केलें तैसें कुमातेनें । स्वामीद्रोही" ॥१३३॥ ऐकतां ते भरत–शब्द । प्रेमें समजावी निषाद । "स्वामी कां करितां खेद । वृथाच हा?॥१३४॥ राम प्रियतम तुम्हांस । तुम्ही प्रिय राघवास । यांत न कुणाचा दोष । दुर्दैवाचा ॥१३५॥ दुर्दैवाचा खेळ फार । कठिण असे खरोखर । मातेची मति निष्ठुर । केली जेणें ॥१३६॥ त्या रात्रीं श्रीरघुवीर । तुमची प्रशंसा सादर । करीत होता वारंवार । श्रीमुखानें ॥१३७॥ श्रीरामास तुम्हांवांचून । प्रियतम नाहींच आन । हें मी शपथ वाहून । सांगतसे ॥१३८॥ गोड होईल शेवट । ऐसें जाणूनिया स्पष्ट । धैर्य धरा हो! उत्कट । हृदयांतरीं ॥१३९॥ घटघटाच्या अंतर्यामीं । श्रीराम तुमचा स्वामी । कृपानिधान प्रेमी । भिडस्त अति ॥१४०॥ हाचि एक दृढतर । मनीं करून विचार । चला विश्रांति क्षणभर । घ्याव-यासी" ॥१४१॥ ऐकून निषाद–भाषित । धैर्य धरून मनांत । जाय रामातें आठवीत । निवासस्थलीं ॥१४२॥ हें ऐकतांचि वर्तमान । नरनारी, नगरजन । चालले कराया विलोकन । आतुरतेनें ॥१४३॥ करूनिया प्रदक्षिणा । वंदिती ते त्या स्थाना । देती अनेक दूषणा । कैकेयीतें ॥१४४॥ दुःख अनावर चित्तीं । नेत्रीं अश्रु वाहविती । त्यापरीं दूषणें देती । दुर्दै-वातें ॥१४५॥ भरताची रामप्रीति । तीच कुणी प्रशंसिती । 'दशरथानें' कुणी म्हणती । 'निभावलें प्रेम' ॥१४६॥ आपणां निंदून मनीं । करिती गुहाची वाखाणणी । मोह-विषाद-वर्णनीं । शक्त कोण? ॥१४७॥ याप्रकारें सर्वांनीं । रात्र काढिली जागुनी । प्रभातीं नदी उतरुनी । जाऊं पाहती ॥१४८॥ नावेंत सुंदर अति । वसिष्ठातें बैसविती । नव नौकेंत चढविती ।

राजमाता ॥१४९॥ लोटतां घटिका चार । सर्वांनीं गांठलें परतीर । भरत घेई समाचार । सर्वांचाहि ॥१५०॥ आटोपतां प्रातर्विधि । भरत मातृपदा वंदी । ठेवी सद्गुरूंच्या पदीं । निज मस्तक ॥१५१॥ निषादाच्या समुदाया । अग्रभागीं करू-निया । चालवी त्या मागूनिया । आपली सेना ॥१५२॥ मग त्या निषादनायका । पुढतीं करून देखा । चालवी मातृ-शिविका । समस्तहि ॥१५३॥ धाकुटा बंधु शत्रुघ्न । सवें धाडी पाचारून । पाठवी वसिष्ठांलागून । विप्रांसह ॥१५४॥ स्वयें भागीरथीप्रति । करून आदरें प्रणति । स्मरून सीतारघुपति । लक्ष्मणासह ॥१५५॥ भरत स्वयें त्या समयीं । चालूं लागला पायीं । सवें लगामासह जाई । मोकळा अश्व ॥१५६॥ सेवक प्रामाणिक अति । वारंवार त्या विनविती । 'स्वामिन्! तुम्ही अश्वावरतीं । आरू-ढावें' ॥१५७॥ म्हणे, 'राम चापपाणि । चाले पायीं अनवाणी । सिद्ध केले मजलागुनी । गजाश्वरथ ॥१५८॥ डोक्यानें जावें चालत । हेंचि असें मज उचित । अति कठिण सेवाव्रत । सर्वां-हुनी" ॥१५९॥ पाहून भरताची स्थिति । ऐकून तन्मधुरोक्ति । दुःखानें व्याकुल होती । सेवक सारे ॥१६०॥ असो, चालतां यापरीं । भरत तो तिसऱ्या प्रहरीं । सपरिवार प्रवेश करी । प्रयागांत ॥१६१॥ 'सीताराम सीताराम' । मुखें गर्जतसे नाम । हृदयीं उचंबळलें प्रेम । वरचेवर ॥१६२॥ पदतलीं कोमल अति । फोड कैसे चमकती । जैसे पद्मदलांवरतीं । दंब-बिंदु ॥१६३॥ पायींच पातला भरत । ऐसा ऐकून वृत्तान्त । सकल समाज दुःखित । होय तेणें ॥१६४॥ सर्वंहि जाहले स्नात । ऐसें जाणूनिया भरत । येऊन करी प्रणिपात । त्रिवेणीतें ॥१६५॥ शुभ्र-श्यामलशा जलांत । स्नान करून विधियुक्त । सन्मानी तें

विप्रांप्रत । दान-मानें ॥१६६॥ शुभ्र-श्यामल तरंग । पाहून पुलकित सर्वांग । बद्धांजलि भरत मग । काय म्हणे ॥१६७॥ "पुरविसी कामना सर्व । तीर्थ-राजा ! त्वत्प्रभाव । वेदविख्यात, अनुभव । प्रत्यक्ष जगीं ॥१६८॥ सोडून आपुला धर्म । भीक मागतों मी अधम । दुःखार्त कोणतें कर्म । करणार नाहीं ॥१६९॥ ऐसें जाणूनिया चित्तीं । सुज्ञ ज्ञाते जे असती । याचना ते पूर्ण करिती । याचकांची ॥१७०॥ मज धर्मार्थकामाची । यत्किंचित् नसे रुचि । चाड निर्वाणपदाची । नाहीं मुळीं ॥१७१॥ श्रीरामाच्या पादपद्मीं । प्रेम राहो जन्मोजन्मीं । हेंचि मागे वरदान मी । अन्य न कांहीं ॥१७२॥ मजला 'कुटिल' म्हणून । समजो श्रीरघुनंदन । 'गुरु-स्वामी-द्रोही' जन । म्हणोत मज ॥१७३॥ सीतारामाच्या चरणीं । प्रेम मज अंतःकरणीं । वाढत राहो प्रतिदिनीं । तुझ्या कृपें ॥१७४॥ उदार मेघ जन्मभरीं । विसरला आठव जरी । जल याचितां टाकी वरी । वज्रपाषाण ॥१७५॥ चातकाची आर्तवाणी । जाय जरी क्षीण होउनी । तरी प्रेमातिरेकेंकरुनी । कल्याण होय ॥१७६॥ जेंवि अग्निसंगें हेम । मोल पावें अधिकोत्तम । तेंवि प्रियतम पदप्रेम । निभावून नें" ॥१७७॥ ऐकून भरताचे शब्द । त्रिवेणींतून विशद । निघाली मंगलप्रद । गंभीर गिरा ॥१७८॥ "बाळा भरता ! सावध । तूं सर्वतोपरीं शुद्ध । रामचरणीं अगाध । प्रेम तुझें ॥१७९॥ याकारणें निजांतरीं । व्यर्थ दुःख हें न करीं । प्रिय न कुणी तुझ्यापरी । राघवातें" ॥१८०॥ देह झाला रोमांचित । हर्ष ओसंडे हृदयांत । ऐकून अनुकूल भाषित । त्रिवेणीचें ॥१८१॥ 'धन्य धन्य भरता !' म्हणून । देव सारे आनंदून । करिती त्यापरी सुमन- । वृष्टि तेव्हां ॥१८२॥

प्रयागक्षेत्रनिवासी । सुप्रसन्न त्या समयासी । बटु, गृहस्थ संन्यासी । वानप्रस्थ ॥१८३॥ दहा-पांच एकत्र होती । एक-मेकांतें बोलती । 'भरताची शीलप्रीति । सत्य-शुद्ध' ॥१८४॥ सुंदर रामगुण-गणासी । ऐकत, कंठीत मार्गासी । मुनींद्र भर-द्वाजापाशीं । पातला तो ॥१८५॥ साष्टांग दंडवत् करितां । मुनीनें पाहून भरता । मानिली मूर्तिच तत्त्वतां । निज-भाग्याची ॥१८६॥ वेगें धांवून तें जाती । उठवूनिया आलिं-गिती । मुनि त्या कृतार्थ करिती । आशीर्वादें ॥१८७॥ मग त्या देती आसन । बैसे तो शिर नमवून । बसूं इच्छी जणुं धांवून । संकोच-गृहीं ॥१८८॥ कांहीं पुसतील मुनि । हीच चिंता त्याचे मनीं । ऋषि बोलती पाहुनी । संकोचशील ॥१८९॥ "ऐक भरता! आम्हांप्रत । ज्ञात झालें सर्व वृत्त । उपाय न चाले किंचित् । विधिघटनेवरी ॥१९०॥ बालका रे! निज चित्तीं । करूं नकोस मुळीं खंति । निज मातेची कपटकृति । जाणू-निया ॥१९१॥ अरे! कैकेयीचा यांत । दोष नाहीं यत्किंचित् । भ्रंशिलें तन्मतिप्रत । शारदेनें ॥१९२॥ ऐसेंहि म्हणतां कोणी । मानिती न योग्य म्हणुनी । सिद्धान्त-व्यवहार दोन्ही । बुध-संमत ॥१९३॥ तुझ्या शुद्ध यशालागुनी । बाळा भरता! गाउनी । महत्त्व पावतील दोन्ही । लोक-वेद ॥१९४॥ लोक-वेदांसी संमत । ऐसें म्हणती समस्त । 'पिता राज्य देई ज्याप्रत । तोचि पावे' ॥१९५॥ जरी सत्यव्रत भूपति । राज्य देतां तुजप्रति । सुख, धर्म, महत्त्व-प्राप्ति । होतीच तरी ॥१९६॥ परि रामाचें वनगमन । सर्व अनर्थां कारण । जें ऐकतां शूलासमान । सकल विश्वा ॥१९७॥ राणी भावी-वश होऊन । अज्ञानें कपट करून । अंतीं पश्चात्तापालागून । पावलीसे ॥१९८॥ त्यांत 'अल्पहि

तुजकडुनी । अपराध आला घडुनी’। म्हणेल तोच अज्ञानी । दुष्टाधम ॥१९९॥ राज्य जरी केलें असतें । त्यांत दोष नव्हता तूंतें । नव्हें, ऐकून राघवातें । संतोषचि ॥२००॥ बाळा भरता! सांप्रत । केलेंस उत्कृष्ट बहुत । तेंचि होतें उचित मत । तुज-लागीं ॥२०१॥ सकल मंगलांचें मूल । जगीं पाहतां केवल । श्रीरामाचें पदकमल- । प्रेम एक ॥२०२॥ तरी तो रघुनंदन । तुझें प्राण-धन, जीवन । महद्भाग्यवान् कोण । तुज-सारिखा ॥२०३॥ बाळा! तुजविषयीं जाण । नवल ना निश्चयेंकरून । राम-प्रियभ्राता, नंदन । दशरथाचा ॥२०४॥ हे भरता! घे ऐकुनी । श्रीरघुपतीच्या मनीं । तुजसमान नाहीं कोणी । प्रेमपात्र ॥२०५॥ राम-लक्ष्मण-जानकींनीं । अति-प्रेमभरेंकरुनी । ती रात्र तुज प्रशंसुनी । काढिलीसे ॥२०६॥ प्रयागीं करितां स्नान । मर्म घेतलें मी जाणून । त्रिवर्ग ते झाले मग्न । तुझ्या प्रेमीं ॥२०७॥ श्रीरामचंद्राची प्रीति । ऐसी असे तुजवरतीं । जैशी मूर्खाची जगतीं । सुखजीवनीं ॥२०८॥ परि ऐसी महत्तता । अधिक नव्हे रघुनाथा । भक्तकुटुंबा पोषितां । स्वभावेंचि तो ॥२०९॥ तुजविषयीं माझें मत । भरता! हेंचि निश्चित । रामप्रेमचि मूर्तिमंत । अवतर-लासी ॥२१०॥ भरता! तुज हा कलंक । वाटतो दृढमूलक । आम्हां सर्वां निश्चयात्मक । उपदेश हा ॥२११॥ श्रीरामाचा भक्तिरस । परिपूर्ण व्हावयास । झाला खरा या समयास । ‘ओ ना मा’ हा ॥२१२॥ भरता! त्वद्यश पुनीत । निशापति नवो-दित । कुमुदचकोरांप्रत । रामभक्तां ॥२१३॥ हा चंद्रमा सदा उदित । कदा यासी नसे अस्त । विश्वगगनीं वृद्धिगत । दिवसानु-दिवस ॥२१४॥ जीव-चक्रवाक् यावरी । प्रीति करितील

बहुपरीं । प्रभु–प्रतापार्क न हरी । शोभा याची ॥२१५॥ निशिदिनीं सर्वांसहि । सारखाच सुखदायी । ग्रासूं न शके कैकेयी– । कपट राहू ॥२१६॥ श्रीरामाचें प्रेमामृत । तेणें हा परिपूरित । गुर्वापमानें दूषित । होणार नाहीं ॥२१७॥ श्रीराम-चंद्राचे भक्त । अमृतें होतील तृप्त । सुलभ केलें त्वां अमृत । पृथ्वीवरी ॥२१८॥ भूप भगीरथें अवनीं । आणिलीसे स्वर्धुनी । जी सकल मंगल–खनि । स्मरणमात्रें ॥२१९॥ दशरथाच्या गुणतति । वर्णितां न वर्णवती । तदधिक कोण जगतीं ? । समहि न कुणी ॥२२०॥ ज्याच्या प्रेमसंकोचास । पूर्णपणें होऊन वश । प्रकटलासे जगदीश । राम स्वयें ॥२२१॥ ज्या प्रभूतें त्रिपुरारि । विलोकितां हृदयनेत्रीं । तृप्ति न पावे अंतरीं । कदापिहि ॥२२२॥ अगदींच अद्वितीय । तुझा यशश्चंद्र होय । रामप्रेमाचें वास्तव्य । मृगरूपें जिथें ॥ २२३ ॥ म्हणून बाळा भरता ! करूं नको मुळीं चिंता । कां भीसी परिस लाभतां । दारिद्र्यातें ? ॥२२४॥ तरी भरता ! घे ऐकुनी । असत्य न वदूं वाणी । तापसी, उदासीन वनीं । राहणारे ॥२२५॥ केल्या सर्व साधनांचें । सुफल हेंचि एक साचें । सीता–राम–लक्ष्मणाचें । दर्शन झालें ! ॥२२६॥ त्या दर्शनाचें केवल । तुझें दर्शन हेंचि फल । आमुचें सद्भाग्य निश्चल । प्रयागासह ॥२२७॥ धन्य भरता ! तूं विशेष । जगीं त्वां मिळविलें यश" । इतुकें बोलून मुनीश । प्रेमीं मग्न ॥२२८॥ ऐकून मुनींचे शब्द । आनंदले सभासद । 'धन्य' म्हणून सुरवृंद । वर्षती सुमें ॥२२९॥ प्रयागीं आणि गगनीं । 'धन्य धन्य' गर्जे ध्वनि । प्रेममग्न भरत ऐकुनी । वारंवार ॥२३०॥ देह झाला रोमांचित । सीताराम हृदयांत । प्रेमाश्रूंनीं परिपूरित । कमलनेत्र ॥२३१॥ तदा मुनि-

मंडळाप्रत । करूनिया प्रणिप्रात । गद्‌गद वाणीनें भरत । काय म्हणे ॥२३२॥ "मुनिसमाज सकळिक । प्रयागतीर्थनायक । खरी शपथ अप्रयोजक । अतिशयेंसी ॥२३३॥ येथें रचून कांहीं एक । सांगूं जातां कथानक । यासम नीचत्व, पातक । अधिक नाहीं ॥२३४॥ तुम्ही सर्वज्ञ सर्वजण । सद्‌भावें करितों कथन । जाणतो रघुनंदन । अंतर्यामीं ॥२३५॥ मातेची कपटकृति । तीहि मज न गमे खंति । अधम मानील मजप्रति । अथवा जग ॥२३६॥ मुकेल मज परलोक । याचें न भय नावेक । तैसा मजला न शोक । पितृमरणाचा ॥२३७॥ निज सुकृत-सद्यशानें। भरून टाकिलीं भुवनें। रामलक्ष्मणासम ज्यानें । मिळविले पुत्र ॥२३८॥ रामविरहें शरीर । सोडिलें जें क्षणभंगुर । शोचनीय तो नृपवर । होय कैसा ? ॥२३९॥ सीता-लक्ष्मण-रघुपति । पायीं अनवाणी त्रिमूर्ति । रानोमाळ भटकती । मुनिवेषें ॥२४०॥ अजिनवस्त्र परिधानून । करिती फलभक्षण । तृणपल्लवीं शयन । महीवरी ॥२४१॥ वृक्षाचिया तळवटीं । वास्तव्य करिती कष्टीं । शीतोष्ण-वात-वृष्टि । साहूनिया ॥२४२॥ याच दुःखानलें निश्चित । हृदय माझें आहे जळत । क्षुधा न दिवसां, येत । नीज रात्रीं ॥२४३॥ याच दुर्धर रोगावरी । औषध नाढळे परि । सकल विश्व निजांतरीं । शोधिलें मीं ॥२४४॥ मातृ-दुर्मति पापमूल । त्याच सुतारें कुशल । निर्मिला वाकस केवल । मद्धिताचा ॥२४५॥ कलह-काष्ठाचा कठिण । पुतळा सिद्ध करून । अयोध्येंत पुरला जपून । आधारस्तंभ ॥२४६॥ उपद्व्याप हा मदर्थ । जरी केलासे यथार्थ । परि सर्व जगा अनर्थ । ओढवलासे" ॥२४७॥ परत येतां रघुनाथ । तैंच टळेल अनर्थ । अयोध्येच्या सुखा व्यर्थ । उपाय दुजे" ॥२४८॥

भरत–वचन परिसुनी । तुष्टले भरद्वाज मुनि । प्रशंसिलें त्यालागुनी । सर्वांनींहि ॥२४९॥ "बाळा भरता! तूं अधिक । करूं नकोस गा! शोक । रामपद पाहतां दुःख । नाशेल सर्व" ॥२५०॥ बोध करून या रीतीं । भरद्वाज मुनि म्हणती । "हो आमुचा तूं अतिथि । प्राणप्रिय ॥२५१॥ कंद–मूल, फलफूल । जें जें देऊं तें सकल । कृपा करून केवल । ग्रहण करीं" ॥२५२॥ ऐकून मुनीचें वचन । भरताचें शंकित मन । समय हा दिसे कठिण । संकोच बहु ॥२५३॥ ( प्रयागीं मुनिपासून । स्वीकारावें का भोजन । याच विचारें त्याचें मन । संकोचलें ॥२५४॥) परि गुरूचें वचन । श्रेष्ठतम तें मानून । बद्धांजलि पद वंदून । काय म्हणे ॥२५५॥ "आज्ञा जी दिधली तुम्हीं । शिरीं वंदावी ती आम्हीं । इतुकाच आमुचा स्वामी! । परम धर्म" ॥२५६॥ भरताचें हें उत्तर । मुनि–मनास रुचलें फार । बाहती निकटतर । शुद्ध सेवकां ॥२५७॥ "भरताचा पाहुणचार । केला पाहिजे सादर । कंदमूलफल–संभार । घेऊन या" ॥२५८॥ 'बरें स्वामिन्!' म्हणून ते । नमवून स्वशिरातें । चालले निज कार्यातें । आनंदानें ॥२५९॥ मुनि सचिंत मानसीं । बाहिलें थोर पाहुण्यासी । जैशी देवता, तैशी । पाहिजे पूजा ॥२६०॥ ऐकतां आल्या सकळिक । ऋद्धिसिद्धिअणिमादिक । 'आज्ञेपरी आवश्यक । करूं स्वामिन्' ॥२६१॥ "श्रीरामाचा विरहानल । तेणें झालासे व्याकुल । भरत सानुज सकल । समाजासह ॥२६२॥ उत्कृष्ट पाहुणचार । करावा श्रमपरिहार" । ऐसें म्हणती मुनीश्वर । आनंदानें ॥२६३॥ मुनीश्वरांची आज्ञा ती । ऋद्धिसिद्धि संमानिती । भाग्यशालिनी मानिती । आपणांतें ॥२६४॥ मिळून सिद्धि समस्त । म्हणती

त्या आपसांत । "रामानुज हा अतुलित । अतिथि मह‍ा ।।२६५।। वंदून मुनिपदा आज । अवश्य तेंच करूं काज । जेणें सर्व राज-समाज । सुखी होय" ।।२६६।। बोलून हें, त्यांनीं नाना । रचिलें सुंदर भवनां । ज्या विलोकितां विमानां । लाज वाटे ।।२६७।। ऐश्वर्य, विलास अमित । भरून ठेविले त्यांत । देवहि पाहून ज्यांप्रत । लालचावती ।।२६८।। घेऊन सर्व सामुग्रीसी । दक्ष राहती दास–दासी । इच्छेनुसार सर्वांसी । द्यावयातें ।।२६९।। सर्व सिद्धता यापरीं । सिद्धि करिती पलांतरीं । जें सुख नाहीं सुरपुरीं । स्वप्नांतहि ।।२७०।। प्रथमतां देती सुंदर । निवास-स्थल सोयीस्कर । ज्याच्या त्याच्या रुचीनुसार । सर्वां-प्रति ।।२७१।। मग परिवारासहित । राहावया भरताप्रत । भरद्वाज मुनिनाथ । आज्ञापिती ।।२७२।। धात्यास वाटे आश्चर्य । ऐसें निर्मिती ऐश्वर्य । भरद्वाज मुनिवर्य । स्वतपोबलें ।।२७३।। मुनिप्रभाव अलौकिक । पाहतां भरतास सम्यक् । इंद्रादिकांचेहि लोक । वाटती तुच्छ ।।२७४।। ती सुखसामुग्री समस्त । होती वर्णनातीत । पाहतां वैराग्य विस्मृत । ज्ञात्याचेंहि ।।२७५।। तेथें आसनें, शयनें । सुंदर वसनें, वितानें । नाना वाटिका, वनें । विहंग, मृग ।।२७६।। सुगंधित पुष्पें विपुल । अमृतासम फलें सकल । सरोवरें तैशीं निर्मल । नानाविध ।।२७७।। खाद्य–पेयें ज्यां न मिति । अमृतासम शुद्ध अति । पाहतां जन संकोचती । संयमीपरी ।।२७८।। ( विकार करितील उत्पन्न । याकरितां योगी जन । होती संयमसंपन्न । विलासांत ।।२७९।। अयोध्येचे नारीनर । श्रीरामदर्शना आतुर । व्रतादि–नियमतत्पर । पथा-माजीं ।।२८०।। यास्तव विषय–विलास । भोगावयासी सोल्हास । संकोच वाटला त्यांस । निजांतरीं ।।२८१।। ) कामधेनु,

कल्पवृक्ष । घरोघरीं येथें प्रत्यक्ष । पाहतां लोलुप सहस्राक्ष । इंद्राणीसह ॥२८२॥ जेथें वसंत ऋतु सिद्ध । वायु वाहतसे त्रिविध । सुलभ पदार्थ चतुर्विध । सर्वांसहि ॥२८३॥ माला, चंदन, अनेक । भोगविलास, वनितादिक । सुखदुःख–वश लोक । अवलोकितां ॥२८४॥ चक्रवाकी ती संपत्ति । चक्रवाक् भरत-मूर्ति । मुनीची आज्ञा तेथ ती । गारुडीच ॥२८५॥ जेणें तया रात्रभरीं । कोंडून आश्रम–पंजरीं । ठेविलें, मग त्यावरी । उजाडलें ॥२८६॥ ( चक्रवाक्–युग्माप्रत । कोंडितां रात्रीं पिंजऱ्यांत । राहती विरहाकुलित । स्वाभाविक ॥२८७॥ जोंवर न सरे रात्र । तोंवरी न होती एकत्र । संयोग त्यांचा अणुमात्र । अशक्य जैसा ॥२८८॥ तेंवि त्या आश्रमीं भरत । विलास असतां प्राप्त । संयमी राहिला निश्चित । न भोगितां ॥२८९॥ ) तीर्थराज प्रयागांत । प्रभातीं होऊन स्नात । मुनीश्वरां वंदी भरत । सपरिवार ॥२९०॥ ऋष्याज्ञा, आशीर्वचन । शिरसा वंद्य करून । परोपरीनें वंदून । प्रार्थीतसे ॥२९१॥ वाटाडे कुशल अति । सर्व घेऊन सांगातीं । चालला वेधून वृत्ति । चित्रकूटीं ॥२९२॥ ( सोपानींचा मार्ग भला । जरी दीर्घतम वाटला । तदर्थ दहावा योजिला । विश्राम हा ॥२९३॥ रसिक भाविक श्रोत्यांस । विनवीतसे देवीदास । माझ्या बोबडचा बोलांस । मान्य करा ॥२९४॥ )

---

## विश्राम ११ वा

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्योनम
श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः

पुढें करून निषादाप्रत । चालला मार्ग क्रमीत । जणुं प्रेमचि झालें मूर्त । देहधारी ॥१॥ पादत्राण न पायांत । शिरीं छाया न किंचित् । प्रेम–नेम–धर्म–व्रत । निष्कपट ॥२॥ लक्ष्मण, राम आणि सीता । यांची वनयात्रा–कथा । मधुरवचें मित्रा पुसतां । तोहि सांगे ॥३॥ श्रीरामाच्या वसतिस्थाना । पाहून तेथील वृक्षांना । भरता प्रेम आवरेना । अंतर्यामीं ॥४॥ ऐसी तदवस्था पाहतां । सुमनें वर्षती देवता । मार्ग मंगल सुख-दाता । धरा मृदु ॥५॥ त्या समयीं तयावरती । मेघ छाया करूं लागती । वायूच्या लहरी येती । सुखदायक ॥६॥ वनीं चालतां रघुपति । मार्ग न लाधला या रीतीं । जैसा झाला भरताप्रति सुखदायक ॥७॥ स्थावर–जंगम जीव । मार्गींचे जे जे सर्व । ज्यांनीं पाहिला राघव । राघवें ज्यां ॥८॥ ते ते जीव देहधारी । परमपदाचे अधिकारी । भरतदर्शन मात्रा खरी । भव-रोगासी ॥९॥ भरताविषयीं ऐसें हें । आश्चर्यकारक नव्हें । ज्यातें मनीं स्मरताहे । स्वयें राम ॥१०॥ संसारीं जो एकवार । म्हणे, 'राम रघुवीर' । स्वयें तरून तो नर । इतरां तारी ॥११॥ भरत प्रिय रघुनाथा । त्यांतहि धाकुटा भ्राता । कैसा न होय सुखदाता । मार्ग तया? ॥१२॥ सिद्ध, साधु, मुनिनाथ । ऐसें म्हणती आपसांत । भरतदर्शनें हर्षभरित ।

हृदयांतरीं ॥१३॥ पाहून या प्रभावातें। चिंता उपजली इंद्रातें। भलें दिसतें भल्यातें। नीचास नीच ॥१४॥ गुरूस म्हणे सुरराय। "स्वामिन्! योजावा उपाय। राम–भरताची ना होय। भेट जेणें ॥१५॥ राम स्वयें अति भिडस्त। होतो प्रेमाच्या अंकित। भरत प्रेमाचा मूर्त। सागरचि ॥१६॥ आला योग जो जुळून। जाऊं पाहतो बिघडून। कपट काढावें शोधून। प्रयत्नानें" ॥१७॥ ऐकून वचन ऐसें। बृहस्पति मनीं हांसे। सहस्राक्ष परि भासे। आंधळाचि ॥१८॥ गुरु म्हणे, "क्षोभ द्वाड। छलबुद्धि सर्व सोड। कपट करितां उघड। होय येथें ॥१९॥ मायापतीच्या सेवकासी। योजूं जातां कपटासी। उलटेल तें निश्चयेंसी। देवराया! ॥२०॥ रामाची इच्छा जाणून। तेव्हां केलें कारस्थान। आतां निश्चयेंकरून। हानि होय ॥२१॥ ऐक देवेंद्रा! सुबुद्धि। श्रीराम–स्वभाव आधीं। स्वापराध्यावरी कधीं। रुष्टेल ना ॥२२॥ परि भक्ताचा अपराध। करील जो का निर्बुद्ध। रामकोपाग्नींत दग्ध। होईल तो ॥२३॥ लोकीं वेदीं सर्वांस। विदित असे इतिहास। जाणतो स्वयें दुर्वास। महिमा हा ॥२४॥ भरतासारखा कोण। श्रीरामाचा प्रेमी जन। जग रामास, ज्यालागून। राम जपे ॥२५॥ आणूं नको मनांत। अमरपते! तूं सांप्रत। विघ्न भक्त–कार्यांत। करायाचें ॥२६॥ इहलोकांत अपकीर्ति। परलोकीं दुःखप्राप्ति। दुःखपरंपरा या रीतीं। उत्तरोत्तर ॥२७॥ याकारणें हे सुरेश!। ऐक माझा उपदेश। प्राणप्रिय निज दास। राघवातें ॥२८॥ सेवकाची करितां सेवा। सुख वाटे श्रीराघवा। करितां सेवकाशीं हेवा। वैर वाढे ॥२९॥ जरी तो पक्षपातरहित। राग–लोभ न त्याप्रत। त्या न शिवे पुण्यदुरित–।

दोष--गुण ॥३०॥ यद्यपि या जगतांत । महत्त्व दिलें कर्माप्रत । जैसें करील, तसा प्राप्त । फलभोग त्या ॥३१॥ तथापि करी रघुराय । समविषम व्यवहार सत्य । जैसें भक्ता भक्तहृदय । तदनुसार ॥३२॥ राम अलक्ष्य, निर्गुण । एकरस, निरभिमान । भक्तप्रेमा वश होऊन । सगुण होय ॥३३॥ सेवकाचे मनोरथ । राम पुरवी सदोदित । वेद, पुराणें, देव, संत । यास साक्षी ॥३४॥ हें आणून अंतरीं । कुटिलता ती दूर करीं । भरतपदांप्रति धरीं । शुद्ध भावें ॥३५॥ जे का श्रीरामाचे भक्त । नित्य करिती परहित । परदुःखानें दुःखित । दयाळु ते ॥३६॥ मग भरत हा त्यांतुनी । आहे भक्तशिरोमणि । त्याचें भय न धरीं मनीं । देवेंद्रा रे! ॥३७॥ सत्यप्रतिज्ञ रघुनायक । देवांचा हितकारक । भरत तो प्रतिपालक । रामाज्ञेचा ॥३८॥ स्वार्थास होऊन वश । होसी व्याकुळ विशेष । यांत नसे भरत-दोष । अज्ञान तुझें" ॥३९॥ बृहस्पतीच्या उपदेशा । ऐकूनिया सुराधीशा । ज्ञात झालें, नुरे सहसा । चिंता मनीं ॥४०॥ आनंदून देवेंद्र तंव । करी पुष्पांचा वर्षाव । भरताचाच सद्‌भाव । वर्णीतसे ॥४१॥ एणें प्रकारें करुनी । भरत जातां पथांतुनी । त्याची अवस्था सिद्ध, मुनि । प्रशंसिती ॥४२॥ जेधवां म्हणून 'राम'। निश्वास टाकी भक्तोत्तम। चोहींकडून येई प्रेम । उचंबळुनी ॥४३॥ ऐकून तत्प्रेमोद्‌गार । वज्र-पाषाणा फुटे पाझर । नागरिकांचें प्रेम तर । अवर्णनीय ॥४४॥ मध्यें करून निवास । पातला यमुनातीरास । नीर लोटलें नेत्रांस । पाहतां जळ ॥४५॥ यमुना-जलाचा वर्ण। रामदेह-कांतिसमान । समाजासहवर्तमान । अवलोकुनी ॥४६॥ रामविरहसागरांत । मग्न झालासे भरत । विवेक-जलयानांत ।

आरूढ होय ।।४७।। त्या दिवशीं यमुनातीरीं । भरत तो निवास करी । विश्रांति मिळे समयापरी । सर्वांसचि ।।४८।। घाटा-घाटांच्या समस्त । नौका तेव्हां रातोरात । येत्या झाल्या अगणित । न वर्णवती ।।४९।। एका खेपेंत प्रातःकाळीं । सर्व मंडळी उतरली । सेवा करून तोषविली । निषादानें ।।५०।। स्नानें करून यमुनेंत । निघे वंदून भरत । अनुज, निषादनाथ । घेऊन सवें ।।५१।। वसिष्ठांचा श्रेष्ठ रथ । अग्रभागीं होता जात । राजसमाज समस्त । त्यामागुनी ।।५२।। उभयतां बंधु मिळुनी । चालती पायीं मागुनी । वस्त्रभूषणादिकरुनी । साधा वेष ।।५३।। सवें सेवक, सन्मित्र । सुमंत सचिवाचा पुत्र । सीता-राघव-सौमित्र । स्मरती मनीं ।।५४।। जेथें जेथें श्रीराम । करिता झाला विश्राम । करिती प्रेमें प्रणाम । त्या त्या स्थला ।।५५।। मार्गींचे रहिवासी जन । ऐकून हें वर्तमान । धांवत येती टाकून । गृह-कृत्यासी ।।५६।। दोघांचीं स्वरूपें पाहुनी । सर्वहि प्रेमेंकरुनी । जन्मसाफल्य मानुनी । प्रसन्न होती ।।५७।। आपसांत नारीगण । करीतसे संभाषण । "गडे हे रामलक्ष्मण । असावे कीं ।।५८।। देहरूप-वयोवर्ण । तोचि सखे ! ये दिसून । शील-प्रेम तत्समान । चाल तीच ।।५९।। वेष मात्र तैसा नसे । सवें सीता न दिसतसे । पुढें सेना चाललीसे । चतुरंगहि ।।६०।। मुखीं नसे प्रसन्नता । मानसीं वाटे खिन्नता । या भेदावरून चित्ता । संशय गमे" ।।६१।। तिचा तर्क स्त्रियांप्रति । मान्य झालासे चित्तीं । 'कुणी न शाहणी' म्हणती । 'तुज समान' ।।६२।। तिची करून वाखाणणी । तर्कातें अनुमोदुनी । दुजी युवती मृदु वचनीं । बोलतसे ।।६३।। घडला तो कथा प्रसंग । प्रेमें सांगे यथासांग ।

राज्याभिषेक-रसभंग । झाला जसा ।।६४।। भरताचें प्रेम, शील । स्वभाव, सद्भाग्य केवळ । प्रशंसून वर्णी सकल । पुनः पुन्हां ।।६५।। "पथानें चालला पायीं । केवल वन-फलें खाई । पितृदत्त राज्य तेंहि । टाकूनिया ।।६६।। श्रीरामाची समजूत । घालावया आहे जात । त्या भरतासम जगांत । कोण आज ? ।।६७।। भरताची बंधुप्रीति । आचरणीं शुद्धनीति । श्रवणें-कथनें हरिती । दुःख दूषणें ।।६८।। तत्संबंधीं जेवढें । बोलावें तितुकें थोडें । रामभ्राताच तो एवढें । नवल काय ? ।।६९।। बंधुसहवर्तमान । भरतातें अवलोकून । आम्ही सर्व स्त्रीगण । धन्य झालों" ।।७०।। त्याची अवस्था ऐकती । विचारून पस्तावती । 'पुत्र हा नाहीं' म्हणती । 'माते-सम' ।।७१।। कुणी म्हणती "राणीचा । दोष नसे यांत साचा । दैवयोगचि आमुचा । बलवत्तर ।।७२।। कोठें आम्ही स्त्रियाजन । लोकवेदविधिहीन । कुलानें, कर्मानें मलिन । स्वभावतां ।।७३।। दुष्ट देशीं कुग्रामीं । निवास करितों आम्ही । कोठें पुण्यपरि-णामी । दर्शन यांचें !" ।।७४।। प्रति ग्रामांत यापरी । आश्चर्या-नंद भारी । जणुं मरुभूमीभीतरीं । कल्पवृक्ष ।।७५।। भरत-दर्शनेंकरून । मार्गीं भेटती जे जन । उदयास आले पूर्ण । भाग्य त्यांचें ।।७६।। जणुं सिंहलद्वीपस्थां । होऊन दैवानुकूलता । सहज लाभला तत्त्वतां । प्रयागराज ।।७७।। स्वगुणासहवर्तमान । श्रीरामाचे गुणगण । ऐकत, रामाचें स्मरण । करीत जाय ।।७८।। तीर्थें, ऋष्याश्रम वनीं । देवता, मंदिरें पाहुनी । स्नान करून त्यांलागुनी । वंदीतसे ।।७९।। तेव्हां मनांतल्या मनांत । मागे वरदानाप्रत । 'सीताराम-पदाब्जीं नित । प्रेम राहो' ।।८०।। भेटती कोल-किरात । वास करिती जे वनांत । येती उदासी,

वानप्रस्थ। ब्रह्मचारी ॥८१॥ त्यां त्यां सर्वांलागुनी। पुसतसे नमस्कारुनी। "सांगा हो! कोणत्या वनीं।सीता–लक्ष्मण?" ॥८२॥ प्रभूच्या सर्व वृत्तान्ता। निवेदिती ते भरता। पावती जन्मसफलता। तद्दर्शनें ॥८३॥ जे म्हणती "आम्ही राम। अवलोकिला सक्षेम"। त्यांतें रामलक्ष्मणासम। प्रिय मानी ॥८४॥ ऐसें मृदुवचेंकरून। पुसतसे सर्वांलागून। राम–वनकथा-श्रवण। करीतसे ॥८५॥ त्या दिनीं करून वास। दुजे दिनीं प्रभातास। स्मरून रघुनाथास। निघाला तो ॥८६॥ कधीं पाहूं रामाप्रति। ऐसी आतुरता अति। सर्व परिवाराच्या चित्तीं। भरतापरी ॥८७॥ त्या समयीं सर्वांप्रति। नाना शुभ शकुन होती। सुखद स्फुरण पावती। नेत्र–बाहू ॥८८॥ सपरिवार भरता। उल्लास वाटला चित्ता। शमेल राम भेटतां। दुःखदाह ॥८९॥ जैसें ज्याचें मनोगत। तैसेंचि होती प्रवृत्त। प्रेममदिरेनें मत्त। क्रमिती पथ ॥९०॥ तनुगात्रें शिथिल होतीं। मार्गीं पाय डगमगती। प्रेमवशें ते बोलती। सद्‌गदित ॥९१॥ त्या समयीं निषादनाथ। दावीतसे सर्वांप्रत। सहजसुंदर पर्वत–। शिरोमणि ॥९२॥ ज्या चित्रकूटाचे निकटीं। मंदाकिनीनदी–तटीं। वास करिती वीरजेठी। सीतेसह ॥९३॥ अवलोकितां ते समस्त। करिती तया प्रणिपात। 'जय जय जानकी नाथ!'। म्हणूनिया ॥९४॥ यापरीं राजसमाज। प्रेममग्न झाला सहज। जणुं परतला रघुराज। अयोध्येसी ॥९५॥ त्या समयीं जयापरीं। प्रेम भरताचे अंतरीं। वर्णूं न शके तें परि। शेषहि स्वयें ॥९६॥ अगम्य तें कविप्रति। जैशी ब्रह्मसुख–प्राप्ति। अहंममतामलिनमति। मानवातें ॥९७॥ रामप्रेमानें शिथिल। झाले तैं लोक सकल। गेले लोपतां रविमंडळ। दोन कोस ॥९८॥

पाहून जलस्थलास । तेथें रात्रीं केला वास । रामभक्त प्रभा-
तास । निघते झाले ॥९९॥ तिकडें थोडी उरतां रात । जागा
झाला रघुनाथ । स्वप्न देखिलें अद्‍भुत । जानकीनें ॥१००॥
परिवारासमवेत । जणुं परतलासे भरत । स्वामीवियोगानलें
तप्त । होऊनिया ॥१०१॥ सर्वांचें मन उदासीन । दुःखी, कष्टी,
अति दीन । कशाशाच येती दिसून । सासवाहि ॥१०२॥ ऐकतां
सीतेचें स्वप्न । सजल जाहले नयन । शोकनाशक रघुनंदन ।
शोकग्रस्त ॥१०३॥ म्हणे, "हे लक्ष्मणा! पाहीं । स्वप्न हें
चांगलें नाहीं । कुणी ऐकवील कांहीं । दुष्ट वार्ता" ॥१०४॥
बोलून हें रघुनाथ । स्नान करी बंधुसहित । शिव पूजून साधु-
संत । संमानीतसे ॥१०५॥ सारून देवपूजेप्रत । मुनींतें करून
प्रणिपात । राम बैसे अवलोकीत । उत्तरदिशे ॥१०६॥ धूलीनें
नभ व्यापिलें । खगमृग व्याकुल झाले । धांवत येऊं लागले ।
आश्रमाकडें ॥१०७॥ उठूनिया रघुनंदन । अवलोकी काय
कारण । आश्चर्यचकित होऊन । जाय मनीं ॥१०८॥ तें सर्वहि
वर्तमान । कोलकिरातीं येऊन । प्रभूस केलें निवेदन । तदव-
सरीं ॥१०९॥ ऐकतां तें शुभ वचन । जाहलें प्रमुदित मन ।
शरीर गेलें होऊन । पुलकांकित ॥११०॥ शारदीय पद्मासमान ।
प्रभूचे दोन्ही नयन । गेले तैं डबडबून । प्रेमाश्रूंनीं ॥१११॥
परि तो सीतारमण । विचारी सचिंत होऊन । भरत येण्याचें
प्रयोजन ! काय असे ? ॥११२॥ कुणी येऊन तितुक्यांत । निवे-
दन केलें वृत्त । 'चतुरंगसेना अमित । भरतासवें' ॥११३॥ तें
ऐकतांच सांकडें । भारी विवंचना पडे । इकडें पित्राज्ञा, तिकडें ।
बंधुसंकोच ॥११४॥ भरतबंधूचा स्वभाव । जाणूनिया सानुभाव ।
स्वस्थता न गमे लव । प्रभुचित्तासी ॥११५॥ वाटलें तैं समा-

धान । स्वमनीं ऐसें जाणून । कीं, भरत समंजस, सुज्ञ । आज्ञाधारी ॥११६॥ प्रभूचें अस्वस्थ मन । अवलोकून लक्ष्मण । प्रासंगिक नीतिकथन । करीतसे ॥११७॥ म्हणे, “प्रभो! आज्ञेविना । कांहीं बोलतों वचना । समयीं धाडस, औद्धत्य ना । सेवकाचें ॥११८॥ सर्वज्ञशिरोमणि स्वामी! । यद्यपि आहांत तुम्ही । परि यथामति सेवकें मीं । सांगणें प्राप्त ॥११९॥ प्रभो! सुहृद् सर्वांप्रत । स्वभावें सरलचित्त । शील–प्रेमाचें साक्षात् । मंदिर तुम्ही ॥१२०॥ तुमची सर्वांवरी प्रीति । विश्वासहि सर्वांवरतीं । आपुल्यापरी सर्वांप्रति । लेखितसां ॥१२१॥ परि विषयांध प्राणी । प्रभुत्व पावतांक्षणीं । होतो मूढ, अभिमानी । मोहवशें ॥१२२॥ भरत नीतितत्पर अति । सज्जन तेंवि सन्मति । त्याची प्रभुपदप्रीति । विश्व जाणें ॥१२३॥ सांप्रत कैकेयीनंदन । राज्यपदा पावून । धर्ममर्यादा टाकून । चाललासे ॥१२४॥ बंधूस कुटिल, दुष्ट । साधून प्रसंग वाईट । जाणून एकाकी रघुश्रेष्ठ । वन–वासी ॥१२५॥ हेतु धरून घातुक । सज्ज करून कटक । कराया राज्य निष्कंटक । पातलासे ॥१२६॥ कोटिप्रकारें कुटिलता । कल्पून मानसीं आतां । सैन्य जमवून उभयतां । पातले हे ॥१२७॥ कपट नसतें अंतरीं । युद्धहेतु नसतां जरी । गजाश्वरथ नाना तरी । कासया हे? ॥१२८॥ भरतावरी करून रोष । काय म्हणून द्यावा दोष? । राज्यपद मिळतां विशेष । उन्मत्त जग! ॥१२९॥ चंद्र होऊन उन्मत्त । गुरुपत्नीशीं झाला रत । विप्रांकडून पालखीप्रत । वाहवी नहुष ॥१३०॥ वेदशास्त्र, लौकिक । यांसी होऊन पराङ्मुख । वेनाहून कोण अधिक । अधम भूप? ॥१३१॥ तैसाच सहस्रार्जुन । त्रिशंकू, सहस्रनयन ।

केलें कलंकित कुणास न । राज्यमदें ? ॥१३२॥ भरतें योजिला खचित । उपाय असे उचित । कुणीं न ठेवावें उर्वरित । शत्रु, ऋण ॥१३३॥ परि तेणें एक येथ । केलें नाहीं मुळीं उचित । निःसाह्य जाणून रामाप्रत । अनादरिलें ॥१३४॥ परि आजचि संमुख । प्रत्यया येईल निःशंक । रणीं सक्रोध राममुख । विलोकुनी !" ॥१३५॥ लक्ष्मण इतुकें बोलला । नीतितत्त्वातें विसरला । वीररसवृक्ष फुलला । रोमांचमिषें ॥१३६॥ प्रभूपदांतें वंदून । शिरीं रज करून धारण । करी स्वबलसमर्थन । प्रतिज्ञेनें ॥१३७॥ म्हणे, "प्रभूंनीं मदुक्त । न मानावें अनुचित । आम्हांस्तव उपाय बहुत । भरतें केले ॥१३८॥ मन मारून वरचेवर । सहन करावें कुठवर । असतां स्वामी बरोबर । धनुष्य हातीं ? ॥१३९॥ मी तों क्षत्रिय स्वभावतां । रघुकुलीं जन्मलों स्वतां । श्रीरामाचा लघु भ्राता । विश्व जाणें ॥१४०॥ करितां लत्ताप्रहार । चढून बसते शिरावर । त्या धूलिसम नीचतर । अन्य कोण ?" ॥१४१॥ (धूलि इतुकी नीच तरी । लत्ताप्रहार होतां परि । सूड घ्यावया शिरावरी । जाऊन बैसे ॥१४२॥ मग मी क्षत्रिय असून । कां तरी हें करूं सहन । निज मनोगतनिवेदन । ऐसें करी ॥१४३॥) उठून कर जोडून । अनुज्ञा मागे लक्ष्मण । वीररस निद्रामग्न । जागला जणुं ! ॥१४४॥ शिरीं बांधिलें जटेतें । कटीस कसिले भाते । घेऊन धनुर्बाण हातें । काय म्हणे– ॥१४५॥ "राम–सेवक म्हणून । आज यश मी संपादीन । धडा देईन घालून । भरता रणीं ॥१४६॥ श्रीरामाचा अनादर । तत्फल हेंचि कटुतर । निजा रणशय्येवर । उभयतांहि ॥१४७॥ सर्वसमाजासहित । पातला हें बरें खचित । उगवीन पूर्वीचा सांप्रत । सूड सारा ॥१४८॥ गज़समूहा ज्या-

परीं । निर्दाळीतसे केसरी । झडपे लावी पक्ष्यांवरी । ससाणा जसा ॥१४९॥ सैन्यासहवर्तमान । तैसेंचि भरतालागून । रणीं लोळवीन निर्भर्त्सून । अनुजासवें ॥१५०॥ प्रत्यक्ष कैलासनाथ । जरी आला तत्साह्यार्थ । तरी रामाचीच शपथ । वधीन रणीं" ॥१५१॥ संतापयुक्त अति । पाहून लक्ष्मणाप्रति । ऐकून प्रतिज्ञोक्ति । शपथयुक्त ॥१५२॥ घाबरले लोक सकळ । त्याचपरी लोकपाळ । इच्छिती काढाया पळ । भराभर ॥१५३॥ जग गेले घाबरुनी । झाली तैं आकाशवाणी । बहूत बाहुबल वर्णी । लक्ष्मणाचें ॥१५४॥ "त्वत्प्रभाव–प्रताप–बल । कोण बापा ! वर्णू शकेल ? । केवळ जाणणारा असेल । कोण तरी ? ॥ १५५ ॥ इष्टानिष्ट कोणतेंहि । कार्य जें असेल कांहीं । जाणून करितां सर्वहि । म्हणती भले ॥१५६॥ अविचारें साहस करिती । ते पश्चात्ताप पावती । 'सुज्ञ' न त्यातें म्हणती । वेद, बुध" ॥१५७॥ ऐकतां ती देववाणी । लक्ष्मण ओशाळला मनीं । सीतारामा नम्रपणीं । नमस्कारी ॥१५८॥ लक्ष्मणास म्हणे रघुपति । "कथिली त्वां राजनीति । राज्यमद तो कठिण अति । सर्वांहुनी ॥१५९॥ प्राशितां राज्यमदाप्रत । तेचि राजे होती मत्त । सेविली न ज्यांनीं किंचित् । संतसभा ॥१६०॥ ऐक ताता ! भरतापरी । साऱ्या ब्रह्मांडाभीतरीं । सज्जन पाहिला ना परि । ऐकिला ना ॥१६१॥ लक्ष्मणा ! भरतास कांहीं । राज्यमद होणार नाहीं । विधिहरिहर-पदहि । प्राप्त होतां ॥१६२॥ (वांयाच नको त्या निंदू) । कांजीचा पडतां बिंदु । नासेल का क्षीरसिंधु । कधीं तरी ॥१६३॥ माध्यान्हींच्या सूर्याप्रत । करूं शकेल तमोग्रस्त । नभ सामावेल मेघांत । किंबहुना ॥१६४॥ गोष्पदांइतुकें जल । त्यांत अगस्ति

बुडेल । पृथ्वी क्षमा सोडील । स्वाभाविक ॥१६५॥ मशकाच्या फुंकेसरशीं । मेरू उडेल आकाशीं । परि राज्यमद भरतासी । होणार नाहीं ॥१६६॥ पित्याची तुझ्यासहित । सांगतों घेऊन शपथ । नाहीं बंधु शुचिष्मंत । भरतासम ॥१६७॥ क्षीरनीरापरी तात ! । गुण आणि दोष मिश्रित । रचिलें या प्रपंचांत । विधात्यानें ॥१६८॥ रविवंशमानससरसीं । भरत हंस निश्चयेंसी । गुणदोष–विभागांसी । जन्मून करी ॥१६९॥ गुणक्षीर स्वीकारिलें । अवगुण-जल त्यागिलें । निज यशानें उजळिलें । जगचि तेणें" १७०॥ भरत-शील-स्वभावगुण । करीत असतां वर्णन । प्रेमसागरीं निमग्न । रघुराज तो ॥१७१॥ श्रीरामाचें तें भाषण । देवांनीं करून श्रवण । भरताविषयीं पाहून । प्रेम त्याचें ॥१७२॥ प्रशंसून तयाप्रति । सर्वहि करिती स्तुति । "रामासम कोण" म्हणती । "कृपानिधि" ॥१७३॥ "भरताचा जन्म जरी । झाला नसतां पृथ्वीवरी । सर्वधर्म–धुरा तरी । धरिते कोण ? ॥१७४॥ भरताचे गुण समस्त । अगम्य कविकुलाप्रत । तुझ्याविण कुणा ज्ञात । रघुनायका !" ॥१७५॥ ऐकून त्या सुरवचना । सीतारामलक्ष्मणा । झाला तो वर्णवे ना । अत्यानंद ॥१७६॥ असो इकडे भरत । सर्व परिवारासहित । पवित्र मंदाकिनींत । स्नान करी ॥१७७॥ नदीनिकट स्थलास । थोपवूनिया सर्वांस । मातृ–गुरु–सचिवाज्ञेस । घेऊनिया ॥१७८॥ भरत चालला त्वरित । जेथें सीतारघुनाथ । शत्रुघ्न–निषाद समवेत । घेऊनिया ॥१७९॥ जननीच्या कारस्थाना । जाणून संकोच मना । करी कोटयवधि कल्पना । निजांतरीं ॥१८०॥ "सीता–लक्ष्मण–राघव । ऐकतांच माझें नांव । अन्यत्र सोडून ठाव । जातील का ? ॥१८१॥ जननीच्या कर्तृत्वांत । मजहि

जाणून संमत । जें जें करितील समस्त । थोडेंचि तें ! ॥१८२॥ माझें पाप, अवगुण । सर्वहि क्षमा करून । मानितील मजलागून आपुलाच का ? ॥१८३॥ कुटिल जाणून निःशंक । त्यागो मज रघुनायक । किंवा सन्मानो सेवक । मानून मज ॥१८४॥ तरी मी शरण निश्चितीं । रामाच्या पादुकांप्रति । श्रेष्ठ स्वामी रघुपति । दोषी मीच ॥१८५॥ जगीं चातक आणि मीन । हेचि खरें यशोभाजन । निज नेमप्रेमें निपुण । नूतनचि" ॥१८६॥ ऐसें मनीं विचारीत । चालला मार्ग क्रमीत । गात्रें शिथिल समस्त । प्रेम-संकोचें ॥१८७॥ मातेची कपटकृति । फिरवी तन्मना मागुतीं । परि धैर्यें चाले पुढतीं । भक्तिबलें ॥१८८॥ श्रीरघुनाथाचें शील । आठवतांचि तत्काल । वाटेनें पडे पाऊल । उतावीळपणें ॥१८९॥ भरताची मनस्थिति । त्या समयीं कैशा रीतीं । जैसी जलकीटगति । प्रवाहांतरीं ॥१९०॥ भरताची शोक-प्रीति । अवलोकुनी निषादपति । पावला विदेहस्थिति । तदवसरीं ॥१९१॥ मंगल शकुन होती । ऐकूनिया तयांप्रति । अनुमानून निषादपति । काय म्हणे ॥१९२॥ "होऊन दुःखाचा नाश । होईल क्षणमात्र हर्ष । परि शेवटीं अमर्ष[1] । होय दिसे" ॥१९३॥ सेवकाचें तें भाषण । भरतें मानिलें प्रमाण । आश्रमानिकट येऊन । पोंचले ते ॥१९४॥ वनीं पर्वतराजीप्रत । अवलोकून भरत । हर्षे जणुं का क्षुधित । पक्वान्न-लाभें ॥१९५॥ षड्विधि[2] कृषि विघ्नयुक्त । प्रजा जणुं का दुःखित । ग्रहग्रस्त वा पीडित । त्रिविध-तापें ॥१९६॥ सुदेशींच्या सुराज्यांत । जातांच होई प्रमुदित । भरताची अवस्था तद्वत् । जाहलीसे ॥१९७॥

---

१. दुःख २. अतिवृष्टिरनावृष्टिर्मूषकाः शलभाः शुकाः ।
अत्यासन्नाश्च राजानः षडेता ईतयः स्मृताः

रामाच्या वास्तव्यें निश्चित । वनश्री ती सुशोभित । सुराज्य पावतां मुदित । प्रजाच जणुं ॥१९८॥ तेथ ज्ञान तोचि भूपति । वैराग्य मंत्री सन्मति । देश तो पवित्र अति । सुंदरवन ॥१९९॥ यमनियमादिक सेनानी । चित्रकूट राजधानी । शांति-सन्मति ह्या राणी । सुंदर, शुचि ॥२००॥ सर्वांगांनीं परिपूर्ण । सुंदर तो नरभूषण । रामपदाश्रयें प्रसन्न । निज मानसीं ॥२०१॥ सैन्या-सहित सकल । जिंकिले अज्ञान-भूपाल । शोभे विवेक महिपाल । सार्वभौम ॥२०२॥ राज्य करी निष्कंटक । तया नगरीं निःशंक । अपरिमित संपत्सुख । निरंतर ॥२०३॥ ऐशा वनप्रदेशांत । मुनींचे आश्रम अमित । तींच जणुं शहरें तेथ । खेडीं-पाडीं ॥२०४॥ विविध वर्णांचे हरिण । नानापरी पक्षीगण । तेच तेथील प्रजाजन । अवर्णनीय ॥२०५॥ गर्दभ आणि गज—सिंह । व्याघ्र तैसेचि वराह । महिष, वृक प्रशंसार्ह । देख-तांचि ॥२०६॥ सोडून वैर परस्पर । एकत्र करिती संचार । चतुरंग सेनाभार । तेथील जणुं ॥२०७॥ निर्झरांचा खळखळाट । मत्त गजांचा गोंगाट । जणुं वाद्यांचा खणखणाट । नाना-विध ॥२०८॥ चकोर आणि चक्रवाक् । शुक, कोकिला, चातक । कूजती हंस मोहक । मुदित मनें ॥२०९॥ भृंगसमुदाय गाती । मत्त मयूर नाचती । जणुं सुराज्यासभोंवतीं । आनंद-पूर्ण ॥२१०॥ वृक्ष—वेली—तृण कोमल । पुष्प—फलांनीं संकुल । मोदमंगलाचें मूल । दृश्य सारें ॥२११॥ श्रीराम[1]शैल—सौंदर्य । अवलोकून साश्चर्य । भक्त भरताचें हृदय । प्रेमयुक्त ॥२१२॥ जैसे का तपस्वी जन । तपःफलातें पावून । व्रतनियम विसर्जून । सुखी होती ॥२१३॥ निषाद तो तदवसरीं । चढून उंच टेकडी-

---

१ चित्रकूट

वरी । बाहु उभारून उद्गारी । भरताप्रति ।।२१४।। "भरतराज पहा विपुल । वृक्ष केवढे विशाल । पाकळ, जंबु, तमाल । आम्रादिक ।।२१५।। त्या वृक्षांच्या मध्यवर्ती । वटवृक्ष शोभे अति । रम्य, भव्य, मनाप्रति । दर्शनें मोही ।।२१६।। नील, सघन पर्णावलि । फळे आरक्त लागलीं । छाया अखंड सर्व कालीं । सुखदायक ।।२१७।। जणुं तिमिर–अरुणासी । मिसळून केली राशि । तच्छोभा रचिली ऐसी । विधात्यानें ।।२१८।। त्याच वृक्षाचे निकटीं । नदी वाहते गोमटी । जेथें रचिली पर्णकुटी । राघवानें ।।२१९।। तुलसीचे वृक्ष तेहि । विराजती शोभादायी । लाविले राघवें कांहीं । लक्ष्मणानें ।।२२०।। वट-तरूच्या छायातलीं । सुंदर वेदी रचिली । स्वयें निज करकमलीं जानकीनें ।।२२१।। घेऊन मुनिपरिवार । बसून त्या वेदीवर । सुज्ञ सीता–रघुवीर । सदोदित ।।२२२।। वेदान्त-शास्त्र-पुराणां । इतिहासकथा नाना । अति आदरानें श्रवणा । करिती स्वयें" ।।२२३।। निषादाचें ऐकून उक्त । विलोकून वृक्षाप्रत । नेत्र झालें अश्रुपूरित । भरताचे ।।२२४।। करूनिया प्रणिपाता । चालले ते उभयतां । संकोचे प्रेम वर्णितां । सरस्वती ।।२२५।। रामचरणांचें चिन्ह । पाहून होती प्रसन्न । जणुं रंकालागून । परिसलाभ ।।२२६।। पदरज शिरीं धरिती । हृदय-नेत्रांतें लाविती । रामभेटीचा भोगिती । आनंद मनीं ।।२२७।। अकथ-नीय अतीव । पाहून भरतभाव । प्रेममग्न जड जीव । खग-मृगादि ।।२२८।। निषादहि प्रेमवश । विसरून गेला वाटेस । देव वर्षिती पुष्पांस । दावून पथ ।।२२९।। सिद्ध, साधकहि जन । पाहून होती प्रेममग्न । त्या सहजप्रेमालागून । वर्णिती तें ।।२३०।। "भरताचा भाव जरी । प्रकटला नसतां भूवरी । जडा चेतन

कोण करी । चेतना जड ?" ॥२३१॥ (देव स्वयें जड झाले । त्यांसी तेणें चेतन केलें । वाट चुकतां दावूं लागले । निषादासी ॥२३२॥ निषाद असून चेतन । भरतप्रेमें जड होऊन । मार्गदर्शक असून । चुकला पथ ॥२३३॥) भक्त तेचि देव येथ । मंथून त्यांच्या हितार्थ । निर्मी समर्थ रघुनाथ । कृपासिंधु ॥२३४॥ निषादासह मनोहर । युग्म न झालें दृग्गोचर । कारण होती समोर । दाट झाडी ॥२३५॥ भरतें केला विलोकन । प्रभूचा आश्रम पावन । सकल आनंदाचें सदन । सुंदर अति ॥२३६॥ त्यांत होतांचि प्रविष्ट । दुःखाग्नि झाला नष्ट । जणुं मुक्तिलाभ प्रकट । योग्याप्रति ॥२३७॥ (सोपानींचा मार्ग भला । जरी दीर्घतम वाटला । तदर्थ अकरावा योजिला । विश्राम हा ॥२३८॥ रसिक भाविक श्रोत्यांस । विनवीतसे देवीदास । माझ्या बोबडचा बोलांस । मान्य करा ॥२३९॥)

---

## विश्राम १२ वा

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्योनमः
श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः

भरतें पाहिला लक्ष्मण । प्रभुसन्मुख करी प्रश्न । प्रभुहि त्या वदे वचन । प्रेमयुक्त ॥१॥ शिरीं शोभे जटाजूट । कटीं तूणीर, मुनिपट । बाण हातीं, चाप श्रेष्ठ । स्कंधावरी ॥२॥ वेदीवरी उपस्थित । मुनीश्वर, साधु, संत । सीतेसह रघुनाथ । विराजमान ॥३॥ शिरीं जटा, वल्कल नेसे । तनु श्यामवर्ण विलसे । रतिकामें धरिलासे । मुनिवेष जणुं ॥४॥ करकमलीं

धनुर्बाण । लीलेनें फिरवी जाण । हृत्ताप करी हरण । स्मित–कटाक्षें ॥५। मुनिसमूह सभोंवती । तयाच्या मध्यवर्ती । शोभे सुंदर रघुपति । जानकीसह ॥६॥ जणुं ज्ञानाच्या सभेंत । देह-धारी मूर्तिमंत । भक्तिसमवेत साक्षात् । सच्चिदानंद ॥७॥ शत्रुघ्न–निषादासहित । मग्न झालासे भरत । विसरे सुखदुःखा-प्रत । हर्षशोकहि ॥८॥ 'पाहि माम् पाहि माम्' ऐसें । एक-सारखें म्हणतसे । दंडवत् तो पडतसे । पृथ्वीवरी ॥९॥ सप्रेम तद्वचनाप्रत । ओळखी सुमित्रासुत । प्रणाम करितसे भरत । जाणे मनीं ॥१०॥ रसयुक्त बंधुप्रेम । एकीकडें निस्सीम । स्वामीसेवा कठिणतम । दुसरीकडें ॥११॥ बंधूस न ये भेटतां । उपेक्षाहि न ये करितां । लक्ष्मणाची मनोवस्था । कथिती कवि ॥१२॥ मुख्य मानून सेवेप्रत । ठेवून तिजवरी भिस्त । न उठतां सुमित्रासुत । स्वस्थ बैसे ॥१३॥ वावडी उडतां आकाशीं । ओढी उडविणाऱ्याशीं । परि भारें ती तयासी । ओढूं न शके ॥१४॥ (भरताविषयींची प्रीति । हीच वावडी निश्चितीं । ओढूं पाहे तयाप्रति । आपणाकडें ॥१५॥ परि रामसेवाधिक्य । तेणें तें झालें अशक्य । सेवाच मानून मुख्य । बसून राहे ॥१६॥ उठून भेटावें भरता । ऐसें वाटे जरी चित्ता । मानून सेवेची महत्तता । उठला न तो ॥१७॥) भूवरी नमवून माथा । लक्ष्मण म्हणे रघुनाथा । "प्रभो! भरत प्रणिपाता । करीतसे" ॥१८॥ ऐकून उठे घननीळ । प्रेमें झाला उतावीळ । कशाचेंहि भान तिळ । उरलें नाहीं ॥१९॥ स्कंधींचें गळलें वसन । कसला भाता, धनुर्बाण । ऐसें तें गेलें होऊन । राघ-वातें ॥२०॥ बळेंचि त्या भरतासी । उठवून हृदयासी । कव-टाळी त्या समयासी । कृपानिधि ॥२१॥ रामभरताचें मीलन ।

निजदृष्टीं विलोकून । हरपून गेलें भान । सर्वांचेंहि ॥२२॥ त्या भेटींतील प्रीति । वर्णन करावी किती । अगम्य कविकुलाप्रति । वाङमनःकर्में ॥२३॥ उभयतां राम–भरत । परम प्रेम–प्रपूरित । मन, बुद्धि, अहं, चित्त । विसरले ते ॥२४॥ प्रकट करील प्रीति । कोणत्या कवीची मति । त्या प्रेमाच्या छायेप्रति । अनुसरेल ॥२५॥ कवीचें अवघें बल । अक्षरार्थावरी केवळ । नट नाचे जैसा ताल । तदनुसार ॥२६॥ (वाच्यत्व अक्षरांप्रति । म्हणूनिया अर्थापत्ति । प्रेमाची पाहतां स्थिति । अनिर्वाच्य ॥२७॥ अनिर्वाच्य ऐसी प्रीति । वर्णूं जातां कविप्रति । धरावें लागतें निश्चितीं । मौन मात्र ॥२८॥) राम–भरताची प्रीति । निस्सीम, अगम्य अति । विधि–हरि–हरांची मति । रिघे न जिथे ॥२९॥ तें प्रेम मी मंदमति । वर्णूं तरी कैशा रीतीं । पिंजणीची तंतू किती । बोलेल राग? ॥३०॥ रामभरताचें मीलन । दुष्टीनें अवलोकून । धडकी भरून देवगण । भयभीत ॥३१॥ समजावितां बृहस्पति । जागृत होती मंदमति । पुष्पवर्षाव करिती । प्रशंसुनी ॥३२॥ मग प्रेमेंकरून । निषादपति–शत्रुघ्न । या दोघां रघुनंदन । भेटलासे ॥३३॥ महाभाग तो लक्ष्मण । तैं त्या भरतालागून । भेटूनिया कडकडून । प्रणाम करी ॥३४॥ शत्रुघ्नास लक्ष्मण । भेटला कडकडून । हृदयीं घे कवटाळून । निषादातें ॥३५॥ भरत–शत्रुघ्ना अथांग । उचंबळे अनुराग । सीतापदाब्ज–पराग । धरिती शिरीं ॥३६॥ पुनः-पुन्हां नमस्कारितां । उठवी दोघांस सीता । शिरीं ठेवून पद्म-हस्ता । बैसवी तयां ॥३७॥ जानकीनें मनांतून । दिलें त्या आशीर्वचन । तिजहि नुरे देहभान । मग्न प्रेमीं ॥३८॥ सर्वतो-परी सीता । प्रसन्न, हें विलोकितां । निश्चित झाले उभयतां ।

निर्भय मनीं ॥३९॥ कोणी न बोलले कोणा । कोणी कांहीं विचारीना । प्रेमभरें नुरलें मना । भान कांहीं ॥४०॥ तोंचि तो निषादपति । धीर धरूनिया चित्तीं । कर जोडूनिया प्रार्थी । नमूनिया ॥४१॥ "श्रीवसिष्ठ मुनिनाथ । प्रभो! तयांच्या समवेत । राजमाता त्या समस्त । नागरिक ॥४२॥ सेनाधिपति, सेवक । प्रधानहि सकलिक । विरहव्याकुल आत्यंतिक । आले येथ" ॥४३॥ सद्गुरूचें येणें झालें । शीलसिंधूनें ऐकिलें । सीतेसमीप ठेविलें । शत्रुघ्नातें ॥४४॥ त्याच समयीं रघुवीर । निघता झाला सत्वर । धैर्य-धर्म-धुरंधर । दीनबंधु ॥४५॥ विलोकितां सद्गुरूंप्रत । बंधूसह प्रेमयुक्त । दंडप्रणाम रघुनाथ । करीतसे ॥४६॥ तै मुनीश्वर धांवुनी । हृदयासी कवटाळुनी । भेटती प्रेमेंकरुनी । उभयतांसी ॥४७॥ निषाद प्रेम-पुलकित । सांगून निज नामाप्रत । करी दुरून दंडवत । वसिष्ठांतें ॥४८॥ रामसखा तो निश्चितीं । मुनि त्या बळेंचि भेटती । जणु प्रेमचि सांवडिती । भूवरीचें ॥४९॥ श्रीरामभक्ति निर्वाणीं । सुमंगलाची जननी । नभीं देव प्रशंसुनी । वर्षती सुमें ॥५०॥ "याच्या सम नीच अति । कुणीच नाहीं निश्चितीं । वसिष्ठासारखा जगतीं । श्रेष्ठ कोण? ॥५१॥ ज्यातें पाहून निःशंक । लक्ष्मणाहून अधिक । भेटले मुनिनायक । आनंदानें ॥५२॥ सीतापतीचें भजन । त्याचाचि निश्चयेंकरून । हा तो प्रभाव, महिमान । प्रत्यक्षचि" ॥५३॥ विरह-दुःखें दुःखित । जाणे सर्व लोकांप्रत । करुणानिधान भगवंत । चतुर अति ॥५४॥ जो जो आपुल्या मानसीं । जैसें जैसें अभिलाषी । प्रभु ती वासना तैसी । पूर्ण करी ॥५५॥ लक्ष्मणासहवर्तमान । पळांत सर्वां भेटून । संताप, दुःख, दारुण । दूर करी ॥५६॥ तरी रामाविषयीं ही ।

आश्चर्याची गोष्ट नाहीं । सूर्य प्रतिबिंबून राही । कोटि घटीं ॥५७॥ प्रेम उचंबळे चित्तीं । निषादपतीतें भेटती । निज भाग्य प्रशंसिती । सर्व लोक ॥५८॥ अवलोकी रघुनाथ । दुःखित निजमातेप्रत । जणुं झाला हिमाघात । सुवेलीवरी ॥५९॥ प्रथमतां श्रीरघुपति । भेटला कैकेयीप्रति । सुस्वभाव-प्रेमें तन्मति । शीतल करी ॥६०॥ मग धरून तत्पदा । समजावी करून बोधा । दोष कालकर्मप्रारब्धा । लावूनिया ॥६१॥ तद-नंतर रघुनाथ । भेटे सर्व मातांप्रत । समजावून शांतवीत । काय म्हणे ॥६२॥ "माउली ! हें जगत् सर्व । ईश्वराधीन । सदैव । दोष न द्यावा यास्तव । कोणासहि" ॥६३॥ उभय बंधु वंदिती । अरुंधतीच्या पदांप्रति । आल्या विप्रस्त्रिया संगतीं । त्यांच्यासह ॥६४॥ गंगा–पार्वतीसमान । मानिती त्यांलागून । मृदुवचें आशीर्वचन । त्याहि देती ॥६५॥ स्पर्शूनिया पदांप्रति । सुमित्रांकीं बिलगती । अति रंकातें संपत्ति । लाभली जणुं ॥६६॥ कौसल्येच्या पदांप्रति । उभयतां मिठी मारिती । तें प्रेमव्याकुल होतीं । सर्व गात्रें ॥६७॥ कौसल्येनें प्रेमबलें । हृदयीं त्यां कवटाळिलें । तदुपरी न्हाऊं घातलें । प्रेमाश्रूंनीं ॥६८॥ तेव्हांचा हर्षविषाद । कवि कैसा करील विशद । ज्यापरीं मुक्यासी स्वाद । सांगतां न ये ॥६९॥ बंधूसह रघुनाथ । भेटून जननीप्रत । गुरूस म्हणे, 'आश्रमांत । पाय ठेवा' ॥७०॥ सकल अयोध्येचे जन । होतां गुर्वानुशासन । उतरूं लागले पाहून । जलस्थल ॥७१॥ ब्राह्मण, मंत्री, जननी । त्यापरी वसिष्ठ मुनि । आपुल्यासंगें घेउनी । लोक बहु ॥७२॥ पवित्र आश्रमाप्रत । घेऊन जाती त्वरित । राम–लक्ष्मण–भरत । त्रिवर्ग तें ॥७३॥ जानकी येऊन तदा । वंदी मुनीश्वरपदां । मिळवी

उचिताशीर्वादा । मनोवांछित ॥७४॥ मुनिस्त्रियांसमवेत । सती अरुंधतीप्रत । भेटे तें प्रेम खचित । वर्णवेना ॥७५॥ सर्वां-च्याहि पदांप्रत । करून सीता प्रणिपात । मिळवी मनोवांछित । आशीर्वाद ॥७६॥ सर्वहि सासवांप्रति । जेव्हां पाही सीता सती । नेत्र झांकी सुकुमारी ती । घाबरून ॥७७॥ जणुं वधि-काच्या पाशीं । अचुक सांपडली हंसी । 'देवा! घाला घातलासी । केवढा हा' ॥७८॥ पाहूनिया जानकीतें । अति दुःख सासवांतें । 'दैव साहवील तें तें । साहणें भाग' ॥७९॥ तेधवां जनकनंदिनी । धैर्य धरी निज मनीं । नीलपद्मनेत्र भरुनी । दुःखाश्रूंनीं ॥८०॥ जाऊन सीता जेधवां । भेटली सर्वहि सासवां । भूमी व्यापिली तेधवां । कारुण्यरसें ॥८१॥ सर्वां-च्याहि पदांप्रति । वंदूनिया अति प्रीतीं । पृथक्पणीं सीता सती । भेटलीसे ॥८२॥ प्रेमवशें सासवा सर्व । मनींचे मनीं देती तंव । 'अखंड सौभाग्यवती भव' । आशीर्वाद ॥८३॥ सीते-सह सर्व राज्ञी । प्रेमव्याकुल पाहुनी । सांगती त्यां गुरु ज्ञानी । बैसावया ॥८४॥ जगाची गति मायिक । म्हणून मुनिनायक । सांगती पारमार्थिक । कथा कांहीं ॥८५॥ रायाचें परलोकगमन वसिष्ठें केलें निवेदन । ऐकतां दुःख दारुण । रघुनाथासी ॥८६॥ पित्याचें घडाया मरण । आपुलें प्रेमचि कारण । धैर्यधुरंधर जाणून । व्याकुल अति ॥८७॥ कठोर वज्रासमान । ऐकतां तें कटुवचन । राज्ञींसह सीता-लक्ष्मण । शोक करिती ॥८८॥ तीव्रशोक-व्याकुल । झाला समाज सकल । जणुं आजचि नृपाल । मृत्यु पावे ॥८९॥ मग राघवालागुनी । समजाविती महामुनि । मंदाकिनींत सर्वांनीं । स्नान केलें ॥९०॥ त्या दिवशीं रघुनाथ । करीतसे निर्जल व्रत । कुणी न घे जलाप्रत ।

गुर्वाज्ञेनें ॥९१॥ प्रातःकालीं दुजे दिनीं । रघुनंदनालागुनी । जी आज्ञा वसिष्ठ मुनि । देते झाले ॥९२॥ ती आज्ञा रघुनाथ । श्रद्धा भक्ति समन्वित । अति आदरें समस्त । पाळिता झाला ॥९३॥ जैसी निवेदी श्रुति । तैशा पितृक्रियेप्रति । करून पापतमोगभस्ती । शुद्ध होय ॥९४॥ ज्या श्रीरामाचें नाम । पापकार्पासा अग्निसम । जो सर्वमंगलधाम । स्मरणमात्रें ॥९५॥ तोहि होतसे पावन । हें साधुसंमत वचन । सकल तीर्थांचें आवाहन । गंगेंत जसें ॥९६॥ (गंगा स्वयेंचि पुनीत । स्नान करितां तियेंत । पाचारितां तीर्थांप्रत । विशेष काय ॥९७॥ तैसा स्वयं पवित्र राम । नाम त्याचें शुद्धतम । तया आचरितां कर्म । विशेष काय? ॥९८॥) असो, शुद्ध होतां दोन । दिवस गेले लोटून । प्रेमें म्हणे रघुनंदन । सद्‌गुरुसी ॥९९॥ "हे स्वामिन्! लोक सकल । अतिशय दुःखाकुल । कंद-मूल-फल-जल । सेवूनिया ॥१००॥ सचिव, भरत, शत्रुघ्न । सर्व माता त्यां पाहून । जातो मज युगासमान । एकेक पल ॥१०१॥ तरी सर्वां समवेत । जावें आपण अयोध्येंत । आपण येथें, नृपनाथ । स्वर्गलोकीं ॥१०२॥ धाडस करून बहुत । बोललोंसे मी सांप्रत । स्वामिन्! करावें उचित । दिसेल तें" ॥१०३॥ ऐकून रामवचन । प्रेमें सद्‌गदित होऊन । बोलते झाले वचन । वसिष्ठ मुनि ॥१०४॥ "तूं तों करुणानिधान । धर्माचा सेतु म्हणून । बोलणार निश्चयें वचन । कां न ऐसें? ॥१०५॥ दुःखित असती हे जन । परि येथें दिवस दोन । विश्रांति पावतील घेऊन । दर्शन तुझें" ॥१०६॥ यापरी ऐकून गुरु-वचन । सकलमंगलाकारण । वाटे जणुं झाला पवन । अनुकूल ॥१०७॥ पवित्र जलीं त्रिकाल । स्नानें करिती सकल । ज्याच्या दर्शनें पापकुल ।

नाश पावें ॥१०८॥ मंगलमूर्तीचें दर्शन । करिती डोळे भरून । हर्षे वंदिती पाहून । वारंवार ॥१०९॥ रामशैलवनप्रांत । पहाया जाती समस्त । जेथें सर्व सुखें, किंचित् । दुःख नाहीं ॥११०॥ निर्झर करिती खळखळ । अमृततुल्य ज्यांचें जळ । त्रिविध वाहे अनिळ । त्रिताप–हारी ॥१११॥ वृक्ष, वेली, तृणादिक । जयांच्या जाति अनेक । फळें, पुष्पें, पत्रें सुरेख । नाना-विध ॥११२॥ शिला सुंदर बैसावया । सुखप्रद वृक्षच्छाया । वनशोभा वर्णावया । शक्य कोण? ॥११३॥ सरसीं कमलें विकसतीं । जलपक्षी ते कूजती । भ्रमरपंक्ति गुंजती । त्याच-परी ॥११४॥ निर्वैरभावें परस्पर । वनीं करिती विहार । नाना वर्णांचे खेचर । हरिणादिक ॥११५॥ भिल्ल, कोळी, किरात । नित्य जे वसती वनांत । शुचि, सुंदर, मधुर, पुनीत । अमृत-तुल्य ११६॥ पर्णांचे द्रोण अमित । भरूनिया व्यवस्थित । कंद-मूल–फळें त्यांत । अंकुरांसह ॥११७॥ नम्र भावानें प्रार्थिती । आणून सर्वांस देती । त्यांचीं गुण–नामें सांगती । स्वाद–भेदहि ॥११८॥ लोकहि बहुमोल देती । परी ते ना स्वीकारिती । रामशपथ घालिती । देती परत ॥११९॥ प्रेममग्न होऊन । बोलती मृदु वचन । “संतांनीं प्रेम जाणून । मान द्यावा ॥१२०॥ तुम्ही आहां पुण्यश्लोक । आम्ही नीच हिंस्रक । पावलोंसे दर्शन–सुख । रामकृपें ॥१२१॥ तुमचें दर्शन आम्हांप्रत । आहे दुर्मिळ अत्यंत । जैसा का मरुभूमींत । गंगाप्रवाह ॥१२२॥ कृपाळु श्रीराघवें । निषादा तारिलें बरवें । प्रजापरिजनीं असावें । भूपापरी ॥१२३॥ हें जाणून अंतरीं । संकोच न धरा तिळ-भरी । प्रेम पाहून आम्हांवरी । दयाच करा ॥१२४॥ आम्हां कराया कृतार्थ । इतुकें करावें सांप्रत । या फलतृणांकुरांप्रत ।

स्वीकारावें ॥१२५॥ प्रिय अतिथि तुम्हांसम । पातले घेऊनिया श्रम । परि न आमुचें भाग्य परम । सेवेयोग्य ॥१२६॥ महाराज! तुम्हांप्रति । आम्हीं द्यावें काय, किती ? । काष्ठ–पल्लव संपत्ति । आमुची ही ॥१२७॥ मोठीच सेवा आपुली । एवढीच जाणा झाली । कीं आम्हीं न चोरिलीं । वस्त्रपात्रें ॥१२८॥ आम्ही जडजीव निश्चितीं । संहारितों जीवांप्रति । कुटिल, कुजाति, दुर्मति । खोडसाळ ॥१२९॥ पाप करीत अहोरात्र । कंठितों जीवन मात्र । कटीस न पुरे वस्त्र । न भरे पोट ॥१३०॥ धर्मबुद्धि ती कैसी । स्वप्नीं न ठावी आम्हांसी । परि महति ही ऐसी । । रामदर्शनाची ॥१३१॥ रामपदाब्जांलागून । पाहिलें तेव्हांपासून । आमुचे दोष, दुःख दारुण । नष्ट झालें" ॥१३२॥ ऐकतां त्यांची नम्रोक्ति । लोक प्रेम–मग्न होती । त्यांचें भाग्य प्रशंसिती । निज मुखांनीं ॥१३३॥ त्यांच्या भाग्याचें वर्णन । करिती अयोध्येंचे जन । बोलती प्रेम-वचन । तयांसवें ॥१३४॥ त्यांच्या भाषणाची रीति । सीतारामपद-प्रीति । मीलनीं विलोकून पावती । सौख्य भारी ॥१३५॥ स्वप्रेमातें लेखिती । नरनारी तुच्छ अति । कोल-किरातांची उक्ति । ऐकूनिया ॥१३६॥ श्रीराम–कृपाच येथ । केवळ कारणीभूत । तारून नेते नावेप्रत । लोह स्वयें ॥१३७॥ (लोह बुडतें जलांत । परि जडतां[1] नौकेप्रत । नेते तारून निश्चित । जलीं तिज ॥१३८॥ रानटी कोल-किरात । लोहासम त्यांचें चित्त । कोठून होय प्राप्त । तरणोपाय ?॥१३९॥ परि श्रीरघुनंदन । त्याचीच कृपा कारण । म्हणून गेले तरून । ऐसेहि ते ॥१४०॥) असो, चोहींकडे वनीं । विहरती प्रतिदिनीं । प्रसन्न होऊन मनीं । सर्व लोक ॥१४१॥ दर्दुर, मयूर ज्यापरी ।

---

१ जडवितां

प्रथमवर्षावें भूवरी । आनंद पावून अंतरीं । पुष्ट होती ॥१४२॥ अयोध्येचे नारीनर । जाहले प्रेमनिर्भर । दिवस परि निमिष-मात्र । लोटतसे ॥१४३॥ सासूकारणें प्रत्येकीं । भिन्न रूपांनीं जानकी । आदरें एकसारखी । सेवा करी ॥१४४॥ परि एका रामाविना । मर्म हें न कळलें कुणा । सीतेच्याच मायेंत जाणा । सर्वहि माया ॥१४५॥ जानकीनें सासवांस । सेवेनेंच केलें वश । आनंदे देती उपदेश, । आशीर्वाद ॥१४६॥ सीतेसवें राम-लक्ष्मण । सरळ वागती पाहून । कुटिल कैकेयीचें मन । पश्चात्तप्त ॥१४७॥ लौकिकीं, वेदीं विदित । कविहि म्हणती समस्त । रामविन्मुखा नरकांत । स्थान न मिळे ॥१४८॥ कैकेयी धरणीप्रति । यमास झाली प्रार्थिती । म्हणे मृत्यु न का मज देती । पृथ्वी-यम ॥१४९॥ सर्व लोकांच्या मानसीं । हीच शंका अहर्निशीं । 'विधात्या! राम अयोध्येसी । येतो कीं नाहीं?' ॥१५०॥ रात्रीं नेत्रीं निद्रा नसे । दिवसां भूक न लागतसे । भरत व्याकुल होतसे । अति दुःखें ॥१५१॥ "अल्प कर्दमीं सहसा । सहज सांपडला मासा । जलसंकोचें जैसा । व्याकुल होय ॥१५१॥ कालानें मातेच्या मिषें । केलें विपरीत ऐसें । भरल्या शेतास जैसें । ईतीनें होय ॥१५३॥ रामास अभिषेक होय । ऐसें करावें तें काय । मज तरी एकहि उपाय । सुचेचिना ॥१५४॥ गुर्वाज्ञा धरून शिरीं । अवश्य परतेल माघारीं । राममनोगतापरी । कथितील मुनि? ॥१५५॥ मातेनें सांगतां कांहीं । राम परतेल तेव्हांहि । हट्ट धरील कीं नाहीं । राम-माता ?॥१५५॥ मी तों सेवक सर्वथा । तेथें माझी काय कथा ? । त्यांत प्रतिकूल विधाता । वेळ खोटी ॥१५७॥ मी हट्ट धरितां नेटे । तें कर्म होय ओखटें ।

सेवाधर्म भारी वाटे । केलासाहुनी" ॥१५८॥ एकहि युक्ति निश्चित । ठरली नाहीं मनांत । याच विचारीं रात । उलटून गेली ॥१५९॥ प्रभातीं करून स्नान । रघुनाथातें वंदून । बैसतां आलें पाचारण । वसिष्ठांचें ॥१६०॥ (सोपानीचा मार्ग भला जरी दीर्घतम वाटला । तदर्थ बारावा योजिला । विश्राम हा ॥१६१॥ रसिक भाविक श्रोत्यांस । विनवीतसे देवीदास । माझ्या बोबडचा बोलांस । मान्य करा ॥१६२॥)

---

## विश्राम १३ वा

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्योनम
श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः

गुरुपदकमलांप्रत । करूनिया दंडवत । आज्ञा घेऊनिया स्थित । होतांक्षणीं ॥१॥ विप्र, महाजन, सचिव । प्रमुख जे जे, ते सर्व । एकत्रित झाले तंव । येऊन तेथ ॥२॥ तेव्हां समयानुसार । बोलती वसिष्ठ मुनिवर । "ऐका, सदस्य हो! समग्र । सुज्ञ भरता! ॥३॥ जो का धर्मधुरंधर । सूर्यवंशींचा भास्कर । स्वयें भगवान् स्वतंत्र । रामराजा ॥४॥ सत्यप्रतिज्ञ निःशंक । श्रुति–सेतूचा पालक । जगन्मंगलकारक । जन्म त्याचा ॥५॥ गुरु, पिता आणि माता । यांची आज्ञा–अनुसरता । दुष्ट–समूह संहर्ता । सुरहितकारी ॥६॥ नीतिप्रीतीचा अर्थ । स्वार्थ आणि परमार्थ । कुणि न जाणे यथार्थ । राघवासम ॥७॥

ब्रह्मा, विष्णु, महेश । दिक्पाल, चंद्र, दिनेश । माया, जीव, कर्म अशेष । कालहि स्वयें ॥८॥ शेष, महीश, योगी, सिद्ध । जेथवरी प्रभुता विविध । वर्णन केली असे वेद– । शास्त्रांतरीं ॥९॥ योग्य प्रकारें अंतरीं । विचारून पहा तरी । रामाज्ञा ती शिरावरी । सर्वांच्याहि ॥१०॥ श्रीरामाचें मनोगत । जाणून तदाज्ञेप्रत । पाळितां होतसे हित । सर्वांचेंहि ॥११॥ तुम्ही सर्वहि सुज्ञांनीं । याचा विचार करून मनीं । करावें कर्तव्य निदानीं । सर्वांनुमतें ॥१२॥ सर्वांसी सुखदायक । श्रीराम–राज्याभिषेक । मोदमंगलार्थ एक । मार्ग तोच ॥१३॥ कैसा अयोध्येस जाय । परत येथून रघुराय । विचारून सांगा उपाय । तोचि करूं" ॥१४॥ ऐसी वसिष्ठांची वाणी । सादर ऐकिली सर्वांनीं । नय–स्वार्थ–परार्थांनीं । परिपूर्ण जी ॥१५॥ (सामुदायिक हित । तेंचि येथें अभिप्रेत । तदर्थ योजिला 'स्वार्थ' । शद्ब येथें ॥१६॥) उत्तर न कांहीं आलें । लोक गोंधळून गेले । तैं वंदून भरत बोले । कर जोडुनी ॥१७॥ "सूर्यवंशांत निःशंक । राजे जाहले अनेक । एका पेक्षांहि एक । श्रेष्ठ ऐसे ॥१८॥ सर्वां जन्म द्याया करितां । निमित्त मात्र मातापिता । शुभाशुभ कर्मांचा दाता । विधाता तो ॥१९॥ दुःखें नाशून विविध । सर्वस्वीं कल्याणप्रद । ऐसा तुमचा आशीर्वाद । विश्व जाणे ॥२०॥ विधि–गतीनें हरताळ । फांसून स्वामींनीं केवळ । प्रतिज्ञा करितां भंगील । कोण ऐसा? ॥२१॥ आतां तेंचि तुम्ही मातें । विचारितां उपायातें । तरी सर्वस्वीं माझें तें । दुर्भाग्यचि" ॥२२॥ ऐसी ती प्रेमळ उक्ति । ऐकतां वसिष्ठांप्रति । प्रेम उचंबळे अति । हृदयांतरीं ॥२३॥ म्हणती, "बापा! सत्य देख । तीहि रामकृपा एक । सिद्धि न लाभे रामविन्मुख ।

स्वप्नांतहि ॥२४॥ बाळा! एक सांगू जातां । संकोच वाटतो चित्ता । 'ज्ञाते सर्वस्व जातां । त्यजिती अर्ध' ॥२५॥ भरता! शत्रुघ्नासवें । उभयतांनीं वनीं जावें । राम लक्ष्मणा परतवावें । जानकीसह" ॥२६॥ तें शुभ वाक्य ऐकतां । हृष्ट झाले उभयतां । तनु झाली रोमांचिता । आनंदानें ॥२७॥ सुप्रसन्नता मनाला । सतेजता शरीराला । जणुं पिता उठला, झाला । राम राजा! ॥२८॥ (मृत पिता झाला जिवंत । रामसिंहासनाधिष्ठित । या घटनांचा सांप्रत । आनंदलाभ ॥२९॥) सर्वहि लोकांलागुनी । लाभ बहु, अल्प हानि । सम सुखदुःख म्हणुनी । राज्ञी रडती ॥३०॥ वसिष्ठांस म्हणे भरत । "बोललां तेंचि करण्यांत । जगीं जीवितफल निश्चित । प्राप्त होय ॥३१॥ मी काननीं जाऊन । आजन्म वास करीन । अधिक मोदप्रद याहून । दुजें न मज ॥३२॥ सीताराम माझा स्वामी । नित्य वसे अंतर्यामीं । स्वयें चतुर, सर्वज्ञ तुम्ही । सद्गुरुनाथा! ॥३३॥ जें कांहीं या अवसरीं । बोललां तें सत्य जरी । तरी आपुली वैखरी । खरी करा" ॥३४॥ ऐकून भरतवचन । प्रेमा त्याचा विलोकून वसिष्ठां नुरलें देहभान । सभेसहित ॥३५॥ भरताचें महिमान । अधिक सागराहून । तटीं स्थित अबलेसमान । वसिष्ठमति ॥३६॥ पार जावया इच्छून । थकली उपाय शोधून नाव, होडी, जलयान । कांहीं न मिळे ॥३७॥ मग भरताची महति । वर्णवेल कुणाप्रति । काय सरोवराच्या शुक्तीं । मावेल सिंधु? ॥३८॥ (जेथें वसिष्ठांची मति । वर्णू न शके महति । तेथें माझी कथा किती । वर्णावया ॥३९॥) मुनींचें हृदय संपुट । तेथें भरत झाला प्रविष्ट । सर्वांसह आले वसिष्ठ । राघवाकडे ॥४०॥ राघवें करून नमन । दिधलें त्यां उचितासन ।

मुनींची आज्ञा ऐकून। बैसले सर्व ॥४१॥ मुनीश विचार करून। बोलूं लागले वचन। देश–काल–वर्तमान। जाणूनिया ॥४२॥ "ऐक हे रघुनंदन! । तूं सर्वज्ञ, सुजाण। धर्म–नीति–गुण–ज्ञान–। निधान तूं ॥४३॥ सर्वांच्याहि हृदयांत। वास्तव्य तुझें निश्चित। भाव–कुभाव सर्वांप्रत। जाणसी तूं ॥४४॥ सर्व नागरिकांसहित। मातेचें, भरताचें हित। होय तो उपाय सांप्रत। सांगावा त्वां ॥४५॥ आर्त जनांचें भाषण। नसतेंच विचारपूर्ण। सुचे जुगाऱ्यालागून। आपुलाच डाव" ॥४६॥ ऐकून ही वसिष्ठोक्ति। म्हणे तेव्हां रघुपति। "उपाय आपुल्याच हातीं। सद्गुरुनाथा! ॥४७॥ सर्वांचेंहि होय हित। तुमचें राखितां मनोगत। आनंद आज्ञा–पालनांत। सत्य सांगे ॥४८॥ प्रथमतां मजकारणें। जी अनुज्ञा द्याल मुने! । शिरीं धरून, त्याप्रमाणें। वागेन मी ॥४९॥ मग स्वामिन्! जें जें ज्यातें। सांगाल तुम्ही करायातें। तो तो करील त्या कार्यातें। सर्वतोपरीं" ॥५०॥ मुनि म्हणती, "रघुनंदना! । तूं बोलसी सत्यवचना। भरत-प्रेमापुढें टिकेना। विचार माझा ॥५१॥ यास्तव रामा! तुज-प्रति। सांगतों पुढतपुढतीं। भरतप्रेमवशें मन्मति। वेडा-वली ॥५२॥ भरताचें राखून मन। करणें तें उत्तम जाण। शिवास साक्ष ठेवून। सांगतों मी ॥५३॥ प्रथम भरताची विनंति। सादर ऐकावी संप्रति। विचार करावा पुढतीं। कर्तव्याचा ॥५४॥ जें का संतांशीं संमत। लोकराजनीतियुक्त। वेदाचें जें सारभूत। करावें तें" ॥५५॥ श्रीसद्गुरूची प्रीति। पाहून भरतावरती। विशेष आनंद चित्तीं। राघवाच्या ॥५६॥ भरत धर्म-धुरंधर। ऐसें जाणे रघुवीर। तनुवाङमनें निर्भर। निजसेवक ॥५७॥

गुर्वाज्ञेतें अनुसरून । बोलतसे रघुनंदन । मृदु, मंजुळ वचन । मंगलमूल ॥५८॥ "आपुली, पित्याची शपथ । घेऊन सांगतों हे नाथ ! । बंधु न झाला जगांत । भरतासम ॥५९॥ गुरुपद-कमलीं ज्यांचें । दृढ प्रेम असे साचें । तेचि महद्भाग्याचें । शास्त्र-व्यवहारें ॥६०॥ ज्यावरी स्वयें आपण । करीतसां प्रेमपूर्ण । त्या भरताचें भाग्य कोण । वर्णूं शके ? ॥६१॥ धाकटा बंधु म्हणून । संकोच पावतें मन । भरताचें कराया वर्णन । तोंडावरी ॥६२॥ भरत म्हणेल तैसें । वागतां हित होतसे" इतुकें बोलून बैसे । राम स्तब्ध ॥६३॥ तेधवां भरताप्रति । वसिष्ठ मुनि बोलती । "सर्वसंकोच संप्रति । टाक बापा ! ॥६४॥ जो का कृपेचा सागर । प्रियबंधु रघुवीर । त्यातें निवेदीं सत्वर । निजहृद्गत" ॥६५॥ ऐकून मुनींचें भाषण । रामाचेंहि अनुमोदन । गुरु-प्रभु दोघे पूर्ण । सानु-कूल ॥ ६६ ॥ आपुल्याच शिरावरी । पाहूनिया भिस्त सारी । भरत विचारचि करी । बोलूं न शके ॥६७॥ देह झाला रोमांचित । उभा राहिला सभेंत । कमलनेत्र प्रपूरित । प्रेमाश्रूंनीं ॥६८॥ म्हणे, "माझें मनोगत । तुम्हीच कथिलें मुनिनाथ ! । याहून अधिक मी येथ । काय सांगूं ? ॥६९॥ माझ्या प्रभूचा स्वभाव । मी जाणतों सानुभव । कधीं न कोपे प्रमादास्तव । अपराध्यावरी ॥७०॥ त्यांतून माझ्यावरतीं । विशेषेंचि कृपा - प्रीति । क्रीडेंतहि क्रुद्धवृत्ति । पाहिली ना ॥७१॥ बाल्यापासून मजला । कधीं सोडून ना राहिला । माझा मनो-भंग केला । नाहीं कधीं ॥७२॥ प्रभूची कृपापद्धति । मी जाणतों निजचित्तीं । येऊं न द्यावा मजवरतीं । खेळांत डाव ॥७३॥ प्रेमसंकोचें मीहि । प्रभूच्या सन्मुख कांहीं ।

मुळींच बोललों नाहीं । अवाक्षर ॥७४॥ दर्शनाचें ईप्सित भलें । अद्यापि न तृप्त झालें । प्रेमाचे तहानलेले । नेत्र माझे ॥७५॥ मजवरील प्रभुप्रीत । साहवली न दैवाप्रत । केलें मातेचें निमित्त । मध्येंच तेणें ॥७६॥ हेंहि म्हणणें मजप्रत । शोभा न देतें सांप्रत । स्वमतेंचि पवित्र संत । कोण ठरे ? ॥७७॥ माता ती दुष्ट पूर्ण । मी मात्र साधु-सज्जन । ऐसें मानणें द्वाडपण । निस्सीम हें ॥७८॥ कुरडूच्या तुऱ्यांतून । कोठून सुवासिक ओदन । काय कासार-शुक्तींतून । निघेल मोती ? ॥७९॥ कुणाचाहि दुःख-दोष । स्वप्नींहि नसे लेश । माझें दुर्भाग्य विशेष । अगाध सिंधु ॥८०॥ माझ्या पापाचें फळ । हें न जाणतां केवळ । मातेस दूषवून निष्फळ । जाळिलें मीं ॥८१॥ हृदयीं विचार करून । मी निराश चोहींकडून । एकाच उपायेंकरून । माझें हित ॥८२॥ महाराज सद्गुरुनाथ । स्वामी सीता–रघुनाथ । निश्चित होय माझें हित । यांच्यानेंचि ॥८३॥ साधुसंतांच्या सभेंत । निकट प्रभु, गुरुनाथ । बोलतों पवित्र क्षेत्रांत । सद्भावें मी ॥८४॥ तें प्रेमें कीं कपटयुक्त । सत्य कीं असे अनृत । मुनिराज, रघुनाथ। जाणतील ॥८५॥ भूपें स्वीकारून मरण । सांभाळिला प्रेम-पण। मातृ–कुमतीस संपूर्ण । विश्व साक्षी ॥८६॥ इतर माता त्या दुःखित । त्यांहि नाहींत बघवत । असह्य ज्वरें प्रजा समस्त । दग्ध होय ॥८७॥ सर्व अनर्थांसी कारण । मीच आहे, तरी पण । हें ऐकून, समजून । सोशितों दुःख ॥८८॥ ऐकिलें कीं 'रघुनंदन । करिता झाला वनीं गमन । सवें जानकी–लक्ष्मण । मुनि-वेषानें ॥८९॥ तेंहि वनांत चालणें । पायीं पायीं अनवाणें ' । मी जिवंत या आघातानें । शिवचि साक्ष ॥९०॥ निषादाचें प्रेम त्यांतून । प्रत्यक्ष तें विलोकून । वज्रासम हृदय कठिण । दुभंगलें

ना ! ॥९१॥ आतां येथेंच येऊन । दृष्टीनें सर्व पाहून । जडजीवें केलें सहन । जिवंतपणीं ! ॥९२॥ ज्यातें निरखून पथीं । सर्प, वृश्चिक जीवजाति । तमःकाठिण्य टाकिती । विषम विष– ॥९३॥ ते सीता–राम–लक्ष्मण । केवळ शत्रुसमान । ज्या कैकेयीलागून । वाटले कीं ! ॥९४॥ तिच्या पुत्रास सोडून । ऐसें हें दुःख दारुण । दैव करवील सहन । अन्य कोणा ?" ॥९५॥ ऐकून केविलवाणें । भरताचें हें बोलणें । न्याय-विनय-प्रेमळपणें । परिपूर्ण जें ॥९६॥ शोकमग्न सभा सर्व । घाबरलीसे अतीव । जणु का हिमवर्षाव । कमल वनीं ॥९७॥ पुराणकथा निवेदून । अनेक प्रकारेंकरून । केलें भरताचें समाधान । वसिष्ठांनीं ॥९८॥ करी समयोचित भाषण । तेधवां रघुनंदन । रविकुलकुमुदवन– । चंद्रमा जो ॥९९॥ "बाळा भरता ! निज चित्तीं । खंत न करीं या रीतीं । ईश्वराधीन जीवगति । जाणूनिया ॥१००॥ कालत्रयीं त्रिभुवनांत । बाळा ! माझें हेंचि मत । तुजपुढें लघु समस्त । पुण्यश्लोक ॥१०१॥ तुजवरतीं कुटिलता । मनांतहि लादूं जातां । मुकले जाणावें तत्त्वतां । इह-परलोक ! ॥१०२॥ तुझ्या मातेसहि जाण । दोष देतील तेचि जन । संत–सद्गुरूचें सेवन । घडलें न ज्यां ॥१०३॥ निखिल पापसमुदाव । प्रपंच मायेचा प्रभाव । अमंगलाचा भार सर्व । नष्ट होय ॥१०४॥ इहलोकांत सद्यश । परलोकीं सुख विशेष । भरता ! स्मरतां निर्दोष । नाम तुझें ॥१०५॥ शिवास साक्ष ठेवून । सत्यचि करितों भाषण । पृथ्वीचें होय रक्षण । तुझ्याच मुळें ॥१०६॥ वृथा कुतर्क या रीतीं । करूं नकोस गा ! पुढतीं । लपवितांहि वैर–प्रीति । लपतीच ना ! ॥१०७॥ ऋषिमुनि–निकटवर्ती । पशु–पक्षीहि नांदती । परि पाहूनिया पळती ।

दुष्ट वधिका ॥१०८॥ हित–अनहित आपुलें । पशुपक्ष्यांनाहि कळे । मनुष्यशरीर आगळें । ज्ञानगुणें ॥१०९॥ बाळा भरता ! तुजप्रति । जाणतों मी यथानिगुती । द्विधा माझी चित्तवृत्ति । काय करूं ? ॥११०॥ रायें मजला त्यागिलें । सत्यव्रत सांभाळिलें । प्रेम–पणास्तव सोडिलें । शरीरहि ॥१११॥ त्याची आज्ञा उल्लंघितां । दुःख वाटे माझ्या चित्ता । त्याहून विशेष तूं तत्त्वतां । संकोच तुझा ॥११२॥ त्यांतूनिया सद्गुरूंनीं । आज्ञापिलें मजलागुनी । सांगशील तें मी मनीं । करूं इच्छी ॥११३॥ मन प्रसन्न करुनी । सर्व संकोच त्यागुनी । सांग काय तें तुझ्या मनीं । करीन आज" ॥११४॥ सत्यसिंधु रघुनंदन । त्याचें ऐकतांचि वचन । सभेंतील सारे जन । सुखावले ॥११५॥ सर्व देवगणासहित । देवेंद्र झाला भयभीत । करूं इच्छी विघ्नाप्रत । कार्यांतरीं ॥११६॥ विचार करी मनांत । उपाय न सुचे किंचित् । श्रीराम–शरणागत । सर्वहि मनीं ॥११७॥ विचार करून मानसीं । म्हणती परस्परांसी । कीं, 'राम वश भक्तीसी । स्वभक्तांच्या ॥११८॥ दुर्वास आणि अंबरीष । स्मरून त्यांच्या कथांस । इंद्रादि देव निराश । होते झाले ॥११९॥ पूर्वयुगीं बहुकालें । देवांनीं दुःख सोशिलें । तें प्रह्लादें प्रकट केलें । नृसिंहासी ॥१२०॥ परस्पर कुजबुजती । कपाळ बडवून म्हणती । 'आतां भरताच्याच हातीं । देवकार्य' ॥१२१॥ सर्व देव हो ! येधवां । उपाय न सुचे नवा । मान्य सद्भक्ताची सेवा । रामचंद्रा ॥१२२॥ तरी आतां सर्वजण । करा प्रेमें भरत–स्मरण । जयें वश केला रघुनंदन । स्वगुणशीलें" ॥१२३॥ ऐकून देवांचा निश्चय । बृहस्पति म्हणती काय । "धन्य तुमचें भाग्य होय । देवगण हो ! ॥१२४॥ या विश्वांतरीं केवल । सकल मंगलांचें

मूल । भरतचरणीं निर्मल । प्रेमभाव ॥१२५॥ सीतापतीचा सेवक । त्याची सेवा निश्चयात्मक । शत सुरभींहून अधिक । श्रेयस्कर ॥१२६॥ भरताची भक्ति भली । तुमच्या चित्तीं उद्भवली । निश्चित बाजू सांवरिली । विधात्यानें ॥१२७॥ देवेंद्रा तूं सानुभव । पहा भरताचा प्रभाव । सहजस्वभावें राघव । वश ज्यासी ॥१२८॥ देव हो! स्थिर करा चित्त । भय नाहीं तुम्हांप्रत । अपरप्रतिमा भरत । राघवाची ॥१२९॥ संमत देव-बृहस्पति । ऐकून त्यांच्या दुःखाप्रति । अंतर्यामीं रघुपति । संकोचला ॥१३०॥ भार सर्व निजशिरीं । जाणून भरत अंतरीं । कोटचवधि कामना करी । निजमनांत ॥१३१॥ बहुत विचार करुनी । निश्चय केला तेणें मनीं । कीं, "रामाज्ञा-पालनीं । स्वकल्याण ॥१३२॥ टाकून स्वप्रतिज्ञेला । माझा पण सांभाळिला । प्रेम-लडिवाळपणा झाला । थोडा का हा? ॥१३३॥ कृपा ही माझ्यावरतीं । खरोखर केली अति । जानकीनाथें संप्रति । सर्वतोपरीं" ॥१३४॥ ऐसें जाणून निस्सीम । रामास करून प्रणाम । जोडून करकमलयुग्म । भरत बोले ॥१३५॥ "आतां काय बोलावें मीं । काय तरी सांगूं स्वामी! । प्रभो! तुम्ही अंतर्यामीं । कृपासिंधो! ॥१३६॥ सद्गुरुनाथ प्रसन्न । स्वामीहि अनुकूल पूर्ण । मनःकल्पित दुःख दारुण । नष्ट झालें ॥१३७॥ लटकीच मानून भीति । भ्यालों होतों निजचित्तीं । दोष न द्यावा सूर्याप्रति । दिग्भ्रम होतां ॥१३८॥ माझें दुर्भाग्य निःशंक । मातेचें कपट-कौतुक । कालकठिनत्व, परिपाक । दैवाचाहि ॥१३९॥ सर्वांनीं मिळून जरी । घातला घाला मजवरी । स्वब्रीद राखिलें परि । दीनवत्सलें ॥१४०॥ प्रभो! तुम्ही ऐशी रीत । नवी नसेचि सांप्रत । प्रसिद्ध वेदलौकिकांत ।

गुप्त नाहीं ॥१४१॥ दुष्टचि असे हें जग । स्वामिन्! तूंच अव्यंग । कुणाच्या भलेपणें सांग । कल्याण होय? ॥१४२॥ प्रभूचा स्वभावगुण कल्पतरूच्या समान । सन्मुख होतां कुणाहि न । विमुख होय ॥१४३॥ कल्पवृक्षातें जाणून । समीप जाती जे जन । सर्व दुःखें होतीं शमन । तच्छायेनें ॥१४४॥ जें जें इच्छील तन्मन । तें तें पावें त्यालागून । राव, रंक, कीं सज्जन । दुर्जन असो ॥१४५॥ स्वामी–सद्‌गुरूची प्रीति । पूर्ण पाहून मजवरतीं । चिंता निवाली मच्चित्तीं । संदेह नाहीं ॥१४६॥ तरी आतां करुणाकरा! । ऐसेंचि करीं रघुवीरा! । ज़ेणें मद्धित, त्वदंतरा । दुःख न होय ॥ १४७ ॥ जो सेवक स्वामींप्रति । भीड घालूनिया अति । स्वहित इच्छी, त्याची मति । क्षुद्र होय ॥१४८॥ सेवकाचें खरें हित । निज स्वामीच्या सेवेंत । सकल सुख-स्वार्थरहित । करावी ती ॥१४९॥ प्रभूनें परतावें यांत । सर्वांचाहि असे स्वार्थ । आज्ञापालन श्रेष्ठ त्यांत । कोटिपट ॥१५०॥ स्वार्थ–परमार्थाचें सार । हेंचि एक असे थोर । सर्व पुण्यफल शृंगार । सद्‌गतीचा ॥१५१॥ परि प्रभो! तुजप्रति । एक असे माझी विनति । उचित जें गमे संप्रति । तैसेंचि करीं ॥१५२॥ अभिषेक–सामुग्री सारी । आणिलीसे येथवरी । मान्य असेल, तरी करीं । सार्थक तिचें ॥१५३॥ अनुजासहवर्तमान । वनीं मजला पाठवून । अयोध्येचे सारे जन । सनाथ करीं ॥१५४॥ ना तरी बंधु उभयतां । परत पाठवावें आतां । मी येईन प्रभो! स्वतां । समागमें ॥१५५॥ उभय बंधूंच्या सवें । ना तरी वनीं मीं जावें । रघुनाथा! त्वां परतावें । जानकीसह ॥१५६॥ ज्या योगानें तुझें मन । होय प्रभो! सुप्रसन्न । तेंचि निश्चयेंकरून ।

करावें गा ! ॥१५७॥ प्रभो ! त्वां सर्वहि भार । सोंपविलासे मजवर । परि नीति–धर्म–विचार । माझ्यांत ना ॥१५८॥ स्वार्थाचा धरून हेत । माझें बोलणें समस्त । विचार नुरेचि किंचित् । आर्त–मनीं ॥१५९॥ स्वामीची आज्ञा ऐकून । उत्तर दे जो सेवकजन । लाज वाटे त्या पाहून । लज्जेसहि ॥१६०॥ अवगुणाचा अथांगसा । समुद्र मी असून ऐसा । प्रेमें साधुत्वाची प्रशंसा । करिशी प्रभो ! ॥१६१॥ आतां दयाळो ! मजप्रत । तेंचि वाटे योग्य मत । जेणें न संकोचें चित्त । स्वामी ! तुझें ॥१६२॥ प्रभुपदाचीव शपथ । सांगतों सद्भावयुक्त । जगाच्या कल्याणार्थ । उपाय एक ॥१६३॥ प्रसन्नमनेंकरून । करावें सर्वांनीं पालन । अनिष्ट-संकट-नाशन । होय तेणें " ॥१६४॥ भरताची पवित्र वाणी । देव हर्षले ऐकुनी । करिती तया प्रशंसुनी । पुष्पवृष्टि ॥१६५॥ परि अयोध्या-निवासी । गोंधळून गेले मानसीं । चित्तीं वनींचे तापसी । आनंदले ॥१६६॥ संकोच वाटून चित्तीं । स्तब्ध राहे रघुपति सर्व सभा पाहून स्थिति । चिंतातुर ॥१६७॥ तितुक्याच अवधींत येते झाले जनकदूत । ऐकून, वसिष्ठें तयांप्रत । बाहिलें त्वरें ॥१६८॥ प्रणाम करून तयांनीं । पाहिलें रामालागुनी । झाले वेष विलोकुनी । दुःखित अति ॥१६९॥ (सोपानींचा मार्ग भला । जरी दीर्घतम वाटला । तदर्थ तेरावा योजिला । विश्राम हा ॥१७०॥ रसिक, भाविक श्रोत्यांस । विनवीतसे देवीदास । माझ्या बोबड्या बोलांस । मान्य करा ॥१७१॥)

---

# विश्राम १४ वा

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्योनमः
श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः

वसिष्ठांनीं दूतांप्रत । विचारिलासे वृत्तान्त । 'कुशल करावें विदित । विदेहाचें' ॥१॥ ऐकून संकोचभरीं । शिर नमवून भूवरीं । बोलती ते बद्धकरीं । चतुर दूत ॥२॥ "स्वामिन्! आपण सादर । पुशिला कुशल समाचार । तेंचि एक कारण थोर । कुशलतेचें ॥३॥ ना तरी कोसलनाथ । महाराज श्रीदशरथ । त्यांचें सर्वेचि कुशल समस्त । संपलें प्रभो! ॥४॥ मिथिला, अयोध्या दोन्ही । अनाथ विशेषेंकरुनी । किंबहुना सारी अवनी । अनाथ झाली ॥५॥ कोसलाधिपतीची वार्ता । जनक-राज्यांत ऐकतां । दुःखें गेली सारी जनता । वेडावून ॥६॥ विदेहाप्रति तयावेळे । ज्यांनीं ज्यांनीं विलोकिलें । नांव सार्थ न वाटलें । कुणासहि ॥७॥ कैकेयीचें कुटिलपण । ऐकतां भूपालागून । मणिविण सर्पासमान । कांहीं न सुचे ॥८॥ राज्य मिळालें भरतास । रामचंद्रा वनवास । तेणें मनीं दुःख विशेष । विदेहाच्या ॥९॥ सुज्ञ मंत्रिगणाप्रति । महाराज विचारिती । 'विचारें सांगा हो! संप्रति । उचित काय'? ॥१०॥ अयोध्येचा प्रश्न जाणुनी । विवंचना पक्षीं दोन्हीं । 'जावें कीं रहावें' कुणी । कांहीं न वदे ॥११॥ धैर्य धरून नृपवर । स्वमनीं करून विचार । धाडिती चार चतुर हेर । अयोध्येतें ॥१२॥ 'भरताचा संबंध यांत । बरावाईट यथार्थ । शोधून वेगें या परत । गुप्त-

पणें' ॥१३॥ दूतीं जाऊन अयोध्येप्रत । जाणून भरताचें हृद्‌गत । त्याची कृतिहि साक्षात् । अवलोकिली ॥१४॥ चित्रकूटाकडें भरत । निघाला पाहून त्वरित । परत गेले ते दूत । मिथिलेप्रति ॥१५॥ परत येऊन दूतीं । भरताची सर्व कृति । भूप-सभेंत यथा-मति । वर्णिलीसे ॥१६॥ गुरु-सचिव-परिजनीं । भूपासह ती ऐकुनी । गेले विव्हल होउनी । दुःखप्रेमें ॥१७॥ धैर्य धरून जनक । करिती भरताचें कौतुक । शूर सरदार सैनिक । पाचारिती ॥१८॥ गृहीं नगरीं, राष्ट्रांत । करिती व्यवस्थित तैनात । गजाश्व-रथ-यानें अमित । सज्ज करिती ॥१९॥ गर्ग मुहूर्त साधिती । निघाले अति शीघ्रगति । मार्गीं विश्राम न घेती । महाराज ॥२०॥ आज प्रयागीं सकाळीं । स्नान करून मंडळी । लागली यमुना-जळीं । उतरावया ॥२१॥ शोध घ्यायास सर्वथा । आम्हांस धाडिलें नाथा !" दूतीं नमविला माथा । सांगून हें ॥२२॥ सहासात किरातांतें । देऊन त्यांच्या सांगातें । त्वरें धाडिलें दूतांतें । मुनीश्वरें ॥२३॥ जनकाचें आगमन । तेधवां करितां श्रवण । अयोध्येचे सारे जन । आनंदलें ॥२४॥ रघुनंदनातें परि । संकट पडलें तैं भारी । चिंता उद्‌भवे अंतरीं । देवेंद्राच्या ॥२५॥ कुटिल कैकेयीच्या जीवा । पश्चात्ताप गमे तेव्हां । 'काय म्हणावें, दोष द्यावा । कुणास तरी' ॥२६॥ नर-नारी आनंदित । ऐसें आणून मनांत । कीं, वास्तव्य होय वनांत । चार दिवस ॥२७॥ ऐशा प्रकारें-करून । गेला तो दिन लोटून । प्रभातीं कराया स्नान । सर्वहि जाती ॥२८॥ स्नान करून नर-नारी । पूजा करिती अत्यादरीं । गणेश-गौरी-त्रिपुरारि- । भास्कराची ॥२९॥ मग रमा-रमण-चरण । वंदिती भावेंकरून । विनविती पदर पसरून ।

बद्धांजलि ॥३०॥ "श्रीराम हाच भूपति । तैसी राज्ञी सीता-सती । सुखसीमा अयोध्या ती । राजधानी ॥३१॥ परतून समाजासहित । इच्छामात्रें वसो तेथ । देवो भरता रघुनाथ । यौवराज्य ॥३२॥ हेंचि देवा ! सौख्यामृत । सिंचूनिया सर्वांप्रत । द्यावा जगतीं निश्चित । जीवनलाभ ॥३३॥ बंधु आणि गुरु-जन । यांच्यासहवर्तमान । अयोध्येंत असो पूर्ण । राम-राज्य ॥३४॥ रामराज्य अखंडित । असतांच अयोध्येंत । मृत्यु यावा आम्हांप्रत" । मागती सर्व ॥३५॥ ऐशापरी प्रेमळ ती । ऐकून पुरजनोक्ति । योग–वैराग्या निंदिती । ज्ञानी, मुनि ॥३६॥ यापरीं त्या पुरजनीं । नित्य कर्मे आटोपुनी । वंदावें पुलकित होउनी । राघवातें ॥३७॥ उच्च–नीच–मध्यमस्थितीं । नर-नारी ज्या असती । आपापल्यापरीं करिती । रामदर्शन ॥३८॥ सावधानपणें सर्वां । प्रभु देतसे गौरवा । ते कृपानिधान राघवा । प्रशंसिती ॥३९॥ "बालपणापासून जाणा । श्रीरामाचा हाच बाणा । करी नीतिच्या पालना । जाणून प्रेम ॥४०॥ सौजन्य, भिडस्तपणा । यांचा सागर रघुराणा । ( किती म्हणून त्याच्या गुणा । प्रशंसावें ॥४१॥ ) वाणी तयाची मधुर । दृष्टि ती सप्रेमभर । स्वभाव त्यांतून तर । प्रांजल अति" ॥४२॥ श्रीराम–गुणगणाप्रति । प्रेमभरें ते वर्णिती । निजभाग्यासी प्रशंसिती । सर्वहिजण ॥४३॥ "आम्हांसम पुण्यवंत । थोडेच असती जगांत । आपुले मानितों ज्यांप्रत । राम प्रभु" ॥४४॥ यावरी जन समस्त । निमग्न असतां प्रेमांत । पातला मिथिला-नाथ । ऐकिलें हें ॥४५॥ सभेसहवर्तमान । उठे लगबगेंकरून । रविकुलकमलपूषण[1] । रामचंद्र ॥४६॥ बंधु, सचिव, परिवार ।

---

१: सूर्य

गुरुवसिष्ठ मुनीश्वर । सामोरा जाई रघुवीर । यांच्यासह ॥४७॥ जनकरायें जेधवां । चित्रकूट देखिला बरवा । रथ टाकून तेधवां । प्रणाम केला ॥४८॥ रामदर्शन–लालसा । सोल्हास सर्वांच्या मानसां । पथश्रम कुणा सहसा । भासले ना ॥४९॥ श्रीराम-जानकी जेथें । मन गुंतलेंसे तेथें । तनूच्या सुखदुःखातें । कोण जाणे? ॥५०॥ चालत चालत या रीतीं । येतसे जनक भूपति । प्रेमोन्मत्त ज्ञाली मति । मंडळीसह ॥५१॥ समीप येतांचि समस्त । पाहून प्रेमभरित । भेटती परस्परांप्रत । आदरानें ॥५२॥ मुनिजनांच्या चरणां । जनक करी वंदना । नमन करी ऋषि-जनां । रघुनंदन ॥५३॥ बंधुसहवर्तमान । जनका भेटे रघुनंदन । जातसे तया घेऊन । मंडळीसह ॥५४॥ रामाश्रम तो सागर । ज्यांत भरलें भरपूर । शांतरसाचें नीर । पवित्रसें ॥५५॥ जन-काची सेना सकल । करुणासरिता केवल । घेऊन जातसे दयाल । रघुनाथ तो ॥५६॥ ज्ञान–वैराग्य दुथडी । वाहून नेई तांतडीं । शोक–आक्रोश घेती उडी । नदी नाले ॥५७॥ शोकाच्या निश्वास-वातीं । थोर लाटा ज्या उसळती । तटींचे उलथून पाडिती । धैर्यवृक्ष ॥५८॥ विषाद तो भयंकर । तोच तिची प्रचंड धार । भय–भ्रम ते अपार । भोंवरे तिथें ॥५९॥ बुधजन तेचि ना-वाडी । तद्विद्या नौका गाढी । वल्हवूं न शके थोडी । कुणीहि तिज ॥६०॥ वनींचे कोल–किरात । यात्रेकरू हे तेथ । नदीस पाहून मनांत । खचले तदा ॥६१॥ आश्रमसिंधु आंतौता । मिळे जैं सेना–सरिता । शांत परि घे क्षुब्धता । उचंबळुनी ॥६२॥ राजसमाज ते दोन्ही । शोकव्याकुल होउनी । ज्ञान, धैर्य, लज्जा मनीं । नुरे तदा ॥६३॥ दशरथाचें रूपगुण– । शीलहि करितां वर्णन । आक्रोशें गेले बुडून । शोकाब्धींत ॥६४॥ बुडाल्या शोक-

सागरीं । दुःखभरें नरनारी । व्याकुल जाहल्या भारी । त्या काळीं ।।६५।। सर्वहि क्रुद्ध झाले । दोष देऊं लागले । म्हणती, "हें काय केलें । दुर्दैवा रे!" ।।६६।। सिद्ध, तापसी, देवगण । मुनीश्वर, योगीजन । अवस्था ती विलोकून । विदेहाची ।।६७।। कुणीहि परि त्यांत । त्या करुणासरितेप्रत । तरून जावया समर्थ नव्हते मुळीं ।।६८।। उपदेश अपरिमित । करूं लागले जेथ तेथ। या सर्वहि लोकांप्रत । मुनिश्रेष्ठ ।।६९।। "अगा भूपते! सांप्रत। धारण करीं धैर्याप्रत । सांगती वसिष्ठनाथ । विदेहातें ।।७०।। ज्याच्या ज्ञानाचा रवि । संसृति–निशेतें नुरवी । मुनिकमलां विकसवी । वचनकरें ।।७१।। त्या विदेहाच्यापाशीं । मोहममता ये कैसी?। सीतारामप्रेमाची ऐसी । महिमाच ही ।।७२।। विषयी साधक, सिद्ध । जीवाचे प्रकार त्रिविध । म्हणून सांगती वेद । जगांत या ।।७३।। श्रीरामाच्या प्रेमीं मग्न । जाहलें जयांचें मन। साधुसभेंत त्यां मान । अत्यंत असे ।।७४।। श्रीराम-प्रेमावांचून । शोभा न पावतें ज्ञान । जैसें कर्णधाराविण । जलयान तें ।।७५।। नानाप्रकारें मुनीनें । शांतविलें भूपाकारणें । रामघाटावरी स्नानें । करिती लोक ।।७६।। स्त्रीपुरुष ते समस्त । झालें होते शोकग्रस्त । तो दिन करिती व्यतित । जलाविण ।।७७।। पशु, पक्षी आणि मृग । निराहारी यथासांग । प्रिय परिवाराचें मग। आश्चर्य काय?।।७८।। मिथिलानाथ, रघुनाथ । निजपरिवा-रांसहित । स्नानें करिती प्रभात– । समयासी ।।७९।। वट-वृक्षाचें तळीं । सर्वहि मंडळी बैसली । ज्यांचीं गात्रें कृश झालीं। सचिंत मनें ।।८०।। अयोध्या दशरथपुर । तेथींचे जे विप्रवर । तैसेंचि मिथिलानगर- । निवासी जे ।।८१।। रविकुलीं वसिष्ठ प्रसिद्ध । जनक-पुरोहित शतानंद । स्वार्थ-परमार्थ-शोध । लाविला

ज्यांनीं ॥८२॥ नाना प्रकारें करून । प्रबोधूं लागलें ज्ञान । विवेक-वैराग्यपूर्ण । सधर्मनय ॥८३॥ तैसेंचि विश्वामित्र मुनि । पुराणेतिहास कथुनी । सुवचनें सभेलागुनी । समजाविती ॥८४॥ तेधवां श्रीरघुनाथें । निवेदिलें कौशिकांतें । "निर्जल उपोषण सर्वांतें । घडलें काल" ॥८५॥ तैं म्हणती विश्वामित्र । "उचित बोलला रघुवीर । दिवसहि अडीच प्रहर । लोटलासे" ॥८६॥ कौशिकाचे मनोगत । जाणून वदे मिथिलानाथ । "येथे नसेचि उचित अन्नाहार" ॥८७॥ जनकें जें का बोलिलें । तें सर्वांसहि मानवलें । आज्ञा घेऊन निघाले । स्नानासाठीं ॥८८॥ स्नानें होतांच तत्काल । फल, फूल, दल, मूल । ऐसे प्रकार विपुल । भक्षावया ॥८९॥ वनींचे कोल–किरात । येऊन पातले तेथ । कावडी भरून अमित । खांद्यावरी ॥९०॥ श्रीरामकृपें पर्वत । पुरवी सर्वांचें ईप्सित । दर्शनेंचि दुःखाप्रत । हरण करी ॥९१॥ सरोवरें, सरिता, वन । ऐशा भूमिविशेषांतून । प्रेमानंद उचंबळून । येई जणुं ॥९२॥ लतावृक्षादि जाति । फलपुष्पमंडित अति । खग, मृग भृंग गाती । कर्णमधुर ॥९३॥ त्या समयीं वनीं सिद्ध । लोटे आनंदीआनंद । वायु वाहून त्रिविध । सुखवी सर्वां ॥९४॥ रमणीयता अतिशय । वाचेसी अवर्णनीय । पृथ्वी करी जणुं काय । जनकातिथ्य ॥९५॥ त्या समयीं सकलांची । स्नानें आटोपलीं साचीं । राम–जनक–वसिष्ठांची । घेऊन आज्ञा– ॥९६॥ दाट वृक्षच्छायेप्रति । पाहूनिया आनंदती । जेथें तेथें उतरती । सर्व लोक ॥९७॥ पर्ण–फल–मूल–कंद । प्रकार जयांचे विविध । सुंदर आणि विशुद्ध । अमृतापरी ॥९८॥ सर्वांसाठीं सादर । श्रीरामाचे गुरुवर । मोटा भरूनि संभार । पाठविती ॥९९॥ देव-पितर-गुरु-अतिथि । पूजूनिया तयांप्रति ।

लोक ते करूं लागती । फलाहार ॥१००॥ ऐशापरी चार दिन । सहज गेले लोटून । रामदर्शनें सर्व जन । सुखी होती ॥१०१॥ उभयहि समाजांत । हीच इच्छा हृदयांत । परतणें नाहीं उचित । सीतारामाविण ॥१०२॥ सीतारामाचा सहवास । असतां, घडे वनवास । तरी कोटि स्वर्गापरिस । सुखकारक ॥१०३॥ सीता-राम-लक्ष्मण । त्रिवर्गातें त्यागून । ज्यांचें गुंते गृहीं मन । दुर्दैवी ते ॥१०४॥ दैव जेधवां अनुकूल । सर्व जनांसी होईल । रामासमीप तैं घडेल । वास्तव्य मनीं ॥१०५॥ त्रिकाल गंगेचें स्नान । श्रीरामचंद्राचें दर्शन । ऐसी मंगलानंदपूर्ण । मालिका ही ॥१०६॥ चित्रकूटीं वनीं फिरणें । तपस्व्याश्रमीं विहरणें । कंदमूलफलें भक्षणें । अमृतासम ॥१०७॥ ऐशा सुखाच्या संगतीं । चौदा वर्षें जरी लोटतीं । पळासम गमतील तीं । कळतील ना ॥१०८॥ ऐसें वाटे सर्व लोकां । आम्ही योग्य न या सुखा । अशी आमुची भाग्यरेखा । कोठली तरी? ॥१०९॥ उभय समाजींचे जन । सहजस्वभावेंकरून । गेले अनुरक्त होऊन । श्रीराम-पदीं ॥११०॥ लोक समस्त यापरीं । इच्छा करिती अंतरीं । प्रेमोक्ति ऐकतां हरी । मनाप्रति ॥१११॥ सीतेच्या मातेनें वहिल्या । तेधवां पाठविलेल्या । सुसंधि पाहून आल्या । दासी सर्व ॥११२॥ 'सीतेच्या सासवा समस्ता । निवांत असती' ऐकतां । जनकांतःपुरींच्या वनिता । पातल्या तेथ ॥११३॥ तदा कौसल्या सादर । करी तयांचा सत्कार । देई सयानुसार । आसनें त्यां ॥११४॥ उभय परिवारांतील । पाहून सर्व स्नेह-शील । ऐकतां पाझर फुटेल । कठिण वज्रा ॥११५॥ देह शिथिल, रोमांचित । नेत्रीं अश्रुधारा गाळित । नखें कोरिती भूप्रत । दुःखभरें ॥११६॥ सीताराम-

प्रेममूर्ति । त्या सर्व स्त्रिया दिसती । जणुं करुणा मूर्तिमती । बहुवेषें ॥११७॥ म्हणे जानकीची माता । "वक्र विधि–बुद्धि-मत्ता । योजी पयःफेनाकरितां । वज्र–टाकी ॥११८॥ अमृत ऐकावें कानीं । विष पहावें नयनीं । सर्वहि त्याची करणी । कठोरचि ॥११९॥ काक, बक, दिवा-भीत । जेथे तेथें अतोनात । एकटचा मानस–सरोवरांत । हंस मात्र" ॥१२०॥ ऐकून सुमित्रा राणी । वदे दुःख-भरें वचनीं । "विपरीत, विचित्र करणी । विधात्याची ॥१२१॥ स्वयें घालून जन्मास । पाळून मग करी नाश । बुद्धि बाललीले-परिस । असे त्याची" ॥१२२॥ तें वदे कौसल्या राणी । "यांत दोषी नसे कुणी । सुखदुःख, लाभहानि । कर्माधीन ॥१२३॥ कर्मगति असे गहन । विधात्यास तिचें ज्ञान । देतो कर्मफळा-लागून । शुभाशुभ ॥१२४॥ इच्छा ती परमेश्वरी । सर्वांच्याहि शिरावरी । उत्पत्ति–स्थिति–नाशापरी । विषामृताच्या ॥१२५॥ मोहवशें करणें दुःख । देवि सुमित्रे! निरर्थक । विधिप्रपंच । निःशंक । अचल, अनादि ॥१२६॥ रायाचें जीवन–मरण । पुनःपुन्हां मनीं आणून । दुःख करणें तें जाणून । स्वलाभ-हानि" ॥१२७॥ यावरी सीतेची जननी । म्हणे, "सत्य तुमची वाणी । अयोध्यापतीची राणी । सुकृतिसीमा ॥१२८॥ लक्ष्मण-सीता-रघुनाथ । वनीं जातील, जावोत । परिणामीं होय उचित । अनुचित ना" ॥१२९॥ गहिंवरून हृदयांतरीं । कौसल्या वदे वैखरी । "मज चिंता वाटे भारी । भरताचीच ॥१३०॥ ईश्व-राच्या प्रसादानें । तुमच्या आशीर्वादानें । पवित्र गंगाजलाप्रमाणें मत्पुत्र–स्नुषा ॥१३१॥ रामाची शपथ बाई! । कधीं मीं घेतली नाहीं । परि ती मी घेऊन्हि । सांगतें सत्य ॥१३२॥

भरताचें शील, गुण । विनम्रता, थोरपण । बंधुप्रेम विश्वासपूर्ण सौजन्यहि ॥१३३॥ वर्णितां या गुणांप्रति । शारदेची कुंठित मति । उपसवेल शिंपल्याप्रति । समुद्र का ? ॥१३४॥ 'भरत हा कुलदीपक' । म्हणत होते निःशंक । मजला अयोध्यानाथ । वारंवार ॥१३५॥ कसीं लावितां कळे सोनें । रत्न तें पारखी भेटल्यानें । तैसे पुरुष प्रसंगानें । कळों येती ॥१३६॥ माझें हें बोलणें आज । अनुचित होईल सहज । दुःखें, प्रेमें न सुचे मज । शहाणपण" ॥१३७॥ पवित्र गंगेसमान । ऐकून कौसल्यावचन । व्याकुल प्रेमेंकरून । सर्व राज्ञी ॥१३८॥ कौसल्या तदवसरीं । धैर्य धरून अंतरीं । म्हणे "हे मिथिलेश्वरी ! । ऐक राज्ञी ॥१३९॥ जनक विवेकसागर । असे जिचा प्राणेश्वर । त्या तुज करूं शकणार । कोण बोध ! ॥१४०॥ राज्ञि ! संधि साधून । जनक भूपालागून । सांगा आपुल्याकडून । समजावुनी ॥१४१॥ ठेवून घ्यावें लक्ष्मणा । भरतास धाडावें वना । जरी मानवेल कल्पना । भूपाप्रति– ॥१४२॥ तरी विचार करून । त्यांनीं करावा सद्यत्न । मज चिंता वाटे दारुण । भरताचीच ॥१४३॥ भरताच्या हृदयांतरी । गूढ प्रेम वास करी । त्याचें राहणें मज तरी । योग्य न गमे" ॥१४४॥ कौसल्येचें प्रेम बघून । ऐकून सरळ भाषण । सर्व राज्ञी झाल्या मग्न । करुणरसीं ॥१४५॥ पुष्प-वृष्टि नभांतुनी । 'धन्य धन्य' गर्जे ध्वनि । झाले सिद्ध–योगी-मुनि । स्नेहशिथिल ॥१४६॥ अंतःपुरीं सर्व स्त्रिया । पाहती थक्क होऊनिया । सुमित्रा म्हणे त्या समया । धरून धीर ॥१४७॥ "देवि ! आतां प्रहर दोन । रात्र गेली उलटून" । उठे राम–माता ऐकून । प्रेमभरें ॥१४८॥ "आपुल्या बिऱ्हाडास जवें । बाई आतां तुम्ही जावें"। म्हणे सप्रेम भावें । कौसल्या ती ॥१४९॥

"आमुचा वाली खरोखर । आतां असे परमेश्वर । त्यापरी मिथिलेश्वर । पाठीराखे" ॥१५०॥ कौसल्येचें प्रेम बघून। ऐकून नम्र भाषण । धरी तिचे पवित्र चरण । जनक-कांता ॥१५१॥ म्हणे, "देवि ! ही नम्रता । तुम्हां योग्यहि तत्त्वतां । दशरथ-कांता, राममाता । म्हणूनिया ॥१५२॥ समर्थ असती जाणा । आदरिती लघु जना । अग्नि धूमा, गिरि तृणा । मस्तकीं धरी ॥१५३॥ कायावाचामनेंकरून । सेवक असती यजमान[1] । शिव-भवानी रात्रंदिन । पाठीराखे ॥१५४॥ सहाय्यक शोभे तुम्हांप्रत । ऐसा कोण तरी जगांत । दीप सहाय्यक सूर्याप्रत । शोभेल काय ? ॥ १५५ ॥ 'वनीं जाऊन रघुराय । करुनिया देवकार्य । राज्य करील अक्षय । अयोध्येंत ॥१५६॥ रामबाहुबलेंकरून । नर, नाग, देवगण । करितील कालक्रमण । स्वस्थलीं सुखें' ॥१५७॥ याज्ञवल्क्यांनीं भाकित । करून ठेविलें समस्त । देवि! नव्हे तें अनृत । अन्यथा कदापि" ॥१५८॥ प्रेमें बोलून जनकजाया । पडे कौसल्येच्या पायां । सीतेस पाठवावया । विनवीतसे ॥१५९॥ सीतेसहवर्तमान । सुनयना निघे तेथून । विनयें आज्ञा घेऊन । कौसल्येची ॥१६०॥ प्रिय परिवारातें स्वतां । भेटती जाहली सीता । जयाची जैशी योग्यता । तैशापरों ॥१६१॥ तपस्विनीच्या वेषांत । पाहूनिया सीतेप्रत । दुःखें व्याकुल समस्त । विशेषेंचि ॥१६२॥ वसिष्ठांचें अनुशासन । जनकरायेंहि घेऊन । बिऱ्हाडीं जातां, ये दिसून । जानकीहि ॥१६३॥ जनकें सीते-लागुनी । हृदयीं धरिलें तत्क्षणीं । प्रेमप्राणाची पाहुणी । पवित्र ती ॥१६४॥ प्रेमसिंधु हृदयांतून । आला तेव्हां उचंबळून ।

---

१ राजा जनक

जाहलें भूपाचें मन । प्रयाग जणुं ॥१६५॥ प्रेम जानकीविषयक । वाढे अक्षयवट निःशंक । रामप्रेमरत बालक । शोभे तेथें ॥१६६॥ जनकाचें तत्त्वज्ञान । मार्कंडेय मुनि बनून । बुडतां करी अवलंबन । बालकाचें ॥१६७॥ ( देव दावी महा प्रलय । त्या समयीं मार्कंडेय । वटवृक्षीं बालकाश्रय । करिता झाला ॥१६८॥ सीतेविषयींची माया । बुडवूं पाहे जनकराया । परि रामप्रेमेंकरूनिया । तरता झाला ॥१६९॥ ) विदेह भूपतीची मति । मोहमग्न नव्हेच ती । ही रामप्रेमाची महती । निःसंशय ॥१७०॥ मातृपितृप्रेमपाश । त्यास सीता होतां वश । निज व्याकुलता तीस । नावरेचि ॥१७१॥ तरी ती भूमिकुमारी । धैर्य धरी निजांतरीं । स्वधर्माचा विचार करी । समयानुसार ॥१७२॥ तपस्विनीच्या वेषांत । पाहूनिया सीतेप्रत । प्रेमें तुष्ट मिथिलानाथ । विशेषेंचि ॥१७३॥ म्हणे, "उभयहि कुलें । पवित्र त्वां केलीं बाले! । 'सद्यशें विश्व धवळिलें' । म्हणती सर्व ॥१७४॥ तुझ्या कीर्ति–सरितेनें । जिंकिलें गंगेकारणें । व्यापून टाकिलीं भुवनें । कोटयवधि ॥१७५॥ केवळ तीन स्थलांसी । गंगा आणी महत्त्वासी । अमित साधुसमाजासी । देतसे ही" ॥१७६॥ (प्रयागराज, हरिद्वार । त्यापरी गंगासागर । गंगेनें केलीं पवित्र । त्रिस्थलें हीं ॥१७७॥ सीतेची कीर्तिसरिता । असंख्यात साधुसंतां । तीर्थस्नान–महत्तता । देतसे ही ॥१७८॥) पिता बोलला वैखरी । प्रेमें सत्य, मधुर तरी । संकोचांत सामावल्यापरी । जानकी ती ॥१७९॥ पुन्हां मातापितरांनीं । कवटाळिलें तिजलागुनी । सुंदर हितबोध करुनी । आशी दिला ॥१८०॥ बोलवेना तिजप्रति । संकोच वाटला चित्तीं । कीं येथे राहणें रातीं । उचित नाहीं ॥१८१॥ पाहून तन्मनोगत ।

राज्ञी जाणवी भूपाप्रत । शीलस्वभाव मिथिलानाथ । प्रशंसी मनीं ॥१८२॥ पुनःपुन्हां कडकडून । सीता भेटे त्यांलागून । त्यांनीं तिज सन्मानून । निरोप दिला ॥१८३॥ भरताविषयीं सादर । बोले समयानुसार । जनकराज्ञी चतुर । प्रेमळ वचें ॥१८४॥ भरताचें सदाचरण । जें सुगंधित सुवर्ण । कीं चंद्रामृतासमान । ऐकूनिया ॥१८५॥ प्रेमाश्रु झांकल्या नयनीं । रोमांचित तनु होउनी । सद्यश प्रशंसी मनीं । भूप मोदें ॥१८६॥ म्हणे, "सुमुखी! सुलोचनी! । ऐक सावध होउनी । संसारबंधन-निवारिणी । भरतकथा ॥१८७॥ धर्म–राजनीति-शास्त्र । तैसाचि ब्रह्मविचार । यथामति जेथवर । जाणतों मी ॥१८८॥ काय सांगूं ती मन्मति । स्पर्शाया तन्महिमेप्रति । प्रयत्नें छायेस नुसती । स्पर्शूं न शके! ॥१८९॥ ब्रह्मा, गणपति, शेष । शारदा आणि महेश । कवि, पंडित अशेष । बुद्धिमंत– ॥१९०॥ भरत-चरित्र केवळ । कीर्ति, कर्तृत्व सकल । धर्म, शील, गुण निर्मळ । विभूतिमत्व– ॥१९१॥ जाणतां, श्रवण करितां । सुखप्रद त्यां समस्तां । गंगेसम शुचि, अमृता । हरवी रुचि ॥१९२॥ गुण जयाचे निस्सीम । जो का पुरुष निरुपम । भरत तो भरतासम । जाणूनिया– ॥१९३॥ मेरु म्हणों का शेरभर । तुलना दिसेल विचित्र । म्हणून कविबुद्धि फार । संकोच धरी ॥१९४॥ भरतमहिमेचें वर्णन । सर्वांसहि गमे कठिण । जैसें मीनाचें गमन । निर्जलस्थलीं ॥ १९५ ॥ भरतमहिमा निःशंक । अपरिमित राज्ञी! ऐक । जाणे परि रघुनायक । वर्णूं न शके" ॥ १९६ ॥ यापरी प्रेमेंकरून । भरतसद्भाव वर्णून । स्त्रीचें हृद्गत जाणून । भूप वदे– ॥१९७॥ "लक्ष्मणें यावें परत । वनास जावो भरत । सर्वांचें हें मनोगत । कल्याण-

प्रद ॥१९८॥ काय सांगूं देवी! परि । राम–भरतांभीतरीं । प्रेमविश्वास परस्परीं । अनुमानेना ॥१९९॥ भरताचें ममता-प्रेम । पाहूं जातां तें निस्सीम । समतेची सीमा राम । असे जरी ॥२००॥ स्वार्थ आणि परमार्थ । यांचें सुख जें समस्त । भरतें न देखिलें किंचित् । स्वप्नांतहि ॥२०१॥ रामपदीं प्रेम अमित । हीच साधन-सिद्धि निश्चित । हाच भरताचा सिद्धान्त । दिसे मज ॥२०२॥ भक्त भरताकडून । रामाज्ञेचें उल्लंघन । घडणार नाहीं चुकून । मनानेंहि ॥२०३॥ होऊनिया प्रेमवश । चिंता न करी विशेष"। कळवळून नरेश । सांगता झाला ॥२०४॥ राम–भरताचे गुण । प्रेमें करीत वर्णन । रात्र गेली पळासमान । दांपत्यातें ॥२०५॥ राजसमाज उभयतां । जागे झाले उजाडतां । पूजिती निज देवता । स्नानोत्तर ॥२०६॥ स्नान करून रघुपति जाय गुरुनिकटवर्ती । पद वंदून बोले उक्ति । अनुज्ञेनें ॥२०७॥ "हे नाथ! माता, भरत । नागरिकहि समस्त । शोकविव्हल, दुःखित । वनवासानें ॥२०८॥ निज समाजासहित । त्यापरी मिथिलानाथ । दिवस लोटले बहुत । क्लेश साही ॥२०९॥ दिसेल जें का उचित । करा स्वामिन् तें सांप्रत । आपुल्याच हातीं हित । सर्वांचेंहि" ॥२१०॥ इतुकें बोलून रघुपति । संकोचे तें निजचित्तीं । बघून शीलस्वभावाप्रति । पुलकित मुनि ॥२११॥ म्हणती, "राम! तुझ्याविण । सुखसमृद्धि संपूर्ण । उभय समाजालागून । नरकतुल्य! ॥२१२॥ प्राणाचा प्राण स्वयमेव । जीवाचाहि तूंच जीव । सुखाचें सुखसर्वस्व । तूंचि राम! ॥२१३॥ बापा! टाकून तुजप्रत । जे का आसक्त गृहांत । त्यांचें प्राक्तन विपरीत । निश्चयानें ॥२१४॥ तया धर्म–कर्म–सुखा । आग लागो रघुनायका! । जेथें तवपदाब्जीं निका । भाव नाहीं ॥२१५॥

योग तो कुयोग जाण। ज्ञान तें पूर्ण अज्ञान । तुझें प्रेमचि प्रधान। नसे जेथें ॥२१६॥ दुःखी, जे तुझ्यारहित। सुखी, जे तुजशीं रत। तूंच जाणसी हृद्‌गत। प्रत्येकाचें ॥२१७॥ तुझी अनुज्ञा समर्था! । आहे सर्वांच्याहि माथां । तुजचि ठावी अवस्था। सर्वांचीहि ॥२१८॥ त्वांचि स्वयें आश्रमांत । रामा! चलावें सांप्रत"। प्रेमें शिथिल मुनिनाथ। बोलून हें ॥२१९॥ तै करूनिया वंदन। आश्रमीं जाई रघुनंदन। आले ऋषि धैर्य करून। जनकाकडें ॥२२०॥ ( सोपानींचा मार्ग भला। जरी दीर्घतम वाटला। तदर्थ चवदावा योजिला। विश्राम हा ॥२२१॥ रसिक, भाविक श्रोत्यांस । विनवीतसे देवीदास । माझ्या बोबड्या बोलांस। मान्य करा ॥२२२॥)

---

## विश्राम १५ वा

श्रीगणेशाय नमः। श्रीसरस्वत्यै नमः। श्रीगुरुभ्योनमः
श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः

वसिष्ठ मुनि रामोक्ति। जनकातें निवेदिती। तच्छील-स्वभावाप्रति। वर्णूनिया ॥१॥ 'राया' म्हणती मुनिनाथ। "तेंचि करावें सांप्रत। जेणें सर्वांचेंहि हित। धर्मासवें ॥२॥ तुम्ही तों ज्ञाननिधान। शुचिष्मंत आणि सुज्ञ। धर्मधुरंधर पूर्ण। राज-श्रेष्ठ! ॥३॥ तुम्हांवांचूनिया राया!। कोडें हें उलगडावया। सामर्थ्यवान् या समया। कोण आहे?" ॥४॥ ऐकून मुनींचें

भाषण । जनक प्रेमीं तल्लीन । नुरे अवस्था पाहून । ज्ञान-वैराग्य! ॥५॥ प्रेमशिथिल होउनी । विचार करी स्वमनीं । "आलों आपण या स्थानीं । चुकलें खरें ॥६॥ दशरथेंचि रघु-राया । कथिलें वनीं जावया । दाविला सत्य करूनिया । प्रेम-पण ॥७॥ आम्ही मात्र सांप्रत । पाठवून त्या वनांत । परतूं मोदें प्रशंसीत । शहाणपण!" ॥८॥ ( सांपडलों न मोहांत पित्यापरी न झालों मृत । शहाणपण मनांत । मानून हें ॥९॥) तापसी–मुनि–ब्राह्मण– । जनकदशा विलोकून । व्याकुल विशेषेंकरून । प्रेमवशें ॥१०॥ प्रसंग जाणून राय । मनीं धरू-निया धैर्य । समाजासहित जाय । भरताकडें ॥११॥ सामोरे जाऊन भरतें । आदरें सन्मानिलें त्यांतें । देऊन योग्य आसनांतें । समयानुसार ॥१२॥ बोले तैं मिथिलानाथ । "बा भरता! तुज-प्रत । स्वभाव असे विदित । राघवाचा ॥१३॥ राम पूर्ण सत्य-व्रत । असूनिया धर्मरत । प्रेमागत्य तयाप्रत । सर्वांचेंहि ॥१४॥ संकोचून निजांतरीं । साहतों संकटें भारीं । घालूं कानावरी तरी । सांगसी तें" ॥१५॥ ऐकतां तनु रोमांचित । नेत्र प्रेमाश्रु-पूरित । धैर्य धरूनिया भरत । काय म्हणे– ॥१६॥ "श्रीराम मज प्रियतम । पूज्य तुम्ही पित्यासम । कुलगुरु हितप्रद परम । पितरांहुनी ॥१७॥ कौशिकादि मुनीश्वर । सुमंतादिक सचिव थोर । हे सर्वहि ज्ञानसागर । आपणांसवें ॥१८॥ मी तों केवळ बालक!। आज्ञेचा परिपालक । जाणून कर्तव्यबोधक । व्हावें स्वामिन्! ॥१९॥ येथें समाजांत आतां । तुम्ही मजलागीं पुसतां । मौनें मलिनता, बोलतां । वेडेपण ॥२०॥ लहान तोंडीं गोष्ट मोठी । बोलतों मी यासाठीं । दुर्दैवाकडें द्या दृष्टि । क्षमा करा ॥२१॥ वेद–शास्त्र–पुराणांत । हाचि प्रसिद्ध सिद्धान्त ।

'सेवाधर्म कठिण' विदित । लोकांसहि ॥२२॥ स्वामीधर्म, निजस्वार्थ । विरोध या उभयतांत । वैर आंधळें, प्रेमांत । ज्ञान नुरे ॥२३॥ (स्वामीधर्म राखूं जातां । मुकावें लागतें स्वार्था । चुकतो स्वार्थ, साधितां । स्वामीधर्म ॥२४॥ ) राखून राम-मनोगत । तैसें त्याचें धर्मव्रत । जाणूनिया मजप्रत । पराधीन– ॥२५॥ जें का सर्वांस संमत । ज्यांत सर्वांचेंहि हित । तेंचि करा प्रेमाप्रत । ओळखुनी" ॥२६॥ ऐकून भरताचें वचन । त्याचा सद्‌भाव पाहून । राव प्रशंसी त्यालागून । समाजासह ॥२७॥ सुगम असून दुर्गम । कोमल परि कठोरतम । अर्थ पाहतां परम । अक्षरें थोडीं ॥२८॥ मुख पाहतां आरशांत । तो आरसा स्वकरांत । धरितां न ये तद्वत् । बोलणें त्याचें ॥२९॥ साधुसमाजासंगतीं । भूप, भरत, मुनि जाती । देव, कुमुदतारापति । राम जेथें ॥३०॥ तें ऐकून वर्तमान । दुःखें व्याकुल सर्व जन । नववृष्ठींत मीनगण । होय जणुं ॥३१॥ कुलगुरूची अवस्था । देव पाहती प्रथमतां । मग प्रेमविलक्षणता । विदेहाची ॥३२॥ रामभक्तींत तल्लीन । त्या भरता विलोकून । घाबरे स्वार्थी देवगण । निराशेनें ॥३३॥ निमग्न रामप्रेमांत । पाहून लोक समस्त । दुःख झालें देवांप्रत । अवर्णनीय ॥३४॥ भक्ताच्या प्रेमेंकरून । वश होय रघुनंदन । बोलला दुःखमग्न । देवेंद्र तो ॥३५॥ "तरी मिळून समस्त । रचा कांहीं कपटाप्रत । ना तरी होणार घात । स्वकार्याचा" ॥३६॥ स्मरूनिया सरस्वती । देव तिला विनविती । "आम्ही शरण तुजप्रति । रक्षण करीं ॥३७॥ आपुल्या मायेनें देवी ! । भरतबुद्धि पालटवीं कपटपटलें वांचवी । देवताकुल" ॥३८॥ ऐकून देवांची विनंति । सुज्ञ देवी सरस्वती । स्वार्थी, मूर्ख देवांप्रति । जाणून वदे– ॥३९॥

"म्हणसी इंद्रा! मजप्रति । 'पालटवीं भरतमति' । सहस्रनेत्रीं तुजप्रति । मेरू न दिसे ॥४०॥ विधि-हरि-हरांची माया । बलवत्तर देवराया ! । भरतबुद्धीतें पहाया । समर्थ नसे ॥४१॥ मोहावया त्या बुद्धिसी । सांगतोस तूं मजसी । चांदणी चोरील कैसी । सूर्याप्रति ? ॥४२॥ भरताच्या हृदयांतरीं । सीताराम वास करी । सूर्यप्रकाशाभीतरीं । अंधार कैसा ?" ॥४३॥ हें बोलून सरस्वती । गेली ब्रह्मलोकाप्रति । देव व्याकुल जैसे रीतीं । चक्रवाक् ॥४४॥ स्वार्थी, कपटी ते देव । संमत होऊन सर्व । द्यावयासी उपद्रव । प्रवर्तले ॥४५॥ प्रबल मायावश होऊन । रचिलें त्यांनीं कारस्थान । भय, भ्रम, उच्चाटन । दुःखादिक ॥४६॥ (राजसमाजीं उभय । कुणा भ्रम, कुणा भय । उच्चाटन होय । दुःख कोणा ॥४७॥) कपट करून यापरीं । देवेंद्र मनीं विचारी । कार्य, अकार्य सर्व परि । भरताकडें ॥४८॥ जनक तया समयासी । जाय रघुनाथापाशीं । तैं संमानी सर्वांसी । रघुकुलदीप ॥४९॥ धर्म, समय, सभाजन । या सर्वां अनुसरून । बोलती तेधवां वचन । वसिष्ठ मुनि ॥५०॥ (जनक-भरत-संवाद । ऐकविला आधीं विशद । भरत-मतासी अविरोध । दावूनिया ॥५१॥) "प्रिय राघवा! तूं जैसी । जया लागीं आज्ञा करिसी । तैसेंचि वागणें त्यासी । योग्य गमे" ॥५२॥ तें ऐकून रघुनंदन । दोन्ही करांतें जोडून । मृदुपणें वदे वचन । सरल सत्य ॥५३॥ "प्रत्यक्ष आपण स्वतां । त्यापरी मिथिलेश असतां । माझें बोलणें सर्वथा । उचित नसे ॥५४॥ आपण आणि महाराज । आज्ञा कराल जी मज । ती शिरसा वंद्य सहज । शपथपूर्वक" ॥५५॥ श्रीरामाची ती शपथ । ऐकतां समाजासहित । वसिष्ठ, मिथिलानाथ । संको-

चले ।।५६।। भरताच्या मुखाप्रति । सर्वहि अवलोकिती । बोला-
वया कुणाप्रति । सुचेचिना ।।५७।। संकोचग्रस्त सभा सारी ।
भरत तो विलोकन करी । धैर्य धरीतसे भारी । रामबंधु ।।५८।।
प्रसंग कठिण भारी । पाहून प्रेमा आवरी । अगस्ति जैसा
सांवरी । विंध्याचला ।।५९।। शोक—हिराण्याक्ष जरी । बुद्धिरूप
धरा हरी । शुद्ध गुण जो निर्मात्री । स्वभारती- ।।६०।। भरत-
विवेक निर्मल । तोच वराह विशाल । उद्धरी तिज तत्काल ।
अनायासें ।।६१।। (लोकीं पसरला शोक । तया भरत—विवेक ।
दूर करीतसे निःशंक । भाषणानें ।।६२।।) करूनिया प्रणिपाता ।
सर्वां जोडूनिया हाता । राम—भूप—गुरु—संतां । प्रार्थूनिया ।।६३।।
म्हणे "अनुचित अति । क्षमा करा हो ! मजप्रति । मृदुमुखें कठोर
उक्ति । बोलतों मी" ।।६४।। भरतें आपुल्या चित्तीं । आठविली
सरस्वती । मानसींची आली वरती । मुखपंकजीं ।।६५।। युक्त-
विवेक, लीनता । धर्म, न्याय, शालीनता । भरतवाणी तत्त्वतां ।
हंसिनीच ।।६६।। ( धर्मन्यायविवेक । शालीनता, विनयादिक ।
हेंचि खाद्य मौक्तिक । हंसिनीचें ।।६७।।) ज्ञानचक्षूनें भरतें ।
प्रथमतां त्या समयातें । प्रेमशिथिल समाजातें । विलोकिलें ।।६८।।
करूनिया प्रणिपात । बोलता झाला भरत । सीतारामचंद्राप्रत ।
स्मरूनिया ।।६९।। "प्रभो ! तूंचि मातापिता । मित्र, गुरु,
स्वामी तत्त्वतां । पूज्य परम, हितकर्ता । अंतर्यामीं ।।७०।।
तूंच सुस्वामी सरल । शीलनिधान केवल । तूंच सुज्ञ,
प्रणतपाल सर्वज्ञ तूं ।।७१।। तूंच समर्थ निःशंक । शरणागत-
हितकारक । पापदोष-संहारक । गुणग्राही ।।७२।। तुजसारखा
सुस्वामी । तूंच एक विश्वधामीं । तुझीच शपथ, सेवक
मी । मजसारखा ।।७३।। तुझी आणि जनकाची । आज्ञा

उल्लंघून साची । समाजासह उगाचि । आलों येथ ॥७४॥ बरें–वाईट जगांत । उच्चनीच तद्वत् । अमरपद अमृत । विष मृत्यु ॥७५॥ परि तुझी आज्ञा कांहीं । उल्लंघितां मनानेंहि । देखिला, ऐकिला नाहीं । कुठेंहि कुणी ॥७६॥ धाडस तें ऐशा-रीतीं । मींच केलेंसे निश्चितीं । प्रभो ! त्वां मानिली ती । प्रेमसेवा ॥७७॥ कृपा आणि सुजनता । तुझीच स्वामिन् ! तत्त्वतां । केलें त्वांच माझ्या हिता । सर्वतोपरीं ॥७८॥ जें जें माझें दूषण । तें तें झालें मद्भूषण । सद्यश गेलें पसरून । चोहींकडे ॥७९॥ तुझी नीतीची राहणी । मधुरशी भाषासरणी । गायिली वेद-शास्त्रांनीं । विदित जगीं ॥८०॥ क्रूर, दुष्ट, कपटयुक्त । दुर्मति आणि कलंकित । नीच, नास्तिक, शीलरहित । निर्लज्ज जे– ॥८१॥ तेहि ऐकून यशाप्रत । होतांच शरणागत । एक-दांचि नमितां त्यांप्रत । आपुलें केलें ॥८२॥ त्यांचे पाहूनिया दोष । मनीं आणिलें न लेश । वर्णिलें ऐकून गुणांस । सत्सभेंत ॥८३॥ कोण स्वामी ऐसा जगीं । आपुल्या सेवका-लागीं । सांभाळून घे सर्वांगीं । आपुल्यासम ? ॥८४॥ आपुल्या उपकाराप्रत । स्वप्नींहि न आणिलें मनांत । चिंता वाहिली सदोदित । सेवकाची ॥८५॥ ऐसा स्वामी तुजविण । असे दुजा तरी कोण ?। सांगतों बाहु उभारून । पैजेनें मी ॥८६॥ पशु सुंदर नाचती । शुक चातुर्यें बोलती । गुणप्रभाव तो हातीं । शिक्षकांच्या ॥८७॥ यापरीं सेवकालागीं । सांभाळूनिया सर्वांगीं । बैसविसीं शिरोभागीं । सज्जनांच्या ॥८८॥ तरी कृपाळा ! तुझ्याविण । कोण करी प्रतिपालन । निजब्रीदावलीलागून । प्रतिज्ञेनें ॥८९॥ प्रेमें किंवा वैतागानें । अथवा बालबुद्धीनें । आज्ञा उल्लंघून येणें । झालें माझें ॥९०॥ तथापि कृपाळूपणीं ।

आपुलें ब्रीद जाणुनी । उचित घेतलें मानुनी । सर्वतोपरी ॥९१॥ सुमंगलाचें अधिष्ठान । पाहिले स्वामींचे चरण । स्वभावेंचि सुप्रसन्न । जाणिलें मीं ॥९२॥ प्रचंड समाजीं पाहिलें । सद्‍भाग्य मीं हें आपुलें । महापराध जरी झाले । कृपाळू धनी ॥९३॥ कृपाप्रसादें वहिलें । माझें सर्वांग निवालें । सर्वहि शिगेस नेलें । दयानिधीनें ॥९४॥ स्वामीनें पदरीं घेतलें । माझें कोडचि पुरविलें । आपुल्या स्वभावशीलें । सौजन्यानें ॥९५॥ प्रभो! मी पुरतेंपणीं । बैसलों धाडस करुनी । स्वामींचा संकोच सोडुनी । समाजासह ॥९६॥ अविनयें वा नम्रपणें । बोललों इच्छेप्रमाणें । दुःखी जाणून करणें । क्षमा देवा! ॥९७॥ प्रियतम आणि सुजाण । ऐशा स्वामीलागून । करणें बहुत भाषण । दोष मोठा ॥९८॥ तरी देवा! सांप्रत । आज्ञा द्यावी मजप्रत । माझे दोष समस्त । सुधारुनी ॥९९॥ प्रभुपदाब्जपरागाची । शपथ घेतसे साची । जी सत्य-सुकृत-सुखाची । सुंदर सीमा ॥१००॥ सांगतों घेऊन शपथ । जागृत्स्वप्नसुषुप्तींत । आहे एकचि मन्मनांत । आवडी ही- ॥१०१॥ अकृत्रिम प्रेमेंकरून । करावें स्वामीसेवन । स्वार्थ-कपट त्यागून । फलरहित ॥१०२॥ आज्ञापालनासमान । स्वामीसेवा नसे आन । तो प्रसाद दासालागून । देई देवा" ॥१०३॥ इतुकें बोलून भरत । होई प्रेममग्न बहुत । नेत्रीं अश्रु, रोमांचित । देह झाला ॥१०४॥ हृदयीं होऊन व्याकुल । धरी प्रभुपदकमल । त्या समयींचें प्रेम केवल । अवर्णनीय ॥१०५॥ कृपासिंधु चापपाणि । सद्वचनें सन्मानुनी । निकट बसवी त्यालागुनी । धरून कर ॥१०६॥ ऐकून भरत-विनंति । पाहून तत्स्वभावाप्रति । प्रेमशिथिल रघुपति । सभेसह ॥१०७॥ प्रेममग्न रघुनाथ । साधुसमाज

समस्त । वसिष्ठादिमुनिसहित । जनकराज ॥१०८॥ स्वमनांत प्रशंसिती । भरताची बंधुप्रीति । त्यापरी त्याची महति । अपरिमित ॥१०९॥ भरतातें प्रशंसिती । देव पुष्पवृष्टि करिती । जरी ते कुटिल असती । निजमानसीं ॥११०॥ तेथींचे लोक सकल । झाले अत्यंत व्याकुल । रात्र येतां जैसें कमल । संकोच पावें ॥१११॥ अत्यंत दुःखी दीन । समयीं विलोकून । उभय समाजीं सकल जन । नारीनर ॥११२॥ देवेंद्र महा मलिन । मेलेल्यासहि मारून । मनीं आपुलें कल्याण । इच्छीतसे ॥११३॥ कपट आणि अपाय । यांची सीमाच सुरराय । परकार्यघातप्रिय । स्वार्थ चित्तीं ॥११४॥ इंद्राचा स्वभाव विशेष । केवळ कावळ्यापरिस । कुणाचा न ज्या विश्वास । दुष्ट कपटी ॥११५॥ आधींच दुष्ट बुद्धीनें । कपट योजिलें त्यानें । उच्चाटनप्रयोगानें । घेरिलें सर्वां ॥११६॥ त्या देवमायेनें अति । मोहिलें सर्व लोकांप्रति । राम–वियोग न साहती । प्रेमातिशयें ॥११७॥ उच्चाटनवशेंकरून । स्थिर न राहे त्यांचें मन । क्षणांत आवडे वन । क्षणांत गृह ॥११८॥ द्विधा झालें मनोगत । तेणें प्रजा दुःखी बहुत । सरित्सिंधुसंगमांत । जल जैसें ॥११९॥ दुभंगल्या त्यांच्या मना । कोठें संतोष वाटेना । मर्म सांगतां येईना । एक–मेकां ॥१२०॥ हें स्वमनीं ओळखून । सस्मित कृपानिधान । म्हणे, “श्वान, इंद्र, तरुण । सारखेच” ॥ १२१ ॥ भरत, जनक, मुनिगण । मंत्री, महात्मे, साधुजन । या आत्मनिष्ठांलागून । वगळूनिया ॥१२२॥ देवेंद्राची कपटमाया । भोंवलीसे लोकां तया । ज्याच्या त्याच्या अनुसरूनिया । योग्यतेस ॥१२३॥ कृपासिंधु रघुनंदनें । दुःखी देखिलीं जनमनें । देवेंद्राच्या कपटानें । निजप्रेमें ॥१२४॥ सभा, जनक, मुनिनाथ ।

सचिव ब्राह्मण समस्त । भरतभक्तीनें नियंत्रित । यांची मति ।।१२५।। चित्रीं रेखिल्यासमान । रामास करिती विलोकन । संकोचें बोलती वचन । शिकविल्यापरीं ।।१२६।। भरताची शुचि प्रीति । नम्रता आणि महति । ऐकतां सुखद, कठिण ती । वर्णावया ।।१२७।। ज्याच्या भक्तीचा लवलेश । अवलोकून विशेष । मुनीश्वर, मिथिलेश । प्रेममग्न ।।१२८।। तयाचा महिमा कैसा । वर्णवे तुलसीदासा । भक्तिप्रभावें सहसा । सुमति स्फुरे ।।१२९।। (गोस्वामी ऐसें वदती । तेथें माझा पाड किती । मी तों आधींच मंदमति । भक्तिहीन ।।१३०।।) जाणून आपुली क्षुद्रता । महिमेची महत्तता । कविकुलभयेंचि स्वतां । संकोच पावे ।।१३१।। वर्णूं न शके गुणांप्रति । जरी इच्छा असे अति । बुद्धीची जाहली स्थिति । बालोक्तिपरीं ।।१३२।। भरताचें यश निर्मल । पूर्ण चंद्रमा उज्ज्वल । चकोरकुमारी अबोल । कवीची मति ।।१३३।। तो चंद्रमा होय उदित । कविहृदयाच्या नभांत । टकमक राही पहात । मतिचकोरी ।।१३४।। भरताची शुद्धभक्ति । वेदहि वर्णूं पाहती । परि अगम्य तयांप्रति । वर्णावया ।।१३५।। माझी तों अल्पमति । जिचें चांचल्यहि अति । कविजन हो ! मजप्रति । क्षमा करा ।।१३६।। भरताची सरल भक्ति । सांगतां, ऐकतां चित्तीं । कुणास न जडे प्रीति । सीतारामपदीं ? ।।१३७।। भरताचें करितां स्मरण श्रीरामाचें प्रेम गहन । ज्या न सुलभ त्यासमान । दुर्दैवी कोण ? ।।१३८।। सर्वांची दशा पाहून । त्यांचें मनोगत जाणून । दयाळु रघुनंदन । सर्वज्ञ जो- ।।१३९।। धैर्यशाली, धर्मप्रमुख । नीतिनिपुण आत्यंतिक । सत्य-स्नेह-शील-सुख- । सागर जो ।।१४०।। देशकालवर्तमान- । समयातें विलोकून । नीति-

प्रीतीचें पालन । कर्ताच जो– ॥१४१॥ तो राम झाला बोलता। जें वाक्सर्वस्व तत्त्वतां। अमृतसम ऐकतां। हित परिणामीं ॥१४२॥ "ऐक गा बाळा भरता !। धर्मधुरीण तूं स्वतां । वेद–व्यवहार जाणता । प्रवीण तूं ॥१४३॥ कायावाचामनेंकरून । पवित्र तुझ्यासमान । निश्चयें अससी जाण । तूंच स्वयें ॥१४४॥ सभेंत असतां गुरुजन । धाकटया बंधूचे गुण । कठिण समयीं वर्णून । सांगूं कसें ? ॥१४५॥ बालका ! सूर्यवंशाची । पद्धति जाणसी साची । सत्यप्रतिज्ञ पित्याची । प्रीति, कीर्ति ॥१४६॥ प्रसंगाची, समाजाची । मर्यादा गुरुजनांची । शत्रुमित्र उदासीनांची। मनःस्थिति- ॥१४७॥ विदित आहे तुजप्रत। सर्वांचें मर्म निश्चित। उभयतांचें परमहित । धर्म तैसा ॥१४८॥ सर्वस्वीं माझा तरी । भरवसा तो तुझ्यावरी। तथापि समयापरी । बोलतों मी ॥१४९॥ पित्याच्या पश्चात् सांप्रत । आपुली बूज समस्त । गुरुकृपेनेंच निश्चित । राखिलीसे ॥१५०॥ कुटुंब, परिवार ना तरी। त्यापरी प्रजाहि सारी। झाली असती दुःखी भारी। आमुच्यासह ॥१५१॥ एकाएकीं दिनेश । पावला जरी अस्तास। कां नाहीं होणार क्लेश । विश्वाप्रति ? ॥१५२॥ तैसाचि उत्पात ताता ! । करिता झाला विधाता । मुनि मिथिलेशें सर्वथा। सांभाळिलें ॥१५३॥ राजकारण मुख्यतम । लज्जा, प्रतिष्ठा, धर्म । धरणी, धन आणि धाम । सर्व कांहीं ॥१५४॥ गुरुप्रभावचि पूर्ण । यांचें करील रक्षण। शेखीं होईल कल्याण । सर्वांचेंहि १५५॥ समाजासह सकळिक। तुझें, माझें उभयात्मक। गुरुप्रसादचि संरक्षक । गृहीं वनीं ॥१५६॥ गुरु–स्वामी–पितराज्ञेंत। सर्व धर्म अंतर्भूत। शेषाधार पृथ्वीप्रत। जैशापरीं ॥१५७॥ करून तिचें तूं पालन। करवीं माझ्याहिकडून। करीं रविकुल-

रक्षण । याच रीतीं ॥१५८॥ सकल सिद्धींचे साधक । हेंचि साधक असे एक । यशःसद्‌गतिऐश्वर्यात्मक । त्रिवेणीचें ॥१५९॥ हें विचारून मानसीं । साहून भारी संकटासी । निज प्रजा-परिवारासी । सुखी करीं ॥१६०॥ सर्वांनींच मिळून । विपत्ति घेतली वांटून । अवधिपर्यंत कठिण । मात्र तुज ॥१६१॥ जाणून तव मृदुचित्त । कठोर बोलतों सांप्रत । प्रसंग जाणून अनुचित । मानूं नको ॥१६२॥ येतां कठिण समय । बंधूच होती साह्य । हातचि चुकवितां होय । खड्गाघात ॥१६३॥ हस्त, पाद आणि नयन । हा होय सेवक गण । मुख तें निश्चयेंकरून । स्वामी त्यांचा ॥१६४॥ प्रेमाचें ऐसें लक्षण । ऐकूनिया सत्कविजन । करितात प्रशंसन । तयाचेंच" ॥१६५॥ तेधवां सभा समस्त । ऐकून रामाचें भाषित । जणुं प्रेमसागरामृत- । परिपूर्ण तें ॥१६६॥ शिथिल झाले सर्व जन । जणुं प्रेमसमाधिमग्न । वाग्देवी स्तब्ध पाहून । त्यांची स्थिति ॥१६७॥ ह्या कारणें भरतास । झाला परम संतोष । स्वामी प्रसन्न, दुःख दोष । नष्ट झाले ॥१६८॥ मुखीं प्रसन्नता आली । मनींची चिंता निरसली । जणुं मूका प्रसन्न झाली । वाग्देवता ॥१६९॥ पुनरपि अतिप्रीतीं । भरत करूनिया प्रणति । जोडून करकमलांप्रति । काय म्हणे- ॥१७०॥ "प्रभो! संगें यावयाचें । सुख लाभलें मज साचें । जगीं जन्म घेतल्याचें । सार्थक झालें! ॥१७१॥ कृपाघना! या उपरीं । आज्ञा होईल ज्यापरीं । पाळीन मी धरून शिरीं । आद-रानें ॥१७२॥ प्रभो! मजला कांहीं तरी । आधार तुम्ही द्याल जरी । पावेन मी कैसातरी । अवधि पार ॥१७३ प्रभो! हे रघुनंदना! । कराया अभिसेचना । सद्‌गुरूच्या अनुशासना । पावूनिया- ॥ १७४ ॥ पृथ्वींचीं तीर्थें सकल । त्यांचें मीं

आणिलें जल। तदर्थ आज्ञा केवल । निवेदावीं ॥१७५॥ परि एक हौस मोठी। राहलीसे माझ्या पोटीं । सांगाया येई न ओठीं । संकोच–भावें" ॥१७६॥ "सांग गा! सांग गा ताता !"। प्रभूची अनुज्ञा होतां। बोले स्नेह–सुभगता–। युक्त वाणी ॥१७७॥ "चित्रकूटीं तीर्थ, वन । ऋष्याश्रम, पक्षी, हरिण। सरिता, निर्झर, गिरिगण। सरोवरें– ॥१७८॥ विशेषें-करून धरणी। अंकित प्रभुपदांनीं। आज्ञा होय तरी पाहुनी। येईन मी" ॥१७९॥ (ऐकून ऐसी विनंति। संतोषलासे रघुपति। बोले तदा भरताप्रति । प्रसन्नपणें ॥१८०॥ "अत्रींच्या आज्ञे-नुसार। अवश्य पहावें कांतार । बाळा! करीं वनविहार। निर्भयपणें ॥१८१॥ केवळ मुनींचा प्रसाद। वन हें मंगलप्रद। सुंदर परम शुद्ध। बांधवारे! ॥१८२॥ ऋषिश्रेष्ठ अत्रिनाथ। अनुज्ञा देतील जेथ। तीर्थांचें जल हें तेथ। स्थापन करीं" ॥१८३॥ ऐकून प्रभूचें भाषित । संतुष्ट झाला भरत । मुनिपदकमलीं मुदित। नमवी शिर ॥१८४॥ (सोपानींचा मार्ग भला। जरी दीर्घतम वाटला। तदर्थं पंधरावा योजिला। विश्राम हा ॥१८५॥ रसिक, भाविक श्रोत्यांस । विनवीतसे देवीदास । माझ्या बोबड्या बोलांस। मान्य करा ॥१८६॥)

———

# विश्राम १६ वा

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्योनमः
श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः

राम आणि भरताचा । संवाद ऐकून साचा । सकलहि सुमंगलाचा । मूळ जो का ॥१॥ स्वर्गस्थ देव जे स्वार्थी । सूर्यकुला प्रशंसिती । कल्पद्रुम–पुष्पें वर्षिती । तयांवरी ॥२॥ 'धन्य धन्य हा भरत । जय जय श्रीरघुनाथ' । म्हणती देव समस्त । आनंदोनी ॥३॥ वसिष्ठ–मिथिलानाथा । तैसा सभाजनां समस्तां । भरत–वचन ऐकतां । परमाल्हाद ॥४॥ भरत आणि रघुपति । यांचे गुणगण, प्रीति । पुलकित होऊन भूपति । प्रशंसीतसे ॥५॥ स्वामी–सेवक उभयत्र । शुद्ध जयांचें चरित्र । पवित्राहून पवित्र । तत्प्रेमव्रत ॥६॥ आपुल्या बुध्द्यनुसार । प्रशंसिती वरचेवर । सचिव, सभाजन समग्र । प्रेमाविष्ट ॥७॥ राम–भरत–संभाषण । अनुक्रमें करून श्रवण । हर्षविषादयुक्त मन । समस्तांचें ॥८॥ श्रीराममातेलागून । सुखदुःख समसमान । राण्यांचें करी समाधान । वर्णून गुण ॥९॥ श्रीरामाची महति । कोणी एक वर्णिती । भरताची सरलमति । वर्णिती कुणी ॥१०॥ तदुपरी भरताप्रति । अत्रि ऋषि ते सांगती । "पर्वताच्या निकटवर्ती । कूप एक ॥११॥ तीर्थजलांची स्थापना । करावी त्वां त्या स्थानां । पवित्र, ज्या उपमा ना । अमृतासम" ॥१२॥ अत्रींचें अनुशासन । यापरीं भरतें पावून । पुढें दिलीं पाठवून । तीर्थपात्रें ॥१३॥ अत्रि–वसिष्ठमुनिसहित । शत्रुघ्नाच्या समवेत ।

भरत जाला झाला जेथ । अगाध कूप ॥१४॥ पवित्र जल तें घेउनी । ठेवी तेव्हां पुण्यस्थानीं । प्रेमानंदें अत्रिमुनि । काय म्हणती– ॥१५॥ "बाळा भरता! हें स्थान । अनादिसिद्ध असून । कालमानें लुप्त, म्हणून । ठावें न कुणा ॥१६॥ तुझ्या सेवकांनीं केवळ । पाहून दलदलीचें स्थळ । प्यावया सुंदर जळ । उपसिला हा ॥१७॥ परि दैवयोगें साचार । झाला जगास उपकार । अगम्य जो धर्मविचार । सुलभ झाला ॥१८॥ 'भरत कूप' म्हणून । पावेल हा अभिधान । तीर्थांच्या जलेंकरून । पवित्र हा ॥१९॥ प्रेम-नियम सांभाळुनी । स्नान करी जो प्राणी । कायावाचामनेंकरुनी । शुद्ध होय" ॥२०॥ यापरीं कूपाचें महत्त्व । वर्णन करिती सर्व । गले ज्या स्थलीं राघव । बैस-लासे ॥२१॥ तेथें रघुनाथाप्रति । अत्रिमुनि निवेदिती । पुण्य-तीर्थाची महति । निजमुखानें ॥२२॥ कथा धर्मेतिहासिक । सांगतां प्रीतिपूर्वक । रात्र संपून स्वाभाविक । उजाडलें ॥२३॥ भरत आणि शत्रुघ्न । नित्यकर्मातें सारून । अत्रिरामगुर्वानु-शासन । घेऊनिया– ॥२४॥ सकल समाजासहित । साध्या थाटेंच त्वरित । पायींच वनविहारार्थ । निघते झाले ॥२५॥ कोमलपदें भरत । असतां अनवाणी चालत । पृथ्वी संकोचून मनांत । मृदु होय ॥२६॥ पाषाण, तृण, कंटक । कांटेरी झुडपें अनेक । दुरावून त्रासदायक । वस्तूंप्रति– ॥२७॥ पृथ्वीनें केलासे पथ । सुगम, मृदु अत्यंत । सुखाचा त्रिविध वात । वाहतसे ॥२८॥ पुष्पें वर्षिती सुरगण । छायाहि करिती सघन । वृक्ष पुष्प-फलें परिपूर्ण । तृणें मृदु ॥२९॥ हरिण सारखे पाहती । पक्षी मधुर आलापती । रामप्रिय जाणून सेविती । सर्वहि त्या ॥३०॥ सुलभ सिद्धि समस्त । साधारण जीवांप्रत । जांभई

देतां उच्चारित । रामनाम ॥३१॥ श्रीरघुनाथाप्रत । प्राणप्रिय ह्या भरत । तदर्थं सुलभ समस्त । नवल काय? ॥३२॥ ऐशा प्रकारें करुनी । भरत विहरतसे वनीं । प्रेम-नेम पाहून मुनि संकोचती ॥३३॥ पुण्य जलाशय सुभग । तैसे तेथील भूभाग । गिरि, तृण, तरु, खग, मृग । वनोद्यानें ॥३४॥ सुंदर आणि विचित्र । विशेषेंकरून पवित्र । दिव्य पाहून सर्वत्र । भरत पुसे ॥३५॥ ऐकून मुदित हृदय । कथिती त्या ऋषिवर्य । नाम, गुण आणि माहात्म्य । हेतूंसह ॥३६॥ कोठें करीतसे स्नान । कोठें विनयें वंदन । कोठें तें रमणीय वन । अव-लोकी ॥३७॥ मुनींचें अनुशासन । घेऊन, कोठें बैसून । स्मरती रघुनंदन । उभयबंधु ॥३८॥ पाहून सेवा, सद्भक्ति । सुस्वभाव आणि प्रीति । वनदेवता त्या देती । आशीर्वाद ॥३९॥ अडीच प्रहर दिन । लोटतां यावें परतून । प्रभुपदाब्जदर्शन । घ्याव-यातें ॥४०॥ ऐशीं तीर्थस्नानें सारीं । भरतें तया अवसरीं । पांच दिवसांमाझारीं । विलोकिलीं ॥४१॥ हरिहरांचें सद्यश । गातां, ऐकतां विशेष । लोटला तोहि दिवस । सूर्यास्त होय ॥४२॥ प्रातःस्नानें आटोपून । एकत्र जमले सर्वजण । राजा जनक, ब्राह्मण । भरतासह ॥४३॥ आज असे शुद्ध दिन । ऐसें अंतरीं जाणून । सांगाया रघुनंदन । संकोच करी ॥४४॥ वसिष्ठ, जनक, भरत । पाहून सभा समस्त । भूमीस पाही रघुनाथ । संकोचें पुन्हां ॥४५॥ ती शालीनता पाहून । मनीं म्हणती सभाजन । "संकोची रामासमान । स्वामी न कुठें" ॥४६॥ श्रीरामाचें मनोगत । जाणून चतुर भरत । धैर्य धरून मनांत । सप्रेम उठे ॥४७॥ करूनिया प्रणिपात । म्हणे जोडूनिया हात । "पुरविले नाथें समस्त । मन्मनोरथ ॥४८॥ साहिला मजकारणें

सर्वहि त्रास प्रभूने । भोगिलें बहुपरीनें । दुःख स्वयें ॥४९॥ स्वामिन् ! आतां येथून । आज्ञा द्या मजलागून । अयोध्येची सेवा करीन । अवधीवरी ॥५०॥ ज्या उपायेंकरून । सेवक हा दीनजन । दीनदयाळा ! बघेन । पाय पुन्हां ॥५१॥ चौदा वर्षेपर्यंत । ऐशा कांहीं आज्ञेप्रत । द्यावें हे अयोध्यानाथ ! । कृपाळुवा ॥५२॥ अयोध्येचे नागरिक । कुटुंबी, प्रजा सकळिक । तुजपाशीं यांचें निष्कलंक । प्रेमनातें ॥५३॥ तुझ्यास्तवचि चांगला । दुःखदाह संसारांतला । तुजविण व्यर्थ लेखिला । मोक्षलाभ ॥५४॥ तूं तों स्वामी ! सर्वज्ञचि । सर्वहि जाणसी भक्तांची । राहणी, लालसा, रुचि । हृदयांतली ॥५५॥ सर्वांच्याहि प्रतिपाला । करिसी तूं प्रणतपाला ! । देवा ! सांभाळिसी मजला । उभयपक्षीं ॥५६॥ ऐसा मजला अंतरीं । विश्वास सर्वतोपरीं । याच विचारें खरोखरी । निश्चित मी ॥५७॥ माझ्या मनींची तळमळ । मदर्थ प्रभूची कळकळ । दोहींकडून केलें सबळ । बळेंचि मज ॥५८॥ हा मद्दोष भयंकर । स्वामिन् ! करावा दूर । निःसंकोच आज्ञा कर । सेवकातें" ॥५९॥ भरतविनय बघून । प्रशंसिती सर्वजण । नीरक्षीरविवेकगुण । हंसाचाच ॥६०॥ श्रीराम दीनवत्सल । ऐकून भरताचे बोल । जे निष्कपट केवल । विनययुक्त ॥६१॥ देशकालवर्तमान । या तिहींस अनुसरून । बोलता झाला प्रवीण । रामचंद्र ॥६२॥ "तुझी, माझी बाळा भरता ! । कुटुंब–गृह–वनाची चिंता । सद्गुरु आणि मिथिलानाथा । उभयांसहि ॥६३॥ गुरु वसिष्ठ, नृपवर । असती आपुल्या शिरावर । आपणां न क्लेशभार । स्वप्नांतहि ॥६४॥ तुझा, माझा पुरुषार्थ । सद्यश आणि स्वार्थ । तैसा धर्म, परमार्थ । सर्व कांहीं ॥६५॥ पित्याचें अनुशासन ।

पाळावें उभयतां मिळून । वेदीं, लौकिकीं भलेंपण । भूपा-चेंहि ॥६६॥ गुरु, माता, पिता, स्वामी । होतां तदाज्ञानुगामी । चालतां कुमार्गीं, भ्रमीं । न पडे पद ॥६७॥ हें विचारून अंतरीं । शोक टाकूनिया दुरी । अयोध्येचें राज्य करीं । अवधी-वरी ॥६८॥ देश, कोश, नारीनर । तैसा कुटुंब–परिवार । या सर्वांचाहि भार । गुरुपदरजीं ॥६९॥ सद्‌गुरु, सचिव, जननी । यांची आज्ञा पाळुनी । पृथ्वी, प्रजा, राजधानी । सांभाळ तूं ॥७०॥ मुख्य तो मुखासमान । अवश्य असावा जाण । कराया भोजन–प्राशन । एकचि तें ॥७१॥ जें सर्वंहि अंगांतें । पाळितें आणि पोषितें । करूनिया विचारातें यथायोग्य ॥७२॥ राजधर्माचें हें सार । इतुकेंच परि अगोचर । जैसा मनींचा विचार । मनींच गुप्त" ॥७३॥ परोपरीं रघुनंदन । करी भर-ताचें सांत्वन । परि न शांति–समाधान । आधाराविण ॥७४॥ भरतशील एकीकडें । गुरु, सचिव दुसरीकडें । प्रेम–संकोचीं सांपडे । रामचंद्र ॥७५॥ प्रभूनें कृपा करून । दिधल्या तैं पादुका दोन । भरतें केल्या धारण । आदरें शिरीं ॥७६॥ करुणानिधान जो का । त्याच्या पायींच्या पादुका । जणुं प्राणाच्या रक्षिका । प्रजेचिया ॥७७॥ भरत भक्तिस्वरूप रत्न । संपुष्ट पादुका त्या-लागून । कीं जीवोद्धारार्थ दोन । बीजाक्षरें ! ॥७८॥ कीं कुलाचीं कपाटें चोख । कर्मकौशल्याचे हस्तक । सेवाधर्माचे निष्कलंक । नेत्र दोन ! ॥७९॥ पादुकांचा लाभ होतां । हर्ष वाटे भरत-चित्ता । जणुं राहती राम–सीता । अयोध्येंत ! ॥८०॥ भरत मागे अनुज्ञेसी । प्रणाम करून पदांसी । राघवें त्या हृदयासी । कवटाळिलें ॥८१॥ देवेंद्र तो कुटिलधी । सकल जनांची बुद्धि । उच्चाटीतसे, संधि । साधूनिया ॥८२॥ इंद्राची कुटिलता परि ।

पडे सर्वांच्या पथ्यावरी। उद्‌भवली अवधीवरी। जीवनाशा ॥८३॥ न तरी सीता–राम–लक्ष्मण–। वियोग–रोगेंकरून। सोडिते लोक प्राण। हळहळुनी ॥८४॥ परि श्रीरामकृपें। कठिण जें, तें होय सोपें। कौटिल्य झालें गुणरूपें। सहाय्यक ॥८५॥ निज बाहूंनीं रघुनाथ। भेटतसे भरताप्रत। तो प्रेमरस अत्यद्‌भुत। अकथनीय ॥८६॥ कायावाचामनासवें। प्रेम उचंबळलें जवें। धीर सोडिला राघवें। धुरंधरें ॥८७॥ प्रभुनेत्र–कमलांतुनी। अश्रु वाहती त्या क्षणीं। तें प्रेम पाहतां सचित मनीं। देवसभा ॥८८॥ मुनिवृंद, वसिष्ठनाथ। जनकासम धैर्यवंत। मनःसुवर्ण ज्ञानाग्नींत। कसिलें ज्यांनीं ॥८९॥ विधिनिर्मित सृष्टींत। जे का सर्वदा अलिप्त। जसें कासार–जलांत। पद्मपत्र ॥९०॥ तेहि त्या समयाप्रति। श्रीरामभरत–प्रीति। अनुपम, अपार अति। पाहूनिया ॥९१॥ प्रेमप्रभावें सर्वजण। कायावाचामनेंकरून। विवेक वैराग्य असून। मग्न झाले ॥९२॥ जनकवसिष्ठांची मति। केली जिनें कुंठित गति। ती म्हणतां संसारी नीति। महादोष ॥९३॥ रामभरत–वियोगास। वर्णूं जातां बहुवस। कठोर म्हणतील कवीस। ऐकून जन ॥९४॥ तो संकोच, तो रस। वर्णवेना सद्वाणीस। आठवितां त्या प्रेमास संकोचे ती ॥९५॥ श्रीराम भरता भेटून। करी त्याचें समाधान मग आलिंगी हर्षून। शत्रुघ्नातें ॥९६॥ जाणून भरत-मनोगत। सचिव, सेवक, समस्त। आपापल्या कार्यीं रत। होती तदा ॥९७॥ दोन्ही समाजांभीतरीं। दुःख तेव्हां झालें भारी। करिती सिद्धता सारी। निघावयाची ॥९८॥ उभयतां भरत-शत्रुघ्न। प्रभुपदाब्ज वंदून। निघाले रामाज्ञा करून। शिरसा मान्य ॥९९॥ मुनीश्वर–तपस्व्यांसी। त्याचपरीं वनदेवींसी।

आदरें प्रार्थिती सर्वांसी । पुनःपुन्हां ॥१००॥ उभयतां लक्ष्मणाप्रति । भेटून प्रणाम करिती । पदरज शिरीं धरिती । जानकीचें ॥१०१॥ मंगलाचें अधिष्ठान । सर्वांचेंहि आशीर्वचन । ऐकून प्रेमेंकरून । निघते झाले ॥१०२॥ लक्ष्मणासहवर्तमान । वंदी जनका रघुनंदन । बहुप्रकारें प्रशंसून । प्रार्थीतसे ॥१०३॥ "वश होऊन दयेप्रत । दुःख पावलां अत्यंत । वनीं परिवारासहित येऊनिया ॥१०४॥ आशीर्वादातें देऊन । नगरीं करावें गमन"। जनक धैर्य धरून । जाता झाला ॥१०५॥ मुनीश्वर, साधु, ब्राह्मण । त्या सर्वांतें सन्मानून । मानून हरिहरांसमान । पाठविलें ॥१०६॥ उभयतां रामलक्ष्मण । सासवांतेंहि भेटून । वंदून परतले, घेऊन । तदाशीष ॥१०७॥ वामदेव आणि कौशिक । जाबाली मुनिनायक । कुटुंबियांसह नागरिक । सच्छील मंत्री- ॥१०८॥ तयांच्या योग्यतेनुसार । वंदून संमानें सादर । लक्ष्मणासह रघुवीर । पाठवी सर्वां ॥१०९॥ स्त्री-पुरुष जे उत्तम । कनिष्ठ अथवा मध्यम । सर्वां संमानून राम । परतलासे ॥११०॥ कैकेयीच्या पदांप्रति । वंदीतसे रघुपति । मातृभावें शुद्ध प्रीतीं । भेटूनिया ॥१११॥ सजवून पालखी एक । पाठवी रघुनायक । सर्वहि संकोच-शोक । निवारुनी ॥११२॥ परिवार, मातापिता । सर्वांतें भेटून सीता । पवित्रप्रेमें पतिव्रता । परतलीसे ॥११३॥ सासवांतें वंदूनिया । भेटलीसे जनकतनया । प्रीति वर्णितां कविहृदया । उल्हास ना ॥११४॥ ऐकून तयांचा बोध । मिळवून आशीर्वाद । उभय-प्रीतींत संबद्ध । होय सीता ॥११५॥ पालख्या सुंदर अति । मागवून रघुपति । बसवी सर्व मातांप्रति । प्रबोधुनी ॥११६॥ वारंवार उभयतांनीं । मोकळ्या मनें भेटुनी । समप्रेमभावें

जननी । पाठविल्या ॥११७॥ वाहनें, अश्व आणि गज । नानापरीं करून सज्ज । जनक--भरताचा समाज । प्रयाण करी ॥११८॥ सीतालक्ष्मणासहित । हृदयीं राघवा चिंतित । चालले लोक समस्त । निश्चेष्टसे ॥११९॥ वृषभ, अश्व, वारण । पशुहि हृदयीं विषण्ण । करिती मार्गक्रमण । परवश-पणें ॥१२०॥ सती अरुंधतीसहित । वंदी गुरुपदाप्रत । सीता-लक्ष्मणासमवेत । रघुनाथ तो ॥१२१॥ हर्षामर्षसंयुक्त । तेधवां जाहलें चित्त । आपुल्या आश्रमाप्रत । परतलासे ॥१२२॥ (लोक धाडिले परत । तेणें प्रभु आनंदित । देव--कार्य उर्वरित । म्हणून खिन्न ॥१२३॥ ) निषादातें सन्मानुनी । परत पाठवी स्वस्थानीं । विरहें खिन्न तोहि मनीं । चाललासे ॥१२४॥ वनींचे कोल, किरात । भिल्लहि धाडिले परत । प्रभूस करून प्रणिपात । चालले ते ॥१२५॥ राम-लक्ष्मण-सीता सती । वट-वृक्षातलीं बैसती । प्रिय आप्तवियोगें होती । कष्टी मनीं ॥१२६॥ भरतसुखभावप्रेम । त्यापरी भाषण उत्तम । सीतालक्ष्मणा सांगे राम : प्रशंसुनी ॥१२७॥ कायावाचामनें प्रीति । अनुभूति आणि कृति । श्रीमुखें वर्णी रघुपति । प्रेमवशें ॥१२८॥ तेधवां खग, मृग, मीन । मनुष्यासहवर्तमान । चराचर होय खिन्न । चित्र-कूटीं ॥१२९॥ प्रेममग्न ती अवस्था । पाहून सुर रघुनाथा । पुष्पें वर्षून गृहकथा । निवेदिती ॥१३०॥ प्रभु वंदून दिवौकसां । देतसे पूर्ण भरवंसा । जाती स्वस्थलीं सहसा । निर्भयपणें ॥१३१॥ सीतालक्ष्मणासहित । चित्रकूटीं रघुनाथ । त्या आपुल्या आश्र-मांत । शोभतसे ॥१३२॥ भक्ति, वैराग्य, ज्ञान । त्रिवर्गाच्या रूपेंकरून । शरीर करून धारण । राहती जणुं ॥१३३॥ मुनि, ब्राह्मण, गुरुवर । भरत आणि मिथिलेश्वर । रामवियोगें दुःखा-

तुर । सर्वजण ॥१३४॥ प्रभूचे गुणानुवाद । स्वमनीं करीत सावध । मार्ग क्रमिती निःशद्व । मौनपणें ॥१३५॥ पार करून यमुनेस । उतरले परतीरास । घालविला तो दिवस । अन्ना-विणें ॥१३६॥ दुजे दिनीं तो परिवार । जाता झाला गंगापार । निषादें केला सत्कार । सर्वांचाहि ॥१३७॥ शरयूस ओलांडिती । गोमतींत स्नानें करिती । चवथे दिवशीं येती । अयो-ध्येस ॥१३८॥ चार दिवस अयोध्येंत । वास करी मिथिलानाथ । राज्ययंत्रणा व्यवस्थित । करिता झाला ॥१३९॥ गुरु वसिष्ठ-प्रधानावर । सोंपवून राज्यभार । जनक निघे सपरिवार । मिथिलेसी ॥१४०॥ नागरिक नारीनर । वसिष्ठाज्ञेनुसार । सुखें नांदती निरंतर । अयोध्येंत ॥१४१॥ व्हावया रामदर्शन । अयोध्येचे सकल जन । करिती नेमेंकरून । व्रतोपवास ॥१४२॥ वस्त्रालंकारासहित । त्यागून सुखभोगांप्रत । जगती अवधिपर्यंत । आशायुक्त ॥१४३॥ प्रधान-सत्सेवकांतें । निवेदन करितां भरतें । आज्ञेपरीं स्वकर्तव्यातें । पाळिती ते ॥१४४॥ मग शत्रुघ्ना-कारणें । आज्ञापिलें भरतानें । 'सकलमातृ-सेवा करणें । नित्य तुवां' ॥१४५॥ बाहून ब्राह्मणांप्रत । कर जोडूनियां भरत । विनयें करी प्रणिपात । सन्मानुनी– ॥१४६॥ बोले कीं, "अध-मोत्तम । कोणतेंहि असो काम । निःसंकोच दिनयाम । आज्ञा-पावें" ॥१४७॥ सपरिवार नागरिक । प्रजा बाहून सकळिक । शांतवून सर्व लोक । राहविले ॥१४८॥ मग निजानुजासहित । जाऊन गुरुगृहाप्रत । बद्धांजलि दंडवत । करून म्हणे– ॥१४९॥ "आज्ञेनुसार व्रतस्थ । राहीन मी सदोदित" । ऐकतां प्रेमपुल-कित । म्हणती मुनि– ॥१५०॥ "स्वयें तूं बोलसी जाणुनी । दाविसी जैसें वर्तुनी । धर्मसारभूत जनीं । होईल तें" ॥१५१॥

वसिष्ठांचा आशीर्वाद । प्राप्त होय सुबोध । बाहून ज्योतिषी वृंद । मुहूर्त साधी ।।१५२।। प्रभूच्या पादुका दोन्ही । स्वयें निजकरीं धरुनी । परम शुद्ध सिंहासनीं । स्थापन करी ।।१५३।। राम-माता, वसिष्ठमुनि । यांच्या पदांतें वंदुनी । तेंवि प्रमाण मानुनी । पादुकाज्ञा ।।१५४।। समीप नंदीग्रामांत । पवित्र पर्ण-कुटींत । धर्मधुरंधर भरत । वास करी ।।१५५।। जटा बांधूनिया शिरीं । वल्कलें धारण करी । भूमी खणून आंथरी । कुशा-सन ।।१५६।। वस्त्रालंकार, भूषणें । सकल सुखभोगाकारणें । त्यागिलें तनुवाङमनें । तृणापरीं ।। १५७ ।। अयोध्याधीशा पाहतां । भय वाटे शचीनाथा । धन-कोशातें विलोकितां । कुबेर लाजे ।।१५८।। त्याच नगरीं भरत । वास करी अनासक्त । जणुं चंपकोद्यानीं अभुक्त । चंचरिक ।।१५९।। ज्यांची रामावरी प्रीति । लक्ष्मीची भोगसंपत्ति । वमनापरी त्यागिती । भाग्यवंत ।।१६०।। श्रीरामाचा प्रीतिपात्र । स्वयें भरतराज पवित्र कठिण तद्व्रताचें मात्र । आश्चर्य नव्हें ।।१६१।। कलहंस आणि चातक । यांतें प्रशंसिती लोक । ऐश्वर्य आणि विवेक-। प्रभावेंचि ।।१६२।। ( स्वातीचेंच जल एक । प्राशन करील चातक । न तरी मरेल निःशंक । तृषाक्रांत ।।१६३।। दूध, पाणी झाल्या एक । त्यांची कराया वेगळीक । हंसावांचून विवेक । अन्य कोणा ? ।।१६४।। ) देह दिवसानुदिवस । व्रतें, नेमें होय कृश । वाढे तेजोबल विशेष । मुखशोभा ।।१६५।। रामप्रेम नवें नित । वाढतसे नेमव्रत । धर्मदल वृद्धिगत । विशुद्ध मन ।।१६६।। शरद्प्रभावानें जल । आटून होय निर्मल । पसरूनिया पद्मनाल । पुष्प विकसे ।।१६७।। शम, दम आणि संयम । उपवास, व्रत, नेम । नक्षत्रें पावती उद्गम । हृदाकाशीं ।।१६८।। विश्वास

तो ध्रुव नक्षत्र । अवधि पौर्णिमेची रात्र । प्रभुस्मृति विचित्र । तारकापुंज ॥१६९॥ रामप्रेमाचा निशाकर । निष्कलंक सदा स्थिर । नित्य शोभे सपरिवार । उत्कृष्टपणें ॥१७०॥ भरताची बुद्धिमत्ता । राहणी तैसी कर्तव्यता । गुण, भक्ति, विरक्तता । शुद्धैश्वर्य– ॥१७१॥ सत्कवीहि वर्णूं जाती । परि मनीं संकोचती । शेष–गणेश–सरस्वती । समर्थ ना ॥१७२॥ प्रभुपादुकांचें पूजन । करी नित्य नेमेंकरून । त्याच्या हृदयीं समावें न । परम प्रेम ॥१७३॥ आज्ञा मानून सादर । पालनीं होय तत्पर । विविध राज्य-कारभार । चालवी तो ॥१७४॥ सदा रोमांचित शरीर । हृदयीं सीता-रघुवीर । नेत्रीं प्रेमाश्रूंचा पूर । नाम मुखीं ॥१७५॥ सीता–लक्ष्मणासहित । वनीं वसे श्रीरघुनाथ । गृहींच राहुनी भरत । सर्वतोपरीं ॥१७६॥ त्याच्या नेमव्रता ऐकुनी । संकोच वाटे साधुजनीं । प्रत्यक्ष अवस्था पाहुनी । लाजती मुनि ॥१७७॥ भरताचें आचरण । पाहतां परम पावन । मधुर, सुंदर, कारण । मुदमंगलाचें ॥१७८॥ कलीचे क्लेश–पातक । कठिण परि त्या संहारक । महामोह-निशांतक । सूर्य जणुं ॥१७९॥ पापसमूह गज मत्त । त्यासी केसरी साक्षात् । सर्व दुःखांचा करी अंत । निश्चयेंचि ॥१८०॥ भक्तजनमनोरंजक । संसारभारभंजक । रामप्रेमेंदूचें निःशंक । सार जें का ॥१८१॥ सीताराम-प्रेमामृत । अंतर्बाह्य परिपूरित । अवतरतां न भरत । अवनीवरी- ॥१८२॥ शमदम आणि संयम । व्रतनेम कठिण परम । यांचें आचरण दुर्गम । मुनिमनातें ॥१८३॥ दारिद्र्यदुःखतपन । दंभ, पाखंड, दूषण । कोण करिता निरसन । निज सद्यशें? ॥१८४॥ या कठिण कलिकालांत । नजममान मूर्खाप्रत । कोण करितें निश्चित । रामसन्मुख? ॥१८५॥

म्हणती श्रीतुलसीदास । करून नित्यनेमास । सादर भरत-चरितास । ऐकती जे– ॥१८६॥ संसाररसीं विरक्ति । प्राप्त होऊन त्यांप्रति । सीतारामपद-प्रीति । पावती ते ॥१८७॥ (श्रीरामचरितमानस । विहंगराज राजहंस । गोस्वामी तुलसी-दास । ग्रंथकर्ते– ॥१८८॥ स्वस्ति श्रीमानस–विहार । तुलसी-रामायणाचें सार । द्वितीय सोपान सुखकर । भाविकांतें ॥१८९॥ मानस उत्तुंग परम । सोपान केले सुगम । वाटती तेहि दुर्गम । भाविकांतें ॥१९०॥ माझी टीका ही मराठी । हीच टेकावया काठी । ऐशा अशक्तांसाठीं । योजिली मीं ॥१९१॥ सोपानींचा मार्ग भला । जरी दीर्घतम वाटला । तदर्थ सोळावा योजिला । विश्राम हा ॥१९२॥ रसिक भाविक श्रोत्यांस । विनवीतसे देवीदास । माझ्या बोबड्या बोलांस । मान्य करा ॥१९३॥)

इति श्रीमद्रामचरितमानसे सकलकलिकलुष-
विध्वंसने द्वितीयः सोपानः समाप्तः

---

तो ध्रुव नक्षत्र । अवधि पौर्णिमेची रात्र । प्रभुस्मृति विचित्र । तारकापुंज ॥१६९॥ रामप्रेमाचा निशाकर । निष्कलंक सदा स्थिर । नित्य शोभे सपरिवार । उत्कृष्टपणें ॥१७०॥ भरताची बुद्धिमत्ता । राहणी तैसी कर्तव्यता । गुण, भक्ति, विरक्तता । शुद्धैश्वर्य- ॥१७१॥ सत्कवीहि वर्णूं जाती । परि मनीं संकोचती । शेष–गणेश–सरस्वती । समर्थ ना ॥१७२॥ प्रभुपादुकांचें पूजन । करी नित्य नेमेंकरून । त्याच्या हृदयीं समावें न । परम प्रेम ॥१७३॥ आज्ञा मानून सादर । पालनीं होय तत्पर । विविध राज्य-कारभार । चालवी तो ॥१७४॥ सदा रोमांचित शरीर । हृदयीं सीता-रघुवीर । नेत्रीं प्रेमाश्रूंचा पूर । नाम मुखीं ॥१७५॥ सीता–लक्ष्मणासहित । वनीं वसे श्रीरघुनाथ । गृहींच राहुनी भरत । सर्वतोंपरीं ॥१७६॥ त्याच्या नेमव्रता ऐकुनी । संकोच वाटे साधुजनीं । प्रत्यक्ष अवस्था पाहुनी । लाजती मुनि ॥१७७॥ भरताचें आचरण । पाहतां परम पावन । मधुर, सुंदर, कारण । मुदमंगलाचें ॥१७८॥ कलीचे क्लेश–पातक । कठिण परि त्या संहारक । महामोह-निशांतक । सूर्य जणुं ॥१७९॥ पापसमूह गज मत्त । त्यासी केसरी साक्षात् । सर्व दुःखांचा करी अंत । निश्चयेंचि ॥१८०॥ भक्तजनमनोरंजक । संसारभारभंजक । रामप्रेमेंदूचें निःशंक । सार जें का ॥१८१॥ सीताराम-प्रेमामृत । अंतर्बाह्य परिपूरित । अवतरतां न भरत । अवनीवरी- ॥१८२॥ शमदम आणि संयम । व्रतनेम कठिण परम । यांचें आचरण दुर्गम । मुनिमनातें ॥१८३॥ दारिद्र्यदुःखतपन । दंभ, पाखंड, दूषण । कोण करिता निरसन । निज सद्यशें? ॥१८४॥ या कठिण कलिकालांत । जडमसान मूर्खाप्रत । कोण करितें निश्चित । रामसन्मुख? ॥१८५॥

म्हणती श्रीतुलसीदास । करून नित्यनेमास । सादर भरत-चरितास । ऐकती जे- ॥१८६॥ संसाररसीं विरक्ति । प्राप्त होऊन त्यांप्रति । सीतारामपद-प्रीति । पावती ते ॥१८७॥ (श्रीरामचरितमानस । विहंगराज राजहंस । गोस्वामी तुलसी-दास । ग्रंथकर्ते- ॥१८८॥ स्वस्ति श्रीमानस-विहार । तुलसी-रामायणाचें सार । द्वितीय सोपान सुखकर । भाविकांतें ॥१८९॥ मानस उत्तुंग परम । सोपान केले सुगम । वाटती तेहि दुर्गम । भाविकांतें ॥१९०॥ माझी टीका ही मराठी । हीच टेकावया काठी । ऐशा अशक्तांसाठीं । योजिली मीं ॥१९१॥ सोपानींचा मार्ग भला । जरी दीर्घतम वाटला । तदर्थ सोळावा योजिला । विश्राम हा ॥१९२॥ रसिक भाविक श्रोत्यांस । विनवीतसे देवीदास । माझ्या बोबड्या बोलांस । मान्य करा ॥१९३॥)

इति श्रीमद्रामचरितमानसे सकलकलिकलुष-
विध्वंसने द्वितीयः सोपानः समाप्तः

---